# महात्मा गांधी

लेखक

श्री. सीताकांत

—:*:—

" यज्ञाला स्वतः मनुष्यरूप घ्यावेसें वाटलें
आणि तो गांधींच्या रूपानें अवतरला "

—डॉ. रवींद्रनाथ टागोर

प्रस्तावना लेखक

बॅरिस्टर मुकुंद रामराव जयकर

प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी

६२१ गिरगांवरोड, मुंबई

१८ फेब्रुवारी १९२४

किंमत सव्वादोन रुपये

गणेश महादेव वीरकर यांनी
'साहित्यसेवक' छापखाना, ९५-९७ गिरगांव बॅकरोड, मुंबई
येथें छापून
गणेश महादेव आणि कंपनी, ६२१ गिरगांव रोड, मुंबई
येथें प्रसिद्ध केलें.

# अनुक्रमणिका



# प्रस्तावना.

—:*:—



श्री. सीताकांत यांनीं लिहिलेलें महात्मा गांधी यांचें चरित्र मी वाचून पाहिलें आहे. या चरित्रामुळें श्री. सीताकान्त यांच्या ग्रंथकर्तृत्वाच्या लौकिकांत भरच पडणार आहे इतर लेखकांनीं लिहिलेलीं महात्माजींचीं बरींच चरित्रें मी वाचलेलीं आहेत; प्रस्तुत चरित्रकारांनीं महात्मा गांधी हा एक अवतारी पुरुष आहे अशा दृष्टीनें त्यांच्या जीवनाचें विवेचन केलेलें नाहीं; मधुर वैशिष्ट्य व दाक्षिण्यपूर्ण सत्यवक्तेपणा हे गुण महात्माजींचे ठिकाणीं कसे परिणत होत गेले आणि आयुष्याच्या वेगवेगळ्या अवस्थांमधून जात असतांना महात्माजींची घडवणूक कसकशी होत गेली, यांची मीमांसा प्रस्तुत चरित्रकारांनीं केवळ कार्यकारणभावाच्या पद्धतीनें लावलेली आहे; प्रस्तुत चरित्र आणि इतर चरित्रें यांमध्यें असलेला मुख्य भेद तरी हाच आहे. महात्मा गांधींचे ठायीं भारतीय संस्कृतीचा पूर्ण विकास झालेला आहे, अशा भावना त्यांचे अनुयायी व टीकाकार हे दोघेहि प्रकट करीत असतात. अशा प्रकारच्या वर्णनांमध्यें स्तुति ओतप्रोत भरलेली असली तरी त्यामुळें दिशाभूल मात्र व्हावयाचा संभव असतो. महात्मा गांधींच्या चरित्रांतील अभिप्रेत अर्थ समजावून घेणें आणि निःपक्षपातपूर्वक चिकित्साबुद्धीनें अभ्यास करून त्यांच्या वैशिष्ट्याचें आदिकारण हुडकून काढणें हल्लींच्या दिवसांत विशेषच आवश्यक आहे. दृढनिश्चय व दयार्द्रता या दोन गुणांचा त्यांचे ठायीं मधुर मिलाफ

झालेला आहे. त्यांचीं मतें प्रगमनशील आहेत तरीही परंपरेशीं एकदम फटकून रहावयास ते तयार नाहींत; त्यांचें आत्मदमनाचें सामर्थ्य मोठें आहे त्याचप्रमाणें सहिष्णुताहि विशाल आहे. महात्माजींच्या स्वभावांत अशा परस्परविरोधी तत्वांचा मिलाफ झालेला असल्यामुळें वेगवेगळ्या परिस्थितींतील व्यक्तींनी त्यांचेविषयीं भिन्न भिन्न अभिप्राय प्रकट केले आहेत. सत्यवादित्वाप्रमाणेंच दूरदर्शीपणाबद्दलहि त्यांची ख्याति आहे; अनेकांकडून अग्रपूजेचा मान घेणाऱ्या व्यक्तींवर शितोंडे उडविणारे लोकहि थोडे नसतात—महात्माजींबद्दल या दोनहि भावना अतिरेकाला पोंचलेल्या आहेत. अशा परस्परविरोधी स्वभावघटकांचें एकीकरण झालें याला बुद्धिगम्य असें कांहीं तरी कारण असलेंच पाहिजे हें उघड आहे; नाहींतर सृष्टिदेवतेच्या हातून हें चमत्कृतिजन्य मिश्रण केवळ यदृच्छेनें घडून आलें असेंच मानल्याशिवाय या प्रश्नाचा उलगडा होत नाहीं. प्रस्तुत चरित्रांत लेखकानें चरित्रनायकाच्या माहात्म्याचें रहस्य शोधून काढावयाचा मार्मिक यत्न केलेला आहे. महात्माजींचे अंगीं आज दिसून येणारें माहात्म्य बाल्यगांतहि त्यांचे ठिकाणीं बीजरूपानें निवास करीत होतें कीं काय याचा लेखकानें विचार केलेला आहे. आनुवंशिक संस्कार व बाह्य परिस्थिति यांचा त्यांच्या चारित्र्यावर काय परिणाम झालेला असावा यांचेंहि अनुमान लेखकानें काढलें आहे. लेखकाचा हा प्रयत्न चांगलेपणीं यशस्वी झालेला आहे. प्रस्तुतचा एवढासा ग्रंथ वाचल्यानंतर वाचकाला महात्माजींबद्दल अगोदरपासूनच वाटणारा आदर द्विगुणित होतो; महात्माजींच्या आयुष्यांत जे प्रसंग घडून आले त्यांचें ज्ञान होतांच दिसून

येतें कीं, या घडामोडीमुळेंच त्यांचे अंगींच्या नैसर्गिक माहात्म्याचा विकास झाला. गांधीजींच्या माहात्म्याचे वेगवेगळे घटक स्पष्ट करून दाखवावयासाठीं लेखकानें त्यांच्या जीवनांतील अनेक प्रसंग नमूद केले आहेत.

प्रस्तुत चरित्राच्या लेखकाची भाषा मोहक असून तिचा ओघ अप्रतिहत गतीनें चाललेला आहे असें वाटतें. भाषेची योजना प्रसंगाच्या अनुरोधानें केलेली असल्यामुळें भाषेच्या विशेषच माधुर्य आलेलें आहे. या पुस्तकाच्या वाचनानें महाराष्ट्र जनतेला महात्माजींच्या चरित्रांतील प्रसंगांचें स्पष्ट ज्ञान होईल. मोठ्या माणसांना अवतारी पुरुष मानून स्वस्थ बसण्यांत मोठी हानि आहे; कारण अवतारी पुरुष हे मानवी कार्य व आकांक्षा यांच्या पलीकडचे असतात. महापुरुषांना मानवी उत्क्रांतीच्या मांडणींत योग्य स्थान मिळाल्यानंतर दैनिक व्यवहार चोखपणें बजावल्यास व्यक्तीला असें यश मिळविणें अशक्य नाहीं हें मनाला पटल्यानंतरच अशा व्यक्तींना आदर्शभूत मानल्यामुळें समाजाचा व व्यक्तींचा उद्धार होतो. या दृष्टीनें पाहिलें असतां श्री. सीताकांत यांनीं महात्मा गांधी यांचें हें चरित्र लिहून मराठी चरित्रवाङ्मयांत मोठीच भर घातली आहे असेंच मला वाटतें.

मुंबई,
ता. १३।२।२४.

मु. रा. जयकर.

# गणेश महादेव आणि कंपनीचीं पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | स्वराज्याचा श्रीगणेशा. | २-४-० |
| २ | स्वराज्याची घटना. | २-४-० |
| ३ | स्वराज्याची स्थापना. | २-४-० |
| ४ | स्वराज्याचा कारभार. | २-४-० |
| ५ | स्वराज्यावरील संकट. | २-४-० |
| ६ | मराठी रियासत, मध्य वि. ३ | २-४-० |
| ७ | ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध. | ३-८-० |
| ८ | श्रीएकनाथ चरित्र. | ०-१२-० |
| ९ | अजिंक्य तारा. | १-८-० |
| १० | भक्तिमणिमाला. | १-८-० |
| ११ | निकोलाय लेनिन. | ०-१२-० |
| १२ | ग्रेट ब्रिटनची शासनपद्धति. | ०-१०-० |
| १३ | नवजीवन ( नाटक ) | ०-१०-० |
| १४ | जोसेफ मॅझिनी. | २-०-० |
| १५ | महात्मा गांधी. | २-४-० |
| १६ | मानवी कर्तव्यें. | १-०-० |
| १७ | माधवानुज ( कविता ) | २-०-० |

## इतर पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | मराठी रियासत, पूर्वार्ध. | ३-८-० |
| २ | मराठी रियासत, मध्य वि० २ | ३-०-० |

# प्रकाशकाचे दोन शब्द.

श्री. सीताकान्त यांनीं लिहिलेलें महात्मा गांधी यांचें चरित्र महाराष्ट्र वाचकांना सादर करतांना आज आम्हांस विशेष आनंद होत आहे. प्रस्तुत चरित्र प्रसिद्ध करावयाचें ठरविलें तेव्हां महात्माजी बंधमुक्त होतील अशी कल्पना कोणाच्या स्वप्नींहि येणें शक्य नव्हतें. पण कल्पनासृष्टींत मनुष्य जे प्रसंग विशेष आश्चर्यकारक म्हणून रंगवितो त्यापेक्षांहि अधिक चमत्कृतिजन्य प्रसंग प्रत्यक्ष व्यवहारांत घडून आलेले आपणांस कधीं कधीं दिसून येतात. महात्माजींची सुटका हा असाच एक प्रसंग आहे; आपणां सर्वांच्या अंतर्यामींची जी उत्कट इच्छा ती अशा अकल्पित रीतीनें पूर्ण झालेली असल्यामुळें सर्वांसच अपरिमित आनंद झालेला आहे; आणि अशा या आनंदोत्सवाच्या महिन्यांतच प्रस्तुत चरित्र प्रसिद्ध होण्याचा योग यावा ही गोष्ट विशेषच भाग्याची होय.

महात्माजी दोन वर्षांपूर्वी तुरुगांत गेले त्यावेळींच त्यांच्या सार्वजनिक कार्यांत खंड पडला, आणि तोंपर्यंतचाच भाग प्रस्तुत चरित्रांत आलेला आहे. बंधमुक्त झाल्यानंतरहि प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें महात्माजींना सार्वजनिक कार्यांत भाग घेतां येणें निदान कांहीं कालपर्यंत तरी अशक्य झालें आहे. पूर्ववत् शरीरस्वास्थ्य प्राप्त होतांच महात्माजी काय करणार याकडे आज हिंदुस्थान डोळे लावून बसलें आहे. महापुरुषांचें आयुष्य व कार्य सदोदित विकास पावत असतें आणि म्हणूनच आज प्रसिद्ध होणारें हें चरित्र लवकरच अपूर्ण होईल असा संभव आहे–आणि असें व्हावें यांतच आमचा आनंद आहे.

बंधमुक्त होतांच मौलाना महंमदअली यांना महात्माजींनीं पाठविलेल्या पत्राचा मसुदा पुढें दिलेला आहे. पुस्तक हाताबाहेर जाईपर्यंत देववेल तितकी माहिती देणें हें प्रकाशक या नात्यानें आमचें कर्तव्य असल्यामुळें श्री. सीताकांत यांच्या गैरहजिरींत आम्ही आमच्या जबाबदारीवरच हा मजकूर जोडलेला आहे.

बॅ. जयकर यांनीं आपला अमूल्य वेळ खर्च करून प्रस्तुत चरित्रास प्रस्तावना लिहून दिली याबद्दल त्यांचे मानावे तेवढे आभार थोडेच होणार आहेत. प्रस्तुत प्रस्तावनेनें सदरहू चरित्रास विशेषच शोभा आली हें निर्विवाद आहे.

असो. आमची ही सेवा महाराष्ट्र वाचकांना मान्य होईल अशी आशा आहे.

प्रकाशक.

मायर्स पंप्स

व

ऑइल इंजिन्स् आऊंत, खतें वगैरे

मिळण्याचें विश्वसनीय ठिकाण

धों. लिमये ब्रदर्स लिमिटेड

हमाम स्ट्रीट, फोर्ट मुंबई.

# महात्मा गांधींचा ताजा संदेश.

(मौ० महम्मद अल्ली यांना पाठविलेलें पत्र.)

सासून हॉस्पिटल, पुणें.
ता. ७ फेब्रुवारी, १९२४.

प्रिय मित्र आणि बंधु,

कॉंग्रेसचे अध्यक्ष आणि पर्यायानें देशाचे प्रतिनिधी या नात्यानें मी हें पत्र आपणांस लिहीत आहें. माझ्या अनपेक्षित बंधमुक्ततेनंतर आपले देशबांधव माझे चार शब्द ऐकावयास उत्सुक आहेत ही जाणीव मनांत बाळगूनच हे शब्द मी लिहीत आहें.

आजारीपणामुळें ठरलेल्या मुदतीच्या आंत सरकारनें मला बंधमुक्त केलें याबद्दल मला फार खेद होत आहे. कैदी आजारी पडला म्हणून त्याला सरकारनें बंधमुक्त केलेंच पाहिजे असें मला वाटत नाहीं, आणि म्हणूनच या असल्या सुटकेमुळें मला आनंद वाटणें शक्य नाहीं.

माझ्या आजारीपणांत तुरुंगांतील व इस्पितळांतील अधिकाऱ्यांनीं माझी फार काळजी घेतली हें मी अत्यंत कृतज्ञतेनें तुम्हांस आणि तुमच्या मार्फत लोकांना कळवीत आहें. माझें दुखणें विकोपास जात आहे असा संशय येतांच येरवड्याच्या तुरुंगाचे सुपरिंटेंडेंट कर्नल मरे यांनीं कर्नल मॅडॉक यांना तांतडीनें बोलावणें पाठविलें आणि माझ्या आजारावर शक्य ते उपचार करण्याची तजवीज केली. अत्यंत तांतडीनें सासून हास्पिटलमध्यें माझी रवानगी केली व त्यांचे हाताखालील मंडळींनीं अतिशय काळजीनें माझी शुश्रूषा केली. बहिणीप्रमाणें माझी शुश्रूषा करणाऱ्या नर्सेसचा उल्लेख केल्यावांचून मला राहवत नाहीं. आतां मी बंधमुक्त झालेला आहें व हें इस्पितळ सोडून जाण्यास मला पूर्ण मोकळीक आहे तरी दुसऱ्या ठिकाणीं येथल्यापेक्षां अधिक चांगली व्यवस्था लागणें शक्य नसल्यामुळें कर्नल मॅडॉक यांच्या परवानगीनें जखम भरून येईपर्यंत आणि औषधोपचारांची जरूरी नाहींशी होईपर्यंत मी त्यांचेच उपचार चालू ठेवावयाचें ठरविलें आहे.

कांहीं काळपर्यंत तरी मला प्रत्यक्ष कार्यांत भाग घेतां येणे शक्य नाहीं हें लोकांना सहजच समजणार आहे. मी लवकर कार्याला लागावें अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं मला भेटावयाची आपली इच्छा थोडे दिवस दाबून ठेवावी. मी आज अगदीं अशक्त झालेला आहें. आणि अनेक लोकांची भेट घेण्याइतकी ताकद आणखी कांहीं दिवस माझ्या अंगांत येणें शक्य नाहीं. माझ्या स्नेह्यांनीं माझी भेट घ्यावयासाठीं आपला वेळ फुकट न घालवितां तोच वेळ चालू राष्ट्रकार्यांत आणि विशेषत: सूत कातण्यांत खर्च केला तर त्यामध्येंच मला विशेष आनंद होणार आहे.

बंधमुक्ततेमुळें माझ्या मनाला स्वास्थ्य प्राप्त झालेलें नाहीं. बंदिवासांत माझे शिरावर राष्ट्रकार्याचा भार नव्हता; तुरुंगाचे नियम पाळणें आणि लोकसेवेसाठीं स्वत:ची कार्यक्षमता वाढविणें एवढीच जबाबदारी माझे शिरावर होती, पण आतां राष्ट्रकार्याचा भार माझ्यावर येऊन पडला आहे, मात्र हा भार वाहण्याचें सामर्थ्य माझे अंगीं अजून आलेलें नाहीं, मजवर अभिनंदनपर संदेशांचा वर्षाव होत आहे. माझ्या देशबांधवांचें मजवर प्रेम आहे याचा हा आणखी एक पुरावा आहे. या संदेशांमुळें मला समाधान वाटलें. या संदेश पाठविणारांपैकीं कांहींजण मजकडून एवढ्या मोठ्या कार्याची अपेक्षा करीत आहेत कीं त्यामुळें माझी छाती अगदीं दडपून गेली आहे. मजपुढें असलेलें कार्य पार पाडण्यास मी असमर्थ आहें ह्या विचारानें माझा सर्व गर्व नष्ट झाला आहे.

देशांतील हल्लींच्या परिस्थितीबद्दल सूक्ष्म ज्ञान मला अद्यापि झालेलें नाहीं; बार्डोलीच्या सुमारास राजकारण जितकें गुंतागुंतीचें झालें होतें त्यापेक्षांहि आजची परिस्थिती अधिक बिकट आहे हें मात्र मला उमगलें आहे. हिंदु, मुसलमान, शीख, पारशी व ख्रिश्चियन यांच्या एकजुटीशिवाय स्वराज्याच्या गप्पा वायफळच ठरणार. १९२२ सालीं हिंदुस्थानांत एकजूट झाली आहे अशी माझी भोळी कल्पना होती. पण आज निदान हिंदुमुसलमानांतील एकीचा तरी भंग झालेला आहे. परस्पर विश्वासाचे जागीं परस्पर अविश्वास मात्र निर्माण झाला आहे. स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं अभेद्य प्रेमबंधन आवश्यक आहे. माझ्या सुटकेनिमित्त आभारप्रदर्शनार्थ ज्या सभा भरतील त्यांत हें प्रेमबंधन निर्माण करण्याचा प्रयत्न होईल काय?

डॉक्टरी उपचारानें किंवा विश्रांतीनें माझी प्रकृति सुधारावयास बरेच दिवस लागतील, पण राष्ट्रामध्यें एकजूट झाली आहे अशी बातमी कानीं येताच माझी

प्रकृति तातडीनें बरी होईल. हिंदु व मुसलमान यांमध्यें तेढ उत्पन्न झाली आहे असें तुरुंगांत माझ्या कानीं आलें तेव्हां माझी छाती दडपून गेली. विश्रांति घेतल्यास मी बरा होईन असें डॉक्टरांनीं मला सांगितलें आहे, पण राष्ट्रांतील फाटाफुटीचा भार मनावर असतांना या विश्रांतीचा उपयोग होणें शक्य नाहीं. मजवर ज्या कोणाचें प्रेम असेल त्यांनीं या प्रेमशक्तीचा उपयोग राष्ट्रामध्यें ऐक्य घडवून आणण्याकडे करावा. हें कार्य अत्यंत बिकट आहे हें मला माहीत आहे, पण परमेश्वरावर जिवंत श्रद्धा असेल त्यांना कोणतेंच कार्य जड नाहीं. आपल्या दुबळेपणाचें यथार्थ ज्ञान प्राप्त करून घेऊन आपण परमेश्वराची करुणा भाकली तर तो आपणास साह्य केल्यावांचून राहणार नाहीं. भीति हा दुबळेपणा आहे आणि भीतिमुळेंच अविश्वास उत्पन्न होतो. आपण भीतीचा त्याग करूं या; आपणांपैकीं एक पक्ष जरी भीतीपासून मुक्त झाला तरी आपली सर्व भांडणें खात्रीनें मिटून जातील. एकीसाठीं तुमचे हातून होणाऱ्या प्रयत्नामुळेंच तुमच्या अध्यक्षत्वाच्या कारकीर्दीची किंमत ठरावयाची आहे. आपलें एकामेकांवर सख्या भावांसारखें प्रेम आहे हें मला माहित आहे म्हणून ही जबाबदारी वाहण्यांत मला मदत करून तुम्ही मला आजारांतून उठण्यास मदत कराल अशी आशा आहे.

देशाच्या दारिद्र्याची यथार्थ कल्पना मनांत आणली आणि त्यावर चरखा हा एकच उपाय आहे हें जर आपणाला पटलें तर आपणांस भांडत बसावयास वेळच मिळणार नाहीं. गेल्या दोन वर्षांत विचार करावयास मला भरपूर आणि निवांत वेळ मिळाला होता. या विचारामुळें बारडोलीचा कार्यक्रम म्हणजेच—जातीजातींमधील ऐक्य, चरखा, अस्पृश्यतानिवारण, विचार, आचार व कृति यांमध्यें अहिंसावृत्तीचा अवलंब हाच स्वराज्य प्राप्तीचा मार्ग होय अशी माझी खात्री झाली आहे हा कार्यक्रम आपण पूर्णपणें आणि प्रामाणिकपणें पार पाडला तर कायदेभंग करावयाची जरूरच पडणार नाहीं आणि कायदेभंग करण्याचा प्रसंग येणार नाहीं अशी मला आशा आहे. तरी एकांतांत प्रार्थनापूर्वक केलेल्या विचारानें कायदेभंगाच्या कार्यक्षमतेवरील माझा विश्वास यत्किंचितहि ढळला नाहीं. अस्तित्वावर संकट आलेलें असतांना कायदेभंग करणें हा व्यक्तीचा व राष्ट्राचा हक्क व कर्तव्य आहे याबद्दल माझा विश्वास दृढतर झालेला आहे. लढाईपेक्षां कायदेभंगांत धोका कमी आहे कारण कायदेभंगाच्या

यशामुळें सत्याग्रही व सैतान या दोघांचाहि उद्धार होतो. आणि लढाईमुळें जित व जेते या दोघांचाहि घात होतो.

लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें व असेंब्ली या संस्था काँग्रेसवाल्यांनीं काबीज केल्या–या चुरशीच्या प्रश्नाबद्दल मी आपलें मत प्रदर्शित करावें अशी तुमची अपेक्षा नसेलच. कौन्सिलें, कोर्टें व सरकारी शाळा यांवरील बहिष्कारासंबंधींचीं माझी पूर्वीचीं मतें अजून कायमच आहेत. पण दिल्ली येथें झालेल्या फेरफाराबद्दल निश्चित मत ठरविण्यास पुरेशी माहिती अजून मला उपलब्ध झालेली नाहीं. देशाच्या कल्याणासाठीं कौन्सिलांवरील बहिष्कार दूर करावयाचा ज्या पुढाऱ्यांनीं सल्ला दिला त्यांचेबरोबर या प्रश्नासंबंधीं वाटाघाट करीपर्यंत या प्रश्नासंबंधीं कोणतेंही मत प्रगट करावयाचा माझा विचार नाहीं.

शेवटीं मला अभिनंदनपर संदेश पाठविणाऱ्या असंख्य लोकांचे आभार तुमच्या मार्फत मी मानीत आहें. प्रत्येकाला वेगवेगळें उत्तर पाठविणें अशक्य आहे. या संदेशापैकीं कांहीं आपल्या नेमस्त मित्रांकडून आलेले आहेत याबद्दल मला फार आनंद झाला आहे. माझें व इतर असहकारितावाद्यांचें त्यांचे बरोबर कोणत्याहि प्रकारचें भांडण नाहीं.देशाचें हित त्यानाही हवेंच आहे आणि आपापल्या समजुतीप्रमाणें ते देशसेवा करीतच आहेत. ते चुकत आहेत असें जर आपणांस वाटत असेल तर त्यांना आपण स्नेहबुद्धीनें आणि सतत वादविवादानें आपले बाजूस वळविलें पाहिजे. शिव्या शापांच्या वर्षावानें ते जिंकले जाणार नाहींत. इंग्रजांनाहि आपण आपले स्नेही समजलें पाहिजे, त्यांना शत्रु लेखून त्यांचेबद्दल आपण गैरसमज करून घेतां कामा नये. आज सरकारबरोबर आपलें भांडण आहे हें भांडण प्रचलित राज्यपद्धतिबरोबर आहे, राज्यकारभार हाकणाऱ्या इंग्लिश व्यक्तींबरोबर नाहीं. आमचेपैकीं पुष्कळांना या गोष्टीची अजून जाणीव झालेली नाहीं, आणि म्हणूनच आजवर आमच्या कार्याला अपाय पोंचलेला आहे हें मी जाणून आहें.

आपला

जिवलग मित्र आणि बंधु

मो. क. गांधी.

# महात्माजींचा जयजयकार !

" आमच्या पौर्वात्य संस्कृतीचें अंतिम ध्येय गांधींच्या रूपानें अवतरलें आहे. * * * भविष्यत्काळीं जगाला नवें वळण लावण्याच्या कार्यांत गांधी यांजकडे मोठी महत्वाची भूमिका येणार आहे. "

" यज्ञाला स्वतः मनुष्यरूप घ्यावेंसें वाटलें आणि तो गांधींच्या रूपानें अवतरला. "

—डॉ. रवींद्रनाथ टागोर

" त्यांचें चारित्र्य इतकें पूर्णावस्थेला पोहोंचलें आहे कीं, अशा प्रकारचीं माणसें क्वचितच आपल्या नजरेस पडतात. किंबहुना हजार दोन हजार वर्षांत एखादाच प्राणी मानवकोटींत जन्म घेतो. "

—रे. जॉन हेन्स होम्स

" एका बाजूला वैभवशाली परंतु सत्ताहीन असा युवराज उभा आहे आणि त्याच्या सन्मुख एक दरिद्री, फक्त शुभ्र कटिवस्त्र नेसलेला आणि कांहीं पादत्राण सुद्धां नसलेला असा गृहस्थ उभा आहे. आज भरतभूमीचा खरा मालक हा भिकारी आहे. "

—मॅटिन–पॅरिस

" म. गांधींचे जितके अनुयायी आहेत तितके जगाच्या पाठीवर आजपर्यंतच्या इतिहासांत एकाहि व्यक्तीला मिळालेले नाहींत. ते आत्मिक शक्तीवांचून दुसरी कोणती शक्ति मानीत नाहींत, ह्यांतच त्यांचें महत्व आहे. जग जडवादानें होरपळून गेलें आहे व त्याला

अध्यात्मिक क्रांतीची तीव्र उत्कंठा लागून राहिली आहे. एका एशियाटिकानें ही उत्कंठा तृप्त करण्यास पुढें यावें ह्याबद्दल आम्हांला अत्यंत अभिमान वाटतो, "

—ओसाका मेनिची—जपानी दैनिक

" मनुष्यानें कर्तव्य काय आणि त्याचा मार्ग कोणत्या प्रकारें चोखाळला पाहिजे, ह्याचें ज्ञान महात्माजींचें जिवंत उदाहरण पाहून प्रस्तुत लेखकाला झालें आहे. ' पवित्र गंगोदक अथवा देवांच्या मूर्ति यांच्यांत आम्हांला शुद्ध करण्याचें कांहीं सामर्थ्य असलें तरी त्याचा प्रत्यय फार दीर्घकाळानें येणारा आहे; पण सत्पुरुषाचें केवळ दर्शनच आपणास पवित्र करतें !' अशा अर्थाचा एक संस्कृत श्लोक आहे. त्याची आठवण अशा प्रसंगीं झाल्यावांचून राहत नाहीं."

—नेक ना. श्रीनिवास शास्त्री

( सर्व्हे ग्रॅफिक. )

" असहकार योग अखेरीस यशस्वी झाला नाहीं तरी व्यक्तिशः गांधींचें नांव चिरस्मरणीय होऊन राहील यांत संशय नाहीं. कारण हिंदी राष्ट्र पुरुषाचें आत्मरूप गांधी यांच्या ठिकाणीं स्पष्ट दृष्टीला आलें आहे. "

—ग्लासगो हेरल्ड

" मानव जातीला तारक म्हणून घेण्याचें भाग्य आज गांधी यांना प्राप्त न झालें, तरी भविष्य काळाचा मार्गदर्शक या नात्यानें त्यांचें नांव अजरामर होऊन जाईल. "

विन्सेंट शेरसन—न्यूयॉर्क हेरल्ड

" ख्रिस्ताचा अवतार पुन्हां होणार असें भविष्य आहे. हें भविष्य खरें होईल असें मला वाटत नाहीं; पण माझा तसा विश्वास असता तर ख्रिस्त गांधींच्या रूपानें अवतरला आहे असें प्रतिपादन मीं निःसंशय केलें असतें. "

—रे. जॉन हेन्स होम्स्

" जगाच्या आजपर्यंतच्या इतिहासांत कोणत्याही एका व्यक्तीनें एकाच उद्योगांत आपला सारा जन्म घालवूनहि जेवढें यश संपादन केलें नसेल, तेवढें यश केवळ दोन वर्षांच्या अवधींत आपल्या शुद्ध दानतीच्या बळावर म. गांधी यांनीं संपादिलें आहे. "

—पुसीफुट जॉन्सन.

( ख्रिश्चन हेरल्ड. )

" ह्या पौर्वात्य साधुपुरुषाचें चरित्रश्रवण आणि त्यापासून होणारें ज्ञान यापेक्षां आपल्या जीवात्म्याला अधिक पवित्र करणारें कांहींहि नाहीं. अंतर्गत पावित्र्य आणि त्याचें व्यक्त स्वरूप बाह्य भक्ति ह्यांची खरी किंमत ज्यांना कळते, त्यांना ह्या महात्म्याच्या चरित्रश्रवणानें अत्यंत आल्हाद होईल. त्यांचा हृत्ताप यामुळें खचित हरण होईल."

—रे. होम्स



फोटोग्राफर श्री० एन्. व्ही. वीरकर ]

चित्रकार श्री० र. कृ. फडके यांचें मेणाचें एक हालचालयुक्त चित्र.

आपला हात टाकला. तथा थोडी कारकुनावर राजमातेचा रोष झाला. आपला जीव धोक्यांत आहे अशी कल्पना येताच कारकुनानें उत्तमचंदजींचा आश्रय घेतला. उत्तमचंदजींनी त्याला आपल्या घरांत, कित्येक दिवसपर्यंत दडवून ठेविलें. पण अखेरीस राजमातेला हा प्रकार समजून आला. राजमातेने शिपाई माना बोलावून आणलें आणि गुन्हेगाराला आपल्या ताब्यांत द्यावे, विषयीं सक्त हुकूम सोडला. उत्तमचंदजी काहीं अर्धवट, कच्चे गृहस्थ नव्हते. त्यांनी हुकूम मान्य करण्याचे साफ नाकारलें. उत्तमचंदजींच्या हितशत्रूंना चांगलीच संधि मिळाली. त्यांनी राजमातेचे कान फुंकले, राजमातेचा रोष कारकुनावरून तात्काळ दिवाणजींच्या डोक्यावर पडला. उत्तमचंदजींच्या घरावर गोळीबार सुरू झाला. गोळीबाराच्या खुणा अद्यापि त्या घरावर दिसून येतात. उत्तमचंदजी जीव बचावण्यासाठी पोरबंदराहून पळून गेले आणि जुनागडला आले.

प्रथमारंभीं वर्णन केलेला प्रसंग हा ह्या उत्तमचंदजींच्या जुनागडच्या नवाबाच्या दरबारातील पहिल्या हजिरीच्या वेळचा आहे.

नवाबाच्या मध्यस्थीनें काहीं दिवसांनीं उत्तमचंदजी पोरबंदरला दिवाणगिरीच्या कामावर पुन्हा रुजू झाले.

## सत्याग्रहाची जागती जोत

उत्तमचंदजींनी पुढें नोकरीस रजा देऊन आपले पांचवे पुत्र करमचंद ह्यांस दिवाणगिरीचें काम दरबारकडून देवविलें, व पुढें ते लवकरच स्वर्गवासी झाले. करमचंद ह्यांनीं दिवाणगिरी स्वीकारली त्यावेळीं त्याचें वय फक्त २५ वर्षांचें होतें. आपल्या वडिलांप्रमाणेंच हेहि मोठे साहसी, दृढनिश्चयी, निर्भय आणि तत्वनिष्ठ होते. त्यांची स्वातंत्र्यप्रियताहि तशीच तीव्र होती. आपल्या अधिकारात आणि कामात कोणीहि थोडीसुद्धा ढवळाढवळ केलेली त्यांना खपत नसे. अशाच काहीं कारणामुळें त्यांनीं आपल्या दरमहा ७०० रु. पगाराच्या जागेवर लाथ मारली व पुढें राजकोटच्या ठाकूर साहेबांची दिवाणगिरी पत्करली.

देशी राज्यांत ब्रिटिश रेसिडेंट, एजंट वगैरेचें प्रस्थ किती व कसें माजलेलें असे हें कोणास सांगण्याचें कारण नाहीं. राजकोटच्या ठाकोर साहेबावर तेथील असिस्टंट पोलिटिकल एजंटचा असा फाजील दाब होता. एकदां त्या साहेबांनी करमचंदजींविरुद्ध ठाकोरसाहेबाकडे कऱ्याच खोटेपणाच्या कागाळ्या केल्या. करमचंदजींना ही गोष्ट सहन झाली नाहीं. त्यांनीं साहेबांनी

रोखठोक उत्तर दिलें. ठाकोर साहेबांनाहि गुंडाळून ठेवणारे हे साहेब हा अपमान कसा सहन करणार ? ते संतापले. पण करमचंद ह्यांची लोकप्रियता व वजन हीं लक्षांत घेऊन त्यांनी फक्त करमचंदजींनीं माफी मागावी येवढीच मागणी केली. पण जर अपराधच केलेला नाहीं तर माफी; आणि तीहि करमचंदजींसारखा गृहस्थ, कां म्हणून मागणार ? त्यांनीं माफी मागण्याचें साफ नाकारलें आणि एजंटनें त्यांना शहराबाहेर एका झाडाखालीं एक तासभर अटकेंत ठेवलें. अखेर एजंटनीं माघार घेतली व त्यांच्याशीं स्नेहाचें नातें जोडलें.

## निस्पृहस्य तृणं जगत्

उत्तमचंदजींस थोडे दिवस तरी आमच्या दरबारीं पाठवा असा वांकानेरच्या राजसाहेबांनीं फार आग्रह केल्यामुळें ठाकोरसाहेबांच्या परवानगीनें करमचंदजींनीं वांकानेरची दिवाणगिरी पत्करली. पांच वर्षे पर्यंत करमचंदजींनीं दिवाणगिरी चालवावी; मध्यंतरीं त्यांना दिवाणगिरी सोडून जाणें भाग पडलें तर वांकानेर दरबारनें पुऱ्या पांच वर्षांचा सर्व पगार त्यांस चुकता करावा असा त्यांचा करार झाला होता. दोनच महिन्यांनीं त्यांना ही दिवाणगिरी आपल्या मर्जीप्रमाणें चालविणें येणें अशक्य झालें. त्यांनीं राजीनामा दिला. कराराप्रमाणें दरबारनें त्यांना पुऱ्या पांच वर्षांचा पगार देऊं केला. पण त्यांनीं ह्या रकमेचा स्वीकार केला नाहीं ! ते आपल्या पूर्वीच्या ठिकाणीं पूर्वीच्या कामावर रुजू झाले !

करमचंदजी ह्यांची पत्नी आपल्या पतीप्रमाणेंच धर्मनिष्ठ, बुद्धिमती, प्रेमळ व कनवाळू होती. घरांत राजलक्ष्मी वावरत असूनहि ती मंगळसूत्रावांचून एकहि अलंकार अंगावर घालीत नसे.

उत्तमचंदजी हे पैशांच्या बाबतींत " मारवाडी " होते; पण करमचंद उदार व दानशूर होते. त्यांची पत्नीहि त्यांच्याप्रमाणेंच उदारवृत्तीची होती. ह्यामुळें त्यांच्या घरासमोर रोज सकाळीं भिकाऱ्यांच्या झुंडी जमावयाच्या; पण कोणासहि रिक्तहस्तें परत फिरावें लागत नसे.

## बाळपण.

अशा सत्याग्रही परंपरेच्या आणि निग्रही वृत्तीच्या कुळांत मोहनदास गांधी ह्यांचा जन्म ता. २ आक्टोबर १८६९ सालीं झाला. करमचंदजी ह्यांस दुसऱ्या

पत्नीपासून एक कन्या आणि लक्ष्मीदास, करसनदास व मोहनदास अशीं एकंदर चार अपत्यें झालीं.

सर्वांत धाकटा मुलगा मोहनदास हा ७ वर्षांचा असतांना करमचंदजी हे पोरबंदरची दिवाणगिरी सोडून राजकोट येथें गेले. मोहनदासचें गुजराथी शिक्षण पोरबंदर आणि राजकोट येथें झालें. आपल्या वयाच्या दहाव्या वर्षी मोहनदास राजकोटच्या काठियावाड हायस्कूलमध्ये इंग्रजीचें शिक्षण घेऊं लागले. ह्याच हायस्कूलमधून वयाच्या १७ व्या वर्षी ते मॅट्रिक्युलेशन परीक्षेंत उत्तीर्ण झाले.

लहानपणीं ते फार खेळाडू, दयाळू आणि हट्टी असत. ते लहरी आणि कटकटी असले तरी आपल्या गोड स्वभावामुळे सर्वांनाच फार आवडत.

वयाच्या ७ व्या वर्षीच त्यांचें लग्न ठरलें होतें. बाराव्या वर्षी पोरबंदर येथें त्यांचें कस्तुरबा यांच्याशीं लग्न झालें.

## मोहनला मोह पडला.

राजकोट येथील शाळेंत असतांनाच त्यांच्या भावी आयुष्यकार्याच्या दृष्टीनें एक विचित्र घटना जुळून आली. निष्ठावान् व आचारशील वैष्णव कुळांतील जन्म आणि जैन धर्मवृत्तिचे शुद्ध संस्कार ! पण असे असूनहि १३ वर्षें वयाच्या मोहनदासाच्या व हायस्कूलमधील त्यांच्या कित्येक सहाध्यायांच्या मनात मांसाहार करण्याची इच्छा उत्पन्न झाली.

अहिंसेच्या असामान्य व जगन्मान्य पुरस्कर्त्यांच्या व अशा अनुकूल परिस्थितींत वाढणाऱ्या मुलाच्या मनांत मांसाहाराची इच्छा उत्पन्न व्हावी व त्या इच्छेची अंमलबजावणी पद्धतशीर रीतीनें व्हावी हें वर वर पहाणारास आश्चर्यकारक वाटेल व संगतीचा परिणाम हा असा होतो !" म्हणून कित्येक जण ह्या प्रवृत्तीचा खुलासा करूं पाहतील.

वस्तुत: म. गांधींच्या बुद्धिप्रधान चौकसवृत्तीचें, आचारप्रधान तत्वनिष्ठेचें आणि निष्प्रतिबंध स्वरवृत्तीचें हें बालवयांतील प्रौढकार्य आहे.

स्वभावत:च मोहनदास ह्याची वृत्ति बुद्धिप्रधान व चौकस. त्यांतच पाश्चात्यविचारप्रवृत्तीचा त्यावेळीं सामान्यसुशिक्षितांवर पडलेला तीव्र प्रभाव; आणि घरीं वडिलांची वृत्ति तर केवळ श्रद्धावान् धर्माचाराची ! अशा स्थितींत असंतुष्ट मोहनदास आपलेंच स्वतंत्र विचारवातावरण निर्माण करूं लागला व पक्का "धर्मभ्रष्ट," "आचारभ्रष्ट," व "सुधारक" बनल्यास नवल कसचें ? युरोपियन लोक हिंदी लोकांपेक्षा एकंदरीत पुष्कळच बळकट, सहनशील व

दीर्घायु असतात त्यांच्या ह्या श्रेष्ठत्वाचें कारण मासाहार हेंच आहे असें ह्या मंडळीच्या मनानें घेतलें एक दिवस ही धाडसी सुधारक बाल मंडळी शहराबाहर नदीतीरावर गेली, तेथें ह्यान्या मुसलमान शाळामास्तराच्या भावानें मासान्न शिजविलें आणि सर्व मंडळीनें तोंड वेडीं वाकडीं करीत व भीतभीत तें भराभर खाऊन टाकलें रात्रभर ह्या मंडळीतील एकहि ' सुधारक ' बालवीराला सुखान झोंप आली नसेल पण त्यानीं हा क्रम सुरूच ठेविला आणि कालांतरानें मासान्न व धाडस हीं दोन्ही त्याच्या अंगवळणी पडलीं

## मोहन अखेर शुद्धीवर आला.

मोहनदास ह्यांच्यामध्यें कित्येक गुण होते, त्या सर्वांत सत्यनिष्ठा हा गुण अगदीं ठळक होता. एकदा ह्या बालान इतराच्या संगतीनें व मदतकारितेनें आपल्या अंगावरील एक सोन्याचा दागिना विकला आणि पैसे केले पण पैशाचा खाऊ खाण्याची वेळ आली तेव्हा खाऊ काहीं घशाखालीं उतरेना सत्यनिष्ठेपुढें जिभेचा रुचिवाल्पणा फिक्का पडला मोहनदास थट उठला तो आपल्या वडिलांजवळ गेला आणि डोळ्यात अश्रू आणून गुन्ह्याचा सविस्तर कबूली जबाब देऊन मोकळा झाला ! हीच त्याची सत्यनिष्ठा त्यावेळींहि त्याना अशीच आतून बो लागली घरातून बाहर जाताना आईला कोठें जातों तें सांगावयाचें, आल्या बरोबर " मोहन ! आज उशीर का रे झाला ? " ह्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें, " आज जेवत का रे नाहीस नीट ? " ह्या प्रश्नाचें कारण द्यावयाचें ! आणि अशा प्रत्येक वेळे निखालस खोटें बोलावयाचें ! अखेर त्याची सत्यनिष्ठाच प्रबळ झाली आणि त्यानीं मासाहार तर सोडून दिलाच पण आपल्या ह्या मासाहारी मित्राची संगतहि साफ सोडून दिली

## लग्न आणि विघ्न.

मोहनदासाचे वडील १८८७ सालीं वारले त्यावेळीं त्याचे वय .३ वर्षांचें होतें. मोहनदास ह्यांच्या लग्नाला एन वेळीं ते राजकोटहून निघाले, वेळवर लग्नमंडपात हजर राहता यावें म्हणून त्यानीं घोड्याची गाडी फार जोरानें चालविली होती मध्येंच गाडी उलटली आणि करमचंद ह्यांना माठीच इजा झाली त्याच दुखण्यात ते पुढें वारले त्यांच्या आजारात मोहनदास ह्यानीं त्यांची सेवा अत्यंत निष्ठेनें केली

यापुढें मोहनदास ह्याजवर केवळ त्यांच्या मातेचीच नजर राहिली. पतीच्या निधनानंतर त्यांचा बहुतेक काळ व्रतोपवासातच जाई बेचरस्वामी ह्या जैन

साधूंस त्या आपला गुरु मानीत व त्यांच्याच सदुपदेशामुळें त्या आपलें पुढील आयुष्य आपल्या मुलांबाळांकडे पाहून कसें तरी कंठीत असत.

## मोहन ! मोहाला बळी पडूं नको बरें !

हायस्कूलचें शिक्षण संपविल्यावर ( १८८७ ) मोहनदास हे भावनगर येथील सामळदास कॉलेजमध्यें अभ्यास करूं लागले. मांसाहाराचा नाद लागण्यास कारणीभूत झालेली त्यांची जी इग्लंडला जाण्याची इच्छा ती आतां बळावूं लागली. कॉलेजला रजा पडली असतां मोहनदास घरीं राजकोटला आले. त्यावेळीं विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन आलेल्या एका ब्राह्मण गृहस्थाशीं त्यांचा स्नेह जमला. मोहनदासनें विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन यावें असें त्यानें सुचविलें. धाडसी व आकांक्षावान् मोहनदासाला हा विचार फारच मानवला. त्यांच्या बंधूनाहि हा विचार फारच पसंत पडला. दानशूर वडिलांनीं शिल्लक ती काय ठेविली होती ? परंतु जडजवाहिर विकावें लागलें तरीहि हरकत नाहीं; पण मोहनदासनें विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन यावें. असें त्यांचें मन पडलें. पण आईची संमति मिळावी कशी ? विलायतेंतील मोहमय वातावरण, धर्मभ्रष्टता, अनीति वगैरे संबंधानें तिनें कितीतरी गोष्टी ऐकल्या होत्या आणि त्या तिला अगदीं खऱ्या वाटत होत्या. मोहनदास दिवसभर आईची समजूत घालण्याचा प्रयत्न करी आणि रात्रीं आईला सुबुद्धि देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना करी. अखेर मोठ्या नाखुषीनें तिनें परवानगी दिली. पण त्याला तिनें एक शपथ घातली. ( १ ) मद्य ( २ ) मांस व ( ३ ) परस्त्री यांच्यापासून सर्वस्वी अलिप्त रहावयाचें हीच ती शपथ.

अज्ञान, त्यांच्यामतें फॅशनेबल पण लंडनमधील लोकांच्या मतें अगदींच विक्षिप्त असा त्यांचा फ्लॅनेलचा पोषाख आणि एकंदर नवम्या चालीरीति ह्यामुळें- मोहनदास म्हणजे एक प्रेक्षणीय आणि हास्यास्पद चीजच बनून गेली! अखेर हताश होऊन त्यांनीं लंडनमध्येंच दुसरीकडे राहणाऱ्या आपल्या एका मित्राला तार करुन बोलाविलें. हे मित्र ह्यावेळीं मोहनदासनां फार उपयोगी पडले. त्यांनीं मोहनदासनां सभ्यगृहस्थानें कसें वागावें, कसें बोलावें चालावें वगैरे संबंधानें नीट पढविलें व त्यांना पक्के इंग्लिश जंटलमन बनविण्याच्या उद्योगास लागले.

## जंटलमन्!

मोहनदास ह्या मित्राच्या सहाय्यानें जंटलमन होण्याचा कसून प्रयत्न करूं लागले. परंतु ह्या तज्ज्ञ मित्राची जंटलमन्‌ची व्याख्या फार व्यापक होती. जंटलमन् व्हायचें तर मासाहारावर मन मोकळेपणनें हात मारला पाहिजे; मद्यपान करेंच,पाहिजे. चार चौघांशीं विशेषतः तरुण स्त्रियांशीं सलगीनें वागलें पाहिजे आणि त्यासाठीं गायन आणि नृत्य ह्या ललितकलांचेंहि ज्ञान असलें पाहिजे.

मद्य-मांस-स्त्री त्यांच्यापासून मीं सर्वस्वीं अलिप्त राहीन अशी मोहनदास ह्यांनीं नुकतीच मातेसमोर शपथ घेतली असल्यामुळें जंटलमनचे हे सर्व गुण अंगवळणीं पाडून घेण्याचें त्यांनीं नाकारलें. पण ते नृत्य, वक्तृत्व, फ्रेंच भाषा, व्हायोलिन वगैरे वाद्यें वाजविणें असल्या जंटलमनच्या उपलक्षणांचा मात्र झटून अभ्यास करू लागले.

मोहनदासनां जंटलमन् बनविण्याच्या उद्योगाला लागलेल्या ह्या गृहस्थांना व मोहनदास व इतर स्थिक विद्यार्थी ह्यांना एकदा एका मजरानीच आमन्त्रण आले. रीतीप्रमाणें सर्व मंडळी टेबलाशीं बसल्यावर एकामागून एक पदार्थ येऊं लागले.

"हा रसा (सूप) कसला आहे बरें?" मोहनदासनीं वाढ्याला हळूच प्रश्न विचारला. शिष्टाचाराचें अक्षम्य उल्लंघन करणारा हा प्रश्न ऐकून मित्र चिडला.

"हें तुम्हीं काय चालविलें आहे?"

"मी शपथ घेतली आहे मांसाहार करणार नाहीं म्हणून. मी शपथ मोडणार नाहीं."

## गाढव कुठला

" शपथ ! गाढव कुठला ! कसली घेऊन बसला आहेस शपथ ! चव तर घे एकदा मग लाळ घोटायला लागशील त्यासाठीं ! "

" मी त्याची मागेंच चव पाहिली आहे. आणि पुन्हा तसला गाढवपणा करायचा नाही असा माझा निश्चय आहे ! "

" तू सभ्य लोकांत बसायलाच लायक नाहींस ! मांस खायचें नव्हतें तर आलास कशाला इथें ? चालता हो पाहू येथून ! "

मोहनदास तसेच टेबलाजवळून उठले आणि बाहेर पडले. झालें जंटलमन होण्याचा नाद ह्यापुढें त्यांनीं सोडून दिला. त्यांनीं सर्व मायामोह सफाईनें तोडून टाकले. आणि कडकडीत तापसी जीवनक्रम स्वीकारला. त्यांनीं आपलें व्हायोलिन विकून टाकून त्या पैशांतून एक 'स्टोव्ह' विकत आणला आणि स्टोवरच 'स्वयंपाक' करून जेऊं लागले. त्याचा सर्व खर्च ६० रुपयांत भागू लागला. इनर टेंपल ह्या कायद्याच्या विद्यालयांत त्यांचें अध्ययन सुरू होतेंच. आता ते नामांकित विद्वानांच्या ओळखी करून घेण्याचे प्रयत्न करूं लागले. एका शाकाहारी संस्थेचे ते सभासद बनले व निर्मांसभोजन तत्वाचा प्रसार करूं लागले. वादनकलेचा त्यांनीं अभ्यास सोडून दिला पण वक्तृत्वकलेचा अभ्यास मात्र सुरूच ठेविला. तीन वर्षांच्या अभ्यासानंतर १८९१ मध्यें बॅरिस्टरीची परीक्षा देऊन ते हिंदुस्थानांत परत आले.

## " आधीं आईला भेटूं ! "

मोहनदास लंडनमध्यें असतांनाच त्यांची आई इकडे स्वर्गवासी झाली. पण त्यांच्या अभ्यासांत व्यत्यय येऊं नये म्हणून त्यांना ही बातमी कळविण्यांत आली नव्हती. विलायतेच्या मोहमयी वातावरणांतून ज्या मातृभक्तीनें त्यांना निर्लेप परत आणलें त्या मातृविषयीं मोहनदासांच्या मनांत किती आदर असेल ह्याची वाचकांनींच कल्पना करावी.

मुंबईस उतरल्यावर मोहनदास आधीं आईला भेटण्याकरितां राजकोटला जाऊं लागले, परंतु तिची मृत्युवार्ता समजल्यावर मोहनदासांना नाशिकला जाऊन प्रायश्चित्त घेतलें आणि नंतर राजकोटला जाऊन आल्यावर मुंबईला वकिली करूं लागले.

## आर्धी गीता-मग बायबल.

रंगूनचे डॉ. पी. जे. मेथा, राजकोटचे श्री. शुक्ल, अहमदाबादचे श्री. मजुमदार वगैरे मंडळी त्यांची सहाध्यायी होती. सध्यांचें महात्मा गांधींचें माहात्म्य पाहून त्यांच्या त्यावेळच्या सहाध्यायांस आतां कौतुकाबरोबरच मोठें आश्चर्यहि वाटतें. परंतु त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहींच नाहीं. त्यावेळीं मोहनदास ह्यांचे जे गुण त्यांना सामान्य वाटत, किंवा उपेक्षणीय वाटत तेच गुण-अगदीं तेच गुण आज क्रमविकासानें, व्यवस्थित जोपासनेनें आणि वाढत्या तपश्चर्येनें सध्यांच्या जगाला दीपविण्याइतके तेजस्वी झाले आहेत.

इंग्लिश जंटलमन होण्याचा मोह आवरून पुन्हा एकवार त्यांनीं आपल्या सत्यनिष्ठ, वज्रभेदी निश्चयी इच्छाशक्तीचा खुंटा हालवून बळकट केला. पाश्चात्य शिष्टाचारांचा उथळ कृत्रिमपणा त्यांनीं ओळखला; स्वतःच्या सात्त्विक अंतःकरण प्रधान धर्मशीलतेवर आलेला बुद्धिप्रधान निरीश्वर वादाचा पगडा झुगारून दिला.

" तुम्ही ख्रिस्ती धर्माचा अभ्यास कां करीत नाहीं ? " असा डॉ. ओल्डफील्ड ह्यांनीं त्यांना एकदां प्रश्न केला. " आधीं मी स्वधर्माचें अध्ययन करीन; त्याच्यापूर्वीं ख्रिस्ती धर्माचें अध्ययन मी कां म्हणून करावें ? " असें त्यांनीं ह्या प्रश्नाला तेजस्वी उत्तर दिलें. त्यांनीं बायबल वाचण्यास व ख्रिस्ती धर्मप्रवचनें ऐकण्यास सुरुवात केली; पण त्यांनीं गीतेच्या सूक्ष्म अध्ययनास सुरुवात केली. ह्या कामीं त्यांना दोन थिऑसफीस्ट स्नेही सहाध्यायी लाभले. "गीतेनें माझ्या आत्म्यावर एक नवीनच प्रकाश पाडला. भरतभूमींत जन्म घेतल्यावांचून ह्या प्रकाशाचा लाभ कोणासहि होणें शक्य नाहीं. जो मार्गदर्शक दीपप्रकाश मला पाहिजे होता तो गीतेनें मला मिळवून दिला " असें ह्या संबंधानें त्यांनीं एकदां म्हटलें आहे.

## प्रकरण २ रें.

# कर्तव्यक्षेत्रांत.



### बॅरिस्टर तर बनले. पण—



मोहनदास आतां "बॅरिस्टर गांधी" बनले. आणि त्यांची वकीलीहि थोडी फार सुरू झाली. पण त्यांचें मन शुद्ध बॅरिस्टरींत आणि द्रव्यार्जनांत भारीच गुंतणार !

गांधी कधीं मुंबईला तर कधीं राजकोटाला राहून वकीली करीत आणि त्यांचें धर्मग्रंथांचे वाचनहि सुरूच होतें. पण ते द्रव्यार्जनाला धर्मग्रंथ वाचनाची जोड दिली म्हणजे इतिकर्तव्यता झाली असें मानणारे आत्मवंचक, अल्पसंतुष्ट किंवा आत्मनिष्ठ नव्हते

गांधी आपल्या बुद्धीला आणि वृत्तीला रुचेल असा उद्योग शोधूं लागले. त्या वेळीं राष्ट्रीय सभेच्या रूपानें हिंदी राजकारण संघटित होऊं लागलें होतें. महर्षी दादाभाई नौरोजी डब्ल्यू. सी. बानर्जी (सर) सुरेंद्रनाथ बानर्जी, (सर) फेरोजशहामेथा, (सर) दिनशावाच्छा, प. अयोध्यानाथ वगैरे तत्कालीन पुढारी मंडळीच्या रूपानें व प्रयत्नांनीं हिंदी राजकीय आकांक्षा जन्मास येऊन व्यक्त होऊं लागल्या होत्या व वाढीस लागल्या होत्या.

खुद्द गांधींचा गुजराथ मात्र त्यावेळीं गिरण्यांच्या धुरानें धुंद होण्याच्या उद्योगास लागला होता. केवळ बुद्धिमान् पुरुषानें काव्य व वाङ्मय' त्यांत कांहीं खटपट करून कीर्ति मिळवावी आणि कर्तबगार मनुष्यानें कापडाची गिरणी काढून संपत्ति मिळवावी अशा प्रकारचें गुजराथच्या जागृतीला जें स्वरूप आलें त्या जागृतीच्या स्वरूपाचा पूर्वरंग त्यावेळीं गांधींना दिसत होता.

अशा ह्या परिस्थितींत पुढें काय करावें ? ह्या विचारांत पडलेल्या ह्या तरुण कर्तबगार व कर्तव्यनिष्ठ बॅरिस्टरच्या सर्व गुणांनाच नव्हे तर भावी जीवनकार्याला पोषक अशी संधि मिळाली. कर्तव्य क्षेत्रांत उतरण्याविषयीं गांधींना आव्हान आलें.

## अखेर कार्यक्षेत्र सांपडलें.

दादा अबदुल्ला हे पोरबंदरचे मेमन रहिवाशी. ट्रान्सव्हालमध्यें त्यांचा धंदा मोठया प्रमाणावर चालत असे. प्रिटोरिया येथील न्यायमंदिरांत त्यांच्या पेढीचा एक महत्वाचा खटला चालू होता आणि त्याकरितां हिंदुस्थानांतून एक लायक बॅरिस्टर तिकडे न्यावा असें ठरविल्यामुळें त्यांनीं गांधींच्या बंधूंमार्फत त्यांना तिकडे येण्याविषयीं आग्रह केला.

द. आफ्रिकेंतील परिस्थितीविषयीं त्यावेळीं सर्व देश पूर्ण अज्ञानांत होता. आणि न जाणों, गांधी तिकडे येण्याचेंच नाकारतील या भीतीनें त्यांच्या अशोलानेंहि गांधींचें तेथील परिस्थितीविषयींचें अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न केला नाहीं. ते दरबानवरून प्रिटोरिया येथें गेले.

## पहिली सलामी.

प्रथम त्यांना काळा आदमी म्हणून वकीलीची सनदच मिळेना. अखेर सुप्रीम कोर्टानें त्यांना परवानगी दिली. पण प्रत्यक्ष कोर्टांत त्यांना विचित्र अनुभव आला. गांधींनीं सर्व पोषाख थेट इंग्लिश जंटलमनला शोभण्यासारखा केला होता. पण डोक्यावर टोपी मात्र चपकडी व मागें खालीं उतरणारी अशी " रमणभाई पागडी " घातली होती.

" आधीं ती टोपी काढा आणि मग काय तें बोला ! " अशी प्रिटोरियाच्या कोर्टांत ह्या नव्या बॅरिस्टरला पहिली सलामी मिळाली. गांधींनीं टोपी काढण्याचें नाकारलें आणि ते कोर्टांतून निघून गेले. अखेर कोर्टानें ह्या रमणभाई पागडीवरील बहिष्कार काढून घेतला.

फर्स्ट क्लासचें तिकिट काढून एकदां हे नवे बॅरिस्टर दरबानहून प्रिटोरियाला जाण्याकरितां आगगाडीच्या पहिल्या वर्गाच्या डब्यांत जाऊन बसले. पण गाडी सुरू होण्याची वेळ होत आहे तोंच गाडीचा गोरा गार्ड त्यांच्या जवळ आला. आणि खालीं उतरा म्हणून म्हणूं लागला. गांधींनीं तिकीट दाखवून तसें करण्याचें नाकारलें. गार्डनें गांधींना डब्यांतून खालीं खेचलें आणि त्यांचें सामानसुमान बाहेर फेंकून दिलें. सबंध रात्र त्यांना स्टेशनच्या वेटिंगरूममध्यें थंडीनें कुडकुडत काढावी लागली.

ट्रान्सवालमध्येंहि तोच अनुभव एका घोडयाच्या गाडीतून कोचमनच्या जागेवर बसून ते प्रवास करूं लागले. तोंच गाडीच्या आंत बसलेल्या एका डच

गोऱ्यानें त्यांना हुकूम सोडला, "मुकाट्यानें तेथून खाली उतरा ! मला तेथें बसायचें आहे !" गांधींनी जागा सोडण्याचें नाकारलें आणि उलट दांडगट गोऱ्यानें त्यांना चांगलेच ठोसे लगावले.

कवरेंत लाथ देऊन गांधींना एकदां एका पहारेकऱ्यानें प्रेसिडेंट क्रूगर ह्यांच्या बंगल्याबाहेरच्या रस्त्यावरील फूटपाथवरून हांकून दिलें होतें.

## काळा अदमी !

जोहान्सबर्ग येथें तर ह्या काळ्या अदमीला उतरावयास हॉटेलांतून जागाच मिळेना.

गांधींना असे अपमानास्पद प्रसंग वारंवार सहन करावे लागत.

इंग्लंडमध्यें तीन वर्षें राहून ब्रिटिश समतातत्वाचा अनुभव घेतलेले, ब्रिटिश मुत्सद्दी, ब्रिटिश तत्वज्ञानी, ब्रिटिश विद्वान् ह्यांच्या समतातत्वाच्या गोड गोड विचारांस, आचार विचार ह्यांत भेद न करणारे गांधी प्रामाणिक व व्यावहारिक विचार म्हणून समजत. बरें हा त्यांचा समज हिंदुस्थानांत अंशत: तरी दूर झाला असता परंतु तेथें त्यांचा मुक्काम झालेला केवळ दीड वर्षेंच. अशा स्थितींत ह्या वर्णभेदाच्या अतिरेकाचा व गोऱ्या लोकांच्या उद्धटपणाचा त्यांना वीट यणें व आश्चर्यहि वाटणें स्वाभाविक होतें. पण ह्या प्रसंगांनीं त्यांचा तत्वनिष्ठ दमदारपणा ढिला पडला नाहीं. किंवा त्यांची विचारशीलता व मन:शांति हीं ढळलीं नाहींत. अशा प्रकारास विटून दुसरा एखादा मनुष्य तत्काळ स्वदेशीं परतला असता. पण गांधी असे अर्धे कच्चे नव्हते. ते वचनाची किंमत जाणणारे होते. त्यांनीं आपणांस आगाऊ येथील परिस्थितीची नीट कल्पना करून न दिल्याबद्दल आपल्या अशीलाची चांगलीच कान उघाडणी केली. परंतु एक वर्षाची मुदत पुरी होईपर्यंत द. आफ्रिकेंतच राहण्याचा निश्चय मात्र बदलला नाहीं.

## फुरसतीच्या वेळीं

खटल्यांचे कामांत त्यांचा कांहीं फारसा वेळ जात नसे. ह्यामुळें त्यास बऱ्याच थोर लोकांची ओळख करून घेतां आली. ह्याच वेळीं त्यांनीं प्रथम बायबल वाचण्यास सुरुवात केली. गीता व इतर हिंदू धर्मग्रंथांचा त्यांचा अभ्यास मात्र त्यामुळें मागें पडला नव्हता. टॉलस्टॉयच्या ग्रंथांचा ह्यावेळीं त्यांनीं विशेष परिचय करून घेतला.

गांधींच्या ह्या मुक्कामांत प्रथमच त्यांना पाश्चात्य गोऱ्यांच्या दानतीचा काळाभाग दिसून आला. त्यांच्या भावी सत्याग्रह तत्वाला आधारभूत असलेल्या त्यांच्या सहनशीलता स्थितप्रज्ञवृत्ति, निरहंकारवृत्ति, ध्येयनिष्ठा वगैरे गुणांची चांचणी होऊन हालवून खुंटा बळकट व्हावा त्याप्रमाणें बळकट होऊं लागले; जी विभूति त्यांना सर्वात अत्यादरणीय वाटते त्या भगवान् ख्रिस्ताच्या बायबलचा आणि ज्या श्रेष्ठ तत्वज्ञान्याच्या मतांचा त्यांच्यावर विशेष प्रभाव दिसून येतो त्या कौंट लिओ टॉलस्टाय ह्यांच्या ग्रंथांचा परिचय झाला.

गांधी आंतून ख्रिस्त, टॉलस्टाय व हिंदुधर्मग्रंथ ह्यांच्या उदात्ततत्वांचें अध्ययन करीत होते व बाहेरील विषम, उग्र आणि गोऱ्या सस्कृतीच्या चित्तक्षोभक वातावरणांत त्या अध्ययनाची परीक्षा देत होते. त्यांचा स्वभावपरिपोष अशा रीतीनें सर्वांगांनीं होत होता.

## आम्हांला टाकून जाऊं नका.

ह्याच वेळीं नाताळ सरकारनें आपल्या हद्दींतील एशियाटिक लोकांचा मताधिकार काढून घेणारा कायदा करण्याचा घाट घातला. तेथील पार्लमेंटपुढें एशियाटिक्स एक्सल्यूझन बिल लवकरच मंजूरीकरितां येणार होतें. द. आफ्रिकेंत एक वर्ष काढून गांधी हिंदुस्थानांत यावयाकरितां प्रिटोरियाहून निघून दरबानला आले होते. त्यावेळीं त्यांस देण्यांत आलेल्या एका मेजवानीच्या वेळींच त्यांना नेटल मरक्युरी पत्रावरून नाताळ सरकारचा हा विचार समजून आला. ह्या कायद्यास सर्व हिंदी लोकांनीं कसून विरोध करावा असा त्यांनी सर्वांस आग्रहाचा इशारा दिला. सर्व हिंदी लोकांत ह्यामुळें मोठीच खळबळ उडून गेली. पण पुढें करावें काय आणि करावें कोणी ? अखेर दोन्ही प्रश्नांचे उत्तर गांधींसच द्यावें लागलें. अनेक मित्रमंडळींच्या आग्रहावरून त्यांनींच हिंदी लोकांच्या चळवळीचा पुढाकार घ्यावा असें ठरलें. हिंदुस्थानांत यावयास निघालेले मि. गांधी द. आफ्रिकेंतल्या एका पेढी ऐवजीं सबंध हिंदी लोकसमाजाची वकीली करण्याकरितां कांहीं दिवस पुन्हां आफ्रिकेंतच राहण्यास तयार झाले.

द. आफ्रिकेंत राहण्याचा निश्चय कायम होतांच त्यांनीं एकदम लोकसंघटनेचें काम हातीं घेतलें. नाताळ इंडियन कॉंग्रेस आणि नाताळ इंडियन एज्युकेशनल असोसिएशन ह्या दोन संस्थांची स्थापना करून त्यांनीं ठिकठिकाणीं सभा भरविण्यास व लोकजागृतीला आणि लोकसंघटनेला सुरवात केली.

## मताधिकारावर धाड.

ब्रिटिश प्रजाजन असून ५० पौंड किंमतीची स्थावर मिळकत असलेल्या किंवा वर्षाला १० पौंड भाडें भरणाऱ्या प्रत्येक वयांत आलेल्या पुरुषाला नाताळमध्यें मताधिकार होता. त्यांत काळा-गोरा, एशियाटिक युरोपियन असा भेद केला जात नव्हता. एकंदर नाताळच्या वसाहतींत त्यावेळीं असे गोरे मतदार दहा हजार होते.

हिंदीमतदारांची संख्या कें [illegible]
साठीं हा कायदा करण्यांत ये [illegible]
विनंतिअर्ज तयार करून तो [illegible]
ळहि अधिकाऱ्यांच्या भेटीला गले. पण अखर थोडासा विरोध होऊन कायदा तर मंजूर झालाच. तेव्हां आतां ही चळवळ थेट विलायतेंत चालवून ब्रिटिश वसाहत खात्यापुढें आपली गाऱ्हाणीं सादर करावयाचीं आणि महाराणी व्हिक्टोरिया ह्यांनीं ह्या कायद्याला संमति देऊं नये म्हणून खटपट करावयाची असें ठरलें. गांधींनीं दहा हजार सह्यांचा एक विनंती अर्ज परराष्ट्रीय प्रधानांकडे रवाना केला. लंडन टाइम्सनें हिंदी लोकांचा कैवार घेतला आणि अखेर महाराणी व्हिक्टोरिया ह्यांनी ह्या कायद्याला संमति देण्याचे नाकारलें. गांधींची चळवळ तेवढ्या पुरती तरी यशस्वी झाली.

## निष्फळ विरोध.

स्वार्थपरायण वसाहतवाल्यांनीं ह्यावर दुसरी एक तोड काढली. ह्यावेळीं जुने ब्रिटिश वसाहतप्रधान बदलून नवे प्रधान अधिकारारूढ झाले होते. वसाहतवाल्यांनीं आपल्या पार्लमेंटमध्यें असा एक कायदा करून घेतला कीं, " कोणत्याहि देशांचा जर पार्लमेंट [illegible] प्रदेमंडळाकडून
कारभार चालत नसे [illegible] या रहिवाशांना
मताधिकार नसावा. [illegible] त्यांचें माफीपत्र मिळवावें. " हिंदुस्थानात त्यावेळीं कायदे कौन्सिल नव्हत असें नाहीं, पण त्यांचा हक्क कबूल करणें न करणें हें वसाहतवाल्या अधिकाऱ्यांच्या मर्जीवर अवलंबून राहिल्यामुळें ह्या नव्या कायद्यानें हिंदी लोकांचे हक्क पुन्हां धोक्यांत येणार हें निश्चित झालें. हिंदी लोकांनीं ह्या कायद्याला कसून विरोध केला. पण अखेर त्याला बादशाही संमति मिळालीच.

## असें कां व्हावें ?

द. आफ्रिकेंत गोऱ्यांच्या ह्या धोरणाची पूर्व परंपरा व मीमांसा अशी आहे. द. आफ्रिकेचे मूळ रहिवाशी झूलू, हॉटेंटॉट वगैरे रानटी हबशी लोक हेच होत. परंतु प्रदेश निसर्ग संपत्तीनें ओतप्रोत भरलेला. शेती व फळफळावळ यांचे पिकाला जमीन अत्यंत उत्तम आणि शिवाय कोळसा सोनें, हिरे वगैरेंच्या खाणींची रेलचेल ह्यामुळें अनेक गोऱ्या राष्ट्रांतील व विशेषत: इंग्रजलोकांचें लक्ष ह्या प्रदेशाकडे वळलें. प्रथम केप कॉलनी व नाताळ ह्या वसाहती वसविण्यांत आल्या. पुढें त्या इंग्रजांच्या ताब्यांत आल्या. डच लोकांनीं ऑरेंज फ्री स्टेट व मागाहून ट्रान्सव्हाल ह्या वसाहती स्थापन केल्या. कार्यक्षेत्र प्रचण्ड पण गोऱ्या लोकांकडून काबाडकष्ट होईनात आणि आफ्रिकन हबशी लोक त्यांची शेती वगैरे करण्यास तयार होईनात. अशी कार्यकुचंबणा होऊं लागल्यावर गोऱ्या लोकांची दृष्टि असहाय्य चीन आणि परवश हिंदुस्थान ह्यांजवर वळली. त्यांतल्या त्यांत हिंदी मजुरांवर आपणास चांगलाच अधिकार चालवितां येईल अशी त्यांची खात्री होती.

## सुधारलेल्या गुलामगिरीचा उपक्रम.

प्रथम नाताळ सरकारनें साम्राज्यसरकारमार्फत हिंदुस्थानसरकारकडे ( कूली ) मजूर लोकांची मागणी केली आणि हिंदी मजुरांच हितसंबंध सुरक्षित राखण्याकरितां कसून प्रयत्न करण्यांत येतील असें साम्राज्य सरकारनें अभिवचन दिल्यावर हिंदुस्थान सरकारनें नाताळमध्यें हिंदी मजूर जाण्यास परवानगी दिली.

सुधारलेल्या गुलामगिरीची खरी सुरवात १८३७ साली झाली होती. त्या वर्षी ७००० हिंदी मजूर मॅरिशसमध्यें नेण्यांत आले होते. नाताळमध्यें ५ वर्षांच्या नोकरीच्या करारानें हिंदी मजुरांची पहिली तुकडी १६ नोव्हेंबर १८६० मध्यें आफ्रिकेच्या किनाऱ्यावर उतरली. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं कूलीडेपो उघडले जाऊन आफ्रिकन वसाहतवाल्यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं आमचेच कितीतरी लोक अनेक बऱ्यावाईट प्रयत्नांनीं मजुरांची भरती करण्याच्या कामांत गढून गेले. गांधी द. आफ्रिकेंत गेले त्यावेळीं नाताळांतील हिंदीलोकांची संख्या ५०००० होती. त्यांपैकीं १६ हजार मुदतबंदीच्या करारानें मजुरी करीत होते, ३५ हजारांवर लोक करार संपवून "स्वतंत्र" म्हणून मोल मजुरी करीत होते आणि अंदाजें ५ हजार लोक बारीकसारीक व्यापार धंदा करीत होते.

हे धंदेवाईक लोक प्रथम कूलींना लागणारें सामानसुमान पुरविण्याचाच धंदा करीत पण हे लोक उद्योगी, मितव्ययी आणि अल्पसंतुष्ट असल्यामुळें चार पैसे सग्रहीं ठेवू लागले, युरोपियन लोकहि त्यांच्याकडे माल स्वस्त मिळतो म्हणून खरेदी करू लागले आणि गो यांप्रमाणें हे उद्दाम व घेंडे नसल्यामुळें तद्देशीय लोकांतहि त्यांचा जम बसू लागला आफ्रिकन भूमींतील सोनें, रत्नें आणि धनधान्य ते स्वत सर्वस्वी लाटीत होते, पण त्या सोनेरी मातीचा धुरळा आणि समृद्धीचा अवशेष हिंदी लोकांच्या अंगावर आणि खिशात उडण्याचा संभव दिसू लागताच गोऱ्या लोकांच्या पोटात दुखू लागलें !

ही स्वार्थजन्य पोटदुखी वाढवता वाढवता आज अशी स्थिती उत्पन्न झाली आहे की, ब्रिटिश साम्राज्य अखेर ह्या पोटदुखीनेंच बेजार होणार अशी अगदीं नेमस्त हिंदी लोकांस सुद्धा भीति वाटू लागली आहे

## दोन्ही प्रयत्नांत अपयश.

हिंदी लोकांचा मताधिकार काढून घेऊनच स्वस्थ रहावें असा नाताळमधल्या गोऱ्या लोकांचा हेतु नव्हता द आफ्रिकेच्या भावी वैभवशाली राष्ट्रांत हिंदी लोकांचें बिलकुल आस्तित्वच राहू नये ह्या इच्छेनेच प्रेरित झालेल्या लोकांच्या धोरणाची ही केवळ पहिली पायरी होती ह्यासाठीं त्यानीं आता इंडियन इमिग्रेशन कायद्यात दुरुस्ती करणारें बिल नाताळच्या कायदे मंडळापुढें आणलें ( १८९५ ) तेथें तें मंजूर झालें आणि त्याला १८९, मध्ये बादशाही समतीहि मिळाली.

पूर्वीच्या कायद्याप्रमाणें नाताळांत जाणारा हिंदी मजूर हा पाच वर्षांच्या करारानें-पहिल्या वर्षी दरमहा १० शिलिंग मजूरी मिळावी, पुढें दरवर्षी तिच्यांत १ शिलिंग प्रमाणें वाढ व्हावा, वसाहतींत जाण्याचा भाडे खर्च मालकान सोसावा, त्याला व त्याच्या कुटुंबाला खाण्यास अन्न व राहण्यास जागा फुकट पुरवावी अशा करारानें वसाहतींत जात असे शिवाय आणखी पाच वर्षें तेथें काढल्यास त्याला परत स्वदेशी येण्याचा खर्च वेंचहि मिळे पण ह्या नवीन करारानें, त्यानें वसाहतींत आजन्म नोकरीच्या करारानें रहावें व वार्षिक वाढीनें ९ ह्या वर्षांच अखेर दरमहा २० शिलिंगप्रमाणें मजुरी घ्यावी, किंवा परत हिंदुस्थानांत यावें अथवा वार्षिक ३ पौंड, म्हणजे मुदतबंदीच्या मजुरीच्या दीड जवळ जवळ अर्ध्या वर्षांची मजुरी डोईपट्टी म्हणून भरून स्वाश्रितपणें रहावें अशी नवीनच परिस्थिती उत्पन्न झाली.

गांधींच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे हा " ब्रिटिश प्रजाजनांचा उपमर्द, कायदे करणारांचा निर्लज्जपणा आणि इंग्लंडवरील काळिमा " होता. तरी पण तो अखेर अमलांत आलाच!

अशा रीतीनें दोन्ही प्रयत्नांत गांधींना अपयश आलें. परंतु ह्या अपयशांतच त्यांच्या भावी यशाचें बीजारोपण झालें. लोकसंघटना कशी करावी, लोकमत जागृति कशी करावी, ह्यांचा त्यांना ह्यावेळी चांगलाच अनुभव मिळाला.

## मध्येंच हिंदुस्थान

नाताळच्या चळवळीचें महत्व केवळ नाताळमधील पन्नास हजार हिंदी लोकांपुरतें नसून एकंदर हिंदी राष्ट्रीय कार्याचें तें एक अंग आहे आणि एकंदर हिंदी राष्ट्रानें हा प्रश्न मनावर घेतल्यावांचून ह्या कार्याला खरा जोम येणार नाहीं ह्याची जाणीव असल्यामुळें आतां म. गांधी हिंदुस्थानांत यावयास निघाले. बरोबर आपल्या कुटुंबासहि घेऊन परत जावें असा त्यांचा हेतु होताच.

हिंदुस्थानांत ते सुमारें वर्षभर राहिले आणि तेवढ्या मुदतींत ते ठिक-ठिकाणीं फिरून मोठमोठ्या सभांतून आफ्रिकेंतील हिंदी लोकांची गार्‍हाणीं लोकांपुढें मांडूं लागले. अनेक मोठमोठ्या पुढार्‍यांच्या भेटी घेतल्या व त्यांच्याशीं स्नेह संपादिला. ह्याचवेळीं कै. वा. ना. गोखले ह्यांच्याशीं परिचय झाला. आणि गांधीजी त्यांना आपले राजकीय गुरु मानूं लागले.

गांधींनीं कै. वा. गोखले ह्यांस आपले राजकीय गुरु कां मानावें हा एक जरा घोंटाळ्याचाच प्रश्न आहे. वस्तुतः राजकारणांत त्यांच्याच मतांचे, त्यांच्याहून वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध असे पुष्कळ पुढारी त्यावेळीं त्यांना भेटले. परंतु " राजकीय कार्यक्षेत्रांत हाच एक सर्वगुणसंपन्न पुरुष मला आढळला पण गोखले ह्यांचा सुसंस्कृत गोड व सीधासाधा स्वभाव आणि सात्विक वृत्ति ह्यांचेच गांधींवर जास्त वजन पडलें, त्यांच्या राजकीय कार्यक्षमतेचें वजन त्यांच्यावर विशेष पडलें असावें असें दिसत नाहीं.

येथील लोकांना द. आफ्रिकेंतील आपल्या बांधवांच्या दुःस्थितीची पुरी कल्पना यावी आणि आपल्या चळवळीस मदत व्हावी म्हणून त्यांनीं एक लहा-नसें चोपडें प्रसिद्ध केलें होतें. त्या चोपड्याच्या व येथील ठिकठिकाणच्या सभां-तील त्यांच्या भाषणाचा विपर्यास करणार्‍या बातम्या द. आफ्रिकेंत जाऊं लागल्या. गांधींच्या प्रयत्नांनीं हिंदी लोकांच्या चळवळीस आलेलें व्यापक स्व

जोमदार स्वरूप पाहून आधींच उद्विग्न झालेले वसाहतवाले त्या विपर्यस्त बातम्यांनीं अगदीं चिडून गेले आणि द. आफ्रिकेंत गांधींच्या विरुद्ध त्यांनीं एक जंगी चळवळ सुरू केली.

## खोटीच बातमी.

गांधी ता. २८ नोव्हें. सन १८९६ रोजीं कूरलँड बोटीने दरबानला जावयास निघाले. दोनच दिवस मागाहून दादा अबदुल्ला ह्यांची नादेरी बोट सहाशें मजूर घेऊन निघाली. आणि दोन्ही बोटी एकाच दिवशीं दरबानला पोहोंचल्या. नाताळांत दरवर्षी हजार दोन हजार हिंदी लोक आणून त्यांची वस्ती वाटविण्याचा गांधीचा विचार आहे अशी ह्या प्रसगानें गोऱ्या लोकात बातमी पसरली.

गाधी दरबानला निघण्यापूर्वी त्यांच्या चळवळीसबंधाने पुष्कळशा विपर्यस्त बातम्या तिकडे पाठविण्यांत आल्या होत्या; त्यामुळें चिडलेल्या दरबानच्या गोऱ्या वसाहतवाल्यांच्या एका जाहीर सभेंत असा ठराव केला कीं, "वसाहतींत स्वतंत्र हिंदी किंवा एशियाटिक लोकांस प्रवेश करण्याची मनाई करण्याची वेळ आतां आली आहे. ह्यासाठीं वसाहत सरकारनें नादेरी व कूरलँड बोटीनें येणाऱ्या सर्व एशियाटिकाना आपल्या खर्चानें परत स्वदेशीं पाठवून द्यावें आणि इतर स्वतंत्र हिंदी व एशियाटिक स्वतंत्र लोकांना दरबानच्या किनाऱ्यावर पाऊल ठेऊं देऊ नये.

बोटींवर कोणी मनुष्य दगावलेला नव्हता, कसला रोग नव्हता किंवा कांहीं नव्हतें पण दरबानच्या अटर्नी जनरलने बोटी 'क्वारंटाइन' मध्यें ठेवण्याचा हुकूम सोडला. २४ दिवसपर्यंत बोटी बदरांत पडून राहिल्यावर बोटींच्या कप्तानांनीं अटर्नीजनरलना एक सणसणीत पत्र लिहून कळविलें कीं, रोज १५० पौंड नुकसान सोसून आम्ही बोटी आतांपर्यंत ठेविल्या. परंतु आतां आमच्यानें दम धरवत नाहीं. सरकारनें दंगेखोरांचा बंदोबस्त करावा. नाहीं तर आम्ही बेलाशक बंदरांत शिरून उतारू जमिनीवर उतरूं. सरकार काम बंदोबस्त करील तें खरें."

इकडे गांधी व इतर उतारू ह्यांना बोटीवरून उतरूं न देण्याची चळवळ फारच जोरांत आली होती.

## याद राखा गोळ्या घालूं !

"बोटीवर गोळीबार करणाऱ्या मनुष्याला मी मासा एक महिन्याचा पगार बक्षीस देईन, असें एक आरमारी स्वयंसेवक काल रात्रीं म्हणत होता, हा

सभेचा हेतु सिद्धीस नेण्याकरितां या सभेंतील प्रत्येक श्रोता अशाच रीतीनें आपापला एक महिन्याचा पगार बहाल करण्यास तयार आहे काय ?"

भर जाहीर सभेंतील डॉ. मॅकेन्झी ह्या वक्त्यानें असा प्रश्न विचारला; श्रोत्यांनीं टाळ्यांचा कडकडाट केला आणि संमतिदर्शक उद्गार काढले. दोन्ही बोटींच्या उतारूंनीं किनाऱ्यावर उतरूं नये म्हणून जरूर तर रक्तपात करण्यास तयार असलेल्या लोकांची सभेंत यादी करण्यांत आली आणि त्यांच्यावर योग्य अधिकाऱ्यांचीहि नेमणुक करण्यांत आली.

नांदेरी बोटीवरील उतारू जमिनीवर उतरूं लागले. बाहेर प्रचंड व संतप्त जनसमूह जमलेला पाहून त्यावेळीं मि लॅटन नांवाचे एक वकील कूरलॅंड बोटीवर चढले आणि गांधींना सांगूं लागले कीं, मेहेरबानी करा आणि संध्याकाळपर्यंत बोटीवरच रहा. नाहींतर तुमचा जीव धोक्यांत पडेल. " माझा ब्रिटिश लोकांच्या न्यायप्रियतेवर पूर्ण विश्वास आहे " असें सांगून गांधींनीं हा प्रेमळ पण दुबळा सल्ला मानण्याचे नाकारलें.

अखेर अटर्नी जनरल ह्यांस बोटीवरील मंडळीस जमिनीवर उतरण्याची परवानगी तर द्यावी लागलीच. परंतु बाहेर किनाऱ्यावर जमलेला तीन चार हजार गोऱ्या वसाहतवाल्यांच्या चिडलेल्या जमावाचें नियंत्रण व्हावें कसें ? अटर्नी जनरल बोटीवर चढले आणि त्यांनीं बोटीचे कॅप्टन व उतारू ह्यांस शक्य तितकें संरक्षण करण्याची हमी दिली. नतर ते बोटीवरून पुन्हां किनाऱ्यावर आले आणि त्यांनीं व्हिक्टोरिया महाराणीच्या नांवाचा उच्चार करून जमलेल्या लोकांस गर्दी मोडण्याचा हुकूम केला. गर्दी तात्पुरती मोडली आणि लवकरच गांधी बोटीवरून धक्यावर उतरले.

सडकीं अंडीं, मासे, दगड वगैरे सुधारलेल्या शस्त्रास्त्रांचा गांधींवर लगेच भडिमार सुरू झाला.

## जिवावरचा प्रसंग.

" वर्तमान पत्रांतून बरळणारे ते तुम्हींच ना ?" असा मागाहून कोणीतरी गांधींस प्रश्न केला आणि लगेच प्रश्न करणारानें त्यांच्या कमरेंत एक जोराची लाथ ठेवून दिली !

अर्धवट बेशुद्धींत गांधी जवळच्या कठड्याकडे धडपडत गेले व त्याच्या आधारानें उभे राहिले. इतक्यांत दुसरी तितक्याच जोराची लाथ पुन्हां त्यांच्या

कंबरेत बसली. चोहोंकडे एकच दंगल उडाली. इतक्यांत तेथील पोलीस सुपरिंटेंडेंटच्या पत्नीनें हा सर्व प्रकार पाहिला. त्यांना कळवळा आला आणि त्या धांवतच गांधींजवळ गेल्या. त्यांनी दंगेखोरांच्या हातून गांधींना सोडविलें आणि आपल्या घरीं नेलें. तेथून गांधी आपल्या एका मित्राच्या घरीं जावयास निघाले. पण दंगेखोर त्यांच्या पाळतीवर होतेच. त्यांनीं गांधी ज्या मित्राच्या घरांत गेले होते त्या घरालाच वेढा दिला आणि आतां त्या घराला दंगेखोर आग लावणार खास अशीं चिन्हें दिसूं लागलीं. अखेर पोलिस सुपरिंटेंडेंट यांच्या सल्ल्यावरून गांधींनीं पोलीस शिपायाचा वेष धारण केला आणि सुपरिंटेंडेंट बरोबर पोलीस ठाण्यावर गेले. तेथून मग ते आपल्या घरीं गेले.

सुदैवानें त्यांनी आपल्या कुटुंबास आधींच एका मित्राच्या सहाय्यानें सुरक्षितपणें किनाऱ्यावर उतरवून आपल्या एका मित्राचे घरीं पोंचविण्याची तजवीज केली होती.

*" आपल्याविषयीं मीं मोठाच अन्याय केला; आधींच आपली योग्यता मीं ओळखून असतों तर आपला छळ करण्याच्या कामाला मीं कधींच हातभार लावला नसता." असें म्हणून गांधींच्या ह्या छळाला सर्वस्वी अनुकूल असलेले व अंशतः सहाय्यभूत झालेले अटर्नीजनरल मि. एस्कोंब ह्यांनीं ह्या प्रसंगाबद्दल पुढें लवकरच खेद प्रदर्शित केला;* ही गोष्ट येथें नमूद करून ठेवण्यासारखी आहे.

### तत्वनिष्ठा म्हणतात ती ही !

*गांधींच्या आयुष्यांतील विशेष महत्वाच्या प्रसंगांपैकीं हा एक प्रसंग आहे. आतांपर्यंत गांधींवर व्यक्तिशः गोऱ्या वसाहतवाल्यांकडून पुष्कळच अन्याय झाला; पण तो वैयक्तिक स्वरूपाचा होता. ह्यावेळीं त्यांना झालेला विरोध संघटित होता.* आतांपर्यंत तत्वासाठीं त्यांनीं पुष्कळच वेळां आपण दुःख व कष्ट सहन केले; पण ह्यावेळीं त्यांनीं तत्वासाठीं आपला जीव धोक्यांत घातला. आतां पर्यंत त्यांनीं निष्प्रतिकारी तत्वनिष्ठेचा अनुभव घेतला तो स्वतःच्या संतोषापुरता होता. पण ह्यावेळच्या त्यांच्या निष्प्रतिकारी तत्वनिष्ठेनें प्रतिपक्षावर मात केली. स्वभाव परिपोषाच्या दृष्टीनें आतांपर्यंत गांधींच्या आत्मबलाची वाढ, त्यांच्या अवतारकार्याची पूर्व तयारी आणि निष्प्रतिकारी तत्वज्ञानाचा अनुभव ह्यांची ही इतकी वाढ झाली होती.

दोषच काढावयाचा तर वेषांतर करून जीव बचावण्याचा त्यांचा प्रयत्न हें त्यांच्या वर्तनांतील वैगुण्य म्हणून दाखवितां येणार नाहीं असें नाहीं, परंतु पुढील अशाच एका प्रसंगीं त्यांनीं आपल्या वर्तनांतील हें व्यंगहि दूर केल्याचें आढळून येतें.

मनुष्यस्वभावांतील चांगुलपणावरील त्यांचा भरंवसा किती दृढमूल आहे व ब्रिटिश न्यायबुद्धीवरील त्यांची निष्ठा किती अढळ होती हें ह्यावेळींच दिसून येतें. त्यांच्या आत्मबलाच्या व अनुभवाच्या वाढीबरोबर हा भरंवसा व ही श्रद्धा कमी न होतां पुढें सारखी वाढतच गेली !

## तुमच्या मदतीची जरूरी नाहीं.

" तुम्ही नालायक आहांत ! आम्हाला मदत करण्याची तुमची लायकी नाहीं आणि आम्हाला तुमच्या मदतीची जरूरीहि नाहीं ! "

" तुम्ही संकटांत आहांत ! तुम्हाला यथाशक्ति मदत करण्यास आम्हीं उत्सुक आहों. " असें आतांपर्यंतचे कटु अनुभव घेतलेले गांधी बोअर युद्धाच्या वेळीं हिंदी लोकांच्या वतीनें ब्रिटीश सरकारला सांगूं लागले आणि त्यांना वरील प्रमाणें उत्तर मिळालें.

काय आश्चर्य आहे पहा ! ज्यांच्या समतायुद्धीनें हिंदी लोकांचें मनुष्यपण आणि नागरिकत्वाचे हक्क संपुष्टांत येत होते आणि ज्यांच्या न्यायबुद्धीनें गांधींचा स्वाभिमान व प्राण हीं सुद्धां धोक्यांत पडत होतीं त्या इंग्रज वसाहत-वाल्यांस सहाय्य करण्यास हेच गांधी तयार होतात. पण इंग्रज मात्र त्यांच्या सहाय्याची पर्वा करीत नाहींत. एका पक्षाचा मधुर दिलदारपणा आणि प्रति-पक्षाचा मगरूर आडमुठेपणा ह्यांची ही जोडी गांधींच्या आतांपर्यंतच्या जीवन-कार्यांत अगदीं अभेद्य राहिलेली आहे.

द. आफ्रिकेंतील बोअर वसाहतवाले आणि इंग्रज वसाहतवाले ह्यांची सर-मिसळ होती; तरी पण त्यांच्यांत सारखी व वाढती तेढच होती. बोअर ( डच ) वसाहतवाले स्वातंत्र्यप्रिय व धडाडीचे इंग्रज वसाहतवाले त्यांच्या स्वातंत्र्याच्या व त्यांच्या व्यापारी हितसंबंधाच्या आड येत. इ. स. १८८० मध्यें त्यांच्यामध्यें एक लढाई झालीच होती. आणि तेव्हांपासून बोअरलोकांच्या ट्रान्सव्हाल वसाहतीवर ताबा बसविण्याचा इंग्रज वसाहतवाल्यांचा बेत होता. ह्यावेळीं ट्रान्सव्हालच्या लोकसभेचे अध्यक्ष क्रूगर हे होते. त्यांनीं

कारभार काटकसरीनें करून शिल्लक उरेल तेवढा पैसा खर्च करून युरोपांत दारू गोळा व युद्धसामुग्री खरेदी करण्याचा सपाटा चालविला. इंग्रजांच्या ध्यानांत हा प्रकार येतांच तेहि युद्धसामुग्री खरेदी करूं लागले. तेव्हां इंग्रजांना युद्धाची तयारी करण्यास विशेष सवड देऊं नये म्हणून बोअर लोकांनीं एकदम लढाई पुकारली. १८९९ च्या अक्टोबर महिन्यांत युद्धाला तोंड लागलें.

## आम्हांला रणांगणावर पाठवा.

हिंदी लोकांची लष्करांत भरती करण्यांत यावी आणि त्यांना लष्करी शिक्षण देऊन रणांगणावर पाठवावें अशी त्यावेळीं गांधींनीं सरकारकडे मागणी केली. तुमच्या सहाय्यानें युद्धकार्य सुलभ न होतां उलट तुम्हीं खायला काळ आणि भुईला भार व्हाल असा यावर गांधींना जबाब मिळाला. खुद्द लढाऊ कामांत तर नाहींच; पण युद्धविषयक कोणत्याहि कामगिरींत त्यांचें सहाय्य स्वीकारण्यास वसाहत सरकार त्यावेळीं तयार नव्हतें.

बोअर लोकांनीं युद्धाच्या सुरवातीसच इंग्रजवसाहतवाल्यांस सपाटून चोप दिला. त्यांचीं शहरामागून शहरें बोअर लोकांच्या ताब्यांत जाऊं लागलीं; आगगाड्यांचे रस्ते तोडण्यांत आले; माणसें व सामान सुमान तर राहोच परंतु निरोप व पत्रंसुद्धां इकडून तिकडे पोंचण्याची मारामार ! इंग्रज सेनापति सर जॉर्ज व्हाइट् वेढ्यांत सापडले. युद्धानुषंगिक कामासाठीं माणसांचा तुटवडा पडूं लागला. इंग्रज वसाहतवाल्यांची [illegible] कमी होऊं लागली. इंडियन अँग्लिकन मिशनचे प्रमुख यांनीं खटपट करून गांधींना हिंदीस्वयंसेवकाचें पायाळ सैनिकांना हॉस्पिटलमध्यें पोंचविण्यासाठीं डोल्या वाहणारें पथक बनविण्याची परवानगी मिळवून दिली.

## मुडदेफराशी.

या मुडदेफराशीच्या कामांत मानमान्यता नव्हती पण प्राणहानीची भीति मात्र होती. अशा या कामालागहां गांधींच्या शब्दाला मान देऊन एक हजार स्वयंसेवक नाण्याळ पुढें सरसावले.

अनुयायांच्या अगदीं मर्जीविरुद्ध धोरण स्वीकारावयाचें आणि पुन्हां त्या आपल्या धोरणाच्या सफलतेसाठीं हजारों अनुयायांचें मोलाचें, सक्रिय व सार्वजनिक सहाय्य मिळवावयाचें असे प्रसंग गांधींच्या आयुष्यांत किती तरी आले आहेत. त्यांपैकीं हा त्यांचा अगदीं पहिलाच विलक्षण व महत्त्वाचा प्रसंग होय.

साधारण नियम असा आहे की चकमकीतील गोळीबार संपला म्हणजे मग घायाळ लोकांचा शोध करुन त्यांना दवाखान्यांत पोंचवावयाचें. पण गांधींना हा मार्ग रुचला नाहीं. गोळीबाराच्या ऐन तडाक्यांत गांधींचें पथक घायाळांना उचलून नेण्याचे कामीं बिलकुल कसर करीत नसे.

युद्ध संपलें; शांतता प्रस्थापित झाली; ट्रान्सव्हाल व ऑरेंजफ्रीस्टेट हा मुलुख इंग्रजांना मिळाला आणि गांधींना युद्धपदकें व शिफारसपत्रें मिळालीं.

## गरज सरो आणि वैद्य मरो !

गांधींना वाटलें; आतां कांहीं हे नाताळमधील गोरे लोक हिंदी लोकांना अन्यायानें वागविणार नाहींत. गांधींना स्वदेश सोडून आतां ( १९११ ) आठ वर्षें झालीं होतीं. आणि त्यांच्यामतें त्यांचें आफ्रिकेंतील कार्यहि संपलें होतें. त्यांची प्रकृतीहि फार खालावली होती. तेव्हां परत स्वदेशीं येण्याचा विचार त्यांनीं नक्की केला.

द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांनीं त्यांना एका जाहीरसभेंत अत्यंत प्रेमादरानें निरोप दिला व एक पैशांची थैलीहि अर्पण केली. पण गांधींनी पैशांचा स्वीकार केला नाहीं. ते म्हणाले, मी सत्कार्यासाठीं झटलों; कर्तव्यकर्म केलें. त्यासाठीं बक्षीस घेण्याचा मला काय अधिकार ? ज्या सत्कार्यासाठीं आपण सर्व झगडलों त्या सत्कार्यासाठींच आणि तुम्हीच हा पैसा खर्च करावा.

## पुन्हां मध्येंच हिंदुस्थानांत.

गांधी परत हिंदुस्थानांत आले आणि राजकोट येथें वकिली करूं लागले. तेथें त्यांची वकिली चांगलीच चालूं लागली. परंतु यापुढें मुंबई येथेंच कायमची वस्ती करावी ह्या हेतूनें ते मुंबईला आले.

गांधी १९०१ च्या कलकत्ता कांग्रेसला हजर राहिले; पण ते एका स्वयंसेवक पथकाचे कॅप्टन म्हणून ! आणि त्या कॉंग्रेसचे अध्यक्ष सर दिनशा वाच्छा त्यांनीं त्या " फार चांगल्या, तरतरीत आणि अति उत्साही " तरुण स्वयंसेवकाचें खास अभिनंदनहि केलें. आचार धर्माचें रहस्य तें हेंच. कार्य करावयाचें, सत्कार्य करावयाचें आणि उत्कृष्ट रीतीनें करावयाचें हेंच आचार धर्माचें रहस्य आहे ! कोणत्या दर्जाचें, किती त्यागानें आणि कशा धोरणानें करावयाचें यांत कांहीं आचार धर्माचें खरें रहस्य नाहीं. विचार धर्माचें रहस्य कदाचित् यांत असेल इतकेंच !

गोखले, मेथा, यांच्या वगैरे पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखाली असेच राष्ट्रकार्य यथाशक्ति करीत राहण्याची त्यांना फार इच्छा होती. पण इतक्यांत नाताळमधून त्यांना निकडीचे आमन्त्रण आलें.

## पुन्हां आपलें आफ्रिकेंत आलेच !

गांधी पुन्हां एकवार ता. १ जानेवारी १९०३ रोजी प्रिटोरिया येथें जाऊन पोहोंचले.

" तुम्हीं उगाच इकडे कशाला आलांत ? तुम्हीं निमूटपणें स्वदेशीं परत जावें हें बरें. " अशा रीतीनें ह्यावेळीं द. आफ्रिकेंत सरकारी अधिकाऱ्यांनीं त्यांचें स्वागत केलें गोऱ्या वसाहतवाल्यांच्या प्राणांतिक विरोधाला आणि अन्यायपूर्ण सरकारी राजकीय धोरणानेंहि चिडून न जातां उलट सरकारवरील प्राणांतिक संकटाच्यावेळीं सरकारला निष्ठापूर्वक मदत करणाऱ्या गांधींविषयीं सरकारी अधिकाऱ्यांची ही अशी वृत्ति !

गांधी द. आफ्रिकेंत गेले त्यावेळीं मि. जोसेफ चेंबरलेन हे वसाहतींत दौऱ्यावर होते. नाताळमधून गांधी व इतर कित्येक हिंदी गृहस्थांचें एक शिष्टमंडळ त्यांच्या मुलाखतीला गेलें पण ट्रान्सव्हालमधील हिंदी लोकांचें शिष्टमंडळ जेव्हां त्यांची मुलाखत मागूं लागलें तेव्हां त्याला असें स्पष्ट उत्तर मिळालें कीं, ज्या शिष्टमंडळांत गांधी असतील त्या शिष्टमंडळाची भेट घेण्याची माझी इच्छा नाहीं !

## स्थायिक झाले.

एकंदरीत द. आफ्रिकन अधिकाऱ्यांचें हिंदी लोकांविषयींचें धोरण कांहीं सुधारत नाहीं; उलट त्यांच्या अडचणी दिवसेंदिवस अधिकच वाढण्याचे संघटित प्रयत्न होत आहेत हें गांधींच्या लक्षांत येऊन चुकलें. अर्थातच अशा स्थितींत ' तुमचें तुम्हीं पाहून घ्या ' असें म्हणून स्वदेशीं परतण्याइतके गांधी कांहीं कच्चे नव्हते. त्यांनीं द. आफ्रिकेंतच वस्ती करून रहावयाचें व शक्य त्या मार्गांनीं हिंदी लोकांच्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घ्यावयाची असा निश्चय केला. ह्या कामीं न्यायमंदिराचा विशेष उपयोग होण्यासारखा असल्यामुळे महप्रयासानें त्यांनीं तेथील सुप्रीम कोर्टांत बॅरिस्टरीची सनद मिळविली. हिंदी लोकमत जागृत व माहितगार व्हावें आणि हिंदी लोकांचीं गाऱ्हाणीं व्यवस्थितपणें वसाहतवाल्यांपुढें मांडलीं जावीं म्हणून त्यांनीं एक छापखाना विकत घेऊन

" इंडियन ओपीनियन-" हिंदी लोकमत ह्या नांवाचें एक साप्ताहिक सुरू केलें. त्यांत इंग्रजी, हिंदी, गुजराथी व तामीळ अशा चार भाषांतून मजकूर देण्यांत येई. पहिल्याच वर्षी ह्या पत्रासाठीं गांधींना दोन हजार पौंड नुकसान सोसावें लागलें. पण पुढें हें नुकसान कमी कमी होत गेलें आणि पत्राची उपयुक्तता व आवश्यकता वाढतच गेली. ह्याच वर्षी गांधींनीं 'ब्रिटिश इंडियन असोसिएशन' ही संस्था स्थापन केली.

## शत्रूंवरहि उपकार आणि मित्रांवरहि.

जोहान्सबर्गमध्यें १९०४ सालीं प्लेगची सांथ भयंकर जोरांत सुरू झाली ! म्युनसिपालटीनें तात्काळ योग्य बंदोबस्त करावा म्हणून गांधींनीं प्रयत्न केलें. पण बेदरकार अधिकारी वर्गानें त्यांना दाद दिली नाहीं. एक दिवस तर शहरच्या एका लहानशा भागांत २१ लोक प्लेगला बळी पडले. तेव्हां गांधींनीं आपल्या मित्रांच्या सहाय्यानें एक मालाची वखार साफसूफ केली आणि त्याला एक प्लेगचें हॉस्पिटल बनविलें. अखेर म्यूनसिपालटीला लाजेनें कां होईना, दुसऱ्याच दिवसापासून संरक्षक उपायांची योजना करावी लागली. आणि अशा उभयविध प्रयत्नांनीं एक महिन्यांत १०० माणसांचा बळी घेऊन ही सांथ बंद पडली.

झुलू लोकांनीं १९०६ सालीं एक बंड उभारलें. त्यावेळीं गांधींनीं सरकारी अधिकाऱ्यांची परवानगी घेऊन एक शुश्रूषापथक बनविलें. गांधी ह्यांनाच त्या पथकाचे सार्जंट मेजर नेमण्यांत आलें. ह्यावेळीं गांधींनीं रानटी झुलू लोकांची पोटच्या पोरांइतकीच कळकळीनें शुश्रूषा केली.

बोअर युद्धाच्या अनेक कारणांपैकीं हिंदी लोकांचे हाल हें एक कारण साम्राज्य सरकारतर्फे सांगण्यांत आलें होतें. पण सर्व द. आफ्रिकन वसाहती ब्रिटिश अमलाखालीं आल्यावर हे हाल कमी न होतां उलट ते वाढले !

## होतें तेंच बरें होतें !

बोअर युद्धापूर्वी बोअर अंमलांतील ट्रान्सव्हाल मध्यें हिंदी लोकांना प्रवेश करण्यास मनाई नव्हती. त्यांनीं फक्त ३ पौंड भरून आपलें नांव नोंदवून घेतलें म्हणजे पुरत असे. पण १९०३ सालीं एक 'शांततासंरक्षण' कायदा करण्यांत आला. त्या कायद्यान्वयें ह्या नव्या वसाहतींत नव्यानें वसाहत करा-

वयाला येणाऱ्या प्रत्येक हिंदी मनुष्याला नवीनच निर्माण केलेल्या: एशियाटिक खात्याकडून परवाने काढण्याची सक्ती होऊं लागली. युद्धापूर्वीचे रहिवाशी नसलेले नवेनवे हिंदी लोक चोरून वसाहतींत प्रवेश करून घेतात अशीहि तक्रार करण्यांत येऊं लागली. पण ह्या तक्रारींत कांहींच विशेष अर्थ नाहीं असें परवाने खात्याच्या चीफ सेक्रटरीचें मत पडलें. लॉर्ड मिल्नर ह्यांना हें मत मान्य करावें लागलें. पण (गोऱ्या) लोकमताला मान देण्याकरितां म्हणून हिंदी पुढाऱ्यांना त्यांनीं असें सुचविलें कीं, एकंदर हिंदी लोकांनीं केवळ आपखुषीनें पुनः एकवार आपलीं नांवें, ओळख पटविणाऱ्या खाणा खुणा तपशीलवार देऊन, नोंदवून घ्यावींत. पुन्हां नांवें रजिस्टर करावीं लागणार नाहींत किंवा नवे परवानेहि काढावे लागणार नाहींत असें लॉर्ड मिल्नर ह्यांजकडून स्पष्ट अभिवचन मिळविल्यावर गांधी तडजोडीला तयार झाले आणि नांव नोंदणीचें काम समाधानकारक रीतीनें पार पडलें.



## प्रकरण ३ रें.

# सत्याग्रहयुद्धाचा उपक्रम.

### नव्या राजवटींत.



द. आफ्रिकेंतील जुन्या व नव्या राजवटींत हिंदी लोकांविरुद्ध ज्या कांहीं चळवळी झाल्या त्या गोऱ्या वसाहतवाल्यांस त्या त्यावेळीं हिंदी लोकांकडून कांहीं विशेष किंवा विशिष्ट व असह्य अडचणी होत होत्या. म्हणून नव्हे; किंवा केवळ इंग्रज अथवा केवळ बोअर लोकांकडूनच झाल्या असेंहि नाहीं. जगाच्या पाठीवरील हा एक सधन व अफाट भूप्रदेश गोऱ्या लोकांच्या वाढत्या लोकसंख्येला त्याहूनहि वाढत्या खादीला निर्वेध मोकळा रहावा आणि ह्या भागांत उत्पन्न होणाऱ्या भावी द. आफ्रिकन साम्राज्यांत काळ्या पिवळ्या एशियाटिकांचा उपसर्ग राहूं नये ह्या इच्छेनेंच हे सर्व प्रयत्न होत होते. १८९४ सालीं नाताळ पार्लमेंटच्या एका सभासदानें असेच उद्गार काढले होते व आज ह्या १९१३ सालीं ज. स्मट्स ज. हर्झाग व इतर गोरीं पत्रें अगदीं हेच उद्गार काढीत आहेत. द. आफ्रिकेंतील हा लढा ह्याप्रमाणें अगदीं एकसूत्री आहे.

ह्यामुळें आपखुषीनें नांवें नोंदविण्यास हिंदी लोक तयार झाल्याचें पाहून गोऱ्या अधिकाऱ्यांचा धीर अधिकच चेपला; त्यांतच त्यांना इतक्यांतच जबाबदार राज्यपद्धतीचें स्वराज्य मिळावयाचें असल्यामुळें त्यांना विशेष जोर चढला होता. आणि ह्या अशाच कारणांमुळे एकंदर गोऱ्या वसाहतवाल्यांच्या 'एशियाटिक लोक सर्व द. आफ्रिका भरून काढीत आहेत' या कावेबाज व सतत चालणाऱ्या ओरडीची भर पडलेली. अखेर ट्रान्सव्हाल सरकारनें २२ ऑगष्ट.१९०६ च्या गॅझेट एक्स्ट्रॉ ऑर्डीनरीमध्यें हिंदी लोकांना पुन्हां आपलीं नांवें रजिस्टर करून घेणें भाग पाडणारा ड्रॅफ्ट एशियाटिक ऑर्डिनन्स प्रसिद्ध केला.

## कायद्याचें स्वरूप.

म. गांधीची ह्या नवीन होऊं घातलेल्या कायद्यांतील आक्षेपार्ह भागांची कलमवार यादी पुढीलप्रमाणें होती:—

( १ ) ट्रान्सव्हालमध्यें हिंदी लोकांची गर्दी उसळत नसून उलट बोअरयुद्धापूर्वी त्यांची संख्या १५००० होती ती १९०४ च्या खानेसुमारींत १३००० झाली. ह्या बाबतींत जाहीर चौकशी करून घ्यावयास आमची तयारी आहे.

( २ ) चोरून मारून किंवा भलभलत्याच नांवानें वसाहतींत शिरणाऱ्या हिंदी लोकांना अटक करून पुन्हां हद्दपार करण्याचा अथवा ते हद्दीबाहेर जाण्याचें नाकारतील तर त्यांना कडक शिक्षा करण्याचा अधिकार शांतिसंरक्षक कायद्यान्वयें सरकारला आहेच. आणि जुने परवाने एकवार सरसहा तपासून पाहिल्यास बेकायदा वस्ती करणाऱ्या हिंदी लोकांस सहज हुडकून काढतां येईल.

( ३ ) जुन्या सरकारला ३ पौंड भरून नांवें नोंदवून घेतलेल्या लोकांना नांवें नोंदवून घेण्याची आवश्यकता नसूनहि लॉर्ड मिल्नर ह्यांच्या शब्दांना मान देऊन हिंदी लोकांनीं आपखुषीनें नांवें नोंदवून घेतलीं. पण ह्या कायद्यानें ती नोंदणी निरुपयोगी ठरविली जाणार आहे.

( ४ ) ह्या कायद्यानें जुने सर्व परवाने निरुपयोगी ठरवून प्रत्येक हिंदी मनुष्याला ह्या परवान्यातला मनुष्य तो मीच असें सिद्ध करावें लागेल. व त्यासाठीं सर्व प्रकारचीं अनवश्यक व पुष्कळ वेळां उपमर्दकारक प्रश्नोत्तरें ऐकून घ्यावीं लागतील.

( ५ ) आतांपर्यंत परवाना नाकारण्याचा अधिकार गव्हर्नरकडे होता तो ह्या नव्या कायद्यानें एका नवीनच दुय्यम अधिकाऱ्याकडे जाणार आहे!

( ६ ) परवानावाल्यानें आपल्या हातांच्या दहाहि बोटांचे ठसे उठवून द्यावयाचा हा नियम तर अत्यंत कष्टप्रद आणि अवनतिप्रद आहे. एकंदर सुधारलेल्या जगांत असा प्रकार कोठें आढळणार नाहीं. फक्त गुन्हेगारांनाच असे ठसे द्यावे लागतात.

( ७ ) नवा कायदा म्हणजे जुन्या १८८५ च्या ३ ऱ्या कायद्याची दुरुस्ती आहे असें म्हणतां येत नाहीं. जुन्या कायद्यान्वयें फक्त तीन पौंड कर न देतां वसाहत करून राहणाराला शिक्षा होऊं शकते. ह्या नव्या कायद्यानें ब्रिटिश हिंदी लोकांच्या एकंदर वसाहतप्रवेशापर्यंत नियमन होणार आहे.

येथील लोकमत हिंदी लोकांविषयीं फार कलुषित झालेलें आहे हें खरें; आणि त्यामुळें हें नियमनहि आम्हीं स्वीकारूं पण नियमनाची अंमलबजावणी करण्याचे मार्ग मात्र रानटीपणाचे आणि म्हणून आक्षेपार्ह आहेत. पूर्वीचा कायदा फक्त व्यापाऱ्यांपुरता होता. नव्या कायद्यांचा अंमल स्त्रिया, मुलें आणि व्यापारधंदा न करणाऱ्या इतर लोकांवरहि होणार आहे.

गांधी, अबदुल घनी, इसूफ मियां, हाजी वजीर आणि पिटर मूनलाइट ह्या गृहस्थांचें एक शिष्टमंडळ वसाहत सरकारच्या वसाहत खात्याच्या सेक्रेटरीस भेटावयास गेलें. भेट झाली. शिष्टमंडळाचें म्हणणें शांतपणें ऐकून घेण्यांत आलें आणि ४ सप्टेंबर रोजीं बिल लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीपुढें आणून क्षुल्लक फेरफारानंतर १२ सप्टेंबरला तें मंजूर करून घेण्यांत आलें.

### " तुरुंगांतच जाऊं "

ट्रान्सव्हालमध्यें पूर्वी कधींहि भरली नव्हती एवढी ३००० हिंदी लोकांची जंगी जाहीर सभा अबदुल घनी ह्यांच्या अध्यक्षतेखालीं ११ सप्टेंबर रोजीं जोहान्सबर्ग येथें भरली. या सभेंत पसार करण्यांत आलेल्या ठरावांपैकीं चौथा ठराव पुढील आशयाचा होता:—" लेजिस्लेटिव्ह कौन्सिल व बादशाही सरकार आमची विनंति अमान्य करील तर अशा उपमर्दकारक, जुलमी आणि अनब्रिटिश नियमांना मान देण्याऐवजीं ब्रिटिश हिंदी लोक कैदेची शिक्षाच पतकरतील. "

सभेला हजर असलेला प्रत्येक हिंदी मनुष्य त्यावेळीं एकदम उठून उभा राहिला आणि एकंदर जनसमूहानें ह्या ठरावाला अत्युत्साहानें " होय ! होय !" म्हणून संमति दिली.

" तुमच्या असल्या धमक्यांना आम्ही भीक घालणार नाहीं. मात्र असा कांहीं उपद्व्याप कराल तर सरसहा सर्वच हिंदी लोकांची वसाहतींतून हकालपट्टी होईल " अशी त्यावेळीं हिंदी लोकांना भीति घालण्यांत येऊं लागली.

अखेरचा मार्ग म्हणून गांधी व हाजी वजीर अल्ली हे हिंदी लोकांतर्फे प्रतिनिधि म्हणून ता. ३ अक्टोबर १९०६ रोजीं विलायतेस जावयास निघाले. खुद्द ब्रिटिश वसाहत प्रधानांच्या कानावर आपली गाऱ्हाणीं घालावींत असा त्यांचा विचार होता.

" आम्हीं आपल्या परी शिकस्त करून पाहूं पण विशेष आशा कांहीं दिसत नाहीं. तेव्हां आपण आपल्या ४ था ठरावावरच मुख्यतः अवलंबून राहिलें.

पाहिजे " असें गांधींनीं लोकांचा निरोप घेतांना स्पष्ट सांगून टाकलें होतें आणि " सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे हिंदु मुसलमान ह्यांच्यांत सर्वस्वी एकमेक झालेंच पाहिजे " असेंहि त्यांनीं ह्यावेळीं सर्वांस बजावून ठेविलें.

## शिष्टाई

गांधी इग्लंडमध्यें फक्त ४० दिवस राहिले. ह्या मुदतींत गांधीनीं पार्लमेंटच्या कित्येक सभासदांच्या व्यक्तिशः मुलाखती घेतल्या. कित्येक वर्तमानपत्रांची सहानुभूति मिळविली.

परिस्थिति बिकट होती आणि दिवसें दिवस अधिक बिकट होत जाणार होती. द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांचा प्रश्न येथेंच सुटणारा किंवा थांबणारा नव्हता. व ह्या कामीं असे वैयक्तिक, तत्कालीन, आणि उपरे प्रयत्न अपूरे होते असें गांधींना वाटूं लागलें. ह्यासाठीं इंग्लंडमध्यें हिंदी लोकांचा कैवार घेण्यासाठीं कांहीं तरी संघटित, स्थिर आणि कार्यक्षम योजना व्हावी असें गांधीनीं ठरविलें.

महर्षि दादाभाई नौरोजी ह्यांनीं ह्या कार्याला उचलून धरलें, सर मंचरजी भावनगरी ह्यांची त्यावेळची कर्तबगार सहानुभूति गांधींच्या कार्याला मिळाली; अमीरअली हेहि गांधींच्या मदतीला आले आणि त्यांच्या साहाय्यानें प. वा. वॅल्यू. टी. स्टीड, सर जॉर्ज बर्डवुड, थिओडर मॉरिसन, लॉर्ड रे, सर रेमंड वेस्ट वगैरेंचें सहकार्य गांधींना लाभलें.

सर लिपल ग्रिफन ह्यांच्या नेतृत्वाखालीं लॉर्ड स्टॅन्ली, सर जॉर्ज बर्डवड, जे. डी. रीस, सर हेनरी कॉटन, हॅरोल्ड कॉक्स, दादाभाई नौरोजी, सर मंचरजी भावनगरी, अली व गांधी ह्यांचें एक शिष्टमंडळ वसाहतप्रधान लॉर्ड एल्जिन ह्यांच्या मुलाखतीला गेलें.

निदान चौकशी कमिशन तरी नेमून पहा अशी गांधीनीं त्यावेळीं वसाहत-प्रधानांस विनंति करून पाहिली.

" एका आंगठ्याचा ठसा जर तुम्ही खुशीनें दिलात तर दहा बोटांचा ठसा द्यावयाला हरकत कोणती ? " असा त्यावेळीं लॉर्ड एल्गिन यांनीं शिष्ट-मंडळीला उलट प्रश्न विचारला. कांहीं अडाणी हिंदी मजुरांच्या कोऱ्या काग-दावर ठसा करून त्यांच्या साहाय्यानें लॉर्ड एल्गिन यांचा असा एकज करून दिला कीं, ट्रान्सव्हालच्या ब्रिटिश इंडियन असोसिएशननें त्या गृहस्थांनीं पिटाईचें मुखत्यार पत्रच दिलेलें नाहीं. परंतु त्या गृहस्थांचा कोरसाळपणा

लवकरच जगजाहीर झाला. आणि लॉर्ड एल्जिन ह्यांच्यानंतर हेंच शिष्टमंडळ हिंदी प्रधान मोर्ले ह्यांच्या मुलाखतीला गेलें तेव्हां त्यावेळीं मोर्ले ह्यांचें धोरण पुष्कळच सहानुभूतीचें झालें. ह्याच मुक्कामांत गांधींनीं " द. आफ्रिका ब्रिटिश इंडियन कमीटी " स्थापन केली.

" ह्या ब्रिटिश मताधिकार मागणाऱ्या घार्यांकडे पहा आणि प्रसंग पडेल तेव्हां वीरवृत्तीनें पुढें या " असा गांधी इकडे आपल्या बांधवांस इशारा देतच होते. ह्या शिष्टाईपासून कांहीं विशेष फलप्राप्ति होईल असें वाटत नव्हतें. पण अखेर लॉर्ड एल्जिन हे विशेष चौकशी केल्यावांचून ह्या कायद्याला संमति - या असें बादशहांना सुचविण्यास तयार नाहींत असें जाहीर झालें. कायद्याची अंमल-बजावणी होणार नाहीं असेंहि जाहीर करण्यांत आलें गांधींची शिष्टाई येवढ्या-पुरतीच तरी यशस्वी झाली. पण त्यामुळें ब्रिटिश उदारमतवादी प्रधानमंडळानें मोठेसें औदार्य दाखविलें असेंहि नाहीं किंवा ट्रान्सव्हालच्या अधिकाऱ्यांना विशेष नाखूष होण्याचें कारण होतें असेंहि नाहीं. पुढील वर्षींच ट्रान्सव्हाल सरकारला स्वायत्तता मिळणार होती व ब्रिटिन सरकार आपल्या जबाबदारींतून व ट्रान्सव्हाल सरकार आपल्यावरील ब्रिटिश बादशाही दाबाखालून मोकळे होणार होतें.

## सत्याग्रहास आव्हान.

ट्रान्सव्हालला जबाबदार राज्यपद्धतीचे अधिकार मिळाले आणि नवीन पार्ल-मेंट अस्तित्वांत आलें ह्या नव्या पार्लमेंटनें पहिल्या सपाटयास एशियाटिक्स लॉ अमेंडमेंट बिल विचाराकरितां घेतलें आणि अवघ्या दोन दिवसांत ( ता. २१ व २२ मार्च १९०७ ) तें मंजूर करून टाकलें. बिलाचें पहिलें वाचन आणि दुसरें वाचन ह्यांच्यामध्यें निदान ३ महिन्याची मुदत असावी हा काय-द्यांतील सर्वसामान्य नियम त्यांनीं तात्पुरता तहकूब करून ठेविला.

हिंदुस्थानांत द्विदल राज्यपद्धति सुरू करण्यास कारणीभूत झालेले, राऊंड-टेबल संस्थेचे प्रमुख लायोनेल कर्टिस हे द. आफ्रिकन नवीन राजघटनेच्या वेळीं तेथेंहि असेच उपद्व्याप करण्यास हजर होतेच. त्यांनीं त्या विधेयकाचा जोरानें पुरस्कार चालविला होता. त्यांना कोठून तरी वसाहतींतून हिंदी लोकांची पुरी हकालपट्टी करावयाची होती. पण उजळ माथ्यानें त्यांना तसें करणें शक्य नव्हतें. म्हणून त्यांनीं हिंदी लोकांची वसाहतींतील वसति शक्य तितकी कष्टप्रद करण्याचा प्रयत्न चालविला होता. त्या कामांत बादशाही सरकारची

त्यांना मुळींच भीति किंवा परवा नव्हती. " घटकाभर आपण ब्रिटिश साम्राज्य झुगारून देऊं; आपणाला वाटेल तो कायदा करून घेऊं आणि मग त्या अटी वर साम्राज्यांत पुन्हा सामील होऊं " असे बेपर्वाईचे उद्गार भर पार्लमेंटमध्यें एका सभासदानें काढले होते.

## आव्हानास उत्तर

गांधीनीं ह्या आव्हानाचा स्वीकार करतांना पुढील उद्गार काढले होते:— " ट्रान्सव्हाल सरकारच्या धैर्याबद्दल आपण त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे. आपल्या स्वातंत्र्यासाठीं ज्यांनीं स्वतःच्या रक्ताच्या नद्या वाहविल्या आणि असंख्य आपत्तींना वीरवृत्तीनें तोंड दिलें त्यांच्याकडून निराळ्या वर्तणुकीची अपेक्षाच करण्यांत आली नव्हती. आपणहि ह्या वीरवृत्तीला वीरवृत्तीनेंच तोंड दिलें पाहिजे. ब्रिटिश प्रधानांच्या गोडगोड शब्दांतील सल्लामसलतींनीं मोहून जाण्याला किंवा हिंदी लोकांच्या निःशस्त्र प्रतिकाराच्या धमकीला भीक घालण्याला ट्रान्सव्हाल सरकार तयार नाहीं. ह्या कायद्यानें आपल्यावर गुलामगिरीचा शिक्का बसणार आहे, ह्याची जर आपणास जाणीव होत असेल तर आपण ह्या कायद्याला तोंड दिलें पाहिजे; त्याच्यापुढें मान वांकवून चालणार नाहीं. भाषणापेक्षां कृतीलाच महत्व देणाऱ्या शूर राज्यकर्त्यांवर शूर आणि व्यावहारिक कृतीचाच परिणाम होईल. "

## तडजोड फेटाळून लावली.

ह्या कायद्याला १९०७ च्या मे महिन्यांत बादशाही संमति मिळाली. आम्ही जरूर तर आपखुषीनें एकवार नोंदणी करून घेतों. अशी त्यावेळीं, लॉर्ड मिल्नर ह्यांच्या सल्ल्यावरून तडजोड सुचविली. गांधीनीं ह्यापूर्वीहि चारवेळां तडजोड सुचविली होती. पण हट्टी आणि मगरूर वसाहतसरकारनें ही तडजोडीची सूचना फेटाळून लाविली. इतकेंच नव्हे तर ह्या कायद्याच्या अंमलबजावणी संबंधानें विलक्षण व आक्षेपार्ह नियम तयार केले. आणि शेवटीं त्याच्याहिपुढें जाऊन जुलै १९०७ मध्यें ट्रान्सव्हाल इमिग्रेशन रिस्ट्रिक्शन बिलाचा मसुदा पार्लमेंटपुढें मांडला!

" द. आफ्रिकेला एशियाटिकांच्या आयातीचें नियंत्रण करण्याचा अधिकार आहेच असें म्हणून मि. चर्चिल ह्यांनीं त्यावेळीं ट्रान्सवालच्या ह्या कायद्याला हवाला धरले. इतकेंच नव्हे तर " युद्धापूर्वीच द. आफ्रिकेवर आम्हाला

जास्त दाब ठेवतां येत असे" असें सांगून सध्यांचा आपला दुबळेपणाहि कबूल करावा लागला.

"हिंदी लोकांच्या दैवाला द. आफ्रिकाच हात देईल, समुद्रापलीकडून हातभार लागणार नाहीं." असें म्हणून गांधींनीं ह्या बादशाही सरकारच्या दुबळेपणाची उणीव हिंदी लोकांनीं "खऱ्या स्वार्थत्यागाच्या बळावर भरून काढावी असें आपल्या देशबांधवांस सुचविलें.

"उच्च संस्कृति कनिष्ठ संस्कृतीच्या भक्ष्यस्थानीं कायमची पडूं शकेल कीं काय?" ह्या प्रश्नाचें उत्तर ह्या झगड्यांत मिळवावयाचें आहे असें गांधींचें म्हणणें होतें.

"आम्हीं तुमच्या ह्या धमक्यांना मुळींच भीक घालणार नाहीं." असें वसाहतवाले तावातावानें म्हणत होते पण आंतून त्यांना ह्या चळवळीचा जोर चांगलाच जाणवूं लागला होता. आणि म्हणूनच त्यांनीं ह्या कायद्याची अमलबजावणी कावेबाजपणानें करण्याचें धोरण स्वीकारलें. कायद्याची अंमलबजावणी चोहोंकडे एकदम सुरू करून सार्वत्रिक विरोधास तोंड देणें त्यांना बरें वाटलें नाहीं. याकरितां त्यांनीं जिल्हावारीनें अंमलबजावणी करण्याचा बेत केला. प्रिटोरिया भागांतील हिंदी लोक विशेष सुसंघटित नव्हते. म्हणूनच त्यांनीं प्रथम प्रिटोरियाभागांत ह्या कायद्याची अंमलबजावणी करण्याचें ठरविलें.

## गांधींच्या चळवळीचा विजय.

'आम्हांला नोंदणीकायद्याच्या गुलामगिरींतून मुक्त व्हावयाचें आहे पण त्या ऐवजीं दुसऱ्या एखाद्या जुलमाखालीं मान द्यावयाची नाहीं". असें म्हणून गांधींनीं आपल्या कार्यकारी अनुयायांना अशी स्पष्ट समजूत देऊन ठेविली होती कीं, "कोणत्याही प्रकारची 'सक्ती' ही आपल्या ह्या झगड्यांतील आयतत्त्वांच्या अगदीं विरुद्ध आहे" आणि गांधींच्या ह्या शुद्ध नैतिक चळवळीचा चांगलाच विजय झाला. १५,०० हिंदी लोकांपैकीं फक्त १०० च लोकांनीं नवे परवाने काढले; आणि त्यांचेंही घरोपरीं फिरून हिंदी लोकांस कर्तव्यजागृत करणाऱ्या स्वयंसेवकांनीं हें सर्व काम इतक्या चोख रीतीनें आणि शांतपणें बजावलें कीं, स्टारमासल्या पत्राला गांधींच्या स्वयंसेवकांच्या पथकालाहि त्यांच्या शांतताप्रिय वर्तणुकीची शिफारस करावी लागली.

"ब्रिटिश इंडियन असोसिएशनची तुरुंगप्रवेशाची ही धमकी पोकळ असें आतांपर्यंत आम्हांला वाटत होतें परंतु पुढील अनुभवावरून

गोष्ट विशेष विचारांत घेण्यासारखी दिसते. सरकार कायद्याच्या अंमलबजावणीचा फेर विचार करून कांहीं मध्यम मार्ग काढतां येईल किंवा नाहीं तें पाहील तर बरें."

## पुन्हां तडजोड.

" तडजोडीच्या अटींना मी पुन्हां एकवार उच्चार करतों. त्या योगानें आमच्या समाजाला हीन दर्जाचा कालिमा न लागतांच कायद्याला जरूर त्या सर्व गोष्टी करतां येतील. पण आम्हीं एकदां त्या कायद्यापुढें मान वांकविली म्हणजे हाच कायदा शेवटचा ठरेल अशी हमी कोण देणार? त्या कायद्याचा स्वाभाविक परिणाम आमची रवानगी प्रथम महारवाड्यांत ( सेग्रिगेशन )'आणि नंतर पार देशाबाहेर आहे." असें म्हणून गांधीनीं हा " मध्यममार्ग " पुन्हां एकवार अधिकाऱ्यांस दाखवून दिला.

" हिंदी लोकांच्या ह्या विरोधाचे कटु परिणाम त्यांना सहन करावे लागले तर त्याचा दोष सर्वस्वी हिंदी लोकांच्या आणि त्यांच्या पुढाऱ्यांच्या मस्तकावर राहील." असें म्हणून ज. स्मट्स ह्यांनीं ह्या तडजोडीच्या प्रयत्नांना पार धुडकावून दिलें. " मुदतींत नांव नोंदवून न घेणाऱ्या हिंदी मनुष्याला हद्दपार करण्यांत येईल; नांव नोंदणी पूर्वी व्यापारी परवाने देण्यांत येणार नाहींत आणि अशा रीतीनें सर्व हिंदी दुकानें बंद पडतील. हा देश केवळ गोऱ्या लोकांसाठीच ठेवावयाचा आहे. आणि त्या दिशेनें आंखलेला आमचा मार्ग कितीहि अडचणीचा असला तरी आम्हीं पाऊल पुढें टाकलें आहे आणि तें आम्ही कधींहि मागें घेणार नाहीं." अशीहि ज. स्मट्सनीं हिंदी लोकांस उघड उघड धमकी दिली.

## सरकारची कारवाई.

एकामागून एक सर्व भागांत नोंदणी ऑफीसें उघडण्यांत आलीं. युरोपियन व्यापारी कंपन्यांनीं व इतरांनीं आपापल्या संबंधांत येणाऱ्या हिंदी लोकांची गोडी गुलाबीनें व धमकीनें नांवें नोंदविण्यासाठीं मनें वळविण्याचे प्रयत्न केले. पण अखेर मुदत संपली आणि सरकारी धमक्याहि निरुपयोगी ठरल्या. मग नोंदणीची मुदत एक महिन्यानें वाढविण्यांत आली; पुन्हां आणखी एक महिन्यानें वाढविण्यांत आली. आणि इतकें सर्व करूनहि १३००० हिंदी लोकांपैकीं फक्त ५११ लोकांनींच १ नोव्हेंबरच्या शेवटच्या तारखेपर्यंत नांवें नोंदवून घेतलीं!

:वसाहतसरकारचें तोंड काळें ठिक्कर पडलें; ब्रिटिश वसाहतखात्यानें तोंड चेंडेंवाकडें केलें आणि हिंदी लोकांचा चेहरा उत्साहानें प्रफुल्ल झाला.'

इतक्यांत इमिग्रेशन बिल् द. आफ्रिकन पार्लमेंटमध्यें मजूर झालें आणि त्याला बादशाही संमतीहि मिळाली. गांधीच्या नैतिक विजयानें चिडून गेलेले ज. स्मट्स लगेच दुप्पट निकरानें हिंदी लोकांच्या मागें लागले.

गांधी हेच त्या सगळ्या चळवळीच्या मुळाशीं आहेत; बाकी हिंदी लोक केवळ त्यांच्या नादानें बहकलेले आहेत असें ठरवून ज. स्मट्स ह्यांनीं 'तुरुंगांत जाऊं' म्हणून धमकी देणाऱ्या हिंदी लोकांना 'चलाच तर मग तुरुंगात' म्हणून खरोखरच तुरुंगांत खेंचण्याचा सपाटा सुरू केला.

## तुरुंगांत खेंचण्याचा सपाटा.

गांधी आणि २४ इतर हिंदी पुढारी लोक ह्यांना नाताळच्या सणांत (२८ डिसेंबर १९०७) पकडून जोहान्सबर्गचे असिस्टंट रेसिडेंट मि. जॉर्डन ह्यांजपुढें उभें करण्यांत आलें. प्राथमिक चौकशी झाल्यावर गांधींनीं आपलें म्हणणें कोर्टापुढें थोडक्यांत मांडण्याची परवानगी मागितली.

"मला येथें तुमच राजकीय पुराण ऐकून घ्यावयाची इच्छा नाहीं," असें म्हणून मि. जॉर्डन ह्यांनीं गांधींना परवानगी देण्याचें नाकारलें आणि उलट हिंदी लोकांस थोडासा हितोपदेशहि केला हिंदी लोक ह्या प्रकरणांत थोडेसे तरी व्यवहार ज्ञान दाखवितील तर फार बरें होईल असें म्हणून मॅजिस्ट्रेट पुढें म्हणाले, "सरकारी हुकुमांचा खेळखंडोबा करणें म्हणजे विस्तवाशीं खेळ करण्यासारखा आहे ही गोष्ट एशियाटिकांस समजून चुकली पाहिजे. जेव्हां एखादी व्यक्ति सरकारच्या इच्छेला विरोध करूं लागते तेव्हां सरकार हीच नेहमी बलाढ्य ठरते. आणि कष्ट व्यक्तीला सहन करावे लागतात, सरकारला करावे लागत नाहींत." अखेर सरकार श्रेष्ठ कीं व्यक्ति श्रेष्ठ ह्याचा कायमचा निकाल सुधारणा युगाच्या अंतापर्यंत लागणें कठीण आहे. पण इतकें मात्र खरें कीं व्यक्तिसरकारें निर्माण करूं शकते आणि सरकारें व्यक्तींचें निर्मूलन करूं शकलीं तरी अखेर एखाद्या व्यक्तीच्या प्रयत्नांनींच स्वतःचें निर्मूलन करून घेत असतात. सरकारी वकीलानें गांधींना ४८ तासांत ट्रान्सव्हाल सोडून जाण्याचा हुकूम द्यावा असें कोर्टाला सुचविलें. "अठ्ठेचाळीस तासांची मुदत हवी कशाला? त्याहूनहि कमी मुदत द्याना!" असें गांधींनीं यावर मॅजिस्ट्रेटला उत्तर दिलें.

"ठीक आहे ! तुमची तशी इच्छाच असेल तर मी तुम्हाला निराश करणार नाहीं" असे म्हणून मि. जोन्स ह्यांनीं गांधींना ४८ तासांत वसाहतींतून निघून जावें असा हुकूम सोडला.

"रजिस्ट्रार ऑफ् एशियाटिक्स हा आपलें काम पाहावयाला योग्य आणि लायक नाहीं असें माझ्या अल्पबुद्धीला वाटतें असें सी. एम्. पिले ह्या आरोपीनें नांव न नोंदण्याचें कारण सांगितलें. मॅजिस्ट्रेट चिडले. गांधींच्या विशुद्ध न्याय्य आणि उदार बुद्धीलाहि हें विधान आवडलें नाहीं. आरोपीचें विधान अयोग्य आहे असें मॅजिस्ट्रेटजवळ गांधींनीं तत्काळ कबूल केलें.

"अठ्ठेचाळीस तासांच्या मुदतींत वसाहतीबाहेर जाण्याची शिक्षा द्या म्हणून तुम्हीं मला सांगणार कोण ? मीं आरोपीला १४ दिवसांची मुदत देणार असें म्हणून थंबी नायडू ह्या श्रीमान् व्यापाऱ्याच्या खटल्यात मॅजिस्ट्रेटनें गांधींची "माझ्या ह्या अशीलालाहि वसाहत सोडून जाण्यास फक्त ४८ तासांची मुदत द्या" ही विनंति रागारागानें अमान्य केली !

कोर्टाचें काम संपल्यानंतर लगेच भरलेल्या जाहीर सभेंतील आपल्या हिंदी, चिनी आणि युरोपियन श्रोत्यांना उद्देशून ते म्हणाले, "माझें किंवा इतर कोणाचें कांहींहि होवो, आम्ही झगडा असाच चालविणार. मी चुकत आहें असा जर ईश्वरी संदेश मला मिळेल तर तत्क्षणीं मी माझी चूक कबूल करून तुमची क्षमा मागेन. पण असा संदेश कधी काळीं मला मिळेल असे वाटत नाहीं. हा झगडा धार्मिक आहे आणि आम्ही अखेरपर्यंत झगडतच राहणार."

## हिंदुस्थान हवें कीं वसाहती हव्या ?

"येशूख्रिस्त जोहान्सबर्ग आणि प्रिटोरिया येथे येईल आणि ज. बोथा व ज. स्मट्स ह्यांचीं अंतःकरणें तपासून पाहील तर ख्रिश्चियन वृत्तीला अगदींच अपरिचित असें कांहीं तरी त्यांत त्याला आढळून येईल. * * * तुम्हीं ह्या देशांतून चालते व्हा असें सरकारनें हिंदी लोकांना स्पष्टच सांगण्याइतका प्रामाणिकपणा कां दाखवूं नये ? मला असें वाटतें कीं, आतां भिन्न भिन्न मार्ग चोखाळण्याची वेळ आली आहे. इंग्लंडने हिंदुस्थानची तरी आशा सोडावी किंवा वसाहतींची तरी आशा सोडावी. * * आमचें कार्य हें सत्कार्य आहे आणि तें सत्कार्य आहे तोंपर्यंत सरकारनें कोणते अधिकार मिळविले आहेत किंवा सरकार ते अधिकार किती रानटी वृत्तीनें उपयोगांत आणील ह्यासंबंधानें तिळमात्र

विचार करण्याचें मला कारण नाहीं." रेडेडार्प येथील जाहीर सभेंत गांधींनीं वरील उद्गार काढले.

### शिक्षासत्र.

साडे नऊ हजार लोकांना तुरुंगात तरी टाकावें किंवा हद्दपार तरी करावें, ह्यावांचून ज. स्मट्स ह्यांना दुसरा मार्गच उरला नाहीं. परंतु ह्या दोन्ही गोष्टी जवळ जवळ अशक्य होत्या. अशा स्थितींत ज. स्मट्स ह्यांना एक तोड सुचली. ते म्हणूं लागले;—" ह्या पुढाऱ्यांविषयींच बोलाल, तर मला त्यांची बिलकुल दया येत नाहीं. पण हे बिचारे गरीब लोक अज्ञानामुळें त्यांच्या जाळ्यांत सांपडले आहेत. मला त्यांची कींव येते."

" मला कायद्यांत सांगितलेली भरपूर शिक्षा द्या " असें म्हणून गांधींनीं ता. ११ जानेवारी १९०८ रोजीं मॅजिस्ट्रेटपुढें वसाहती बाहेर ४८ तासात निघून गेल्याचें पूर्ण प्रायश्चित्त घेण्याची तयारी दर्शविली. व अशा प्रकारच्या अनुयायांच्या वागणुकीनें दंगेधोपे मुळींच होणार नाहींत असें अधिकाऱ्यांस आश्वासन दिलें. गांधींच्या मागोमाग सुमारें दोनशें लोकांना अशा प्रकारें शिक्षा देण्यांत आल्या.

## प्रकरण ४ थें.

# युद्धांतील डावपेंच व झटापटी.

### तडजोड आणि सुटका.



साध्या भोळ्या गांधींना सोटेशाहीनें वठणीवर आणतां येत नाहीं आणि अनुयायी व पुढारी ह्यांच्यांत फूट पाडूनहि कांहीं कार्यभाग होत नाहीं असें पाहिल्यावर ज. स्मट्स ह्यांना ह्या पेचांतून बाहेर कसें पडावें हा विचार पडला. तडजोडीस गांधी केव्हांहि तयारच होते. पण जमिनीला पाठ लागली तरी माझेच नाक वर म्हणून शेपी मिरविण्याला तरी कांहीं आधार पाहिजेच; तेव्हां ज. स्मट्स ह्यांनी मि. कार्टराईट् नांवाच्या वर्तमानपत्रकर्त्यामार्फत तुरुंगांत गांधीकडे एक पत्र विचाराकरितां पाठविण्याची तजवीज केली. गांधींनीं ह्या पत्रावर सही करावी आणि तें ट्रान्सव्हाल सरकारच्या वसाहत प्रधा[illegible] पाठवावें आणि मग त्यांनीं ह्या पत्राचा सहानुभूतिपूर्वक विचार करावा अशी ही योजना होती. ह्या पत्रांत आपखुषीनें हिंदी लोकांनीं आंगठ्याचे ठसे द्यावेत ही गांधींची तडजोडीची सूचनाच पुढें मांडलेली होती. कायद्यानें नांवें नोंदविण्याची मुदत संपलीच होती. तेव्हां त्यापुढें होणारी नोंदणी ही आपखुषीची ठरणार हें उघडच आहे. ह्याकरितां गांधी व इतर हिंदी पुढाऱ्यांनीं असें सुचविलें कीं, १६ वर्षांवरील प्रत्येक एशियाटिकानें आपलीं नांवें नोंदवून घेण्यास ३ महिन्यांची मुदत देण्यांत यावी आणि पुढें पार्लमेंटची रजा मिळाल्यावर ही नोंदणी कायदेशीर ठरविण्याची तजवीज सरकारनें करावी. आपण ही नोंदणी यशस्वी करण्यासाठीं आपल्या वचनाचा उपयोग करूं असें ह्या पत्रांत शेवटीं अभिवचन देण्यांत आलें होतें.

हा कायदाच मुळीं रद्द व्हावा असें सुचविणारे योग्य ते फेरफार करून गांधींनीं पत्रावर स्वतःची सही केली व आपल्या दोन सहकारी मित्रांच्या सह्या घेऊन

तें पत्र ज. स्मट्स यांजकडे रवाना केलें. गांधींनीं ह्यापूर्वी सुचविलेल्या तडजोडीच्या अटी कांहीं याहून निराळ्या नव्हत्या.

हें पत्र २९ जानेवारीला वसाहतखात्याच्या सेक्रेटरीकडे रवाना झालें; आणि दुसऱ्याच दिवशीं गांधींना सरकारी पहाऱ्याखालीं सेक्रेटरीच्या मुलाखतीकरितां प्रिटोरिया येथ नेण्यांत आलें. "त्या भेटींत कायदा रद्द करण्यासंबंधानें आमचें बोलणें झालें. आणि तेथेंच, त्याच घटकेला असें वचनहि देण्यांत आलें कीं, एशियाटिक लोक आपखुषीनें नोंदणी करून घेतील तर कायदा रद्द करण्यांत येईल." असें ह्या मुलाखतीसंबंधानें गांधींचें म्हणणें होतें.

ह्या मुलाखतीनंतर गांधी व त्यांचे अनुयायी ह्यांस बंधमुक्त करण्यांत आलें.

## सत्वपरीक्षा.

गांधींनीं केलेली तडजोड पुष्कळांना आवडली. परंतु गांधींच्या अनुयायांतहि कांहीं लोक असे होतेच कीं, त्यांना थोडी सुद्धां माघार घेणें खपत नसे. अशा प्रकारच्या असंतुष्ट लोकांत मुसलमानांचाच भरणा विशेष होता. ह्यां असंतुष्ट लोकांना प्रामाणिकपणें असें वाटूं लागलें कीं, 'एनवेळीं माघार घेऊन गांधी हे आपलें एकंदर हिंदी लोकांचें कायमचें नुकसान करून घेत आहेत. न जाणो ते सरकारला आंतून सामीलहि झाले असतील.' आपल्या ह्या समजुतीस अनुसरून ह्या लोकांनीं गांधींचा पुरा समाचार घेण्याचा बेत केला

"संभाळा! तुमच्या जीवाला धोका आहे!" असें म्हणून गांधींच्या मित्रमंडळीनें गांधींनीं एकट्यानींच, प्रथमच, उघडपणें कराराप्रमाणें नांव नोंदण्यास जावूं नये म्हणून गांधींची पुष्कळ विनवणी करून पाहिली. पण जें स्वतः करावयाचें नाहीं; ज्या कामांत मर्दांत पुढें आपण व्हावयाचें नसेल तें काम दुसऱ्यांना करावयास लावणें हा गांधींचा देहधर्मच नव्हे.

"स्वदेशबांधवांच्या हातून मरण यावें ह्या मारखी दुसरी पुण्याई ती कोणती?" असें ह्या मित्रमंडळीस त्यांनीं उत्तर दिलें. ठरलेल्या दिवशीं गांधी मुकाट्यानें घरांतून उठले आणि रजिस्ट्रेशन ऑफीसकडे जाऊं लागले. गांधींचे एकवेळचे कट्टे अनुयायी, परवांपर्यंतचे असंतुष्ट अनुयायी पण ह्यावेळचे संभवनीय मारेकरी त्यांच्या मागोमाग चालूं लागले. गांधी त्यांचा हेतु समजून चुकले. पण ते निमूटपणें, आनंदानें पुढेंच चालूं लागले. ब्रिटिश इंडियन असोसिएशनचे अध्यक्ष इसूफ मियां आणि थंबी नायडू हे त्यांच्याबरोबर होते. हे तीन हिंदी

पुढारी रजिस्ट्रेशन ऑफीसपासून अगदीं तीन मिनिटांच्या रस्त्यावर येऊन पोहोंचले.

" तुम्हीं सगळेजण चालला आहांत कोठें ? " आठ पठाणांनीं एकदम त्यांना अडविलें आणि गांधींना प्रश्न केला.

" रजिस्ट्रेशन ऑफीसमध्यें जाणार हें उघडच आहे " इसुफ मियां म्हणाले.

" आणि तुम्हीं नोंद कशी करून देणार ? "

" दहाहि बोटांच्या ठशानीं. " गांधींनीं तत्काळ उत्तर दिलें.

तत्क्षणीं गांधींच्या डोक्यावर एक लठ्ठ लाठीचा जोरदार रट्टा बसला. "राम!" म्हणून गांधी जमिनीवर कोलमडून पडले. पठाणांनीं त्या स्थितीतच त्यांना लाठीनें ठोकण्याचा सपाटा चालविला. एक पठाण तर त्यांना लोखंडी जाड कांबीनें झाणीत होता. गांधींच्या दोन सहकाऱ्यांसहि पठाणांचा चांगला प्रसाद मिळाला !

गांधीं आतां मेले रास असें समजून पठाण तेथून निघून गेले. इतक्यांत पोलीसांनीं धांव पळ केली. दोन पठाण पकडण्यांत आले. त्यांना पुढें सक्त मजुरीची शिक्षा झाली. रे. जे. जे. डोक ह्या मिशनरी गृहस्थांनीं गांधींना शुश्रूषेकरितां आपल्या घरीं नेलें.

## परीक्षेला उतरले !

"भिण्याचें कांहीं कारण नाहीं, मारेकऱ्यांवर कायदेशीर इलाज करावयाचा नाहीं; मुसलमानांनीं मला मारलें म्हणून हिंदूंनीं चिथरून जाऊं नये आणि आधीं माझ्या हाताच्या बोटांचे ठस घेऊन नाव नोंदवावें. " ह्या चार गोष्टी गांधी शुद्धीवर येतांच प्रथम त्यांच्या तोंडातून बाहेर आल्या आणि त्यांची अंमलबजावणी करण्याची तजवीज होईपर्यंत ते आपल्या जखमा धुण्याबांधण्यास देखील कबूल होईनात.

" स्वतः प्रमाणेच स्वतःच्या शत्रूवरहि प्रेम करा. " ही आज्ञा भगवान् ख्रिस्तानीं आपल्या अनुयायांना केली. तिचें पालन करणारा खरा ख्रिस्ती मनुष्य आज ह्या.परद्या परी अवघडच स्थितींत पडलेला पाहून डोक ह्यांच्या मारक्या प्रेमळ कुटुंबास काय वाटलें असेल ह्याची कल्पना फारच थोड्यांस होऊं शकेल.

ह्यावेळीं गांधींनी काढलेल्या लहानशा जाहीर पत्रकांत गांधींच्या अति थोर हृदयाचें प्रतिबिंब पडलेलें सहृदय वाचकांस दिसून येईल. गांधी लिहितात:—

मित्र हो !

माझी तब्येत ठीक आहे मि. डोक व त्यांच्या पत्नी हीं माझी काळजी घेत आहेत आणि थोडयाच दिवसांत मी पुन्हां आपल्या सेवेला हजर होईन. ज्यांनीं माझ्यावर हल्ला चढविला त्यांच्या विषयीं माझ्या मनांत मुळींच राग नाहीं. त्यांनीं अज्ञानामुळें हें कृत्य केलें आहे. त्यांच्यावर खटला करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं.

हिंदूनीं मनांत थोडीसुद्धां तेढ वाढूं नये. ह्या प्रसंगानें हिंदु-मुसलमानांत बेबनाव न वाढतां उलट त्यांच्यांत दिलजमाई व्हावी अशी माझी खुदाकडे, परमेश्वराकडे प्रार्थना आहे. मार मिळो किंवा आणखी किनीहि मार मिळो, माझा आपणास हाच सल्ला आहे कीं, तुम्हीं शक्यें तितक्या लोकांनीं दहाहि आंगठ्यांचे ठसे देऊन नांवें नोंदवून घ्यावींत त्यांतच समाजाचें आणि गोर गरीबाचें कल्याण आणि रक्षण आहे. जर आपण खरे सत्याग्रही असाल तर माराला किंवा भावी दगलबाजीला मुळींसुद्धां भिऊन जाणार नाहीं. जे दहा बोटाचा ठसा देण्याला तयार नाहींत त्यांचें तें वर्तन केवळ अज्ञानमूलक आहे. माझें ईश्वराजवळ इतकेंच मागणें आहे कीं, त्यानें लोकांचें कल्याण करावें, त्यांना सत्यमार्ग दाखवावा आणि माझ्या रक्तसिंचनानें हिंदुमुसलमानांचें ऐक्य अधिकच अभंग व्हावें.

हिंदी लोकांचा सेवक.

**मोहनदास करमचंद गांधी**

हिंदुस्थानच्या महद्भाग्यानें आणि मिसेस डोक ह्यांच्या महत्प्रयत्नांनीं गांधींची प्रकृति लवकरच सुधारली.

मध्यंतरी ह्या प्रसंगामुळें आरखपीच्या नोंदणीचें काम बरेंच मंदावलें होतें. पण आतां तें पुन्हां जोरांत सुरू झालें.

आतां सरकारनें आपल्या वचनाला जागून कायदा रद्द करावा असें हिंदी लोक म्हणूं लागले.

## वचनभंग.

" मीं गांधींना कधींच वचन दिलेले नाहीं. १९०७ चा दुसरा कायदा रद्द करण्यांत येईल असें वचन मी ३० जानेवारी किंवा ३ फेब्रुवारी १९०८ ह्या दिवशीं कधीं दिलेंच नव्हतें. " असे म्हणून ज. स्मट्स ह्यांनीं हिंदी पुढाऱ्यांना आश्चर्यमूढ करून टाकलें.

अभिवचच तोंडीं होतें आणि तें देण्यांत आलें त्यावेळीं तेथें असलेले तिसरे गृहस्थ सरकारी नोकर—रजिस्ट्रार ऑफ एशियाटिक्स हे—होते ! गांधींनीं आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ तीन मुद्दे पुढें मांडले:—(१) कायदा रद्दच झाला पाहिजे. असें आपण २९ जानेवारीच्या पत्रांत स्पष्ट म्हटलें होतें. ज. स्मट्स ह्यावर उत्तर देतात कीं, आपण पाठविलेल्या उत्तरांत आपण " हा प्रश्न पार्लमेंटपुढें मांडूं " इतकेंच म्हटलें होतें; रद्द करूं असें अभिवचन दिलेलें नव्हतें. हें वचन लेखी आहे असें गांधींचें म्हणणें होतें. (२) मी ज. स्मट्सना पाठविलेल्या पत्रांत आमची मागणी अगदीं स्पष्ट केली आहे असें गांधी म्हणतात. पण पत्रं खासगी आणि गुप्त असल्यामुळें त्यांतील प्रत्येक मुद्याला उत्तर देण्यास आपण बांधलेले नाहीं अशी ज. स्मट्स ह्यांनीं गांधींच्या त्या मुद्यावर उडवाउडवीचें उत्तर दिलें. (३) गांधींवर पठाणानीं हल्ला केल्यानंतर लगेच मि. चॅमनी हे गांधींनां भेटले त्यांनीं व गांधींनीं मिळून एक नोटीशीचा मसुदा तयार केला. त्यांत असें म्हटलें होतें कीं, एशियाटिकानीं नांव नोंदणी पुरी केली म्हणजे कायदा रद्द करण्यांत येईल. हा मसुदा ज. स्मट्स ह्यांच्या पुढें ठेवण्यांत येईल आणि मग तो प्रसिद्ध करण्यांत येईल असें मि. चॅमनी म्हणाले होते. ज. स्मट्स पुढें कधीं आपले शब्द मागें घेतील अशी कल्पना नसल्यामुळें ती नोटीस प्रसिद्ध करण्याचें कांहीं कारण नाहीं असें आपण मि. चॅमनी ह्यांना सांगितलें. असें गांधींचें म्हणणें पडलें. व ज. स्मट्स ह्यांनीं हा नोटीशीचा मसुदा खुशाल प्रसिद्ध करावा असें गांधींनीं ज. स्मट्स ह्यांनीं जाहीर आव्हान केलें. परंतु समशेर बहाद्दर स्मट्स ह्यांनीं त्या आव्हानाचा स्वीकार केला नाहीं !

## पुन्हां तडजोड !

ज. स्मट्स ह्यांनीं ' वचनभंग केल्यामुळें गांधींचें कार्य अधिकच'

बिकट होऊन बसलें. ज. स्मट्स यांचें बेपर्वाईचें धोरण येथंच थांबलें नाहीं. आपखुषीची नोंदणी करून घेण्याची मुदत तीन महिन्यांची होती. परंतु ट्रान्सव्हालचेच कायम रहिवाशी असूनहि बाहेर ठिकाणीं गेलेल्या कांहीं लोकांना या मुदतींत नोंदणी करून घेतां आली नाहीं. मागाहून ज. स्मट्स हे असें म्हणूं लागले कीं, या लोकांनीं आतां सक्तीच्या कायद्यान्वयेंच नोंदणी करून घेतली पाहिजे. हें म्हणणें तडजोडीच्या वृत्तीला विरोधी आहे असें गांधींचे म्हणणें पडलें.

ज. स्मट्स ह्यांनीं कायदा रद्द करण्याचें वचन दिलें नव्हतें म्हणून साफ सांगून टाकले. परंतु कांहीं अटींवर ते कायदा रद्द करण्यास तयार होते. पण या अटी अगदींच विलक्षण होत्या. "प्रत्येक एशियाटिकाजवळ शांततासरक्षक कायद्याखालील परवाना, आपखुषीच्या नोंदणीचे सर्टिफिकेट किंवा एशियाटिक ॲक्टखालील नोंदणीचें सर्टिफिकेट यांपैकीं एक तरी कागद पाहिजेच. तो नसल तर त्या मनुष्यानें पूर्वीच्या डच सरकारला ३ पौंड कर भरून नागरिकत्वाचा हक्क मिळविला असला तरी तो निरुपयोगी समजला जावा."

ह्या अटी अगदीच मगरूरीच्या होत्या. युद्धापूर्वी वसाहतींत वसतीचा हक्क मिळविलेल्या हिंदी लोकांचा तो हक्क या योगानें रद्द होणार होता. आणि इमिग्रेशन रिस्ट्रिक्शन कायद्याच्या सर्व कडक अटी पुऱ्या करणाऱ्या हिंदी मनुष्याला सुद्धां त्यांच्यामुळें प्रवेश करतां येत नव्हता ! नाताळमधील सोराबजी शापुरजी या श्रीमान् पारशी व्यापाऱ्यांनीं ह्या मुद्याचा कायदशीरपणा कसास लावण्याचा विचार केला. ते ट्रान्सव्हालच्या हद्दींत शिरले. १० दिवस ट्रान्सव्हालमध्यें राहिल्यावर नोंदणी न केल्याबद्दल त्यांच्यावर खटला भरण्यांत आला. आरोपीतर्फे गांधींनीं असा मुद्दा काढला कीं, एशियाटिक्स (नांवनोंदणीचा) कायदा हा फक्त वसाहतींत असलेल्या व कायदा अमलांत येण्यापूर्वी वस्ती करून राहिलेल्या लोकांपुरता आहे. सोराबजी हे या वर्गांत येऊं शकत नाहींत. बरें, इमिग्रेशन रिस्ट्रिक्शन ॲक्टखालीं ते नालायक ठरूं शकत नाहींत. कारण शिक्षण व उद्योगधंदा या बाबतींत त्यांची लायकी अगदीं पुरेशी आहे. मॅजिस्ट्रेटला गांधींचे हे मुद्दे फार खोल आणि विचारार्ह वाटले; पण कायद्यांत अशी एक पळवाट आहे येवढयावरूनच आरोपीला त्या वाटेनें पळूं द्यावें हें मॅजिस्ट्रेटला योग्य वाटलें नाहीं.

## वचनभंगाला प्रत्युत्तर.

वचनभंगाला प्रत्युत्तर म्हणून गांधी व इतर पुढारी ह्यांनीं रजिस्ट्रारकडे आपलीं नोंदणीपत्रकें परत मिळावीत म्हणून मागणी केली. पत्रकें परत मिळालीं नाहींत. तीं परत मिळावीत म्हणून सुप्रीम कोर्टांत खटले भरण्यांत आले. " एशियाटिकांना आपखुषीनें भरून दिलेली नोंदणी पत्रकें परत मागण्याचा अधिकार नाहीं " असा कोर्टानें निकाल दिला. पण एशियाटिकांचा नोंदणी रद्द करण्याचा मार्ग कांहीं ह्यामुळें खुंटला नाहीं. आपल्या जवळील नोंदणी सर्टिफिकेट जाहीर रीतीनें जाळून टाकण्यांत यावीत असें गांधींनीं सूचविलें. ता ५ जुलै रोजीं ह्या सूचनेचा विचार करण्याकरितां एक प्राथमिक सभा भरविण्यांत आली. पण ह्यावेळीं पुन्हां समेटाच्या गोष्टी सुरू झाल्या होत्या. म्हणून मुख्य मुद्याचा विचार पुढील एका सभेवर ढकलण्यांत आला

ज. स्मट्स यांच्या वतीनें आतां अशी तडजोड सुचविली कीं, ते आपल्या सर्व अटी मागें घ्यावयास तयार आहेत; त्यांची एक अट मात्र हिंदी लोकांनीं मान्य करावी. ती ही कीं, सधन व सुशिक्षित हिंदी लोकांना मात्र कायदेशीर मनाई लागू रहावी.

ब्रिटिश इंडिया असोसिएशनच्या एका सभेंत या अटीचा काळजीपूर्वक विचार करण्यांत आला. सभासदांनीं आपल्या भिडेमुळें किंवा वजनामुळें कोणताहि निकाल न ठरवितां केवळ स्वतःच्या बुद्धिप्रमाणेंच या प्रश्नाचा निकाल लावावा म्हणून गांधी या बैठकीला स्वत: हजर राहिले नाहींत.

" ह्या मुद्याच्या प्रश्नावर माघार घेतल्यास हा समाजाचा उपमर्द सहन केल्यासारखें होईल. आणि सुशिक्षित पुढाऱ्यांच्या अभावीं, सरकारला केव्हांहि प्रतिगामी जुलमी कायदे करण्याची इच्छा झाल्यास, सर्व समाज सरकारच्या कचाट्यांत सांपडेल " म्हणून सभेनें ही तडजोड एकमतानें नाकारली.

## सत्याग्रह युद्धाला तोंड लागलें

तडजोडीचा मार्ग अगदींच बंद होऊं नये म्हणून गांधींनीं सर्टिफिकीटें जाहीररीतीनें जाळून टाकण्याची चळवळ जरा लांबणीवर टाकली. परंतु सरकारी धोरणाचा स्पष्टपणें निषेध केला जावा आणि लोकमताचा विरोध किती तीव्र आहे याची सरकारला जाणीव करून द्यावी म्हणून हिंदुमुसलमान पुढाऱ्यांनीं असें ठरविलें कीं, व्यापारी परवाने न काढतांच रस्त्यांत माल विकून तुरुंगप्रवेश करून घ्यावा.

हिरालाल गांधी, इमाम अब्दुल कादीर यांची नायडू वगैरे शंभर हिंदुमुसलमान लोकांस पकडून त्यांना दंडाची शिक्षा करण्यांत आली. दंड देण्याचें नाकारून त्यावेळी त्या सर्वांनी तुरुंगवासच पत्करला. तुरुंगांत जास्त लोकांचा समावेश करणें अशक्य असल्यामुळें सरकारनें आरोपींना कैदेची शिक्षा न देतां केवळ दंडच करून सामानसुमान जप्त करून लिलांवानें पैसे वसूल करण्याचा सपाटा चालविला.

## हरताळ.

तुरुंगांत गेलेल्या आपल्या देशबांधवांच्या सन्मानार्थ ट्रान्सव्हालमधील एकंदर हिंदी समाजानें ता. २३ जुलै रोजीं कडक हरताळ पाळला. ह्या हरताळामुळें खुद्द हिंदी लोकांना आपल्या संघटित प्रयत्नांची उत्कटता चांगल्या प्रकारें ध्यानांत येऊन चोहोंकडे जास्तच उत्साह संचरला. आणि त्या मानानें ट्रान्सव्हाल सरकारलाहि भावी रणसंग्रामाची पूर्व तयारी कशी संघटित व उत्कट आहे त्याची जाणीव करून घेण्यास संधि मिळाली.

## " अग्नये स्वाहा. "

""नीचपणानें आणि विश्वासघातानें आम्हीं फसलों आणि आपखुषीनें नांवें नोंदवून घेतलीं. आमच्या ह्या खुळचटपणाचीं हीं दस्यचिन्हें आज आम्हीं अग्निदेवतेला अर्पण करतों ! " असें म्हणून सुमारें तीन हजार हिंदी लोकांनी ता. १६ ऑगष्ट १९०८च्या जाहीरसभेंत आपल्या नोंदणी सर्टिफिकेटांना अग्नि दिला. आणि आपल्या राष्ट्रीय स्वाभिमानासाठीं, मानवी हक्कांच्या समर्थनासाठीं आणि अतिस्वार्थी गोऱ्या वसाहतवाल्यांचे डोळे नीट उघडावेत म्हणून आपल्या सुखसोयींवर आणि माल मिळकतीवर निखारे ठेवण्याची तयारी जगजाहीर केली.

आपल्या गुलामगिरीच्या ह्या ताम्रपटांना इसूफमियां ह्यांच्या हस्तें अग्नि देण्यापूर्वी गांधी आपल्या लांबलचक, जोमदार आणि उत्तेजक भाषणांत म्हणाले; "मला माहीत आहे; वाटल्यास आजच्या आज सरकार हा कायदा रद्द करील; आमच्या डोळ्यांत धूळ फेंकील आणि उद्यांच याहूनहि अधिक कडक व अपमानास्पद कायदा करावयास तयार होईल. पण मला स्वतः ह्या झगडयापासून हाच धडा शिकावयाचा आहे आणि माझ्या देशबांधवांनीं हाच धडा शिकावा अशी माझी इच्छा आहे, जरी आपणाला ट्रान्सव्हालमध्यें मताधिकार नाहीं, प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार नाहीं तरीपण जर आपण

आपलें अनंताशीं साधर्म्य ओळखलें, मनुष्यजातीच्या भवितव्यतेला वळण लावणारा परमेश्वर म्हणून कोणी आहे आणि मर्त्य राजांऐवजीं त्याच्यावर आपण श्रद्धा ठेविली तर आपणास असा अच्छेद्य, अभेद्य मताधिकार मिळेल, कीं जर आमच्या सत्यासत्याच्या कल्पनेविरुद्ध, आमच्या सदसद्विवेक बुद्धीला न पटणारा, आमच्या धर्मभावनेविरुद्ध कसलाहि कायदा करण्यांत आला तरी आम्हीं *त्याच्यापुढें मान वाकविणार नाहीं.*

ह्या प्रचंड होळीमुळें ज. स्मट्स यांचे डोळे उघडले. आणि त्यांनीं १८ आगष्ट रोजीं गांधींना व इतर पुढाऱ्यांना सरकारशीं विचारविनिमय करण्यासाठीं निकडीचीं आमंत्रणें पाठविलीं.

मागाहून नसता वाद उपस्थित व्हावयास नको आणि एकदांचा हा वाद कायमचा निकालांत निघावा म्हणून ह्या विचारविनिमयानंतर ज. स्मट्स यांनीं गांधींना असें सूचविलें कीं, गांधींनी हिंदी लोकांच्या मागण्या लेखी *कळवाव्यात. त्याप्रमाणें २० तारखेला गांधींनीं ज. स्मट्स यांना एक खाजगी* पत्र पाठवून हिंदी लोकांच्या मागण्या त्यांना कळविल्या व एशियाटिक ( नोंदणी ) ॲक्ट रद्द करावा आणि शिक्षणविषयक अटीवर सुशिक्षितप्रवेशाला परवानगी असावी. हे दोन मुद्दे परिषदेतच ज. स्मट्स यांनीं दप्तरीं दाखल करून घेतले होते. बाकीचे मुद्दे कोणतेहि नवीन तत्त्व प्रस्थापित करूं पाहणारे नव्हते. केवळ औपचारिक होते. पण इतक्यांत ज. स्मट्स यांनीं आपलें धोरण बदललें.

व्हॅलिडेशन बिल असेंब्लीपुढें मांडतांना ज. स्मट्स यांनीं गांधींच्या त्या खाजगी पत्राचा मनमोकळेपणानें उपयोग करून घेतला. गांधी मगरूर होऊन सरकारला निर्वाणीचें खलितें पाठविण्यास तयार झाले आहेत असें भासवून त्यांनीं असेंब्लीच्या सभासदांचीं मनें कलुषित केलीं.

इकडे तडजोडीसाठीं गांधी शक्य तितकी अनुकूलता दाखवीत असतां तिकडे ज. स्मट्स यांनीं [illegible] शिष्टाचाराचा भंग करूनहि वातावरण दूषित करण्यास [illegible] हिंदी [illegible]. याचें कारण असें कीं, व्हॅलिडेशन ॲक्टमध्यें, त्यांच्या मतें [illegible] पास झाल्यानंतर जो कायदा मंजूर होणार एशियाटिक ॲक्ट त्याला कायदेशीर-निरर्थकता देईल. यामुळें हिंदी लोकांच्या चळवळीचा मुख्य हेतु [illegible] होईल, आणि गांधींच्या कार्यक्षेत्र व [illegible] हिंदी लोक [illegible] मती [illegible]

करीत बसणार नाहींत. आणि त्याबरोबरच एशियाटिक्स ॲक्टहि रद्द असा न होतां कायदेबुकावर तरी कायम राहील आणि आपण हिंदी लोकांच्या चळवळी-मुळें हार घेतली असेंहि होणार नाहीं !

शिक्षणविषयक लायकी असणारास वसाहत प्रवेशाची मनाई नसावी हा मुद्दा ज. स्मट्स ह्यांस विशेष जोरदार वाटला नाहीं. कारण त्यांच्या मतें अशिक्षित हिंदी फेरीवाले ह्या सुशिक्षितांच्या मनाईला विशेष महत्व देणार नाहींत. ज. स्मट्स यांनीं असा विचार करतांना हिंदी लोकांची मन:स्थिति व परिस्थिति नीट लक्षांत घेतली नाहीं. नातालमधील शेंकडो सुशिक्षित हिंदी धंदेवाईकांस कायद्याचा हा भाग नडणारा असल्यामुळें नातालमधील कितीतरी सधन व सुशिक्षित हिंदी लोकांनीं आपल्या उद्योग धंद्यांवर पाणी सोडून ट्रान्सव्हालच्या हद्दींत प्रवेश केला. सरहद्दीवर त्यांना पकडावें, कोर्टानें शिक्षा सुनवावी आणि सरकारनें त्यांना हद्दपार करावें असा क्रम सुरू झाला.

" एशियाटिकांशीं चालविलेल्या ह्या झगड्यांत ज. स्मट्स यांनीं नांवहि कमावलें नाहीं आणि अनुभवानें शहाणपणहि मिळविलें नाहीं; नाहीं तर एशियाटिकांना पाहिजे असलेली आणखी एक लहानशी सवलत त्यांना देऊन टाकून ज. स्मट्स यांनीं मोठ्या आनंदानें शांततेचा सौदा पटविला असता असें म्हणून सरकार पक्षाची वर्तमानपत्रेंच यावेळीं सरकारच्या धोरणाविषयीं नापसंती दर्शवूं लागलीं.

समशेर बहाद्दर स्मट्स अशा स्वपक्षीयांच्या सल्ल्याला आणि प्रतिपक्षीयांच्या स्वार्थत्यागाला थोडेच जुमानणार ! ७ अक्टोबर १९०८ रोजीं गांधींना पकडण्यांत आलें. आणि १६ तारखेस त्यांना २५ पौंड दंड अथवा दोन महिने सक्त मजुरी अशी शिक्षा सुनावण्यांत आली.

" सबंध ट्रान्सव्हालमध्यें आज माझ्यासारखा सुखी आणी कोणी नाहीं " असें म्हणून गांधींनीं तुरुंगवासच पसंत केला.

धरपकड, शिक्षा, हद्दपाऱ्या ह्यांचें सत्र सुरू झालें.

गांधींची सुटका झाली; पुन्हां धरपकड झाली आणि दुसऱ्यांदा (ता. २५ फेब्रुवारी १९०९) शिक्षा झाली. पण निःशस्त्र प्रतिकार करणारांची संख्या कांहीं कमी होईना; त्यांच्यावर कायद्याची जरबहि बसेना.

कांहीं दिवसांची किंवा महिन्यांची शिक्षा कोणीहि आनंदानें सोशील, परंतु दीर्घ परिश्रमानीं उभारलेला धंदा; निढळाच्या घामानें कमावलेलें भांडवल

पण मी मोठा कर्तव्यनिष्ठ आहें म्हणून लोकांनीं माझ्या स्वार्थत्यागाचा फायदा घेऊं नये व अशा अपेक्षेनें किंवा कल्पनेनें मात्र कोणीहि स्वार्थत्याग करण्याचा आव आणूं नये ! नाहींतर पश्चात्तापाचीच पाळी यावयाची ! कचालिया ह्यांच्या घेणेदारांनीं कचालिया ह्यांच्या मानानें तिळमात्र औदार्य दाखविलें नाहीं. त्यांनीं रुपयाचे सोळा आणे येणें वसूल करुन घेतलें आणि कचालिया ह्यांना कफल्लक बनविलें ! अशीं शेंकडों उदाहरणें ह्या झगड्यांत घडून आलीं.

## तुरुंगांतील अनुभव.

म. गांधींच्या द. आफ्रिकेंतील तुरुंगवासांतील दोन गोष्टी येथें उल्लेख करण्यासारख्या आहेत.

द. आफ्रिकेंत युरोपियनेतर सर्व लोक 'नेटिव्ह' म्हणून कायद्यानें समजले जात आणि म्हणूनच तुरुंगांतील सर्व हिंदी लोकांना तद्देशीयांप्रमाणें अन्नाबरोबर तुपाऐवजीं चरबी देण्यांत येई. हिंदी लोक अर्थातच तिचा उपयोग न करतां वारंवार उपासच काढीत. म. गांधींना जेव्हां चरबीऐवजीं अधिकारी तूप देऊं लागले तेव्हां त्यांनीं ह्या सवलतीचा फायदा घेण्याचें नाकारलें.

एकदां तुरुंगांतील शेतखानें साफ करण्याकरितां दोन माणसें या असें गांधींना फरमाविण्यांत आलें. गांधींनीं आपल्या सहकाऱ्यांपैकीं दुसऱ्या कोणासहि न कळवितां स्वतःच तें काम निमूटपणें करुन टाकलें.

आपल्या कर्मीत कमी दर्जाच्या कोणत्याहि अनुयायापेक्षां किंवा बांधवापेक्षां आपण काडीभरहि जास्त श्रेष्ठ किंवा मिजासदार रहावें ही अहंभावनाच गांधींनीं अशा व्यावहारिक तपश्चर्येनें नष्ट करुन टाकिली आहे.

अहंकारनिरसनासाठीं रामकृष्ण परमहंसांनीं वरीलपैकीं दुसरें काम मुद्दाम केलें होतें हें कित्येक वाचकांस आठवत असेलच.

## पण पुढें काय ?

हा प्रश्न त्यावेळीं सर्वांपुढें उभा राहिला होता. इतक्यांत २४ मे रोजीं गांधींची तुरुंगांतून सुटका झाली. पण सुटकेनें हा प्रश्न सुलभ झाला नाहीं.

द. आफ्रिकन वसाहतींचें एक संयुक्त राज्य बनविण्याची योजना निश्चित झालेली होती. आणि ह्या संयुक्त राज्यघटनेंत हिंदी लोकांची वाट काय ? हा प्रश्न फारच महत्वाचा होता.

द. आफ्रिकन संयुक्त राज्यघटनेचा विचार करण्याकरितां जं. बोथा, ज. स्मट्स वगैरे मुत्सद्दी लंडनला जाणार होते. अशा वेळीं हिंदी लोकांच पुढारीहि लंडनला गेल्यास तेथील प्रशांत वातावरणांत ह्या द. आफ्रिकन मुत्सद्यांची आफ्रिकन दृष्टि थोडीशी निवळेल आणि ते साम्राज्याच्या व्यापक दृष्टीनें हिंदी लोकांच्या प्रश्नाचा विचार करूं लागतील असें गांधींस वाटलें.

" इष्टसाध्यासाठीं सत्याग्रहाची सर्व मदार आत्मक्लेश सहन करण्यावर असते. शिष्टमंडळावर नसते " असें असूनहि गांधी पुन्हां शिष्टाईसाठीं निघालेच. परंतु याचें कारण हेंच कीं, " पुष्कळशा हिंदी लोकांची इतके आत्मक्लेश सहन करण्याची तयारी नव्हती.

## शिष्टाईवर जाण्यापेक्षां तुरुंगांत जाणेंच बरें;

असा अनुभव मिळविण्याकरितांच कीं काय, गांधी व श्री. हाजीहबीब २१ जून १९०९ रोजीं विलायतेस जावयास निघाले. सर कर्झनवायली यांचा मदनलाल धिंग्रानें खून केला त्याच सुमारास लंडनला पोहोंचले. ह्या वेळच्या कामाचा अनुभव सांगतांना गांधी लिहितात;—" मोठ्या म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांच्या जसजशा भेटी होत गेल्या तसतसा मला त्यांच्या भेटीचा अधिकाधिक कंटाळा येऊं लागला जो तो आपल्याच विचारांत गर्क असतो. अधिकारारूढ लोक केवळ न्याय्य म्हणून कोणताच न्याय करीत नसतात. आपला दर्जा राखावा कसा आणि वाढवावा कसा ह्याच काळजींत ते असतात. अशा रीतीनें दिवसभर पायपीट करावयाची, आपला एक सपथ मूल्यवान् दिवस एक दोन लोकांच्या भेटी मिळविण्याच्या खटपटींत खर्च करावयाचा, अशा सगळ्या कामात पैसा खर्च करावयाचा हें सत्याग्रही हृदयाला कसें सहावें ? त्यापेक्षां तुरुंगांत जाऊन हालअपेष्टा सोसणें किती तरी बरें ! "

" ब्रिटिश प्रजाजनांस पादशहाच्या सर्व मुलखांत कोठेहि जातां यावें हें तत्व साम्राज्य सरकारलाहि आवडतें. परंतु हें ध्येय भविष्यकाळीं कधीं तरी साध्य होणारें आहे. स्वयंशासक वसाहतींच्या कारभारांत आम्हाला ढवळाढवळ करतां येणार नाहीं. मला आशा आहे कीं, संयुक्तपार्लमेंट ह्या प्रश्नाचा व्यापक दृष्टीनें विचार करील " अशी आशा हिंदी सेक्रेटरी अर्ल क्रू यानीं दिली असेल. ऑफ् लॉर्डसमध्यें व्यक्त करून टेकिली इतकेंच ! यापेक्षां गांधींच्या म्हणण्याप्रमाणें तिळमात्राहि मान न देतां युनियन बिल ब्रिटिश पार्लमेंटनें मंजूर करून टाकलें आणि १३ नोव्हेंबरला गांधींनीं इंग्लंड सोडलें.

## हिंदुस्थानांतील चळवळ.

ह्याचवेळीं द. आफ्रिकन कार्याविषयीं हिंदुस्थानांत जागृति करण्याकरितां गांधींचे एक मित्र सहकारी व नामांकित युरोपियन बॅरिस्टर मि. पोलाक हे हिंदुस्थानांत आले होते. त्यांनीं हजारों रुपयांचा फंड जमविला व ठिकठिकाणीं मोठमोठ्या जाहीरसभा भरविल्या. राजेरजवाड्यांत सुद्धां जागृति दिसूं लागली.

ना. गोखले ह्यांनीं वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्यें (२५-२-१०) असा ठराव पुढें आणला कीं, नाताळमध्यें मुदतबंदी मजूर पाठविण्यास हिंदुस्थान-सरकारनें तावडतोब बंदी करावी. सरकारला हा ठराव मान्य करावा लागला. द. आफ्रिकन कमीटि ह्यांनीं विलायतेंत खूब खटपट केली. हिंदुस्थानसरकारनें विलायतेस निकराचे खलिते पाठविले. लॉर्ड ॲपहिल व द. आफ्रिकन कमिटी यांनीं विलायतेंत खूब खटपट केली.

" हिंदी लोकांना नुकसानकारक असा कोणताहि निकाल साम्राज्यसरकारला रुचणार नाहीं " असें वसाहतीस बजावणारा एक खलिता तारीख ७ आक्टोबर १९१० मध्यें साम्राज्यसरकारनें वसाहतीकडे पाठविला व १९०७ चा दुसरा कायदा रद्द करावा अशी सूचना दिली.

## अखेर माघार घ्यावी लागली. पण—

ह्याप्रमाणें चोंफेर दाब पडल्यामुळे अखेर वसाहतींच्या युनियन सरकारला माघार घ्यावी लागली. युनियन सरकारनें २५ फेब्रुवारी १९११ रोजीं युनियन इमिग्रशन बिलाचा खर्डा प्रसिद्ध केला.

ह्या बिलानें १९०७ चा दुसरा कायदा रद्द होणार होता. एशियाटिकांना ते एशियाटिक म्हणून वसाहतींतून अजीबात वगळावयाचें हें पूर्वीचें धोरण सोडून देण्यांत आलें. व वसाहतींत प्रवेश करूं पाहणाराची शिक्षणविषयक लायकी कडक रीतीनें तपासून पहावयाची व त्या योगानें वसाहतप्रवेश करणारांच्या संख्येला आळा घालवयाचा असें धोरण स्वीकारण्यांत आलें. " बाकी इतर बहुतेक सगळ्याच बाबतींत हा नवा कायदा अगदींच असमाधानकारक आहे. कांहीं कारण नसतांना केप आणि नाताळ ह्या वसाहतींतील एशियाटिकांनीं आतापर्यंत निर्वेधपणें उपभोगिलेले हक्क ह्या कायद्यानें काढून घेतले जात आहेत. युनियन सरकार ट्रान्सव्हालमधल्या निःशस्त्र प्रतिकारी हिंदी लोकांच्या मागण्या कबूल करण्यास तयार आहे. परंतु त्या तयारीचा मोबदला म्हणून केप व नाताळ

त्यांतील हिंदी लोकांचे विरुद्ध कायदे करण्याची परवानगी यूनियन सरकारला पाहिजे आहे " असा गांधींचा या नव्या बिलावर आक्षेप होता.

ह्या बिलाला केवळ हिंदी लोकांचाच विरोध होता असें नाहीं. " दरवर्षी कांहीं नियमित एशियाटिकांना संयुक्त वसाहतींत प्रवेश करण्याचा आणि वसाहतींतील कोणत्याहि भागांत निर्वेध प्रवास करण्याचा किंवा वसति करण्याचा हक्क " ह्या बिलानें मिळणार होता. परंतु ऑरेंज फ्री स्टेट वसाहतीच्या प्रतिनिधींनीं बिलांतील ह्या कलमाला वसून विरोध केला.

" ह्या वर्णद्वेषाच्या विषाशीं खेळ खेळणें बरें नव्हे. एकदां का ऑरेंज फ्री स्टेटमध्यें ह्या विषाचा प्रवेश झाला कीं, तत्काळ तें सर्व यूनियनभर पसरल्यावांचून राहणार नाहीं. " असें गांधींनीं ह्यावेळीं अधिकाऱ्यांस बजाविलें.

पुष्कळ विचार विनिमय होऊन अखेर ज. स्मट्स व गांधी ह्यांच्यामध्यें

## तात्पुरती तडजोड

ठरली. स. १९१२ सालच्या पार्लमेंटच्या बैठकींत वसाहत सरकारनें हिंदी लोकांना समाधानकारक असा कायदा करून घ्यावा व हिंदी लोकांनीं निःशस्त्र प्रतिकार तहकूब ठेवावा असें ठरलें. सरकारनें सर्व सत्याग्रही कैद्यांना बंधमुक्त केलें.

वचन दिल्याप्रमाणें ज. स्मट्स ह्यांनीं यूनियन पार्लमेंटपुढें नवें इमिग्रेशन बिल आणलें. हें नवें बिल मागच्या बिलापेक्षां कांहींसें बरें होतें. पण त्यामुळें ज. स्मट्स यांनीं दिलेल्या अभिवचनांची पूर्तता मात्र होत नव्हती. हिंदी लोकांनीं या बिलाला विरोध केला आणि अखेर तें बिल गर्भांतच जिरलें. तात्पुरत्या तडजोडीची मुदत मात्र एक वर्षानें वाढविण्यांत आली.

आतां ह्याच ( १९१२ ) वर्षी नवीन सम्राट् पंचम जॉर्ज ह्यांस राज्याभिषेक झाला. तेव्हां ह्या नव्या साम्राज्योत्सवाचा फायदा घ्यावा आणि ह्या द. आफ्रिकन प्रश्नाचा वडग्या, पूज्य व नामांकित अशा तटस्थ मुत्सद्याच्या हातून तरी कांहीं सोक्षमोक्ष होईल तर पहावा ह्या हेतूनें गांधींनीं कै. वा. गोपाळ कृष्ण गोखले ह्यांस द. आफ्रिकेंत येण्याविषयीं विनंति केली.

## गोखल्यांची शिष्टाई.

तोंडाजवळ नेलेल्या पहिल्याच घासांत मेलेली माशी सांपडावी त्याचप्रमाणें यावेळीं ना. गोखले या पादशाही मुत्सद्यास अनुभव आला.

युरोपियन प्रवासी तुमच्याबरोबर एकाच केबिनमधून प्रवास करायला तयार नाहींत तेव्हां तुम्ही सबंध केबिनचें तिकिट तरी काढा नाहीतर दुसरी कांहीं तजवीज करा अशी आगबोट कंपनीकडून त्यांस समज मिळाली! गोऱ्यासमतेचा हा मसालेदार मासला चाखून गोखले बोटीवर चढले आणि २२ आक्टोबर ते १८ नोव्हेंबर पर्यंत तीन आठवडे ते द. आफ्रिकेंत फिरले.

गोखल्यांचा हा दौरा म्हणजे जगांतील एक लहानसें आश्चर्यच होतें! एखाद्या खऱ्या बादशाही मुसद्याला आणि राजपुरुषाला शोभेल अशा रीतीने वसाहत सरकारनें त्यांचा इतमाम ठेविला होता. प्रवासाला स्पेशल गाड्या, इमिग्रेशन डिपार्टमेंटचे मि. रन्सीमन हे खास तैनातीला; गांवचा मेयॉर हा प्रत्येक जाहीर सभेला अध्यक्ष, खास गोऱ्या वसाहतवाल्यांकडून पाहुणचार!

दुष्काळामुळें साहराच्या वाळवंटाप्रमाणें रखरखीत बनलेल्या माळ जमिनीवर पाऊस पडूं लागतांच शेतकऱ्यांना ज्याप्रमाणें कल्पनेला अगम्य असा आनंद व्हावा त्याप्रमाणेंच द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांची स्थिति झाली. काळ्या-गोऱ्यांमध्ये यक्षिणीची कांडी फिरावी त्याप्रमाणें हा भ्रातृभाव घडवून आणणाऱ्या गोपाळ कृष्ण गोखल्यांचें नांव द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या तोंडीं गोपाळकृष्ण भगवन्ताप्रमाणें स्फुरत राहिलें तर त्यांत आश्चर्य कसलें? खुद्द ना. गोखले ह्यांच्यावर सुद्धां ह्या आदरातिथ्याचा चांगलाच दृश्य परिणाम घडून आला.

गोखले आले आणि आपले हात स्वर्गाला पोहोंचले असा उगाच आपला गैरसमज करून घेऊं नका असें गांधी मात्र प्रत्येक ठिकाणीं लोकांस बजावून सांगत होते. गांधी ह्या आदरातिथ्यांतील " अंदरकी बात " जाणून होते.

गांधी हे, ह्या सगळ्या प्रवासांत, गोखल्यांचे खासगी चिटणीस म्हणून त्यांच्याबरोबर फिरत होते. त्यांच्या खाण्यापिण्याची, औषध पाण्याची, कोटपाटलोणीना व्यवस्थित इस्तरी करण्याची, गोखल्यांच्या प्रत्येक गरजेची अत्यंत काळजीपूर्वक व्यवस्था लावीत होते!

" माझी देवपुजा, देवपुजा, पाय तुझे गुरुराजा, " गांधींची गुरुभक्ति अशी निर्विकल्प होती; गांधींची कार्यनिष्ठा अशी निरपवाद होती; व आहे.

### राजा प्रसन्न झाला आणि हातीं भोपळा दिला!—

द. आफ्रिकन वसाहती ना. गोखल्यांवर प्रसन्न झाल्या; ना. गोखल्यांनीहि साम्राज्यमुत्सद्याप्र साजेशी वागणूक ठेविली आणि ज. स्मट्स, ज. बोथा व ज.

फिशर ह्यांच्याकडून असें अभिवचन मिळविलें कीं, ही तीन पौंडांची डोईपट्टी रद्द करण्यांत येईल.

" मग आपण आम्हांला तसें लेखी वचन द्या ना ? "

" अहो, त्यांत काय मोठेंसें ! आतां सही शिक्क्यानिशीं लेखी वचन दिलें असतें. पण सगळें कांहीं धीरे धीरे घेतलें पाहिजे. आपली जबाबदारी आपण ओळखली पाहिजे. आम्ही आपल्या प्रतिपक्षाशीं आधीं विचारविनिमय करूं आणि मग लेखी अभिवचनाचें पुढें पाहतां येईल ! "

अशा सारख्या वादविवादानंतर गोखल्यांनीं तोंडी अभिवचनांवरच संतुष्ट होण्याचें कबूल केलें. गोखल्यांची ही कामगिरी कांहीं लहानसहान नव्हती ! नाताळमधल्या प्रत्येक मुदत सरून स्वतंत्र झालेल्या मजुराचें सरासरी वार्षिक उत्पन्न ६ पौंड होतें आणि ही सहा पौंडांची कमाई करण्याकरितां नाताळांत राहतां यावें म्हणून त्याला ३ पौंड सरकारला द्यावे लागत होते! " ह्या राक्षसी अटीमुळें पुरुषांना दुष्टपणा व गुन्हे करणें भाग पडे व स्त्रियांना आपल्या अब्रूचे सौदे करून घ्यावे लागे ! " असें गोखले म्हणत आणि हा राक्षसी जुलूम दूर होणार असें त्यांनीं अभिवचन मिळविलें होतें !

सर फीरोजशहा मेथा हे गोखल्यांच्या अभिनंदनार्थ मुंबई येथे भरलेल्या जाहीर सभेला हजर राहिले नाहीत. कारण त्यांना गोखल्यांनीं स्वीकारलेलें मवाळ धोरण मुळीच आवडलें नाहीं; पण गोख[illegible]नीं मिळविलेलें हें [illegible] यशसुद्धां त्यांच्या व हिंदी लोकांच्या पदरांत अखेर पडलें नाहींच.



प्रकरण ९ वें

# निर्णायक मोहीम

## नवीनच आपत्ति.



कुठ्याचें शपूट तीन आठवड्यांच काय परंतु तीन वर्षे नव्हींत घालून ठेविलें तरी तें सरळ होणार थोडच!

" मिरियामबी ही हसन इसूफ ह्यांची बायकोच नव्हे; कारण तिचें लग्न मुसलमानी पद्धतीनें झालेलें आहे " असा आफ्रिकन इमिग्रेशन खात्यानें शास्त्रार्थ काटला आणि वरिष्ठ कोर्टानें तो मान्य केला! म्हणजे इमिग्रेशन कायद्यान्वयें हिंदू किंवा मुसलमान धर्मविधीप्रमाणें लग्न झालेली स्त्री ही आपल्या पतीची धर्मपत्नी न ठरतां रखेली ठरली! व तिला ट्रान्सव्हालमध्यें प्रवेश करण्यास मनाई झाली. ह्या ठरावाचो सरसहा न पुरी अंमलबजावणी होणें शक्यच नव्हतें. तरी पण त्या योगानें एकंदर हिंदी लोक पुन्हां चिडले व सत्याग्रहाच्या गाड्या सुरू झाल्या.

आतांपर्यंत द. आफ्रिकेंतील पुरुषानाच मुख्यतः सत्याग्रहाची दीक्षा मिळाली होती; पण ह्या नव्या निकालांनीं

### हिंदू स्त्रियांनाहि सत्याग्रहाची रणदीक्षा

मिळण्याचा योग आला. आपल्या जिवाच्या जिवलगाला, " तुम्ही खुशाल तुरुंगांत जा, कांहीं झालें तरी मागें पाहू नका " म्हणून प्रोत्साहन देण्यास ज्या हिंदी स्त्रिया तयार झाल्या त्या स्वतःच्या जिवावर बेतल्यानंतर थोडीच माघार घेणार?

कस्तुरबा गांधी ह्यांच्यासुद्धा शेकडो स्त्रिया तरुण, गर्भवती, तान्हीं बाळें हातीं घेतलेल्या आणि वयानें वृद्ध अशा सर्व प्रकारच्या शेकडो स्त्रिया ट्रान्सव्हालच्या हद्दींत शिरुन कारागृहवास पत्करण्यास तयार झाल्या. व त्यांना तीन तीन महिने किंवा अधिकचे मुदतीचा कारागृहवास भोगावा लागला. एक

१८।२० वर्षांची तरुण स्त्री तुरुंगांतून बाहेर पडली ती थेट परलोकाच्या मार्गास लागली !

## अभिवचनांना विचारतो कोण !

"मला हंसूंच आलें ! ह्या सगळ्या दांभिक देखाव्यांची मला मोठीच मौज वाटली ! गोखल्यांनीं पाठ फिरविली आणि ब्रिटिश वसाहतवाल्यानें जरा दुर्लक्ष केलें कीं हे विरोधी लोक एशियाटिकांना पुन्हां पूर्वीप्रमाणेंच छळूं लागतील ! " असे उद्गार ना. गोखल्यांच्या स्वागतसमारंभास अनुसरून एका गोऱ्या वसाहतवाल्यानें काढले होत ! ना. गोखल्यांऐवजीं हा गोरा वसाहतवालाच खरा मुत्सद्दी ठरला !

इकडे १९१० च्या तडजोडीची मुदत संपत येऊन एप्रिल १९१३ मध्यें यूनियन सरकारनें पार्लमेंटपुढें नव्या कायद्याचें बिल दाखल केलें.

ह्या बिलानें गांधी आणि गोखले ह्या दोघांसहि दिलेल्या अभिवचनांना सार॰ खेंच धुडकावून लावलें !

ह्या कायद्यानें फक्त स्त्रियांवरील तीन पौंडाची डोईपट्टी तेवढीच माफ करण्यांत आली. परंतु उलट स्त्रियांवर सुद्धां दरवर्षी लायसेन्स काढण्याची सक्ति करण्यांत आली ! म्हणजे अखेर ह्या कायद्यानें खरी सुधारणा अशी कांहींच केली नाहीं !

" डोईपट्टी फक्त स्त्रियांनाच माफ करण्याचें अभिवचन तुम्हाला मिळालें होतें काय ? " असें हिंदी पुढाऱ्यांनीं गोखल्यांना तारेनें विचारलें.

हा कायदा अजिबात रद्द करण्यात येईल असें आपणास अभिवचन मिळालें होतें असें गोखल्यांनीं उत्तरीं कळविलें.

वसाहत प्रधानमंडळानें गोखल्यांचें हें म्हणणें जाहीररीतीनें खोडून टाकलें नाहीं किंवा आपलें धोरणहि बदललें नाहीं.

" हे वसाहतवाले वचनभंगांत अगदीं तरबेज झाले आहेत. हें लक्षण कांहीं ठीक नाहीं " म्हणून गोखल्यांनीं श्री. पोलाक ह्यांस विलायतेंत पाठवून खूप खटपट केली. लॉर्ड ॲम्टहिल ह्यांनीं हौस ऑफ लॉर्डस मध्यें सणसणीत भाषण केलें.

जून १९१३ मध्ये हें बिल मूळ स्वरुपांत यूनियन पार्लमेंटनें मजूर केलें. गांधींनीं पुढेंहि कांहीं दिवसपर्यंत तडजोडीचे प्रयत्न केले. परंतु अखेर ता. १२ सप्टेंबर १९१३ रोजीं श्री. कचालिया ह्यांच्या सहीनें निघालेल्या पत्रकानें

## सत्याग्रहाचें रणशिंग फुंकलें

" झगडा पुन्हां सुरूच करावयाचा तर आपला कार्यक्रम वाढविलाच पाहिजे. कष्टच सहन करावयाचे तर ते सर्वच प्रमुख आणि सर्वश्रुत गान्हाण्यांसाठीं सोसलेले बरे. " असें म्हणून सत्याग्रहाचा उपक्रम करतांना गांधी म्हणतात, " गोल्डलॉखालीं खटले भरून हिंदी धंदेवाइकांचा नायनाट करण्याची इच्छा सरकारनें व्यक्त केली आहे. हिंदी मनुष्य कोणत्याहि दर्जाचा कां असेना त्याला आपल्या प्रांतांत आम्हीं पुन्हां सुखानं प्रवेश करूं देणार नाहीं अशी नवीन कायद्याच्या अंमलबजावणीनें सरकारची इच्छा व्यक्त होत आहे. नाताळ आणि केपमधील लायसेन्सिंग लॉज ( परवान्याचे कायदे ) हिंदी व्यापारधंदे धुळीस मिळविणार व स्वतंत्र मजुरांवरील ३ पौंड डोईपट्टी कायम ठेवणार. वसाहतींतच जन्म झालेल्या हिंदी लोकांस आपल्या जन्मजात हक्कांचें संरक्षण करणें जरूर आहे. हिंदी विवाहित स्त्रियांस अपमानास्पद असलेला विवाहविषयक कायद्यांतला भाग काढून टाकण्यांत आला पाहिजे.

"ह्यांतील एकेक मुद्दा घेतला तरी तो निःशस्त्र प्रतिकार पुकारण्याइतका महत्वाचा आहे. ह्यावेळचा आपला लढा सरकार आणि युरोपियन जनता ह्यांच्यांत हृदयपालट घडवून आणण्यासाठींच लढविला पाहिजे. सरकार व आपला मुख्य भागीदार ह्यांच्या हृदयास पाझर फुटेल इतके दीर्घकालीन व कटु क्लेश सहन केले तरच आपलें ध्येय साधणार आहे. ह्या भयंकर अग्निदिव्यांतून पार पडण्याचें सामर्थ्य समाजाला प्राप्त होवो ! "

" सत्याग्रहाला लोक तयार नाहींत ! आतांपर्यंत त्यांनीं इतकी द्रव्यहानि सोसली आहे कीं, आतां त्यांच्यांत कांहीं त्राण उरलेलें नाहीं " असें म्हणून अनेक सहानुभूतिवान् मित्रसुद्धां गांधींना सांगूं लागले.

" ह्या झगड्यांत शेंकडो लोक तुरुंगांत जातील असें आपणास वाटत नाहीं हें स्पष्टच आहे. परंतु सत्याग्रहाची उग्र आपण कळकळ आणि दुर्दमनीय इच्छाशक्ति त्यांनीं भरून काढली पाहिजे. * * * जगांतील कोणतेहि राष्ट्र एकाचवेळीं आपली एकंदर मुलें रणांगणावर उभें करूं शकणार नाहीं. आपली ही शांतिसेना आहे. * * * रणांगणांत आपले निःशस्त्र प्रतिकारी वीर पांचशें असोत, पन्नास असोत, पांच असोत किंवा एक असो; आपण यशस्वी होणार खास. " कारण " यश मिळेल तें कांहीं अंशा एकट्या दुकट्या निःशस्त्र प्रति-

कारी वीराच्या सामर्थ्यानें नव्हे तर तो ज्यासाठीं लढतो त्या अजिंक्य सत्याच्या बळावरच यश मिळेल.''

## मजुरांचा संप.

ता. १२ सप्टेंबर रोजीं गांधींनीं वसाहतसरकारला पत्र लिहून खाणींतील मजुरांना संप करण्याविषयीं आपण सल्ला देणार असें कळविलें. परंतु ज. स्मट्स यांनीं या पत्राला चिठोरें समजून त्याची उपेक्षा केली. खाणवाल्यांस यासंबंधानें आगाऊ इषारा देण्याचीहि तसदी घेतली नाहीं.

इकडे ट्रान्सव्हालच्या हद्दींत प्रवेश करणें आणि परवान्यावांचून रस्त्यांतून माल विकणें या दोन मार्गांनीं कायदेभंग सुरू होताच. परंतु गांधींनीं नाताळच्या खाणींतील मुदतबंदी मजुरांस संप करण्याविषयीं सल्ला दिला. लग्नविषयक कायद्यामुळें तुरुंगांत गेलेल्या स्त्रिया आतां तुरुंगांतून सुटून परत घरोघर चालल्या होत्या. त्या न्यूकॅसलकडे एकत्र गोळा झाल्या. आणि श्री. सी. के. थाय्. नायडू यांच्या नेतृत्वाखालीं मजुरांस संपाचा उपदेश करूं लागल्या.

निःशस्त्र प्रतिकारी लोकांच्या या सगळ्या चळवळीकडे कानाडोळा करून उपेक्षेनेच त्या दाबून पाडावयाच्या असें धोरण त्यावेळीं वसाहतसरकारनें स्वीकारलें.

खाणीच्या मार्गांत परवान्यावांचून शिरणारास गोळी घालून ठार करण्यास कायद्यानें परवानगी आहे. पण सत्याग्रही तेथें सुद्धां यावयास लागले. इतकेंच नव्हे तर खाणवाले संपावरील मजूरांना शिधा सामुग्री पोंचवूं लागले ! खाणवाल्यांनीं आतां पोलिसांची मदत मागितली. पण शांतताभंग होण्याची भीति नाहीं या सबबीवर सरकारनें मदत देणें नाकारलें !

एका मागून एक खाणी बंद पडूं लागल्या. खाणवाल्यांनीं एक सभा भरवून गांधींना बोलावणें पाठविलें. गांधींचें म्हणणें ऐकून घेऊन खाणवाल्यांनीं ज. स्मट्स व ज. बोथा यांना तारेनें विचारलें, आपण गोऱ्यांना कांहींबद्दल कांहीं अभिवचन दिलें होतें काय ?

मुळींच नाहीं म्हणून त्यांनीं तारेनेंच उलट जबाब दिला ! हा वसाहतवाल्यांचा तिसरा वचनभंग होय !

आतां स्वतंत्र म्हणजे गांधींकडा

## शांतिसैनिकांची प्रचण्ड छावणी.

वनमी. अंगभर धड वस्त्र नाहीं, पोटभर धड अन्न नाहीं असे हजारों मजु-

रांचे पवेच्या थंडीवारा सहन करीत उघड्या मैदानावर तळ देऊन राहिले होते. कै. ना. गोखले ह्यांच्या खटपटीनें व आफ्रिकेंतील हिंदी व्यापाऱ्यांकडून ह्या शांतिसेनेचा खर्च चालू होता. मि. कॅलेनबॅक व मि. ख्रिस्टोफर वगैरे गृहस्थ त्यांच्या रसदीची व्यवस्था पाहत. अक्टोबर १६ पासून दोन आठवडेपर्यंत अशा रीतीनें स्वस्थ बसण्यांत गेले. परंतु प्रतिपक्षाची कांहींच हालचाल दिसेना तेव्हां गांधींना आपला तळ हालवून आपणच उठाव करणें भाग पडलें.

दररोज २५ मैलप्रमाणें पायीं मजला मारीत आठ मुक्काम करून अखेर ट्रान्सव्हालमधील मि. कॅलेनबॅक ह्यांच्या टॉलस्टॉय फार्ममध्यें तळ द्यावयाचा व सरकार पकडीपर्यंत तेथेंच रहावयाचें असा कार्यक्रम आंखण्यांत आला.

स्त्रिया व मुलें ह्यांना चार्लस् टौन येथें ठेवून दोन हजारांहून अधिक शांतिसैनिक

## मोहिमेवर निघाले.

पुढील मुक्कामाची पोलीस व म्यूनिसिपल अधिकारी ह्यांना गांधी आगाऊ वर्दी देत; शांतता व स्वच्छता राखण्यासाठीं त्यांना शक्य तितकी मदत करीत; पावांनीं भरलेली पोतीं जवळ ठेवून त्यांतील दीड रत्तल पावाचा तुकडा व त्यावर चिमुटभर साखर असें 'राशन' प्रत्येकाला आपल्या हातानें देत; सर्व-जण झोंपले म्हणजे आपण कँपभर फिरून सर्वांवर प्रेमळ मातेप्रमाणें नजर टाकीत आणि पुन्हां सर्वांच्या आधीं उठून त्यांच्या सुखसोईसाठीं कामास लागत!

अचूक सेनापतीच शत्रूनें पकडला की साऱ्या सैन्याची तारांबळ उडते असा एक सामान्य नियम असल्यामुळें सरकारनें ता. ६ नोव्हेंबर रोजीं पामफोर्ड येथें

## गांधींनाच पकडलें.

कोणी साक्षीदार असल्यावांचून आपणावर आरोप शाबीद होणार नाहीं असें म्हणून गांधींनीं पकडणाऱ्या पोलीस अधिकाऱ्यांना जवळच्या कांहीं लोकांची साक्षीदार म्हणून नांवें टिपून घेण्यास सुचविलें!

" मोहिमेवर निघालेल्या लोकांत १२२ स्त्रिया आणि ५० मुलें आहेत. जर का त्यांतील कांहींच्या, विशेषत: तान्हीं मुलें असलेल्या बायांच्या जीवाला धोका पोंचला तर त्याची जबाबदारी सरकारवर राहील " अशी त्याचवेळीं गांधींनीं अंतर्गत प्रधानास तार केली आणि एक तर मला त्यांच्याबरोबर जाऊं

### अटकेचे व मोहिमेचे परिणाम.

गांधींच्या अटकेनें नाताळांतील खाणींतल्या आणखी वीस हजार लोकांनीं संप केला. सरकार गोंधळून गेलें. लष्करानें केलेल्या गोळीबारास कितीतरी मजूर बळी पडले.

सत्याग्रहाची ही विलक्षण मोहीम, प्रचण्ड संप, तीव्र लोकक्षोभ ह्यामुळें हिंदी प्रश्नाकडे अर्थातच सर्वांचे लक्ष वेधलें. हिंदुस्थानचे त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज ह्यांनीं त्यावेळीं हिंदी लोकपक्षाचें जोमदार रीतीनें समर्थन केलें, मद्रास येथील आपल्या संस्मरणीय भाषणांत त्यांनीं स्पष्ट शब्दांत जाहीर केलें कीं " वसाहत सरकारला उजळमाथ्यानें हिंदुस्थानपुढें व जगांत फिरावयाचें असेल तर त्यांनीं एक जोरकस निःपक्षपाती चौकशी कमीटी नेमावी ह्यावांचून गत्यंतरच नाहीं. या कमीटीवर हिंदी प्रतिनिधीहि पाहिजेत. या कमिटीनें अत्यंत चिकित्सकपणें चौकशी केली पाहिजे."

हिंदुस्थानच्या स्टेटसेक्रेटरीनाहि आतां स्वस्थ बसतां येईना. अखेर ता. ११ डिसेंबर १९१३ रोजीं ज. सर वुइलियम सालोमन ( अध्यक्ष ) मि. एवॉल्ड एसेलिन व मि. जे. एस् वायली यांची एक चौकशी कमीटी नेमल्याचें सरकारनें जाहीर केलें. आठ दिवसांनीं कमीशननें कामाला सुरवात केली; हिंदुस्थान सरकारनें आपल्या तर्फे पुरावा सादर करावा म्हणून कळविलें व गांधी, पोलाक, कालेनबॅक वगैरे हिंदी पुढाऱ्यांस बंधमुक्त करण्याविषयीं सरकारला शिफारस केली.

### फलनिष्पत्ति.

बंधमुक्त होतांच गांधींनीं कमीटीची रचना असमाधानकारक असल्यामुळें तिच्यावर बहिष्कार घालण्यांत यावा असें सुचविलें.

" तुमच्यासाठीं प्राणत्याग करण्याची आमची तयारी आहे; परंतु सॅलोमन कमीटीपुढें साक्षी देण्याचें काम मात्र आमच्या हातून होणार नाहीं " असें त्यावेळीं गांधींनीं आपले गुरु के. वा. गोखले यांस सविनय व सडेतोड उत्तर दिलें होतें. गोखल्यांसाठीं गांधी स्वतःच्या पायांवर पायमोजे चढविण्यास तयार झाले; पण स्वतःच्या तत्वांना पायाखालीं तुडविण्यास तयार झाले नाहींत.

पुन्हां सत्याग्रह पुकारावा असेंच गांधींचें मत होतें. परंतु इतक्यांत सर्वव्यापक रेल्वेसंप झाला. आणि सरकारवरील संकटाचा फायदा घेऊन आपला कार्यभाग साधण्याचें तत्व गांधींना कधींच मान्य नसल्यामुळें त्यांनीं सत्याग्रहाची कल्पना सोडून दिली.

सर बेंजामिन रॉबर्टसन यांस हिंदुस्थान सरकारनें प्रतिनिधि म्हणून कमिशनपुढें साक्ष देण्याकरितां पाठविलें होतें. त्यांना मात्र गांधींनीं योग्य तें सहाय्य दिलें. याचवेळीं रे. सी. एफ्. अँड्यूज व मि. डब्ल्यू. पिअर्सन हे द. आफ्रिकेंत गेले. तेथील वातावरण प्रशांत करण्याच्या कामीं यांच्या आगमनाचा बराच उपयोग झाला. अँड्र्यूज व गांधी यांची ही पहिलीच मुलाखत होय ही गोष्ट या ठिकाणीं उल्लेख करण्यासारखी आहे.

गांधींच्या साक्षीपेक्षांहि गांधींचा बहिष्कारच अखेर परिणामकारक झाला असें म्हणावें लागतें. कारण सालोमन कमीटीनें अखेर प्रत्येक वादग्रस्त मुद्यावर गांधींच्या म्हणण्याप्रमाणेंच निकाल दिला आणि सरकारनें, कमीटीच्या सर्व शिफारशी सर्वस्वी मान्य करून ज. बोथा यांनीं इंडिन्स रिलीफ ॲक्ट झटपट मंजूर करून घेतला.

सर्व द. आफ्रिका गोऱ्या वसाहतवाल्यांसाठीं निर्वेध राखण्याचें तत्व स्वीकारून एशियाटिकांचें समूळ उच्चाटण करावयाचें म्हणून ठरविलेल्या गोऱ्या वसाहतवाल्यांचा व त्यांच्या सरकारचा या सत्याग्रहानें हृदयपालट व्हावा कसा ?

तरी पण त्यावेळच्या बहुतेक सर्व तक्रारी, तात्पुरत्या व बहुतांशीं तरी दूर झाल्या इतकें मात्र खरें !



प्रकरण ८ वें.

# गांधींच्या कामगिरीचें स्वरूप.

## राजकीय की धार्मिक.



हिंदुस्थानानें "बॅरिस्टर" गांधी द. आफ्रिकेंत पाठविले, आणि महात्मा गांधी आणले !

कच्चा माल परदेशीं पाठवून त्याचाच बनलेला पक्का माल परत खरेदी करावयाचा या हिंदुस्थानच्या परावलंबी धोरणास साजेसाच हा प्रकार आहे।

या २० वर्षांतील गांधींची कामगिरी व गांधींच्या चारित्र्याचा, तत्वज्ञानाचा आणि अवतारकार्याचा निकाम हा अत्यंत बोधप्रद व मनोरंजक आणि मननीय आहे यांत शंका नाहीं.

" गांधी राजकारणांत अद्याप कालचे पोर आहेत " असें हिंदी सत्याग्रहाच्या प्रारंभीं मिसेस बेझंट यांनीं त्यांच्यावर आक्षेप होता. आणि गांधीहि स्वतः तसेंच समजत. परंतु द. आफ्रिकेंत गांधींनी पाय टेविला तेव्हांपासून द. आफ्रिकेंतील त्यांच्या २० वर्षांच्या कामगिरीच्या कार्यकारणभावांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास असेंच दिसून येईल कीं, त्यांचें हें कार्य जितकें आध्यात्मिक किंवा नैतिक स्वरूपाचें होतें तितकेंच तें राजकीयहि होतेंच.

विशेष स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे द. आफ्रिकेंतील गांधींच्या कामगिरीचें कारण व साध्य हीं शुद्ध राजकीय स्वरूपाचीं होतीं.* फक्त साधन मात्र आध्यात्मिक अथवा धार्मिक भावनांनीं युक्त असें होतें.

### द. आफ्रिकन झगडयाची उत्पत्ति.

द. आफ्रिकेंत हिंदी लोकांनीं चालविलेल्या लढयाची उत्पत्तीच मुळीं आर्थिक स्वरूपाची नाहीं किंवा धार्मिक स्वरूपाची नाहीं; व गोऱ्या लोकांच्या निर्भेळ साम्राज्याकांक्षेंत आहे.

गोऱ्या लोकांची व विशेषतः इंग्लंडची वाढती लोकसंख्या, वाढती भूक आणि वाढती आकांक्षा यांना यूरोप अपुरा पडला, अमेरिका सवता सुभा स्थापून स्वतंत्र बनल्यामुळें वाढीची एक दिशा पुष्कळंच अंशांनीं बंद झाली. यामुळें आणि अमेरिकेच्या या उदाहरणामुळें ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कानडा व आफ्रिका वगैरे मोकळ्या प्रदेशांत पसरलेल्या व पसरूं लागलेल्या मूठभर गोऱ्या वसाहतवाल्यांच्या धोरणाला एक निश्चित असें स्वरूप मिळालें. तें हें कीं, आपल्या हाताखालीं आलेला व येत असलेला सर्व मुलूख सर्वस्वी गोऱ्यांच्या अनिर्बंध सत्तेखालींच राहिला पाहिजे. त्यांत दुसऱ्या कोणत्याहि वर्गाच्या लोकांस स्वतंत्र वाढतें आणि जोमदार अस्तित्व असतां कामा नये. मग हे रंगीत लोक मूळचे रहिवाशी असोत; हिंदी लोकांसारखे एकच साम्राज्यबंधु असोत किंवा जपानसारख्या प्रबळ साम्राज्यांतील व्यवसायबंधु असोत!

द. आफ्रिकन यूनियन मधील द. आफ्रिकन पक्षाची प्रांतिक परिषद पिटर मारिटस्बर्ग येथें २५ जुलै १९२३ रोजीं भरली होती. ही परिषद द. आफ्रिकेंतील अधिकारारूढ पक्षाची असल्यामुळें त्या परिषदेच्या ठरावांनां ' बेजबाबदार ' किंवा इतर कोणत्याहि विशेषणानें उपेक्षणीय ठरवितां येणार नाहीं.

" द. आफ्रिकेंतून सर्व एशियाटिक लोकांस एकदम हांकून लावण्याचे जालीम उपाय द. आफ्रिकन सरकारनें अमलांत आणावेत अशी त्यास या परिषदेची प्रार्थना आहे " असा ठराव या परिषदेंत करण्यांत आला.

सदर परिषदेस मुख्य प्रधान व साम्राज्य मुत्सद्दी ज. स्मट्स हे हजर होते. त्यांनीं वरील ठरावास अनुलक्षून केलेल्या भाषणांत स्पष्ट जाहीर केलें कीं, We ask to be masters in our own house and to regulate Sonth Afriua according to our own ideas " द. आफ्रिकेचे धनी आम्ही राहणार आणि आमच्या इच्छेप्रमाणें द. आफ्रिकेची व्यवस्था आम्ही ठेवणार. तेथें युरोपियन संस्कृतीशिवाय इतर कोणत्याहि संस्कृतीस थारा मिळतां कामा नये. "

आफ्रिकेच्या निरनिराळ्या भागांत हिंदी लोक युरोपियनांच्या पूर्वीहि ज्ञात-यत होते; आफ्रिकेचा कांहीं भाग केवळ हिंदी लोकांच्या द्रव्यबळामुळें, बुद्धिबळामुळें व मनुष्यबळामुळेंच काळ्यागोऱ्यांच्या वसाहतीला लायक झाला; आणि आफ्रिकेंतील पुष्कळसा भाग गोऱ्या लोकांनीं केवळ मातीमोल हिंदी मजुरांच्या मजुरीनेंच वसाहतीला योग्य असा बनविला. यामुळें अर्थातच आफ्रिकेंतील

वसतींत, व्यापारांत आणि हितसंबंधांत हिंदी समाजाला निश्चित व बऱ्याच वरच्या दर्जाचें स्थान मिळणें स्वाभाविक होतें. हा प्रकार वाढतच गेल्यास, किंबहुना आहे ती स्थिति कायम राहिली तरीसुद्धां आफ्रिकेंतील आपली वाढ, आपली सत्ता आणि आपली स्वार्थपरायणता एकत्रीं आणि एकसूत्री संहणार नाहीं; त्यांत हिंदी समाज हा एक मोठाच भागीदार तयार होणार अशी त्यांना भीति पडली.

## झगडा शुद्ध राजकीय स्वरूपाचाच.

गोरें आफ्रिकन साम्राज्य उभारण्याची मूळ कल्पना अगदीं साधी अशीच होती. आपापल्या भागांत आपण करूं तें प्रमाण असावें; त्यांत रंगीत लोकांची नसती खिचडी नसावी अशीच ही कल्पना होती. पण काळे लोक भागीदार म्हणून नको असले तरी मजूर म्हणून गोऱ्या लोकांना हें उंटाचें पिल्लू घरांत घ्यावें लागलेंच !

जगाच्या पाठीवर चोहोंकडे व बरीच वर्षें अनुभव घेऊन गोऱ्या लोकांनीं असा एक ठाम सिद्धांत ठरविला आहे कीं, सारख्याच परिस्थितींत आणि सारख्याच अनुकूल साधनसामुग्रीनें गोरे लोक एशियाटिकांशीं जीवनकलहांत स्पर्धा करूं शकत नाहींत. अशा ' धर्मयुद्धांत ' श्वेतवर्णीय लोक नामशेष होऊन जातील. यूरोपांत व अमेरिकन संयुक्त संस्थानांत गोऱ्या लोकांचा जम सर्वस्वी बसून गेला आहे. त्यामुळें त्या भागांत स्पर्धेचा प्रश्नच तितकासा उद्भवत नाहीं. यांत्रिक व इतर बाबींतील विलक्षण प्रगति, संघटना आणि त्या भागाला केंद्र बनवून आगाऊच सर्व जगावर चालविलेलें आक्रमण, त्यामुळें हा रंगी-बेरंगी लोकांच्या जीवनकलहाचा लढा परस्पर बाहेर रंगीत लोकांच्या प्रदेशांतच मग्न आहे. गोऱ्या लोकांचा खास प्रदेश त्या झगड्यापासून अद्याप पुष्कळ दूर आहे !

प्रत्येक नवनव्या वसाहतींत व आपल्या अमलाखालील मुलुखांत रंगीत लोकांच्या त्या तीव्र व अंशतः सर्वभक्षक प्रतिस्पर्ध्यावर शक्य तितकीं कृत्रिम बंधनें घालावीत व या कृत्रिम बंधनांच्या किल्लेकोटांत राहून आपलें अस्तित्व व केवळ अस्तित्वच नव्हे तर वर्चस्व कायम राखावें असें धोरण गोऱ्या लोकांनीं स्वीकारणें स्वाभाविक होतें. आणि येवढ्यापुरतेंच पाहिलें तर वसाहतींतील व इतर ठिकाणचे त्यासारखे झगडे हे आर्थिक स्वरूपाचे दिसतात खरे. परंतु हीं आर्थिक बंधनें पाळण्यासाठीं सर्व ठिकाणीं मग कांहीं राजकीय सत्तेचाच

उपयोग करण्यांत आला, येत आहे व येत जाणार आणि म्हणूनच हा लढा धार्मिक तर नाहींच परंतु मूलतः आर्थिक असला तरी स्वरूपानें राजकीयच आहे.

## द. आफ्रिकन साम्राज्याची कल्पना.

द. आफ्रिकेंत युरोपियन लोक वसाहत करूं लागले ते प्रथम जर्मन तेथें व युरोपांतील राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेनें प्रेरित होऊनच. वसाहती संमिश्र स्वरूपाच्या असल्या तरी एकेका राष्ट्रांतील लोक आपली स्वतंत्र व स्वयंपूर्ण वसाहत वसविण्याचा प्रयत्न करीत. अशा रीतीनें युरोपांतल्या बहुतेक सर्व राष्ट्रांनीं आपापलें प्राबल्य असलेल्या स्वतंत्र वसाहती आफ्रिकेंत निर्माण केल्या.

द. आफ्रिकेंत डच व ब्रिटिश लोकांच्या वसाहती संमिश्र व जवळ जवळ वसल्या आणि बोअर युद्धानंतर त्या संयुक्त बनल्या. आणि येथूनच वसाहतींतील व युरोपांतील कांहीं मुत्सद्यांच्या आकांक्षांना निराळेंच वळण लागलें. अमेरिकेंतल्याप्रमाणेंच आफ्रिकेंतहि गोऱ्या वसाहतींचें एक प्रचण्ड, स्वयंसमृद्ध व स्वयंस्वतंत्र असे गोरें साम्राज्य निर्माण करावें अशी ही कल्पना आहे.

ब्रिटिश साम्राज्यामुळेंच मूळ संयुक्त वसाहतसरकार द. आफ्रिकेंत निर्माण होऊं शकलें व ब्रिटिश साम्राज्यामुळेंच ह्या कल्पनेची वाढ होणें आतां अगदीं शक्य व संभवनीय आहे.

युरोपियन महायुद्धांत जर्मन पूर्व आफ्रिकेंतील प्रचण्ड विस्ताराच्या जर्मन वसाहती ब्रिटिश साम्राज्याच्या ताब्यांत आल्या. आणि आतां पूर्वीच्या डच वसाहतीप्रमाणेंच ह्या सर्व वसाहती द. आफ्रिकन संयुक्त राज्यांत सामील करून ह्या द. आफ्रिकन साम्राज्य कल्पनेला जंगी व अवाढव्य स्वरूप प्रत्यक्ष व्यवहारांत मिळावें म्हणून आतां खटपट सुरू आहे व ज. स्मट्स ह्यांजकडे कल्पनेचें व साम्राज्य प्रस्थापनेचें कार्य आलेलें आहे.

हें नवें आफ्रिकन साम्राज्य ब्रिटिश साम्राज्याच्या पोटीं जन्मास येत आहे. आणि अमेरिकन संयुक्त राज्याच्या जन्माच्यावेळीं ज्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्याला तीव्र प्रसववेदना सहन कराव्या लागल्या त्याप्रमाणेंच त्या ह्यावेळींहि सहन कराव्या लागणार नाहींतच असें नाहीं. ब्रिटिश साम्राज्याला ह्या प्रसववेदना सह्य होवोत किंवा असह्य होवोत, द. आफ्रिकन साम्राज्याचा जन्मसंभव झालाच पाहिजे असा ह्या मुत्सद्यांचा आग्रह आहे.

हें साम्राज्य सध्यांच्या गर्भावस्थेंत सुद्धां बलिष्ठ आहे; इंग्लंडची अमुक एक मोहर आपण मानलीच पाहिजे असें द. आफ्रिका मानीत नाहीं किंवा पूर्व आफ्रि-

काहि मानीत नाहीं. जरूर तर आम्ही इंग्लंडालाहि धाब्यावर बसवूं असें जबाबदार कानडा बोलून दाखवितो आणि बेजबाबदार केनियावालेहि सशस्त्र बंडाच्या गोष्टी बोलतात. आणि द. आफ्रिका युद्धासारख्या साम्राज्याचा जीव धोक्यांत येणाऱ्या प्रसंगींहि इंग्लंडला ' राजनिष्ठापूर्वक ' मदत करण्यास तयार नसून फक्त ' वाटल्यास ' मदत करण्यास तयार आहे.

भावी आफ्रिकन साम्राज्य हें गर्भावस्थेंतच इतकें बलिष्ठ आहे आणि तें ब्रिटिश साम्राज्याच्या गर्भांत असेपर्यंत तरी एकंदर ब्रिटिश साम्राज्य बळ हें ह्या गर्भावस्थेंतील साम्राज्याचेंच बळ आहे.

द. आफ्रिकन सरकारचें खरें स्वरूप हें असें आहे.

## गांधींच्या कामगिरीचें स्वरूप.

दादाभाई नौरोजी हे हिंदी जागृतीचे जनक होत आणि लोकमान्य हे हिंदी अस्वास्थ्याचे जनक होत.

ब्रिटिश साम्राज्य हें हिंदुस्थानच्या हिताकरितां नसून हिंदुस्थानच्या रक्तशोषणाकरितां आहे ह्या तत्वाचे दादाभाई हे आद्यजनक व प्रवर्तक होते.

ब्रिटिश साम्राज्याचा स्वार्थ साधो किंवा स्वार्थ सर्वस्वी बुडो आमच्या राष्ट्राचा स्वार्थ आम्ही साधणार असा तीव्र लोकक्षोभ लोकमान्यांनीं उत्पन्न केला. दादाभाई व लोकमान्य ह्यांची कामगिरी ह्याप्रमाणें परस्परपूरक आणि क्रमप्राप्त अशी होती.

दादाभाई व लोकमान्य ह्यांनीं खास हिंदुस्थानांत हिंदुस्थानासाठीं ब्रिटिश साम्राज्याला अनुलक्षून जी कामगिरी बजाविली तीच कामगिरी गांधींनीं द. आफ्रिकेंत, द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांसाठीं ह्या. द. आफ्रिकन साम्राज्याला अनुलक्षून बजाविली आहे. गांधी हे द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या जागृतीचे व अस्वास्थ्याचे जनक आहेत. इतकेंच नव्हे तर हिंदी लोकांच्या भावी द. आफ्रिकन साम्राज्याविरुद्ध सुरू झालेल्या मोहिमेंतील ते पहिले सर सेनापति आहेत-होते. जागृति, प्रक्षोभ आणि संघटना हीं तिन्ही कार्यें त्यांनीं एकटयानेंच केलेलीं आहेत.

गांधींना यदृच्छेनें जें कार्यक्षेत्र लाभलें तेंच मोठें विचित्र होतें. हिंदुस्थानांतील झगडा हा स्थिर होऊन गेलेल्या ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध होता व आहे परंतु गांधींना जो लढा लढावा लागला त्याचें स्वरूपच तो लढा

ज्या साम्राज्याच्या विरुद्ध लढावयाचा त्या साम्राज्याच्या उत्पत्तीबरोबरच सुरू झालेला आहे.

आफ्रिकन साम्राज्याच्या कल्पनेबरोबरच त्या साम्राज्याच्या विघटनेस किंवा तें साम्राज्य ज्या साम्राज्याच्या पोटीं जन्म घेऊं महात आहे त्या ब्रिटिश साम्राज्याच्या विघटनेस कारणीभूत होऊं शकेल अशा ह्या हिंदी लोकांच्या लढ्याचें बीजारोपण व संवर्धन गांधींच्या हस्तें व गांधींच्या नेतृत्वाखाली झालेलें आहे.

हिंदी लोकांनीं हिंदुस्थानांत स्वतंत्र स्वयंपूर्ण व अनिर्बंध वृत्तीनें स्वतःची वाढ करून घ्यावी किंवा नाहीं हा हिंदी चळवळींतील प्रश्न जितका व जसा महत्वाचा आहे तितकाच व तसाच द. आफ्रिकेंत ( व एकंदर आफ्रिकेंत ) हक्कानें रहात असलेल्या हिंदी लोकांनी ह्या चालू द. आफ्रिकन राज्यांत व भावी आफ्रिकन साम्राज्यांत युरोपियनांच्या बरोबरीच्या दर्जानें रहावें किंवा जगाच्या पाठीवर स्वतंत्रतेनें, सन्मानानें आणि सुखानें जगावें किंवा नामशेष होऊन जावें हा प्रश्न महत्वाचा आहे.

## गांधींच्या द. आफ्रिकेंतील कामगिरीच्या यशस्वितेचें मोजमाप

घेतांना झगड्याची ही व्यापकता व भव्यता आधीं लक्षांत घेतली पाहिजे. हा झगडाच इतका निर्वाणीचा आहे व त्यावर शुद्ध गोऱ्या साम्राज्याची कल्पना अशी कांहीं अवलंबून राहिलेली आहे कीं, हा झगडा सत्ताधारी वसाहतवाले सुखासुखीं किंबहुना साधारण अडचणींनीं किंवा अपजयानें निकालांत काढतील अशी कल्पनाच करावयास नको. रंगी व बेरंगी अशा वर्णविषयक व जगद्व्यापक झगड्याचा हा एक भाग आहे; एकंदर हिंदी लोकांनीं जगांत निर्मोच्या अधः-स्थितींत जावें किंवा अमेरिकन इंडियनांच्या प्रमाणें संहारात्मक स्थितीला जावें त्याचा निकाल ह्या झगड्यानें लागणार आहे. अर्थात् द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांचा लढा हा हिंदी स्वराज्यप्राप्तीनंतर व आफ्रिकन साम्राज्याच्या जन्मानंतरच खरोखर रंगारूपास येणार आहे.

आफ्रिकन साम्राज्याच्या कल्पनेच्या बरोबरच गांधींनी ह्या लढ्याचाहि उपक्रम केला आणि त्या कल्पनेच्या वाढीबरोबरच ह्या लढ्याचीहि वाढ केली आणि त्याबरोबरच आपल्या सार्वजनिक कार्याचा उपक्रम व वाढ केली.

## " मागणें लई नाहीं—"

येथें एक गोष्ट नमूद करून ठेवणें भाग आहे. ती ही कीं, गांधीनीं ह्या लढ्याचें स्वरूप मात्र प्रारंभापासूनच संकुचित केलें. ह्या भावी बलाढ्य साम्राज्यांत व प्रचलित बलाढ्य राज्यांत हिंदी लोकांना अगदीं बरोबरीचा, स्वतंत्र व पूर्ण अधिकार असावा अशी कधीं मागणीच केली नाहीं.

" द. आफ्रिका गोऱ्यांची गोऱ्यांनाच लखलाभ होवो; " असेंच त्यांनीं ठरविलें. त्यांचें म्हणणें इतकेंच पडलें कीं, ( १ ) जे हिंदी लोक द. आफ्रिकेंत आगाऊच जाऊन राहिले आहेत त्यांना तरी निदान युरोपियनांच्या बरोबरीचे हक्क असावेत; निदान जे कांहीं जुने साधेसे हक्क आहेत ते तरी कायम रहावेत आणि ( २ ) हा मायदेशापासून तुटून अलग झालेला समाज अगदींच डबक्यांतल्या पाण्याप्रमाणें कुजूं नये म्हणून दरवर्षी अगदीं मूठभर तरी नव्या व सुशिक्षित हिंदी लोकांस वसाहतींत येऊन रहाण्याची परवानगी मिळावी. व (३) ही जी जवळ जवळ सर्वस्वी बंदी करावयाची ती हिंदी लोक हे हिंदी किंवा एशियाटिक आहेत म्हणून, अशा वर्णविषयकहीनतेच्या कल्पनेवर न करतां शिक्षणविषयक लायकी फार कडक ठेवून व इतर उपायांनीं अमलांत आणावी.

आमच्यावरचा वर्णविषमतेचा कायदेशीर व तात्विक शिक्का काढून टाका हेंच गांधींच्या ह्या मागण्यांचें सार ठरतें.

आपली मागणी प्रथमपासूनच कमीत कमी प्रमाणांत ठरवावयाची हें गांधींचें धोरण कोणास आवडेल किंवा कोणास आवडणार नाहीं. परंतु ह्या मुद्याचा विचार करतांना एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, प्रबळ परंतु परकीय अशा जपानी (व चिनी ?) राष्ट्रानें युरोपियन वसाहतींच्या बाबतींत याहून विशेष आग्रह धरलेला नाहीं. आणि स्वकीय परंतु दुबळ्या हिंदी राष्ट्रातर्फे गांधीनींहि असा आग्रह धरला नाहीं. जपानला परकीयपणा नडतो तर हिंदी लोकांना दुबळेपणा नडतो, असें हें समीकरण आहे.



## प्रकरण ७ वें.

# गांधींच्या कामगिरीचें महत्व.

Your activity in the Transval, as seems to us, at the end of the world, is the most essential work, the most important of all the work now being done in the world and in which not only the nations of the Christian but of all the world will unavoidably take part.

—*Leo Tolstoy to Gandhi.*

### नव्या तत्वाचे नवे पुरस्कर्ते.



गांधींचें द. आफ्रिकेंतील चरित्र लोकोत्तर आहे आणि गांधींची द. आफ्रिकेंतील कामगिरी अद्वितीय आहे. द. आफ्रिकेंतील चरित्रामुळें गांधी महात्मा बनले आणि द. आफ्रिकेंतील गांधींच्या कामगिरीमुळें जगांत नवयुग सुरू झालें.

म. गांधींनी भावी द. आफ्रिकन साम्राज्याच्या शुद्ध युरोपियन स्वरूपास मुळापासूनच विरोध केला आणि काळ्यागोऱ्यांच्या झगड्याचे ते आद्यप्रवर्तक व असामान्य पुढारी होते हें कांहीं ह्या लोकोत्तरतेचें किंवा युगांतराचें कारण नव्हे. जगांत शासित व शास्ते, प्रबळ व दुर्बळ, काळे व गोरे, भक्ष्य व भक्षक त्यांच्यांत नेहमींच झगडे होत असतात व होत आहेत; प्रत्येक झगड्याला थोर व क्वचित् यशस्वी पुढारीहि लाभले व लाभतात. व त्या प्रत्येकाला कोणीतरी आद्यप्रवर्तक व सर्व प्रमुख पुढारी लाभतोच.

म. गांधींच्या चारित्र्याला, चारित्र्याला व कर्तृत्वाला महत्व आहे, ते नवयुग-प्रवर्तक आहेत, लोकोत्तर आहेत. कारण द. आफ्रिकेंतील आपल्या कामगिरीनें

म. गांधीनीं जगांतील ह्या सामुदायिक लढे लढविण्याच्या व निकालांत काढण्याच्या मार्गांना अगदींच नवें व अद्वितीय वळण लावलें. जगांतल्या ह्या लहानमोठया लढयांत साध्य व साधक कायम असतील पण गांधींनीं साधनांत युगांतर घडवून आणलें.

आतांपर्यंत जगांत सामुदायिक-राष्ट्रीय झगडे निकालांत काढण्याचे दोनच मार्ग प्रचलित होते. ( १ ) मनगटाच्या बळावर प्रतिपक्षाला चीत करून आपलें ध्येय साधावयाचें. आणि ( २ ) मनगटांत इतकें बळ नसेल तर नाइलाज म्हणून किंवा मनगटाच्या बळाचा उपयोग करण्याची पूर्व तयारी म्हणून प्रतिपक्षाला मुत्सद्देगिरीच्या धोरणानें, वेडयावांकडया मार्गांनीं, साधेल त्या रीतीनीं नाडावयाचें व मिळेल तें, मिळेल तसें पदरांत पाडून घ्यावयाचें.

युद्ध किंवा अडवणूक असे हे प्रचलित राजमान्य व लोकमान्य मार्ग होते व अद्यापहि आहेत.

म. गांधींनीं द. आफ्रिकेंतील आपल्या कामगिरीच्या सुरुवातीसच हे दोन्ही मार्ग सर्वस्वी सोडून देऊन अगदींच नव्या धोरणाच्या-मार्गाचा पुरस्कार केला.

सत्याग्रह हें ह्या मार्गाला म. गांधीनी नांव दिलें. म. गांधी हे ह्या नव्या तत्वाचे द्रष्टे, परस्कर्ते, प्रवर्तक व प्रचारक आहेत.

## आद्यतत्वांची अल्पशी अंमलबजावणी.

द. अफ्रिकेंतील आपल्या २० वर्षांच्या अध्ययनानें, मननानें व अनुभवानें गांधींचें नवीन तत्वज्ञान बहुतांशीं परिपूर्ण झालें होतें. तत्वज्ञान ह्या दृष्टीनें त्यांच्या सत्याग्रह ह्या कल्पनेंत नवीन अशी कोणतीच भर घालावयाची राहिली नव्हती; किंवा तत्वज्ञान या दृष्टीनेंच त्यांच्या विचारसरणींत सध्यांपेक्षां कांहीं विशेष फरक किंवा उणीवा होत्या असें मुळींच नाहीं. परंतु द. अफ्रिकेंतील आपल्या कामगिरींत त्यांनीं आपल्या एकंदर विचारसरणीला किंवा तत्वज्ञानाला व्यक्त स्वरूप दिलें नव्हतें. तसं करण्याइतकं तेथील क्षेत्र गुंतागुंतीचें, भरपूर व्यापक आणि पुरेसें विस्तृत नव्हतें.

गांधीनीं हिंदुस्थानांतील सत्याग्रह व असहकार चळवळींतहि आपल्या एकंदर तत्वज्ञानाला पूर्णपणें व्यावहारिक स्वरूप देण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. परंतु द. अफ्रिकेंत तर त्यांनीं हें कार्य अगदींच नियमितप्रमाणांत केलें.

द. अफ्रिकेंत उघड व व्यापक प्रमाणावर अत्याचार शक्यच नव्हता. (१) क्षुल्लक प्रमाणावर अत्यल्प अत्याचार व कांहींशी अडवणूक हीच तेथें शक्य

होती. ह्यांच्या अभावीं (२) निराशा व आत्मघात येवढाच मार्ग मोकळा होता. गांधींनीं हे दोन्ही मार्ग सारखेंच अशक्य व आत्मघातकी ठरविले.

आत्मक्लेश हें नवें तत्त्व गांधींनीं या लढ्यांत पुढें आणलें. प्रतिपक्षावर अत्याचार करावयाचा नाहीं; प्रतिपक्षाची वेड्यावांकड्या मार्गांनीं अडवणूक करावयाची नाहीं. सरळ, उघड, सत्यमार्गानें प्रतिपक्षाकडून होईल तो छळ सहन करून विमेवणानें सत्याचा व ध्येयाचा आग्रह धरावयाचा आणि अशा रीतीनें केवळ नैतिक बळावर—आत्मबळावर प्रतिपक्षाला जेरीस आणावयाचें असा हा मार्ग आहे.

या मार्गांत अडवणूक नाहीं असें नाहीं. हजारों लोकांनीं एकदम एखादा संप करावयाचा, कायदा मोडावयाचा किंवा आग्रह धरावयाचा त्यांत प्रतिपक्षाची अडवणूक होतेच होते. मुत्सद्दी अडवणूक व ही सत्याग्रही अडवणूक यांत फरक आहे तो हाच कीं, ही अडवणूक प्रतिपक्षाच्या अडचणींचा फायदा घेत नाहीं; (२) अतएव, गुप्त, अचानक असें कांहींच करीत नाहीं. (३) सावनांत सुद्धां कोठेंहि सत्य सोडीत नाहीं. (४) प्रतिपक्षावर कोणत्याहि प्रकारचा शारीरिक किंवा नैतिक अत्याचार करीत नाहीं; उलट आपलें सर्व बळ एकवटून आपल्यावर उलटण्यास आणि आपला छळ करण्यास प्रतिपक्षाला पूर्ण संधि देते आणि त्याच्या या शांत तीव्र अत्याचारी धडाडीनेंच त्याचा हृत्किंपात करण्याचा घाट घालते. सत्याग्रही अडवणूक ही अशी आहे. अप्रतीकाराचें तत्त्व हें हेंच.

म. गांधींनीं द. आफ्रिकेंतील लढ्यांत हें येवढें—फक्त सत्य व अप्रतीकार येवढेंच तत्त्व अमलांत आणलें. परंतु ही ह्या तत्त्वाची अंमलबजावणीसुद्धां जगाच्या इतिहासांत अद्वितीय, क्रांतिकारक व नवयुगप्रवर्तक होती.

### अशक्य गोष्ट शक्य केली.

" अप्रतीकाराचें तत्त्व जन्माला येऊन दीर्घकाल लोटून गेला आहे. पण प्रत्यक्ष सृष्टींत मोठ्या प्रमाणावर त्याची उपयुक्तता सिद्ध होण्याच्या कामांत दोन मोठ्या अडचणी आडव्यांत आल्या. ह्या तत्त्वाचा अंगीकार ज्यांनीं प्रथम केला त्यांनीं त्याचा प्रत्यक्ष आचार स्वतःपुरताच केला, ही पहिली अडचण होय. या तत्त्वाचा पुरस्कार करणारे कांहीं पंथहि निघाले ही गोष्ट खरी. परंतु त्यांच्या कार्याचा बरीचहि व्यक्तिपुरताच होता. " * * *

म. गांधींनी ५० हजारांहून जास्त लोकसंख्येच्या एका सबंध समाजाला, शुद्ध राजकारणांत, जगव्यापक तत्वाच्या लढ्यांत, अप्रतीकाराऐवजीं पाशवी बळावरच सर्वस्वी भिस्त ठेवणाऱ्या द. आफ्रिकन वसाहतवाल्यांशीं चालविलेल्या झगड्यांत ह्या तत्वाची अंमलबजावणी केली. आणि म्हणूनच टॉलस्टॉयसारख्या म. गांधींस गुरुस्थानीं असलेल्या, सर्व जगावर अप्रतीकार व अहिंसा तत्वाचा निर्विकल्प पुरस्कार करणाऱ्या, सर्व जगानें साधु! साधु! म्हणून नावाजलेल्या तत्वज्ञान्यानें गांधींच्या द. आफ्रिकेंतील कार्याविषयीं आपली चळवळ ही जगांत चालू असलेल्या चळवळींतील अत्यंत रहस्यगर्भ आणि महत्वाची आहे असे प्रथमनिर्दिष्ट प्रशंसापर उद्गार काढले.

वसति थोडी आणि स्वदेशापासून फारच दूर व कालांतरानें समूळ उच्छेद होण्याची भीति ह्या कारणांमुळें द. आफ्रिकेंत गांधींना हा नवीन प्रयोग करून पाहणें सोपें गेलें हें खरें. परतु कोठेंहि गेलें व कांहींहि झालें तरी एकंदरींत मानवी स्वभाव कांहीं बदलत नाहीं हें तत्व अगदीं खरें आहे. आणि म्हणूनच मानवी स्वभावांचा प्रत्यक्ष अनुभव ह्या दृष्टीनें ह्या प्रयोगाची किंमत फारशी कमी होऊं शकत नाहीं.

द. आफ्रिकेंतील लढ्यांत पुष्कळच मोठ्या प्रमाणावर प्रयोग करून गांधींनीं असे सिद्ध केलें कीं, (१) व्यक्ति तितक्या प्रकृति अशा रीतीनें बनलेल्या एखाद्या संबंध समाजालासुद्धां अप्रतीकारी आत्मक्लेशाचें तत्व अमलांत आणतां येतें. हें तत्व सर्वसामान्य लोकांच्याहि आटोक्यांतले आहे. (२) राजकारणासारख्या खटपाळ, कपटनीतिप्रचुर झगड्यांतसुद्धां ह्या तत्वाचा उपयोग होऊं शकतो. आजपर्यंत कोणीहि सिद्ध न केलेल्या गोष्टी सिद्ध केल्यामुळेंच गांधींची द. आफ्रिकेंतील कामगिरी नवयुग प्रवर्तक झाली आहे.

ह्या मुख्य कामगिरीच्या अनुषंगानें गांधींनीं ह्या झगड्यांत कित्येक दुय्यम तत्वें अमलांत आणलीं किंवा जनतेस पटविलीं:-(१) हिंदुमुसलमानांचें ऐक्य हें राष्ट्रोद्धाराला अगदीं आवश्यक आहेच. (२) कोणत्याहि सामुदायिक कार्यांत स्त्रियांनीं यथाप्रमाण भाग घेतल्यावांचून तें कार्य यथासांग, यशस्वी आणि विशुद्ध होऊं शकत नाहीं. (३) दुबळेपणा आणि भित्रेपणा यांना सत्याग्रहांत थारा नाहीं.

## प्रकरण ८ वें.

# गांधींचें चारित्र्यसंघटन

### जन्मसिद्ध कीं प्रयत्नसिद्ध ?



म. गांधींचें द. आफ्रिकेंतील सार्वजनिक कार्य नवयुगप्रवर्तक होतें तरी पण त्यांच्या या सार्वजनिक कार्यापेक्षां कर्तृत्वापेक्षां त्यांची आत्मोन्नति ही विशेष श्रेष्ठ, व्यापक आणि सर्वांगपूर्ण होती.

म. गांधींची सत्याग्रहाची कल्पना हिंदुस्थानांत आल्यावर पुष्कळच वाढली सुधारली व पसरली. परंतु व्यक्तिशः महात्मा गांधींचें तत्वज्ञान, म. गांधींची मतें, म. गांधींची नैतिक व आध्यात्मिक प्रगति ही द. आफ्रिकेंतच जवळ जवळ परिपूर्ण झालेली होती. म. गांधींचा चारित्र्य-विकास द. आफ्रिकेंतच परिपूर्ण झाल्या सारखा होता.

गांधींचें हें असें अद्वितीय चारित्र्य त्यांच्या द. आफ्रिकेंतील खासगी आयुष्यांतच विकसित होत गेलें आहे. ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, गांधींचें हें अद्वितीय चारित्र्य स्वयंसिद्ध, जन्मसिद्ध, नव्हतें व नाही. पूर्वसंस्कारांवांचून हा चारित्र्यविकास शक्य नाहीं हें तर निर्विवादच आहे. परंतु गांधींच्या चरित्रांत हा चारित्र्यविकास मुख्यतः तीव्र तपश्चर्येनें, क्रमविकासानें आणि पद्धतशीर रीतीनेंच झालेला आहे. ते रामकृष्णपरमहंसांप्रमाणें जन्मःतच सिद्ध पुरुष नव्हते. किंवा तुळशीदास अथवा टॉल्स्टॉय यांच्यासारखे एकाएकी उपरति होऊन एकदम सिद्ध कोटीला चढलेले नाहींत. एकाद्या सर्वसाधारण सधन मनुष्याच्या मुलाप्रमाणें ते एक तरुण बॅरिस्टर होते.

### आचारप्रधान तत्वज्ञान.

*आचारावांचून, गांधींच्या विचारसरणीत विचारांना स्वतंत्र अस्तित्व नाहीं.* आचारः प्रथमो धर्मः । आणि आचारप्रभवो धर्मः । अशा धर्माच्या व्याख्या करण्यांत आलेल्या आहेत. धर्म हा आचारप्रधान आणि आचार प्रवर्तक असला

पाहिजे. तरच तो धारणात् धर्म इति या व्याख्येप्रमाणें समाजधारणा करण्यास समर्थ होईल.

म. गांधीचें तत्वज्ञान अष्टपैलू आहे:—( १ ) सत्य ( २ ) अहिंसा ( ३ ) ब्रह्मचर्य ( ४ ) अस्वाद ( ५ ) अस्तेय ( ६ ) अपरिग्रह ( ७ ) निर्भयता आणि ( ८ ) अकृत्रिमता.

ह्यांतील पहिल्या सात मुद्यांत गांधींचा वैयक्तिक धर्म सांठविलेला आहे. आणि आठव्यांत आधुनिक संस्कृतीच्या दृष्टीनें गांधींच्या एकंदर जीवनकार्याचें रहस्य सांठविलेलें आहे.

गांधींच्या या अष्टपैलू तत्वज्ञानाची व तदनुषंगानें त्यांच्या व्यक्तित्वाची वाढ. द. आफ्रिकेंतील मुक्कामांत कशी होत गेली तें येथें पहावयाचें आहे.

## एक मोठाच गैरसमज.

म. गांधींच्या जीवनकार्याविषयीं एक फारच मोठा गैरसमज बऱ्याच मोठ्या प्रमाणांत दृढ होऊन बसलेला आहे. तो हा कीं, म. गांधीचें जीवनध्येय व जीवनकार्य अहिंसा हें आहे.

वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे. म. गांधींचें जीवनध्येय व जीवनकार्य अहिंसा हें नसून सत्य हें आहे.

उत्कट सत्यनिष्ठा आचरणांत व जगांत मान्य व दृढ व्हावयाला अहिंसेवांचून दुसरा परिणामकारक मार्गच नाहीं; सत्य हें सर्वांच्याच हृदयाला व बुद्धीला सारखेंच व सर्वांगपूर्ण रीतीनें गम्य होणें शक्य नाहीं आणि म्हणूनच सत्याच्या नांवावर जगांत अत्याचार व अनाचार वाढून कष्ट व क्लेश वाढूं नयेत म्हणूनच, केवळ सत्यासाठीं म्हणून अत्याचाराऐवजीं अहिंसेचा मार्ग स्वीकारावयाचा; प्रतिपक्षावर अत्याचारानें सत्य लादण्याऐवजीं आत्मक्लेशांनीं लादावयाचें. म्हणजे आपली सत्याची कल्पना चुकली तर त्याचें प्रायश्चित्त आपणालाच आणि बरोबर असली तर तिचें श्रेय केव्हांहि आहेच.

हा मुद्दा प्रथमच व विशेष जोर देऊन सांगण्याचें कारण हेंच कीं, गांधींचे एकंदर आचार, विचार व कार्य प्रारंभापासून या एकाच सूत्रांत गोवली गेलेली आहेत. या सुवर्णसूत्रांतच गांधींच्या अष्टपैलू तत्वांचा हार गुंफला गेलेला आहे.

## गांधींची गुरुपरंपरा.

जन्मतःच कांहीं विशिष्ट गुण-ध्येय व तत्वसंपन्न दत्तात्रेयानीं कुत्र्यामांजरासुद्धां एकंदर २१ गुरु केले अशी आख्यायिका आहे. म. गांधींनीं सुद्धां असेंच आपल्या मातेपासून गोखल्यांपर्यंत अनेक गुरु केले आहेत. अनेकांच्या तत्वांचें आणि चारित्र्याचें निरीक्षण करून त्यांतील ग्राह्यांशाचें ग्रहण केलें आहे.

सत्यप्रीति हा गुण गांधींच्या चारित्र्यांत जन्मसिद्धच आढळतो. अमुक एक ग्रंथांतून किंवा अमुक एक थोर विभूतीच्या चारित्र्यावरून आपणांस सत्याचें महत्व कळलें, असें त्यांनीं कोठेंहि म्हटलेलें नाहीं. उलट अगदीं बाळपणापासूनच मोहाचे व मतवैचित्र्याचे तडाख खात खात त्यांची सत्यनिष्ठा अधिकाधिक उज्वल व तीव्र होत होती. हें त्यांचे पूर्व संस्कारानें व पूर्व संचितानें कमावलेलें व भावी अवतारकार्याचें मूळ भांडवल होतें यांत शंकाच नाहीं.

या मूळ भांडवलांत त्यांनीं पुढें जैनमहात्मा कवि रामचंद्र, भगवद्गीता, बायबल, ख्रिस्त, टॉयस्टॉल, रस्किन, थोरो, रुसो, मॅझिनी, कार्लाइल, इमर्सन, वगैरे तत्वज्ञान्यांपासून मिळविलेल्या विचार रत्नांची भर घातली.

म. गांधी हे एक स्वयंसिद्ध व स्वयस्वतंत्र तत्वज्ञानी आहेत. ते अमुक एक तत्त्वज्ञानाची किंवा तत्वज्ञान्याची परंपरा चालविणारे प्रचारक नाहींत. परंपरा निर्माण करणारे तत्वद्रष्टे आहेत. त्यांच्या ह्या चारित्र्याची व तत्वज्ञानाची जोपासना तत्वज्ञ व धर्मप्रवर्तक यांच्या कांहीं विशिष्ट ग्रंथांच्या अध्ययनानें व चरित्रमननानें झालेली आहे.

## हिंदु धर्माचा प्रभाव.

" जेव्हां मीं आतां मरणार असें मला वाटूं लागलें, तेव्हां मीं गीतेचाच आश्रय केला. " असें गांधीचें भगवद्गीतेवर प्रेम आहे. गांधींनीं प्रथम जर कोणत्या धर्म ग्रंथाचें अध्ययन केलें असेल तर तें भगवद्गीतेचेंच.

मी स्वतः सनातन हिंदू आहें असे म. गांधी अभिमानानें म्हणतात. आणि त्याची सविस्तर कारणेंहि दिलीं आहेत. ( यं. इं. ६-१०-२१ )

( १ ) वेद, उपनिषदें, शास्त्रें पुराणें वगैरेंवर आणि म्हणूनच अवतार व पुनर्जन्म यांच्यावर माझा भरवसा आहे.

( २ ) वर्णाश्रम धर्माची शुद्ध वैदिक कल्पना मला मान्य आहे; सध्यांची रूढ व अशुद्ध कल्पना मात्र मला मान्य नाहीं.

(३) गो-रक्षण ही कल्पना सर्वांहून व्यापक अर्थानें मला मान्य आहे.
(४) मूर्तिपूजेच्या मी विरुद्ध नाहीं.

मी हिंदू कां ? ह्याचीं म. गांधीनीं वरीलप्रमाणें कारणें दिलीं असून "अहिंसा, सत्य व ब्रह्मचर्य हीं अंगीं बाणल्याचांचून कोणालाहि शास्त्रांचें यथार्थज्ञान होणार नाहीं असा माझा दृढ विश्वास आहे."

म. गांधी हे कर्मवीर असल्यामुळें कोणत्याहि धर्मांतील विचारतत्वांची खोली, गांभीर्य, सौंदर्य, वगैरेंची त्यांना स्वयंसिद्ध व स्वतंत्र अशी किंमत वाटत नाहीं. त्यांतील आचारमार्गावरूनच ते मुख्यतः धर्माची कसोटी ठरवितात. आणि ह्या दृष्टीनेंच हिंदुधर्मांतील अहिंसा, सत्य व ब्रम्हचर्य हीं तत्वें त्यांना मानवलीं. त्यांच्या एकंदर तत्वज्ञानाचें हें सार आहे, आणि म्हणूनच ते खरे हिंदु आहेत. परंतु हिंदु धर्म हा हजारों वर्षांचा, हजारों परंपरांनीं युक्त, हजारों मतमतांतरांस आपल्या पोटीं थारा देणारा आहे.

हिंदुधर्मांत सर्व कांहीं आहे. परंतु 'सर्व कांहीं आहे' हा त्याचा जसा एक अत्यंत मोठा गुण आहे तसाच तो दोषहि आहे. चिकित्सक व तटस्थ परंतु पाहणारास त्यांत जिकडे तिकडे गुडघाभर पाणी दिसून येतें. विशिष्ट श्रेष्ठ तत्वांवर निर्भेळ जोर दिलेला आढळून येणें कठिण पडतें. आणि ह्या दृष्टीनेंच म. गांधी हे इतके मोठे आहेत कीं, केवळ हिंदुधर्म त्यांना अपुरा पडतो.

सत्य, अहिंसा व ब्रह्मचर्य ह्या गुणांवरील गांधींचा जोर लक्षांत घेतला म्हणजे पतंजलीच्या राजयोगाची आठवण होते. राजयोगांतील यम व नियम ह्यांत गांधींच्या आचारसूत्रांचें सुसंगत संकलन व समर्थन सांपडतें. राजयोगाच्या अभ्यासांत मात्र गांधी कधींच गुंतले नव्हते.

## जैन धर्माचा प्रभाव.

म. गांधी जैन आहेत असा म. गांधी हिंदुस्थानांत येऊन राहिल्यावर सुद्धां पुष्कळच लोकांचा समज होता. म. गांधींचे वडील वैष्णव असले तरी माता जैन धर्मीय होती असा अद्यापहि कित्येकांचा समज आहे, परंतु हे समज अर्थातच चुकीचे आहेत.

गुजराथ ही वैष्णव धर्म व जैन धर्म ह्यांची संयोगभूमि आहे. दोन्ही धर्मांचें गुजराथेंत येमालूम समीकरण झालेलें आहे. आणि यामुळेंच गुजराथी मनावर जैनधर्माचे कांहीं संस्कार परंपरागत व स्वाभाविकपणेंच झालेले

असतात. गांधींच्या आचारधर्मात व विचारधर्मात हिंदुधर्मातील राजयोगांतर्गत तत्वांचा स्पष्ट ठसा दिसतो म्हणून वर सांगितलेंच आहे. परंतु हा ठसा गांधींच्या मनावर *राजयोगाच्या अभ्यासानें उमटलेला नसून जैन धर्माच्या, सहवासानें व* मननानें उमटलेला आहे.

जैन धर्म हा अहिंसाप्रधान व आचारप्रधान धर्म आहे. जैन धर्मातील आगम हे राजयोगांतील *यम नियमांप्रमाणेंच* वाचावयाचे नसून तीव्र तपश्चर्येनें आचरावयाचे आहेत.

तपश्चर्या ! तपश्चर्या हें गांधींच्या जीवनांतील तत्व जैन धर्मातील प्रमुख तत्व आहे. जैन धर्मांत सम्यक्ज्ञान व सम्यक् दर्शन हीं पुरेशीं नसून सम्यक् चारित्र्यहि आवश्यक गणलें जातें. सर्व कांहीं गुण तीव्र व वाढत्या तपश्चर्येनें प्रत्यक्ष आचरणांत आणावे लागतात आणि ते अपवादरहित व तर्कशुद्ध शेवटापर्यंत अमलांत आणावे लागतात.

म्हणूनच गांधींना हिंदुधर्मातील सूत्रांचें जैन धर्मात सम्यक् स्वरूप आढळलें आणि तेवढ्यापुरता त्यांजवर जैन धर्माचा पगडा बसला.

## बुद्ध व बौद्ध धर्म.

भगवान् बुद्ध व खास बुद्धप्रणीत बौद्ध धर्म यांतील विचारसरणी व आचारसरणी आणि म. गांधींची विचारसरणी व आचारसरणी यांत विलक्षण साम्य आहे.

( १ ) "बुद्धाचा धर्म हा विशेषत: मानवी आहे दैव नाहीं." "जें बुद्धीला अगम्य त्याविषयीं निष्कारण तर्क करीत बसल्यानें पुढें मार्ग ते तर्कच सत्याची जागा हटानें पटकावतात व मनुष्याला धर्मांध करतात. तेव्हां आपल्या धर्माचा आरंभ ईश्वरापासून न करतां प्रत्यक्ष असलेल्या दुःखापासूनच बुद्धानें केला, ही गोष्ट त्याच्या बुद्धिवैभवाची, सरळपणाची आणि अलौकिक धैर्याची साक्ष देते."

म. गांधींची वृत्ति ईश्वरनिरपेक्ष नाहीं आणि त्यांची विचारसरणीहि दुःखापासूनच सुरू होते असें नाहीं. तथापि म. गांधींची व्यावहारिक वृत्ति इतकी *तीव्र आहे कीं, जवळ जवळ भगवान् बुद्धा इतकेच ते त्या तर्कप्रधान* तत्वज्ञानापासून अलिप्त आहेत.

( २ ) "बौद्धधर्म हा बुद्धिविशिष्ट आहे; श्रद्धाविशिष्ट नाहीं. बौद्ध होण्याला बुद्धावर श्रद्धा असली पाहिजे असा सुद्धां नियम नाहीं. भगवान् बुद्धाचा उपदेश

व मतें मला मान्य आहेत किंवा त्यांचा मला अनुभव घ्यावयाचा आहे, ऐवढें कारण बुद्ध धर्माचा स्वीकार करण्यास बस्स होतें."

(३) परंतु "ज्ञानजन्य जी श्रद्धा ती बौद्ध धर्मास पूर्णपणें मान्य आहे. जे कांही श्रद्धाविशिष्ट धर्म आहेत, त्याचप्रमाणें ईश्वरप्रणीत मानलेल्या ग्रंथांवर ज्या धर्मांची रचना झालेली आहे, त्या धर्मांचीं मतें झूट म्हणून त्यांचा तिरस्कार करावा असेंहि बौद्ध धर्म शिकवीत नाही. तीं मतें खरीं असोत, खोटीं असोत, त्यांचा कर्मफलानुबधित्वाशीं संबंध येत नाहीं तोंपर्यंत त्यांच्याशीं विरोधहि करूं नये आणि त्यावर अंधश्रद्धाहि ठेवूं नये येवढेंच बौद्धधर्माचें सांगणें आहे."

(४) "बौद्धधर्मात धर्ममताचा दुराग्रह (ज्याला इंग्रजींत Dogma म्हणतात तो) बिलकुल नाहीं. जें तर्क दृष्ट्या आक्षेपार्ह, युक्तीच्या दृष्टीनें त्याज्य, अनुभवाला विरुद्ध, अनुदारपणाचे किंवा रहस्याच्या स्वरूपाचें दिसेल तें बुद्धानें उपदेशिलेल्या मूळच्या बौद्धधर्मात सहसा आढळावयाचें नाहीं."

(५) "बौद्धधर्म हा व्यक्तिस्वातंत्र्याचा मोठा अभिमानी आहे * * * अंतःकरणांत परिवर्तन घडल्यावांचून नुसत्या बाह्य आचरणाला महत्व देणें ही मोठी चूक आहे, ही गोष्ट बौद्धधर्मात प्रधान आहे. चित्तशुद्धि ही मुख्य असल्यामुळें ती ज्याची झाली असेल त्याला बौद्धधर्माचा मार्ग नुसता दाखविणें येवढें काम पाहिजे तर दुसऱ्यानें करावें त्या मार्गानें जाणें न जाणें हा अर्थात् ज्याचा त्याचा विचार आहे."

अहिंसा हें बौध धर्माचें आणखी एक लक्षण आहे, "तत्वाप्रमाणें कर्म, हाच त्याच्या धर्माचा अर्थ होता. ज्ञानतरूला कर्मरूपी फळ लागलें, तरच त्या तरूची किंमत; नाहींतर तें झाड पठल्यासारखेंच तो मानीत असे. म्हणून अहिंसा तत्व त्यानें आपल्या चरित्रांत व्यवहाराच्या सर्व अंगाला लावून दाखविलें."

## बौद्धांचा आचारमार्ग.

खास बुद्धाच्या बौद्धधर्माचीं हीं विशेष लक्षणें पाहिलीं आणि म. गांधींचीं त्यांच्या विचारपरंपरेतून आचारपरंपरेंत पूर्ण परिवर्तन पावणारीं तत्वें पाहिलीं म्हणजे त्यांत विलक्षणच साम्य दिसून येतें. परंतु हें साम्य केवळ विचारपरंपरेंतच नसून साधनपरंपरेंतसुद्धां इतकेंच विलक्षण साम्य दिसून येतें.

बौद्धधर्मातील प्रापंचिकांनीं आचरावयाचीं पंचशीलें आणि शिवाय नियमित काळपर्यंत पाळावयाचें उपोसथव्रत ह्यांतील तीन शीलें आणि एकंदर दशशीलें

आणि म. गांधींनीं आपल्या सत्याग्रहाश्रमांतील विद्यार्थ्यांना घालून दिलेलीं व्रतें हीं सर्वस्वी एक आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. उलट म. गांधींनीं तीं अधिक व्यापक बनविलीं आहेत. स्वदेशीव्रत हें त्यांनीं आधुनिक परिस्थितीला अनुसरून अधिक दाखल केलें आहे व निर्भयताव्रत हें बौद्ध शीलांहून अगदीं नवें व ज़ास्त आहे.

भेद भावना दिलसे छोड । निर्भय बैठे मूछ मरोड ॥

मनांतील द्वैतभावना सोडून द्या आणि मिशांना पीळ देत निर्भयपणें मान ताठ करून जगाकडे पहा; माभैः । हा उपनिषद् धर्म आहे.

जैन धर्माप्रमाणेंच बुद्ध धर्मांतहि ध्येयसिद्धि व आत्मोन्नति यासाठीं मार्ग आंखून दिले आहेत. परंतु बौद्धमार्ग हे जैनधर्मासारखे किंवा जैनधर्माइतके देहदंडाचे नाहींत. ते मध्यम मार्ग आहेत.

पतंजलीचा राजयोग, हठयोग, किंवा जैनांचा सम्यक् आचार हे सर्व वैयक्तिक आणि अंतर्मुख आहेत बुद्धाचे मार्ग केवळ वैयक्तिक किंवा केवळ अंतर्मुख नसून बहिर्मुख आणि मानवी आहेत. तरी पण त्यांची उभारणी सर्वस्वी एकाच पायावर झालेली आहे.

**१ ते प्रति प्रसव हेयाः सूक्ष्माः योगसूत्रे २-१०**

**२ सेतुंस्तर दुस्तरान् ।** अक्रोधेन क्रोधं सत्येनानृतम्॥ उपनिषद्

**३ नहि वेरेन वेराणि सम्मन्तीध कुदाचनं । अवेरेणच समन्ति एस धम्मो सनन्तनो—** धम्मपद

( १ ) विशिष्ट मनःस्तरंग जिंकावयाला तद्विरुद्ध मनःस्तरंग उत्पन्न करावेत-( २ ) क्रोध अक्रोधानें आणि असत्य सत्यानें, असा हा दुस्तर सेतु तरून जाण्याचा मार्ग आहे ( ३ ) वैरानें वैर शमत नाहीं. शत्रुत्वाच्या अभावींच वैर नाश पावतें हें उपनिषद्, योगसूत्रें आणि बौद्ध नीतिसूत्रें ह्यांतील मूलाधारतत्व सर्वस्वी एक आहे. फरक आहे तो इतकाच कीं, बुद्धानें वैयक्तिक व अंतर्मुख तत्व सामुदायिक आणि बहिर्मुख बनविलें आहे.

## गांधी, बुद्ध व बौद्ध धर्म ह्यांचा परस्परसंबंध.

आचारपरंपरा व विचारपरंपरा ह्या दृष्टीनें गांधींच्या आचारविचारपरंपरेचें साम्य बुद्धाच्या आचारविचारपरंपरेशीं इतकें दुसऱ्या कोणत्याहि आचारविचारपरंपरेशीं नाहीं. आणि असें असूनहि म. गांधीचा बुद्ध किंवा बौद्ध धर्म यांच्याशी

प्रेमसंबंध मुळींच दिसूं नये कां ? आणि म. गांधीनीं मी सनातनी हिंदू आहे असेंच कां म्हणावें ? श्री. वासुदेव गोविंद आपटे यांनी आपल्या बौद्धपर्व ह्या सर्वांगसुंदर पुस्तकांत दाखवून दिल्याप्रमाणें "उपनिषद्धर्माचीं तत्त्वें व तत्कालीन आचार यांच्यांतील खिंड भरून काढणें हें आपलें जीवितकर्तव्य बुद्धानें ठरविलें होतें." बुद्धाचा धर्म हा हिंदू-ब्राम्हण-उपनिषद्धर्माहून फारसा निराळा नाहीं. उलट बुद्धानें आचारविचारांत एकतानता आणली असली तरी उपनिषदांतील विचारांस बराच संक्षेप दिला आहे. ह्यामुळें हिंदुधर्म हा बुद्धाच्या धर्मापेक्षां व्यापक ठरतो.

( १ ) खुद्द गौतम बुद्धाइतके गांधी हे ईश्वराविषयीं उपेक्षाबुद्धि ठेवणारे नाहींत. ' अव्यक्तानि ' म्हणून ईश्वराचा विचारच करणें सोडून द्या असे गांधी म्हणत नाहींत ( २ ) बुद्धाचीं चार आर्यसत्त्यें हीं " सर्वं दुखं दुख " ह्या कल्पनेवर उभारलेली आहेत. म. गांधींना दुःख व दुःखाचें रहस्य, दुःखाचें कारण, दुःखाचें निराकरण आणि त्या निराकरणाचा मार्ग-अष्टांगिक मार्ग हीं चार आर्यसत्यें मान्य नसतील असें नाहीं परंतु त्यापेक्षां त्यांना उपनिषद् प्रणीत उद्बोधक धर्म अधिक पसंत पडत असावा असें दिसतें. ( ३) गांधींच्या विचारसरणींत " नायमात्मा बलहीनेन लभ्यः " ह्या उपनिषद्विचारसरणीचा निर्भयतेचा परिणाम विशेष दिसून येतो. ( ४ ) बुद्धानीं आचार ( कर्मठ ) धर्माचें प्रस्थ हाणून पाडण्याकरितां आचारशुद्धीपेक्षां विचारशुद्धीला फार महत्व दिलें आहे.

मांसाशनानें पाप लागतें असें एक शुद्ध शाकाहारी ब्राम्हण बुद्धाजवळ म्हणाला. बुद्धानीं तत्काळ उत्तर दिलें, " पाप हें मांसाहारानें लागत नसून मनांत दुष्ट विचार आल्यानें व हिंसा, हत्या, चोरी वगैरे दुष्टपणाचीं कृत्यें केल्यानें लागतें."

हात न धुतांच एक शिष्य जेवल्यामुळें उद्भवलेल्या प्रश्नालाहि ख्रिस्तानें उत्तर दिलें होतें कीं, " मनुष्याच्या पोटांत काय जातें त्या योगानें मनुष्य बिघडत नाहीं; तर मनुष्यांतून बाहेर काय पडतें त्यानें, दुष्ट विचारादिकांनीं मनुष्य बिघडतो."

गांधींना आचार विचार, साध्य व साधन यांतील हा तारतम्यभाव पसंत नाहीं जैनधर्मांत हा तारतम्यभाव दिसत नाहीं. आणि म्हणूनच म. गांधी हे बौद्ध धर्मावर कधींहि भाळून गेलेले दिसत नाहींत. उलट बुद्ध धर्मांतील

मुख्य गोष्ट जी " अक्रोधेन जिनं क्रोधम् " ती आणि हिंदुधर्मातील जशास तसें या दोन्ही धर्मांत त्यांना मुळींच विरोध दिसत नाही.

लोकमान्य व म. गांधी ह्यांच्यामध्यें झालेली प्रश्नोत्तरें २८-१-२० च्या यंगइंडियामध्यें प्रसिद्ध झाली होती. त्यांत लोकमान्य म्हणतात, "अक्रोधेन जिनं क्रोधम्" ह्या बुद्धाच्या नीतिसूत्रापेक्षां "ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्" हें श्रीकृष्णाचें नीतिसूत्रच जास्त पसंत पडतें. प्रतियोगी सहकारिता ह्या माझ्या कल्पनेंतील एकंदर भेद आणि अर्थहि ह्यावरून स्पष्ट होतो."

यावर उत्तर देतांना म. गांधी म्हणतात, "लोकमान्यांनीं उद्धृत केलेल्या दोन्ही सूत्रांत मला तर विरोध दिसत नाहीं. बौद्ध सूत्रांत सनातन तत्व सांगण्यांत आलें आहे. माझ्या मतें भगवद्गीतेंतील उताऱ्यांत द्वेषाला प्रेमानें, असत्याला सत्यानें जिंकण्यासाठीं ह्या तत्वाचा उपयोग कसा करतां येईल व कसा केलाच पाहिजे, तें सांगितलें आहे. आपण दुसऱ्यांशीं वागतांना जसें वागूं तसेंच जर ईश्वर आपणास जशास तसें शासन करणार असेल तर आपण ही योग्य शिक्षा चुकविण्याकरितां रागाची प्रतिक्रिया रागानें न करतां रागालाहि शांति हीच प्रतिक्रिया केली पाहिजे हें उघड आहे. म. गांधींची ही विचारसरणी बिनतोड आहे. ईश्वरसुद्धां जर दंगाला दंडका देतो तर या जगांतील हें दंभ-दंडूक्याचें द्वंद्व टाळावयाचा कोणी तरी एकानें आपली वृत्ति बदललीच पाहिजे हें उघड आहे.

अशा रीतीनें मुख्य मुद्द्यावरील हिंदु व बौद्ध मतांतील विरोधाचें निरसन झाल्यावर स्वतंत्र असें बुद्धमत उरतच नाहीं.

आमची अशी कल्पना आहे कीं, रे. डोम्म् यांच्याप्रमाणेंच जर निर्विकार, उदार आणि व्यापक दृष्टीचे बौद्धाचार्य गांधींच्या तत्वज्ञानाचें, आचाराचें व विचाराचें अध्ययन करतील तर त्यांसहि त्यांना बुद्धाच्या धर्माचें गांधी हे पुनरुज्जीवन करीत आहेत असें आढळून आल्यावांचून राहणार नाहीं. आणि बौद्धधर्मीय राष्ट्रें व हिंदुस्थान यांची दिलजमाई घडण्यास नवें साधन निर्माण झाल्यावांचून राहणार नाहीं.

## जैनगुरु कवि राजचंद्र.

म. गांधींवर जैनधर्माचे पूर्वसंस्कार व बालपणांत कांहीं संस्कार झाले असतील ते निराळे. परंतु धर्माच्या अभ्यासाकडे गांधींचें लक्ष वळल्यानंतर प्रथम

गीता व नंतर बायबल ह्यांकडे त्यांचें चित्त वेधलें; आणि पुढें पुढें तर आपण खिस्ती कां होऊं नये ? असा प्रश्न त्यांच्या मनांत घोळावूं लागला.

अशा वेळीं राजचंद्र रवजीभाई मेथा ह्यांच्याशीं गांधींचा परिचय झाला. हे गृहस्थ जातीनें बनिया, धंद्यानें जव्हेरी आणि धर्मानें जैन होते. राजचंद्र अगदींच अल्पशिक्षित होते. परंतु ते प्रतिभावान् कवि, आचारशील जैन, आत्मज्ञानी आणि तत्वज्ञानी होते. दिव्य व सर्वव्यापक दृष्टि आणि खोल अध्यात्मभावना ह्यांच्या बळावर प्रचण्ड धार्मिक पुनरुज्जीवन घडवून आणण्याचा प्रयत्न करण्याइतकी त्यांची योग्यता थोर होती. कर्म आणि चातुर्वर्ण्य व प्राचीन आर्य संस्कृतीचा उत्कट अभिमान परंतु वर्तमान काळाची उपेक्षा न करण्याची प्रवृत्ति ह्या गोष्टींचा गांधींच्या मनावर प्रभाव पडण्यास तेच पुष्कळ अंशीं कारणीभूत झाले. त्यांनीच खिस्तीधर्मापेक्षांहि आर्यधर्माची श्रेष्ठता गांधींना पटवून दिली. सत्य व अहिंसा ह्यांचा व्यापारधंद्यांत सुद्धां पूर्ण अवलंब कसा करावा ह्याचें राजचंद्र हे मूर्तिमंत उदाहरण होते. दोन वर्षे प्रत्यक्ष सहवास व पुढें कांहीं वर्षे पत्रव्यवहार ह्यांच्या बळावर राजचंद्रांकडून गांधींस स्फूर्ति मिळत होती व आध्यात्मिक ज्ञानलालसा तृप्त केली जात होती.

ह्या जैनधर्माध्ययनाच्या व जैनधर्माचरणाच्या परिचयाबरोबरच किंबहुना जरा आधींच गांधींचा खिस्तीधर्माशीं परिचय झाला होता.

## खिस्ती धर्म व येशू खिस्त.

जैन धर्म त्याप्रमाणें अहिंसाप्रधान व गांधींस मानवणारा असला तरी जैन धर्मातील अहिंसा ही मुख्यतः अंतर्मुख आहे. ती अहिंसा आचरणांत कशी आणावी, ती अहिंसेनें आत्मोद्धार कसा करून घ्यावा तें जैनधर्म उत्तम रीतीनें सांगतो. परंतु तेवढ्यावर म. गांधींचें समाधान होण्यासारखें नव्हतें.

खिस्ताच्या चारित्रांत आणि बायबलांत ही अहिंसा बहिर्मुख झालेली आहे. ' पर्वतावरील प्रवचन ' हा बायबलांतील भाग तर गांधींना अगदीं तन्मय करून टाकतो.

" जे आतां रडतात तेच खरे दैववान्, कारण त्यांचें समाधान करण्यांत येईल. "

" जे दरिद्री आहेत तेच खरे दैववान्, कारण त्यांनाच स्वर्गाचें राज्य प्राप्त होईल. "

" माझ्यासाठीं ज्यांना जगाची निंदा सहन करावी लागेल ते धन्य होत. कारण स्वर्गांत त्यांना तसेंच मोठें पारितोषिक मिळणार आहे. "

* * *

" आपल्या शत्रूंवर दया करा; जे तुम्हांला शिव्याशाप देतील त्यांना आशिर्वाद द्या. "

" प्रथम स्वर्गाच्या राज्याचा शोध करा. "

हिंदुधर्मानें दाखवून दिलेल्या, जैन धर्मानें परिपोष केलेल्या गांधींच्या अहिंसा व्रताला बायबलांतील ह्या अमृतसिंचनानें नूतन पालवी फुटली.

परंतु लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, गांधी हे कांहीं ख्रिस्त्यांच्या बायबलाचे खरे भक्त नाहींत. गांधी हे बायबलांतील ख्रिस्ताचे चहाते आहेत.

## मीं ख्रिस्ती होऊं का ?

" मला येथें कांहीं चांगले ख्रिस्ती मित्र लाभले आहेत. ते सर्व फार दयाळू लोक आहेत. आपलें सर्व आयुष्य ते धर्मकार्यांत घालवितात. मीहि त्यांच्याप्रमाणें व्हावें अशी त्यांची इच्छा आहे. * * * मी आपल्या शंका आणि कोडीं आपल्यापुढें ठेवीत आहें. जर आपली स्मृति माझ्या हृदयांत सजीव आणि जागृत नसती तर मला ह्यांतील आकर्षक गोष्टींचा मोह टाळतांच आला नसता. इतके त्यांतील कांहीं पुरावे निश्चित आहेत. परंतु आपणांकडून उत्तरें मिळाल्याशिवाय कोणतीहि गोष्ट घाईघाईनें करावयाची नाहीं असे ठरविलें असल्यामुळें आणि आपण माझ्या शंकांचें समाधान करू शकाल अशी खात्री असल्यामुळेंच मी हे मोह आंवरले आहेत. "

कवि राजचंद्र ह्यांस गांधींनीं ( २३-९-१८९३ ) लिहिलेल्या एका पत्रांतील हा उतारा आहे. ह्यावरून गांधींना ख्रिस्ती धर्म जबरदस्त आकर्षक वाटत होता हें उघड दिसतें. ह्या पत्रांत त्यांनी आत्मा, ईश्वर, कर्म, आर्यधर्म, ख्रिस्त व ख्रिस्ती धर्म ह्या संबंधानें २४ प्रश्न विचारले होते. आणि पत्रांत लिहिल्याप्रमाणें राजचंद्रांनीं त्यांचें शंकासमाधान केलेंच असावें असें दिसतें. राजचंद्रांच्या शंकासमाधानानें व स्वतःच्या मननानें गांधींची ख्रिस्ती धर्मावरील आवड नाहींशी झाली खास; तथापि खुद्द ख्रिस्तावरील त्यांची भक्ति मात्र उत्तरोत्तर वाढतच गेली असें दिसतें.

सर्व जगांत श्रेष्ठ वंद्य व नितांत आदरणीय अशी कोणती व्यक्ति गांधींना दिसत असेल तर ती भगवान् ख्रिस्त ही होय.

## भगवान् खिस्त.

हीच विभूति गांधींच्या हृदयावर एकतंत्री साम्राज्य चालविते. कारण— तत्वासाठीं आत्मार्पण करण्याचा मान जगांत आतांपर्यंत फक्त खिस्तालाच मिळूं शकला. अति उदात्त तत्वासाठीं अति मोठा स्वार्थत्याग करून जगाला आदर्शभूत होण्याचें महद्भाग्य खिस्तालाच लाभलें.

खिस्ताचें अहिंसातत्व, प्रेमतत्व नितांत श्रेष्ठ होतें व त्यासाठीं त्याचा त्यागहि नितांत श्रेष्ठ होता. परंतु खिस्ताचें श्रेष्ठत्व येवढ्यांतच नाहीं. खिस्ताचें एकंदर जीवन प्रेममय होतें. खिस्ताचें मानवप्रेम, खिस्ताचें वात्सल्य, आणि खिस्ताचें कारुण्य हीं नितांत शुद्ध, निरपवाद आणि अपरंपार होतीं.

खिस्ताचें तत्व नितांत श्रेष्ठ होतें; खिस्ताचें जीवन नितांत तत्वशुद्ध होतें आणि खिस्ताचें मरण केवळ तत्वासाठींच होतें. आणि म्हणूनच हा प्रेमसम्राट् खिस्त गांधींचा हृदयसम्राट् आहे.

म. गांधींच्या सत्य व अहिंसा धर्माची उत्पत्ति, वाढ व संस्करणें हीं अशीं मुख्यत: तीन धर्मांच्या त्रिविध कल्पनांनीं परिणत स्वरूपाला आलेलीं आहेत.

येथपर्यंतचे संस्कार व येथपर्यंतचा तत्वपरिपोष हा गांधींच्या अवतारकार्याला आधाररंग ( Back Ground ) दाखल आहे. येथपर्यंतच्या ह्या आधार तत्वांवर पुढें अनेक निरनिराळ्या आधुनिक तत्वज्ञान्यांच्या व पंथप्रवर्तकांच्या अनुकूल तत्वांच्या छटा ह्या आधाररंगांत मोठ्या कुशलतेने भरल्या गेल्या आहेत.

म. गांधींच्या चारित्र्यावर व जीवनकार्यावर अशा रीतीनें आपल्या मतांच्या स्पष्ट व छानदार छटा उडविणाऱ्या तत्वज्ञान्यांत रशियन तत्वज्ञ कौंट टॉलस्टॉय हे प्रमुख होते.

## कौंट टॉलस्टॉय.

" टॉलस्टॉय ह्यांच्या जोडीला बसविण्याइतकें उदात्त स्वरूपाचें चरित्र मानव जातीच्या साऱ्या इतिहासांत मिळावयाचें नाहीं. "

टॉलस्टॉल ह्यांच्या ग्रंथाचा परिचय द. आफ्रिकेंतील आपल्या पहिल्या मुक्कामांतच गांधींनीं करून घेतला व त्यांच्या मतांचा व चारित्र्याचा त्यांच्यावर फारच प्रभाव पडला.

सत्य व अहिंसा ह्या गांधींच्या दोन पूर्व निश्चित तत्वांना टॉलस्टॉय ह्यांच्या

तत्वज्ञानानें जोमदार पुष्टि मिळालीच. परंतु शिवाय एकंदर आधुनिक परिस्थितीसंबंधानेंहि त्यांची विशिष्ट मतें बनविण्यास मदत मिळाली.

"हिंद स्वराज्य" ह्या गांधींच्या पुस्तकांतील मूळ मजकूर गांधी द. आफ्रिकेंत 'इंडियन ओपीनियन' पत्रांत लिहित असत; त्यावेळीं त्या पत्रांतून तो प्रसिद्ध झाला आहे. ह्या पुस्तकांत गांधींच्या एकंदर जीवनतत्वाचा व जीवनकार्याचा खुलासा झालेला आहे. आंतापर्यंतच्या अनुभवानेंहि गांधीनीं ह्या पुस्तकांतील आपल्या मतांत कांहीं नवीन फेरफार केलेला नाहीं, भर घातलेली नाहीं किंवा संक्षेप केलेला नाहीं.

ह्या प्रथावर टॉलस्टॉय ह्यांच्या मतांची पूर्ण छाप दिसून येतेः—आधुनिक सुधारणेचा तीव्र तिरस्कार, एकंदर शासनसंस्था ह्या सैतानी आहेत ही कल्पना, साधी राहणी, अनाथांविषयींचें कारुण्य, कृत्रिम शिष्टाचारांचा तिटकारा, चैनीचा तिरस्कार आणि शारीरिक श्रमांचा पुरस्कार, ब्रह्मचर्यावरील भर, यांत्रिक युगावरील रोष, वकीली, कोर्टें, शाळा, डॉक्टरी ह्यांच्यावरील तीव्र आक्षेप, आणि मुख्यतः एकदर सामुदायिक राष्ट्रीय व अंतरराष्ट्रीय व्यवहार केवळ प्रेमतत्वावर सोडविले जावेत ही कल्पना हीं सर्व टॉलस्टॉय ह्यांच्या ग्रंथांत प्रामुख्यानें आढळतात. म. गांधीनांहि तींच तत्वें रुचतात.

टॉलस्टॉय ह्यांचें हें प्रेमतत्व इतकें व्यापक आहे कीं, सरकार ह्या संस्थेची उभारणी मुख्यत: पाशवी बळावर-हिंसेवर व नैतिक हिंसेच्या पायावर असल्यामुळें ही संस्थाच नको; कायदा, न्याय व पोलीस हीं ह्या शासनसंस्थेच्या अत्याचारी अस्तित्वाला पोषक असल्यामुळें तींहि त्याज्यच होत. त्याचप्रमाणें अशा शासनसंस्था सैतानी असल्या तरी त्या उलथून पाडण्यासाठीं खून, रक्तपात करणें हा मार्गहि तितकाच अत्याचारी असल्यामुळें तोहि त्याज्यच होय.

येथपर्यंत म. गांधी व टॉलस्टॉय ह्यांची विचारसरणी अगदीं जुळती आहे. परंतु म. गांधींची विचारसरणी येथेंच थांबत नाहीं. जर सरकार किंवा एखादें विशिष्ट सरकार ही संस्थाच नामशेष होण्यालायक असेल व अत्याचार त्या कामीं अनिष्ट असेल तर मग ही संस्था नामशेष कशी करावी?

टॉलस्टॉय ह्यांच्या चरित्रांत व तत्वज्ञानांत ह्या प्रश्नाला नीटसें उत्तर नाहीं. परंतु गांधींच्या चरित्रांत व तत्वज्ञानांत ह्या प्रश्नाला उत्तर आहे. हें उत्तर मिळविण्याच्या कामीं—

## थोरोचें तत्वज्ञान

म. गांधींना पुष्कळच उपयोगी पडलेलें असावें.

सविनय कायदेभंग अथवा सिव्हिल डिस् ओबीडियन्स ह्या कल्पनेचा जनक व प्रवर्तक थोरो हाच होय.

थोरो हा अंतःप्रेरणेवांचून इतर कोणतेहि कायदे न मानणारा होता. अंतःप्रेरणा, सदसद्विवेकबुद्धि हेंच एक वैय्यक्तिक बंधन व समाजबंधन तो मानी. तत्वतः तो टॉलस्टॉय ह्यांच्या इतकाच अ-राजक होता. परंतु तो हें सदसद्विवेकबुद्धीचें, सत्याचें साम्राज्य क्रमविकासानें प्रस्थापित करण्यास तयार होता. "जें सरकार कमींत कमी शासनसत्ता उपयोगांत आणतें तें सरकार जास्तींत जास्त चांगलें होय." ही थोरोची व्याख्या गांधी व लेनीन ह्यांसहि सारखीच मान्य आहे. परंतु "मला एकदम शासन संस्थेचा अंत व्हावयास नको आहे; पण सुसंस्कृत शासनसंस्था मात्र तात्काळ पाहिजे आहे" असें म्हणून त्यानें हा क्रमविकासवाद मान्य केला आहे.

"तुमचें जीवन हें ( अन्यायाचा ) चालता गाडा बंद पाडण्याकरितां खीळी प्रमाणें उपयोगांत आणा."

"परतंत्र राज्यांत तुरुंग हींच घरें फक्त अशीं आहेत कीं, त्यांतच स्वतंत्र मनुष्य उजळ माथ्यानें वसति करूं शकेल."

"पैसा टाक, नाहीं तर प्राणावर उदार हो" असें जर एखादें सरकार मला म्हणेल तर मी पैशाची थैली त्याच्यापुढें ठेवण्यासाठीं उतावीळ होणार नाहीं. मी कांहीं जुलूम करून घ्यावयास जन्मलेला नाहीं. मी माझ्या मर्जीप्रमाणें जिवंत राहीन. पाहूं या तरी कोण कोणाला पुरून उरतो तो." शासनसंस्थेला हें थोरोचें आव्हान आहे.

थोरोच्या ह्या विचारांचें गांधींच्या विचारांशीं किती तरी साम्य दिसतें. विशेष हें कीं, थोरोनें अन्यायाचा प्रतिकार करण्याकरितां कायदेभंग करावा येवढेंच न सांगतां स्वतः कायदेभंग केला.

## फ्रेंच क्रांतिकारक रूसो.

निसर्गाकडे पुनरागमन हें रूसोच्या एकंदर शिकवणुकीचें सार होतें. समाजाला जीं कांहीं दुःखें सहन करावीं लागत आहेत त्यांचें मूळ भौतिक सुधारणेंत आहे. तिचा उच्छेद करून शास्त्रीयज्ञान, ललितकला, वाङ्मय यांतसुद्धां

परावृत्त होऊन नैसर्गिक स्थितीशीं एकरूप होणें हा सामाजिक विषमतेवर त्यानें सुचविलेला उपाय आहे.

" मनुष्य म्हणजे जात्याच अत्यंत क्षुद्र प्राणी; त्याची उन्नति त्याच्या स्वतःच्या हातीं नसून तिच्याकरितां त्याला आकाशांतील बापाकडेच धांव घेतली पाहिजे, अशी तत्कालीन रोमन कॅथॉलिक लोकांची समजूत होती. रूसोनें या कल्पनेविरुद्ध बंड करून मनुष्य हा श्रेष्ठ प्राणी आहे व त्याची उदात्त श्रद्धा, अगाध ज्ञान, कल्पनातीत गोष्टी घडवून आणण्याचें त्याचें अफाट सामर्थ्य हीं सर्व लक्षांत घेतां मानव्याच्या मूळ चांगुलपणावर श्रद्धा ठेवून जन्मतः स्वतंत्र असलेल्या मनुष्यप्राण्याला गुलामगिरींतून सोडवून व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार केला पाहिजे व आत्मोन्नतीचा मार्ग निष्कंटक करून दिला पाहिजे," अशा प्रकारच्या ओजस्वी कल्पनांचा रूसोनें फ्रान्समध्यें प्रसार केला.

परंतु ह्या बरोबरच "समष्टिरूपानें समाज हीच खरी राजसत्ता होय" असें म्हणून अशा लोकमतानुवर्ती राजसत्तेलाच त्यानें राजसत्ता असें नांव दिलें. व ही राजसत्ता आणि व्यक्तिस्वातंत्र्य ह्यांचें समीकरण करून टाकलें आहे. काँग्रेसलाच राजसत्तेचें रूप यावें या गांधींच्या प्रयत्नांच्या मुळाशीं हीच कल्पना आहे.

म. गांधींना रूसोच्या मानव्याचें स्वाभाविक चांगुलपण व समाजांतील विषमतेवरील निसर्गाकडे पुनरागमन या कल्पना रुचलेल्या दिसतात.

## कार्लाइल् व मॅझिनी

रूसोप्रमाणेच कार्लाइल् हाहि प्रत्यक्षाबद्दल असंतुष्ट आणि अस्पष्ट व लक्षणरहित ध्येयासाठीं तळमळणारा एक तत्त्वज्ञानी होता. रूसोप्रमाणेंच कार्लाइल् हा अंतःप्रेरणेस प्रमाण मानणारा होता, शास्त्रीयज्ञान व एकंदर भौतिक सुधारणा म्हणजे मूर्तिमंत अधःपात मानणारा होता; निसर्गस्वाभाविक भावनेला प्रमाण मानणारा होता; व इतिहासासंबंधीत " निरनिराळ्या गूढ राष्ट्रीय भावना, लोकमताचे प्रचण्ड प्रवाह, निरनिराळ्या रीतीनें सतत काम करीत असलेल्या गूढशक्ति ह्या सर्वांकडे दुर्लक्ष करून थोर पुरुषांचीं चरित्रें म्हणजेच इतिहास " असें मानणारा व्यक्तिनिष्ठ होता.

कार्लाइलची कर्तव्यनिष्ठेवर विशेष भर असे.

कार्लाइलप्रमाणेंच मॅझिनीविषयीं महात्मा गांधींना ज्ञात ज्ञात ममत्वार कल्पनांबद्दल आदर वाटतो. मॅझिनी केवळ स्थूल स्वराज्याच्या मागें लागलेला

राष्ट्र-वीर नव्हता. जाज्वल्य कर्तव्य प्रीतीचे धार्मिक धडे घालून जगताच्या राजकारणाला अध्यात्माची जोड करून देणारा तो होता.

" राजकीये पुनरुज्जीवनाच्या आधीं आणि राष्ट्रीय ध्येयत्व साध्य होण्यापूर्वी नैतिक पुनरुज्जीवन म्हणजे बहुधा आध्यात्मिक पुनरुज्जीवन झालें पाहिजे " हें राष्ट्रीयत्वाचें आद्यसूत्र गांधींना सर्वस्वी मान्य आहे परंतु अत्याचार हा ह्या पुढील मॅझिनीचा मार्ग मात्र गांधींना मान्य नाहीं.

## रस्किन.

हा एक सौंदर्योपासक व निसर्गभक्त होता. आणि आधुनिक सुधारणेंतील यांत्रिक शोधांनी मानवी आयुष्यांतील सौंदर्याच्या व नैसर्गिक राहणीच्या आवडीच्या एकंदर कल्पनांचा नायनाट होत असल्यामुळें रस्किनने ह्या आधिभौतिक सुधारणेवर कसून हल्ले चढविले आणि नैसर्गिक जीवनक्रमाचा पुरस्कार केला.

परंतु केवळ सौंदर्योपासना व निसर्गप्रेम ह्यांच्या बळावर त्याला आधुनिक सुधारणेचे वाभाडे काढतां आले. येवढयापुरते त्याचे विचार सर्वांगसुंदर, सडेतोड आणि तीक्ष्ण असे आहेत. आणि तेवढयापुरतें गांधींचें त्याच्याशीं फारच सहमत आहे. शिवाय सौंदर्योपासना व निसर्गप्रेम ह्यांमुळें त्याच्या विचारांत एकप्रकारचें माधुर्य, प्रेम व आकर्षकता आहे. आणि म. गांधी हे स्वभावतःच मधुर प्रेमळ व सौंदर्योपासक आहेत.

रस्किनचा चरखा, टॉलस्टॉय ह्यांची अहिंसा आणि मॅझिनीचें स्वराज्य म्हणजेच गांधींची असहकारिता असें प्रो. गीडिस ह्यांनीं केलेलें वर्णन नितांत सुंदर व सत्य आहे.

हिंदु, जैन व ख्रिस्ती धर्मांनीं व धर्मप्रवर्तकांनीं गांधींचें चारित्र्यसंघटन केलें आणि टॉलस्टॉय, थोरो, रस्किन ह्यांनीं त्याच्यावर आधुनिक संस्कार चढविले व अशा रीतीनें ते सर्वांगपूर्ण आधुनिक धर्मप्रवर्तक व समाजसुधारक बनले आहेत.



प्रकरण ९ वें

# गांधी महात्मा कां आणि कसे ?

हसति सकललोकालोकसर्गाय भानुः ।
परममममृतवृष्ट्यै पूर्णतामेति चंद्रः ॥
इयति जगति पूज्यं जन्म गृण्हाति कश्चित् ।
विपुलकुशलसेतुः सत्वसंतारणाय ॥ *—क्षेमेंद्र.



“ गांधी हे खरोखर महात्मा आहेत. माझे गुरु महर्षि रानडे किंवा राजा राममोहनराय हेच सबंध हिंदुस्थानांत फार झाले तर त्यांच्या जवळ जवळ येऊं शकतील.” असें म्हणून गांधींचे राजकीय-गुरु कै. वा. गोखले ह्यांनीं १९०६ मध्यें महात्मा ही पदवी आपल्या शिष्याला प्रथम अर्पण केली.

अवतार, विभूति, महात्मा, अशा कोटींत गांधींना घालतां येईल काय? वस्तुतः असा प्रश्न उपस्थित करणेंच वेडगळपणाचें होईल.

'धर्मस्थापनेचे नर, तेचि ईश्वराचे अवतार' ही रामदासांची अवताराची व्याख्या घ्या किंवा गीतेंतील विभूतींचीं लक्षणें घ्या; कर्तव्यनिष्ठा, कल्पकता, बुद्धिमत्ता, निष्कलंक आचरण व दैवी स्फूर्ति हीं कार्लाइलची विभूती (हिरो) चीं लक्षणें घ्या अथवा विभूति म्हणून ओळखल्या जाणाऱ्यांच्या चरित्रांकडे पाहून त्यावरून सूचणारीं लक्षणें गांधींना लावून पहा; कोणासहि असेंच आढळून येईल कीं, गांधींचें चरित्र व चारित्र्य अवतार, विभूति, महात्मा ह्या नांवाला शोभण्यासारखें आहे; इतकेंच नव्हे तर ह्या नांवास पात्र झालेल्या पुष्कळशा चरि-

---

* सगळ्या जगाला प्रकाश देण्यासाठींच सूर्य उदय पावतो. परम अमृताचा वर्षाव करण्यासाठींच चंद्र पूर्णता पावतो. त्याप्रमाणें जगांतल्या यच्चयावत् प्राण्यांना उद्धाराचें साधन प्राप्त करून देण्यासाठीं जगांत पूज्य महात्मे उत्पन्न होतात.

त्रांपेक्षां व चारित्र्यापेक्षां तें अधिक उदात्त, अधिक व्यापक व अधिक कार्यक्षम आहे.

## गांधींचें माहात्म्य.

म. गांधींच्या माहात्म्याचें पहिलें कारण व लक्षण हें आहे कीं, ते कोणत्याही एका धर्माचे, तत्वज्ञानाचे किंवा तत्वज्ञान्याचे अनुयायी-परंपरा चालविणारे-नसून अशा कोणत्याहि एका प्रचलित धर्मांत, किंवा तत्वज्ञानांत समाविष्ट न होण्याइतके व्यापक संकीर्ण, स्वयंसिद्ध व स्वयंस्वतंत्र आहेत.

म. गांधींच्या महात्म्याचें, गांधींच्या अद्वितीयतेचें दुसरें एक कारण व लक्षण हें आहे कीं, ते कट्टे कर्मवीर आहेत. म. गांधी हे महान् कर्मयोगी आहेत. त्यांच्या, तत्वांत व मनांत आदरणीय व आचरणीय असे दोन भाग किंवा भेद नाहींत.

म. गांधींच्या माहात्म्याचें, गांधींच्या अद्वितीयतेचें तिसरें एक कारण व लक्षण हें आहे कीं, ते स्थितप्रज्ञ आहेत. स्वार्थ, लोभ वगैरेंच नव्हे तर त्याहिवरच्या सूक्ष्म अहंकारापासूनहि ते मुक्त आहेत व निर्विकार आहेत. त्यांचें कोणतेंहि कृत्य केव्हांहि कोणत्याहि मनोविकारानें प्रेरित झालेलें नसतें; शुद्ध विचारांनींच तें स्फुरलेलें असतें.

म. गांधींच्या माहात्म्याचें, गांधींच्या अद्वितीयतेचें चौथें एक कारण व लक्षण हें आहे कीं, ते अत्यंत प्रबळ, प्रेमळ आणि निर्भय आहेत. ' सर्वभूतहिते रतः ' असे आहेत.

म. गांधींच्या माहात्म्याचें, गांधींच्या अद्वितीयतेचें पांचवें एक कारण व लक्षण हें आहे कीं, ते निसर्गाशीं तादात्म्य पावले आहेत; एकंदर जगाच्या सर्व संस्कारांतून बाहेर पडून परत असंस्कारित निसर्गाशीं तादात्म्य पावलेले आहेत.

## गीता-रहस्य.

खरोखर, गीतारहस्य समजलेला आणि समजून त्याप्रमाणें चालणारा गांधींच्याहून श्रेष्ठ दर्जाचा कर्मयोगी हिंदुस्थानांत आतांपर्यंत खात्रीनेंच झालेला नाहीं.

गीतारहस्यकार लोकमान्य ज्या महाराष्ट्रांत होऊन गेले त्या महाराष्ट्रांतल्या एका महाराष्ट्रीयानें, मराठी पुस्तकांतून असे उद्गार काढावे ह्याबद्दल पुष्कळांस आश्चर्य आणि कित्येकांस खेदाश्चर्य सुद्धां वाटेल, परंतु आम्हीं पुन्हां एकवार असेंच म्हणतों कीं, खरोखर गीतारहस्य समजलेला आणि समजून त्याप्रमाणें

चालणारा गांधींच्याहून श्रेष्ठ दर्जाचा कर्मयोगी हिंदुस्थानांत आतापर्यंत क्वाचि-त्यच झालेला नाहीं.

*गीतारहस्य आहे तरी काय ?*

शठं प्रति शाठ्यम् हें तत्व जगाला शिकविण्यासाठीं कांहीं गीता निर्माण झालेली नाहीं. मोठ्या सत्यासाठीं लहानशा सत्याचा प्रसंगीं बळी देण्यांत आला तरी हरकत नाहीं हें तत्व समजावून सांगण्यासाठीं कांहीं भगवान् श्रीकृष्ण अवतीर्ण झाले नाहींत. सत्यासाठीं हिंसा केलीच पाहिजे किंवा क्षम्य आहे हाच कांहीं श्रीकृष्णाचा जगाला मुख्य संदेश नाहीं.

## मामनुस्मर युध्यच ।

माझें स्मरण कर आणि लढत रहा; हाच संदेश सांगण्याकरितां आणि 'तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर,' (गीता३-१९)हा मार्ग दाखवून देण्या-साठीं गीता निर्माण झाली आहे. आणि लोकमान्यांविषयीं कोणत्याहि प्रकारचा अनादर मनांत नसतांहि असें म्हणतां येईल कीं, ही कर्म करीत राहण्याची व तीहि निष्काम वृत्तीनें कर्म करीत राहण्याची कर्मकुशलता गांधींनीं लोकमा-न्यांइतकीच उत्कटतेनें सतत व सुसंगतपणें दाखविली आहे आणि कर्म केवळ निष्कामवृत्तीनेंच करून न थांबतां निर्विकार वृत्तीनें केलें आहे.

गीतेंत सत्याचा व अहिंसेचा विचार असल तर तो ह्या मुख्य तत्वाच्या अनुषंगानें आहे आणि त्या बाबतींत दोन विभूतींत कितीहि अंतर असलें तरी त्यावरून त्यांच्यांतील मूलभूत साम्य, समानशीलता व समानता ह्यांत वैगुण्य येऊं शकत नाहीं.

श्रीकृष्णांसुद्धां अनेक श्रेष्ठ विभूतींच्या बाबतींत मनूनें एक नियम घालून दिलेला आहे आणि सामान्यतः आपण सर्व तो प्रमाण धरून चालतो. तो नियम असा कीं,—

अनुष्ठितं तु यद्देवैः ऋषिभिर्यदनुष्ठितम् ।
नानुष्ठेयं मनुष्यैस्तु तदुक्तं कर्म आचरेत् ॥

" मनुष्यानें देवांप्रमाणें किंवा ऋषींप्रमाणें वागण्याच्या भरीस पडूं नये, मात्र त्यांनीं सांगितल्याप्रमाणें वागावें." ऋ दल्हा विभूतींची मूळचरित्रें किंवा उपलब्ध चरित्रें अशीं असतात किंवा आहेत कीं, त्यामुळें मनूला असा नियम घालून देणें भाग पडलें. परंतु सुदैवानें म. गांधींचें चरित्र व चारित्र्य असें निष्क-लंक आहे कीं, त्या बाबतींत असा इशारा देण्याची आवश्यकताच राहत नाहीं.

आणि ह्याचें कारण हेंच कीं, म. गांधी हे यदृच्छेनें, केवळ अंतःस्फूर्तीनें विभूतिमत्व पावलेले नसून त्यांचें विभूतिमत्व हें एखाद्या तालीमबाजाच्या शरीराप्रमाणें कमावलेलें आहे. पतंजलीचा राजयोग, राजचंद्रांचा आवडता हठयोग, बुद्धाचा ध्यानयोग, ख्रिस्ताचा भक्तियोग वगैरेंचा आश्रय न करतां तीव्र, व्यावहारिक आचरणाच्या स्वरूपांतील तीव्र तपश्चर्येनें त्यांनीं हें कर्मवीरत्व आणि कर्मयोगित्व कमावलें आहे.

मागील एका प्रकरणांत त्यांच्या चारित्र्यसंघटनाचें दिग्दर्शन केलें आहे. त्याच्यावर बाहेरून जे धर्म व तत्वज्ञान एतद्विषयक संस्कार त्यांच्या तीव्र व सूक्ष्म बुद्धीच्या चाळणीतून आतां ग्रहण केले जात होते त्यांस त्यांच्या ह्या आचारप्रधान तपश्चर्येतून तावून सुलाखून झगझगित व्हावें लागत असे.

" प्रथम व्यवसायात्मक बुद्धि शुद्ध व स्थिर केली पाहिजे "—"( व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन !— ) " असा गीतेंतल्या कर्मयोग शास्त्राचा सिद्धांत आहे. ' शठंप्रति शाठ्यम् ' हेंच गीतेचें कदाचित् बोधासर्वस्व असेल ! पण शठ कोण व सत्य कोणतें हें ठरविण्यास ही बुद्धीची शुद्धता आवश्यक असते. नाहींतर आपणावरून जग पारखण्याच्या देहस्वभावास अनुसरून जो तो शठ व सत्य ह्यांची व्याख्या ठरवूं लागल्यास जगांत धार्मिक नैतिक व राजकीय अनवस्था माजल्यावांचून राहणार नाहीं. श्रीकृष्ण हे अराजकतेंत पर्यवसान होणाऱ्या व्यक्तिस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते नव्हते.

कर्ममार्गावर भर देणारा, 'शठंप्रति शाठ्यम्' हें तत्व घोकीत बसणारा मनुष्य ह्या कर्मयोगाच्या नांवावर गीतेच्या कर्मयोगाचें गीतानिर्दिष्ट पहिलें नियमन मात्र पार झुगारून देतो !

ठोंशास ठोंसा ! हें तत्व सांगावयाला श्रीकृष्णांनीं तसदी घेण्याचें कांहींच कारण नव्हतें. सर्व जग त्या तत्वांत तरबेज होतें व आहे. श्रीकृष्णांची आवश्यकता उत्पन्न झाली ती ह्या तत्वाची अंमलबजावणी कोणत्या बुद्धीनें करावी आणि ती विशिष्ट बुद्धि अधिकाधिक उन्नत व विकसित कशी करावी, हें समजावून सांगण्याकरितां-स्थितप्रज्ञ वृत्तीची आवश्यकता व तिच्या प्राप्तीचे मार्ग समजावून देण्याकरितां.

बुद्धि शुद्ध कशी करावी ह्याचा विचार होतां होतां हिंदुधर्मांत तें एक स्वतंत्र शास्त्रच बनून गेलें. भगवान् पतंजलींचा राजयोग हेंच तें शास्त्र होय. "ह्याच-

साठीं भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांत बुद्धि शुद्ध करण्याचें एक साधन या दृष्टीनें पातंजल योगाचें विवेचन केलें आहे. " ( गी. र. १३७. )

हिंदुधर्मांतच हा साधनमार्ग आहे असें नाहीं. प्रत्येक धर्मप्रवर्तक आपल्या विशिष्ट ध्येयवादाला व विचारसरणीला अनुसरून विशिष्ट साधनमार्ग आंखून देतोच प्रत्येक धर्मांत विचारधर्माला व तत्वज्ञानाला विशिष्ट आचारधर्माची जोड दिलेली असतेच. आणि हा आचार धर्म विचारशुद्धीसाठींच असतो. बौद्ध धर्मांतील साधनमार्ग व जैन धर्मांतील साधनमार्ग ह्यांचें हिंदु धर्मांतील साधनमार्गाशीं पुष्कळसें साम्य आहे. ह्याचें कारण तरी हेंच आहे कीं, त्यांची उत्पत्ति एकाच संस्कृतींतून, हिंदुस्थानच्या एकाच व विशिष्ट मनोभूमिकेंतून व अनुभवसंचयांतून झालेली आहे.

म. गांधी सर्वश्रेष्ठ कर्मयोगी आहेत; कारण त्यांनीं विलक्षण साधन, अनुसंधान व ध्यान ह्यांच्या बळावर आपली ही व्यवसायात्मक बुद्धि स्थिर करण्यांत अचाट यश मिळविलें आहे.

## साधनमार्ग.

म. गांधींचा साधनमार्ग हा सर्वस्वी राजयोगांतर्गत आहे. यम आणि नियम हा अष्टांग योगांतील प्राथमिक भाग गांधींनी उचलला आहे.

अहिंसा सत्यमस्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः
एते जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम्।
शौचसंतोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमः॥

योगसूत्रें २-३० ते ३२

" अहिंसा सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह यांस यम असें म्हणतात. " हीं व्रतें जात, देश, काल आणि हेतु यांनी अनवच्छिन्न असून तीं सर्वांत मोठीं व्रतें आहेत. " " अंतर्बाह्य शुचिता, संतोष, तप, अभ्यास आणि परमेश्वरपूजन यांस नियम असें म्हणतात. "

गांधींच्या आचारधर्मांत–साधनमार्गांत बरोबर याच तत्वांचा समावेश झालेला आहे.

येथून पुढील आसनादि मार्ग मात्र गांधींनी साफ सोडून दिले. ह्या पायावर त्यांनीं स्वतंत्र इमारत उभारली. यापुढें त्यांनीं शरीर व प्राण ह्या स्थूल व सूक्ष्म देहांच्या कवायतीचा मार्ग सोडून दिला आणि ( १ ) उत्कट यमनियम ( २ )

तीव्र इच्छा ( ३ ) आचारनिष्ठा ह्यांच्या समीकरणानें एक निराळाच मार्ग आंखला.

यमनियमांनीं शुद्ध झालेल्या बुद्धीला जें कार्य सुचेल त्याची इच्छाशक्तीच्या बळावर प्रत्यक्ष आचारांत अंमलबजावणी करावी आणि ह्या आचारधर्मानें बुद्धि अधिकच शुद्ध व इच्छाशक्ति अधिकच तीव्र करून घ्यावी असा त्यांचा हा मार्ग त्रिविध, परस्परपोषक व परस्परपूरक आहे

बुद्धानें सुद्धां राजयोगावरील लक्ष कमी करून असाच कांहींतरी मार्ग शोधून काढण्याचा प्रयत्न केला. तीव्र इच्छा व तदनुषंगिक उत्कट विचार यांतच बुद्धांच्या ध्यानयोगाचा समावेश होऊं शकतो.*

**ध्याने विश्वमसावधार्मिककुलं कस्मैचिदस्मै नमः**

—भट्ट विश्वनाथ.

ध्यानाच्या योगानें बुद्धांनीं दिव्यज्ञानाची प्राप्ति करून घेतली व जगाचा उद्धार केला असें बुद्धाचें अवताररहस्य सांगण्यांत येतें. म. गांधी हे यमनियमांच्या पुढें लगेच ह्या ध्यानाच्या पायरीवर येऊन बसतात. आणि ह्या ध्यानमध्य ( धारणा–ध्यान–समाधि=संयम ) संयम मार्गालाच आचारबळानें अति उत्कट बनवून निरनिराळ्या गुणांवर संयम करून अचाट बळ कमावितात.

## ब्रह्मचर्य

इतर कोणत्याहि धर्मापेक्षां हिंदुधर्मांत एक गोष्ट अत्यंत जोर देऊन सांगण्यांत येते व ठळकपणें दिसण्यांत येते ती ब्रह्मचर्य ही होय ब्रह्मचर्य व्रताला इतकें उच्चस्थान व इतकें कडक स्वरूप इतर कोणत्याहि धर्मांत दिलेलें दिसत नाहीं. बौद्ध व ख्रिस्ती धर्मांत भिक्षु व भिक्षुकी, जोगी व जोगिणी ह्यांना हें व्रत घालून देण्यांत आलें होतें. परंतु त्यांना संघ व मठ ह्यांचें स्वरूप आल्यामुळें व्रताच्या अंगीकाराबरोबरच व्रतभंगाला अनुकूल परिस्थितीचें बीजारोपण झालें. हिंदुधर्मांतील संन्यासांत हा संन्यासिनी वर्ग समाविष्ट करण्यांत आलेला नाहीं हें या दृष्टीनें ठीकच दिसतें. शिवाय हिंदुधर्मानें ब्रह्मचर्य हें फक्त विद्यार्थी ( ब्रह्मचारी ) व संन्यासी ह्यांच्यापुरतेंच ठेवलें नसून हें एक स्वतंत्र शास्त्रच बनविलें आहे व विवाहित स्त्रीपुरुषांसहि नियमित ब्रह्मचर्य आवश्यक ठरवून

*तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्—त्या विशिष्ट विषयाशीं चित्ताची एकाग्रता अखंडित राहिली म्हणजे त्यास ध्यान असें म्हणतात. (योग. ३–२)

टाकलें आहे. मनुस्मृति अध्याय ३ रा, धर्मसिंधु वगैरेंत त्यासंबंधाचे नियम घालून देण्यांत आले आहेत.

म. गांधींचा ह्या ब्रम्हचर्यावर विलक्षण कटाक्ष आहे. व तें त्यांनी आज एक तपापेक्षां अधिक काळ अत्यंत कडक रीतीनें पाळलेलें आहे. आपल्या द. आफ्रिकेंत लिहिलेल्या आरोग्यविषयक पुस्तकांत म. गांधी म्हणतातः— माझ्या शरीरांत व मनाला अनेक आधिव्याधि अद्याप जडलेल्या आहेत. तथापि माझ्या सहवासांत, पाहण्यांत व संबंधांत जीं साधारण माणसें आलीं आहेत त्यांच्या मानानें मीं बराच निर्दोष प्रकृतीचा व निरोगी आहें; असेंच म्हणावें लागेल. ही स्थिति जवळ जवळ वीस वर्षें विषयोपभोगांत गढून गेल्यानंतर जागे होऊन सावध झाल्यावरची आहे. तर मग तीं वीसहि वर्षें जर मी वांचवूं शकलों असतों, तर आज माझी किती उत्तम स्थिति असती बरें ? माझी तर खात्री आहे कीं, तशा स्थितींत माझ्या उत्साहाला पारच नसता. आणि खरो-खर देशसेवेंत किंवा स्वार्थसाधनांत मी असा उत्कट व अपार उत्साह दाख-विला असता कीं, माझी त्या कामांत बरोबरी करणाराची परीक्षाच होती ! "

ज्याच्या उत्साहाला आणि कर्तृत्वाला हिंदुस्थानांतच काय, परंतु हिंदु-स्थानाबाहेरसुद्धां तोड मिळणें कठीण त्या पुरुषाचे हे उद्गार आहेत !

ह्या ब्रह्मचर्याच्या कडक पालनामुळेंच आज त्यांच्या वज्रासारख्या इच्छा शक्तीला, दुबळ्या देहाच्या अचाट कार्यक्षमतेला आणि वृत्तीच्या सात्विक निश्च-लतेला जगांत दुसरी तोड नाहीं. अनेक पाश्चात्य व पौर्वात्य तत्वज्ञान्यांपेक्षां व पुढाऱ्यांपेक्षां गांधींत जें विशेष तेज, चैतन्यगर्भ ( Dinamic ) शांति व निष्ठा दिसून येतें त्याचें कारण हेंच आहे.

आतां ह्या बळावर ते कर्मवीर कसे बनत चालले तें पाहूं.

आपल्या अगदीं बालवयांतच त्यांनीं सत्य व अहिंसा या बाबतींत हलवून गुंटा बळकट केलाच होता.

द. आफ्रिकेंत पाय ठेवतांच त्यांच्या यमनियमांची कसून परीक्षा होऊं लागली. पहिल्या पहिल्या परीक्षांतून ते आपल्या संचित सामर्थ्याच्या बळावर पार पडलेच. परंतु पुढें त्यांचें कर्तव्यक्षेत्र फार विस्तृत, तीव्र आणि दीर्घ-कालीन श्रमाचें व कसोटीचें होऊं लागलें. परंतु त्याबरोबरच गांधींची त्या अभ्यावपरिस्थितीला पुरी पडून उरण्याइतकी आत्मिक तयारीहि झपाट्यानें होऊं लागली.

गांधींची प्रत्येक नवनवी चळवळ ही विशिष्ट व निश्चित पण क्रमविकासी तत्वांवर, विशिष्ट व क्रमविकासी पद्धतीनें आणि क्रमविकासी प्रमाणावर झालेली आहे. प्रत्येक चळवळींत त्यांचें आध्यात्मिक बळ अधिक प्रमाणावर कसोटीला लागलें आहे व प्रत्येक चळवळीच्या पूर्वी त्यांनीं आपलें अध्यात्मबळ अधिक सुसंस्कृत व सुदृढ बनविलें आहे.

द. आफ्रिकेंतील आपल्या दुसऱ्या मुक्कामाचीं पहिलीं तीन वर्षें त्यांनीं केवळ मागें सांगितलेल्या स्थूल चळवळींतच घालविलीं असें नाहीं. ह्या काळांत त्यांनी आपल्या आध्यात्मिक बळाच्या, आपल्या जीवनकार्याच्या वाढीला जरूर अशी तयारी स्थिर व निर्वेध वृत्तीन चालविली होती.

रस्किनचें Unto this Last ' अखेर हेंच ' हें पुस्तक ह्यावेळीं त्यांच्या हातीं पडलें व त्यांतील नैसर्गिक साध्या राहणीची तरफदारी त्यांना फार आवडली. लगेच त्यांनीं जोहान्सबर्ग येथील प्लेगच्या वेळची आपली कामगिरी संपतांच नाताळमध्यें परत गेल्यावर दरबानपासून १२ मैलांवर फिनिक्स ह्या नितांत रमणीय ठिकाणीं एक विस्तृत शेतवाडी खरेदी केली. प्रथम ते तेथें मधून मधून रहावयास जात. परंतु आपलीं मुलें बाळें तेथेंच ठेवीत आणि मधून मधून आपण तेथें जात. १९१३ मध्यें ते स्वतःच तेथें रहावयास गेले.

नैसर्गिक राहणी व विश्वबंधुत्वाची विचारसरणी ह्या रस्किनच्या कल्पनांस येथें अगदीं चिमुकल्या प्रमाणावर पण प्रत्यक्ष व व्यावहारिक स्वरूप मिळालें. सर्वांनीं मिळून शेती करावी, कापड विणावें, इतर धंदे करावे, नियमित प्राप्ति वांटून घ्यावी, समानतेनें व प्रेमानें रहावें व स्वकष्टार्जित साध्यापिण्यांत समाधान मानावें अशी येथील राहणी होती. हें एक लहानसें प्रेमसाम्राज्य होतें. जगांत इतर केवळ कायदेसाम्राज्यें व बलसाम्राज्येंच आढळतात!

अत्यंत माफक फलाहार करावा, अगदीं बेताचे जाडेभरडे कपडे वापरावेत, उघड्यावर लांकडी फळ्यांवर झोंपावें, पूर्ण ब्रह्मचर्य पाळावें, पवित्र प्रभात काळ आत्मचिंतनांत व तत्वचिंतनांत घालवावा अशी ह्यावेळीं त्यांनीं स्वतःला व आपल्या कुटुंबाला शिस्त लावून घेतली.

## तपश्चर्या.

गांधींच्या आयुष्यांतील हें परिवर्तन महत्वाचें आहे. " प्रथम व्यवसायात्मिक बुद्धि शुद्ध व स्थिर केली पाहिजे" असा गीतेंतल्या कर्मयोग शास्त्राचा पहिला सिद्धांत आहे. " ( गी. र. पृ. १३६ ) आणि वासनात्मक व व्यवसायात्मिक

बुद्धि एकच असून चांगल्याची निवड करणें हा सात्विक धर्म त्या एकाच बुद्धींत पूर्वसंस्कारानें, शिक्षणानें, इंद्रियनिग्रहानें किंवा आहारादिकांनीं येत असतो. " (गी. र. पृ. १३८)" व्यवसायात्मक बुद्धि ह्याप्रमाणें आत्मनिष्ठ झाली आणि मनोनिग्रहाने मन व इंद्रियें तिच्या ताब्यांत वागण्यास शिकलेलीं असलीं, म्हणजे इच्छा वासना इत्यादि मनोधर्म (किंवा वासनात्मक बुद्धि) आपोआपच शुद्ध व पवित्र राहून शुद्ध सात्विक कर्माकडे देहेंद्रियांची साहजिकरीत्याच प्रवृत्ति होत असते. अध्यात्मदृष्ट्या हेंच सर्व सदाचरणाचें मूळ म्हणजेच कर्मयोग-शास्त्राचें रहस्य आहे. (गी. र. पृ. १३९).

आतांपर्यंत गांधींची बुद्धि अगदींच शुद्ध नव्हती असें नाहीं. आत्मनिष्ठा त्यांच्यांत बऱ्याच प्रमाणांत होती. पण तें मुख्यत: पूर्वसंस्कारांचें फळ होतें. शिक्षण, इंद्रियनिग्रह, आहारादिकांचें नियमन अशा मार्गांचाहि त्यांनीं अल्पप्रमाणांत उपक्रम केला होता हें त्यांच्या गीता, बायबल व रस्किनचे ग्रंथ वगैरेंचे वाचन, मांसाहार प्रवृत्तीचें नियमन, परस्त्रीसहवासापासून अलिप्तता ह्या संबंधीच्या हकीगतीवरून समजून येतें. परंतु आतांपर्यंतचे त्यांचे हे प्रयत्न मुख्यत: निवृत्तिपर होते; मांसाहार वर्ज्य करावयाचा, परस्त्रीचा सहवास टाळावयाचा अशासारखे ते प्रयत्न होते. पण आतां गांधींचे प्रयत्न जास्त ठळक व प्रवृत्तिपर झाले. त्यांनीं साध्या राहणीचा स्वीकार केला; पूर्ण ब्रह्मचर्याचा स्वीकार केला; नैसर्गिक रहाणी व विश्वबंधुत्वाची विचारसरणी ह्यांच्या प्रत्यक्ष आचरणास सुरवात केली. आणि अशा रीतीनें उच्चतर तत्वाचें सम्यक् आकलन होण्यास आणि अधिकतर विस्तृत व बिकट कार्यें अंगावर घेण्यास आपली बुद्धि अधिक शुद्ध व अध्यात्मपर अधिक कणखर बनविण्याचा मार्ग स्वीकारला गांधींची कडा कर्मयोगी बनण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या तीव्र तपश्चर्येची ही खरी सुरवात होती. येथून पुढील प्रयत्नांत त्यांना त्यांच्या पूर्वसंस्कारांच्या जोडीला आपल्या तपोबलाची जोड मिळूं लागली.

## विकास.

गांधींची ही फिनिक्स मधील " टॉलस्टॉयवाडी " म्हणजे टॉलस्टॉय, थोरो वगैरेंच्या बंधनातीत, अंत:प्रेरणा प्रामाण्य मानणाऱ्या, शासनसंस्थेवांचून समाज-धारणा शक्य करून दाखविण्याच्या कल्पनेचा प्रत्यक्ष प्रयोग होय. आणि साबर-मतीच्या पवित्र तीरावरील सत्याग्रहाश्रम हा ह्या वसाहतीचीच सुधारून वाढवि-लेली आवृत्ति होय. ह्या अंत:प्रेरणेवांचून दुसरें प्रामाण्य नाहीं; प्रेमावांचून दुसरें

बंधन नाहीं; यमनियमादि आत्मोन्नतिप्रद तपश्चर्येवांचून सुटका नाहीं आणि नैसर्गिक श्रमोपजीवी राहणीवांचून जास्त सुधारणा नाहीं.

गांधींची द. आफ्रिकेंतील पहिली राहणी फारच थाटाची व वकिलीनील प्राप्ति फारच मोठी होती. ते बादशाही थाटानें उमरावी मोहल्यांत राहत असत. त्यांची प्राप्ति दरमहा सरासरी साडेचार ते पांच हजार रुपयांपर्यंत असे. वकीलीत ते ' खोटा ' खटला कधीं हातांतसुद्धां धरीत नसत; अशीलांकडे थकलेल्या बाकीबद्दल कधींहि मागणी करीत नसत; खटले शक्य तोंपर्यंत कोर्टाबाहेर मिटविण्याचे प्रयत्न करीत आणि गोरगरीबांस फुकट सल्ला देत.

इतकें असूनहि टॉलस्टॉय ह्यांच्या मतांचा स्वीकार केल्यानंतर हळूहळू ते आपली वकीली कमी करूं लागले व १९१० मध्यें त्यांनीं वकीली सर्वस्वी व कायमची बंद केली.

आपल्या खासगी राहणींतील तीव्र तापसी मार्गानें ते आपल्या मानसिक बळाची वाढ करीत तर लगेच निरनिराळ्या चळवळींत त्या वाढीला व्यावहारिक स्वरूप मिळे.

साधनांनीं–अध्ययन, मनन, ध्यान वगैरेंनीं ते आपल्या सत्यवृत्तीची, प्रेमवृत्तीची, निर्भयतेची, सर्वभूतहितेरत: वृत्तीची वाढ करीत तर लगेच जोहान्सबर्ग येथील प्लेग, झुलू लोकांचें बंड, बोअर युद्ध ह्यांत आणि सत्याग्रहाच्या युद्धांतील युरोपियनांची दंगल, पठाणांचा मार, तुरुंगांतील जाच ह्यांमध्यें ते त्या गुणांना व्यावहारिक स्वरूप देत व कसोटीस लावून घेत.

त्यांच्या कर्मयोगी वृत्तीचा एक उत्कृष्ट दृश्य व लहानसा मासला म्हणजे त्यांचा पोषाख हा होय. आचार–विचार, ध्येयस्थिति–विचार–स्थिति व परिस्थिति ह्यांत नेहमीं एकतानता ठेवावयाची हें कर्मकुशलतेचें एक लक्षण आहे. एकतानतेवांचून शांति नाहीं आणि शांतिवांचून एकतानता नाहीं. म. गांधींच्या आचरणांत पोषाखासारख्या क्षुल्लक गोष्टीसुद्धां ह्या एकतानतेला पोषकच असतात.

द. आफ्रिकेंतील त्यांच्या चरित्राचें व कार्याचें जरा बारकाईनें निरीक्षण केलें म्हणजे १ यमनियम २ उत्कट इच्छाशक्ति व ३ आचरण ह्या तिहींच्या समीकरणानें त्यांनीं स्वतःस कर्मवीर, कर्मयोगी कसें बनविलें व ते कसे कर्मवीर आहेत तें दिसून येतें.

—ornament—

## प्रकरण १० वें.

# अगदींच खासगी.



अगदींच खासगी आणि तेंहि एका महात्म्याच्या चरित्रांत!

वस्तुतः हे प्रकरण लिहावयास नको होतें परंतु—

सुरवातीपासूनच गांधींची वकीली राजकोट येथें १८९२ व १९०१–०२ सालीं सुद्धां फार उत्तम रीतीनें चालत असे. दर्बान येथें तर ते बादशाही थाटानेंच रहात. तेथें त्यांची वकीलीहि उत्तम चाले व दरमहा २००० रुपयेपर्यंत त्यांचा खर्च असे. तेथें सर्वांचें मोठया प्रेमानें व थाटानें स्वागत होत असे.

ट्रान्सव्हालमध्यें ते तेथील खास धनाढ्य युरोपियनांच्या ट्रायव्हिली ह्या जोहान्सबर्गच्या उपनगरांत राहत असत. परंतु तेथें कसलाहि थाटमाट नसे. जोहान्सबर्गमधील त्यांच्या ऑफीसांतहि कसलाच थाटमाट नसे. घराहून ऑफिस ६ मैल लांब असे. प्रथम ते सायकलवरून शहरांत येत. मनुष्यानी पशूप्रमाणें रिक्शा ओढावी व त्यांत आपण बसावें हें त्यांना मानवत नसे. परंतु पुढें पुढें ते हा प्रवास मुळीं पायींच करूं लागले. फिरणें हा व्यायाम त्यांच्या फार आवडीचा आहे.

ते सकाळीं ७॥ वाजतां घराहून निघत. १०॥ वाजेपर्यंत ऑफीसांत काम करून कोर्टांत जात. १ वाजतां उपहार करीत. केळीं, द्राक्षें, भुईमूग, खजूर, वगैरे फळेंच ते खात. व ह्या फलाहारासाठीं हजर असलेल्या सर्व मित्र व आश्रित मंडळीला आमंत्रण देत. ५ वाजतां निघून ७ वाजतां घरीं पोहोंचत व सहकुटुंब गुजराथी पद्धतीचें जेवण जेवीत.

सर्वेषां यः सुहृन्नित्यं सर्वेषां च हिते रतः ॥
कर्मणा मनसा वाचा स धर्मं वेद जाजले ॥* (महा०, शांति०)

---

* कर्मानीं, मनानें व वाचेनें सर्वांच्या हितांत गढलेला व सर्वांशी जो नित्यस्नेही त्यालाच हे जाजले! धर्म कळला (म्हणावयाचा)

गांधींनीं दहा हजार रुपयांस आपल्या आयुष्याचा विमा उतरला होता. परंतु आंवळा देऊन कोहाळा घेण्याची ही विम्याची कल्पना त्यांना अनीतिमूलक वाटल्यामुळें त्यांनीं १९०४ पासून विम्याचे हप्ते भरणेंच बंद केले.

म. गांधींची पत्नी ही खरोखरच गांधींची सहधर्मचारिणी होती व आहे. गांधींच्या नवनव्या प्रयोगांत, उत्तरोत्तर बिकट तपश्चर्येत आणि खडतर कार्यांत त्यांनीं कधींहि मोडता घातला नाहीं; तें एक शक्यच नव्हतें म्हणा; पण त्यांनीं कधींहि वैषम्य धरलें नाहीं. उलट त्यांच्या प्रत्येक कार्यांत–कारागृहापासून ब्रम्हचर्यापर्यंतच्या प्रत्येक कार्यांत–त्यांच्याशीं सहकारिताच केली आहे. गांधींना स्त्रीजातीविषयीं अति आदर वाटतो व हिंदू स्त्रीचा जीवनक्रम हा दैवी वाटतो. ह्याचें एक कारण त्यांच्या ह्या गृहलक्ष्मीचा दैवी आचार हेंच असलें पाहिजे.

लवकर निजावें आणि लवकर उठावें हें गांधींचें नेहमींचें आवडतें तत्व आहे. सत्याग्रहाश्रमांत रात्रीं ८ ते ४ हीच सामान्यतः झोंपेची वेळ ठरविलेली आहे. प्रभातकाळ हा ते नेहमीं ईश्वरभजनांत आणि मननांत घालवितात. म. गांधींना नरसी मेहेता ह्या साधूचें पुढील पद्य फार आवडतें:—

( चाल—पंचतुंड नर० )

वैष्णव जन तो तेने कहिये जे पीड पराई जाणे रे
परदुःखे उपकार करे तो ए मन अभिमान न आणे रे ॥ ध्रृ० ॥
सकल लोकमां सौने वंदे निंदा न करे केनी रे
वाच, काछ,* मन, निश्चल राखे, धन धन जननी तेनी रे ॥ १ ॥
समदृष्टी ने तृष्णात्यागी परस्त्री जेने मात रे ॥
जिव्हा थकी असत्य न बोले, परधन नव झाले हाथरे ॥ २ ॥
मोहमाया व्याप नहीं जेने दृढ वैराग्य जेना मनमां रे ॥
राम नामसुं ताळी लागी, सकल तीरथ तेना तनमां रे ॥ ३ ॥

*काछोटा म्ह.—ब्रम्हचर्य.

पण लोभाने कपट रहित छे कामक्रोध निवार्या रे ॥
भणे नरसैयो तेनुं दर्शन करतां कुळ एकोतेर तार्या रे ॥ ४ ॥

मोठमोठे उपवास, अत्यंत अल्प आहार, अत्यंत प्रचण्ड शारीरिक श्रम व मानसिक दगदगी ही सर्व लक्षांत घेतलीं म्हणजे गांधी इतकीं वर्षे जगले तरी कसे ह्याचेंच कोणासहि आश्चर्य वाटेल. त्यांची प्रकृति जात्याच निरोगी आहे. तरी पण त्यांच्या ह्या विलक्षण सहनशक्तीचें मुख्य कारण त्यांची विलक्षण जोमदार इच्छाशक्ति हेंच एक आहे. म. गांधींचे उपवास वगैरे जसे त्यांच्या शरीरास विलक्षण कष्ट देतात त्याप्रमाणेंच त्यांच्या कित्येक चालीरीति त्यांच्या आरोग्याला पोषकहि होतात. गांधींना अगदीं पूर्वीपासूनच अगदीं मोकळ्यावर झोंपण्याची संवय आहे. ब्रह्मचर्य ही मात्र दुसरी एक फार मोठी बाब त्यांच्या आरोग्याला पोषक अशी आहे. नितांत शांत चित्तवृत्ति ही सुद्धां त्यांच्या शरीराला कांहींशी तरी आरोग्यप्रद होतेच. मूळव्याधीचा रोग मात्र त्यांना फार वर्षांपासून जडलेला आहे. व तो क्वचित् मधून मधून त्यांना त्रास देतो.

गांधींना चार मुलगे आहेत:—हरीलाल, मणिलाल, रामदास आणि देवीदास. कर्मवीर व तत्वनिष्ठ गांधींनी आपल्या ह्या मुलांना आधुनिक पद्धतीचें शिक्षण दिलेलें नाहीं. गृहशिक्षण हेंच त्यांचे शिक्षण. गांधींनीं त्यांना आपल्या इतकीच कडक शिस्त लाविली आहे; आ[illegible]बरोबरच आत्मक्लेशाचे व. सार्वजनिक कार्याचे धडे दिलेले आहेत व आपल्या फिनिक्सवसाहतींत (व सत्याग्रहाश्रमांत) त्यांस आचारधर्माचें शिक्षण दिलें आहे. हरीलाल हे विवाहित आहेत. बाकी तिघेहि अविवाहित आहेत व त्यांनीं अविवाहितच राहून ब्रह्मचर्य ह्या सर्वश्रेष्ठ तत्वाचें आचरण करावें अशी त्यांची इच्छा आहे.

इंडियन ओपीनियन हें पत्र गांधींनीं १९०३ सालीं सुरू केलें व पहिल्याच वर्षी त्यासाठीं १८००० रु. पदरमोड केली. व पुढें दरवर्षी होणारें नुकसान भरून काढीत. १९१२ पासून त्यांनीं त्या पत्रांत जाहिराती घेणें बंद केलें. त्यांतून ते इंग्रजी व गुजराथी लेख नेहमीं लिहीत.

गांधींनीं फारच थोडीं पुस्तकें वाचलीं आहेत. वाचनालयें म्हणजे त्यांना एक आपत्तीच वाटते. निवडक पुस्तकें घ्यावीं व त्यांचें नीट मनन करावें अशी

त्यांच्या वाचनाची रीत आहे. त्यांनीं गीता, बायबल, उपनिषदें, कुराण वगैरे खेरीज टॉलस्टॉय, रस्किन, थोरो, मॅझिनी, कार्लाइल्, इमर्सन वगैरे निवडक तत्वज्ञान्यांचे ग्रंथच मुख्यतः वाचले आहेत.

Unto This last ह्या रस्किनच्या आणि Trial of Socrates ह्या टॉलस्टॉय ह्यांच्या व आणखी कांहीं पुस्तकांचीं गुजराथींत भाषांतरें केलीं आहेत. परंतु स्वतंत्र अशीं दोनच पुस्तकें त्यांनीं इंडियन ओपीनियनमधून लेखमालेच्या रूपानें व पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं. हिंद स्वराज्य आणि आरोग्यमार्ग हींच तीं दोन पुस्तकें होत.

गांधींच्या जीवनक्रमांत "अगदींच खासगी" असें कांहींच नाहीं. म. गांधींना खासगी जीवनक्रम असा जो कांहीं होता किंवा आहे तोहि सर्वस्वी त्यांच्या सार्वजनिक जीवनक्रमाला धरून व सार्वजनिक जीवनक्रमाला पोषक असाच आहे. आणि म्हणूनच त्यांच्या अगदींच खासगी गोष्टींचें हें प्रकरणहि अगदींच छोटें होणें आणि त्यांतहि कांहीं सार्वजनिक गोष्टींचा उल्लेख येणें अपरिहार्य आहे.



## प्रकरण ११ वें.

# हिंदुस्थानांतील कार्याला प्रारंभ.

### पुन्हां एकदां विलायतेंत.



सत्याग्रहाच्या यशस्वी समाप्तीनंतर व २० वर्षांच्या एकनिष्ठ सेवेनंतर गांधींनीं हिंदुस्थानांत येण्याचा विचार नक्की केला. आणि आपली तेथील एकंदर मालमिळकत स्वदेशबांधवास अर्पण करून टाकली. पण इतक्यांत त्यांना हिंदुस्थानात येण्याचा आपला बेत बदलून इंग्लंडमध्यें जाण्याची इच्छा झाली. त्यावेळीं त्यांची प्रकृति अगदीं खराब झालेली होती आणि इंग्लंडच्या हवेनें ती अधिकच खराब होईल असें डॉक्टरांचें मत पडलें परंतु त्यांचे राज-गुरु कै वा. नामदार गोखले हे त्यावेळीं इंग्लंडमध्यें होते आणि त्यांची प्रकृति त्यावेळीं फार बिघडलेली होती. आणि म्हणूनच आपल्या प्रकृतीचा बिलकुल विचार न करतां ते इंग्लंडला जावयास निघाले.

अनवाणी चालावयाचें आणि खाण्यापिण्यांत पुष्कळसे पदार्थ वर्ज्य करावयाचे असें इंग्लंडला निघण्यापूर्वींच कित्येक महिने त्यांनीं नवीन नियम अमलांत आणले होते प्रवासांतहि त्यांनीं हे नियम कडकपणें पाळल्यामुळें इंग्लंडला पोहोंचेपर्यंत गांधींची तब्येत अधिकच बिघडली पायांत गरम पायमोजे व बूट घाला आणि दूध व इतर पौष्टिक पदार्थ खात जा म्हणून डॉक्टरनीं खूप आग्रह करून पाहिला. परंतु गांधी कांहीं ऐकेनात.

" तुम्हीं गरम पायमोजे आणि बूट घालून याल तरच मी तुमची भेट घेईन" असा निर्वाणीचा निरोप त्यांनीं गोखले यांस पाठवावा लागला. मोठमोठ्या पंडित मुत्सद्यांना व सरकारांना जबरदस्त झालेले सत्याग्रही गांधी त्यावेळीं आपल्या राजगुरूंच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास तयार झाले. ते पायमोजे व बूट वापरूं लागले. पण फक्त गोखल्यांच्या भेटीला जाण्यापूर्वीच.

## साम्राज्याच्या सेवेला सादर झाले.

गांधी इंग्लंडमध्यें असतांनाच जगद्व्यापी युरोपियन महायुद्धाला तोंड लागलें ( ऑगष्ट १९१४ ). गांधींनीं लगेच आपल्या प्रकृतीची परवा न करतां इंडियन व्हॉलंटिअर ॲम्ब्युलन्स कॉर्प्स ( हिंदी स्वयंसेवक शुश्रूषापथक ) उभारण्याचा उद्योग हातीं घेतला. ह्या पथकांत प्रथम त्यांनीं आपलें व आपल्या पत्नीचें नांव दाखल केलें. हें पथक उभारण्याचें काम जोमानें सुरू होण्यापूर्वीच प्रकृति फार बिघडल्यामुळें अखेर गांधींना हिंदुस्थानांत यावयास निघणें भागच पडलें. आणि गांधी १९१५ च्या जानेवारी महिन्यांत मुंबईस येऊन दाखल झाले।

आपल्या आयुष्यांतील ऐन जोमाचीं, वाढत्या कर्तृत्वाचीं आणि सर्वस्वी सुखानुकूलतेचीं वर्षें खडतर तपश्चर्येत, स्वदेशबांधवांच्या सेवेंत घालवून; आपल्या जीवन कार्याची तात्विक, व्यावहारिक व सर्वांगीण पूर्वतयारी करून म. गांधी परत स्वदेशीं येऊन दाखल झाले.

'बॅरिस्टर' गांधी १८९३ सालीं एक खटला लढविण्यासाठीं, एक वर्षाच्या अवकाशानें द. आफ्रिकेंत गेले आणि १९१४ अखेर 'महात्मा' गांधी होऊन पुन्हां परत न जाण्याच्या इच्छेनें हिंदुस्थानांत आले।

हिंदुस्थानांत, मुंबई बंदरच्या किनाऱ्यावर पाऊल ठेविल्यापासून ठिकठिकाणीं त्यांच्या स्वागतसमारंभाचा थाट उडूं लागला. ह्या समारंभांत धर्मभेद, पक्षभेद वर्णभेद तर राहिले नव्हतेच परंतु सरकारी अधिकारीहि ह्या सन्मानसमारंभापासून सर्वस्वी अलिप्त राहिलेले नव्हते.

## वेळ आणीबाणीची होती.

गांधी हिंदुस्थानांत आले ती वेळ अगदीं आणीबाणीची होती; लोकमान्य टिळक ६ महिन्यांपूर्वीच तुरुंगांतून सुटून आले होते आणि राजकीय परिस्थितीचें सिंहावलोकन करून कामास लागले होते. पण परिस्थिती कशी होती ?

बंगभंगाच्या चळवळीच्या भीषण सदनशीर युद्धाचे दुष्परिणाम अद्याप सर्वस्वी नष्ट झालेले नव्हते. बंगाल्यांतील हजारो तरुण अटकेंत पडले होते; इं. पि. कोडच्या राजद्रोहाखालील कलमांनीं अद्याप प्रांतोप्रांतींचे कितीतरी उत्साही कार्यकर्ते व पत्रकर्ते तुरुंगांत खडत होते. प्रेस ॲक्टच्या ... मान देऊन पत्रें चालविणारे पत्रकर्ते हवालदिल होऊन गेले होते.

राष्ट्रीयपक्षाची लायक पुढाऱ्याच्या अभावीं दाणादाण उडून गेली होती. ह्या अनवस्थेतून अद्याप ह्या पक्षानें मान वर काढली नव्हती.

राष्ट्रीयपक्षाचा कॉंग्रेसमध्यें प्रवेश व्हावा म्हणून लो. टिळक व मिसेस बेझंट ह्यांनीं चालविलेले सर्व प्रयत्न व्यर्थ गेले होते आणि कॉंग्रेसच्या इतिहासांत अत्यंत दुबळी ठरणारी अशी कॉंग्रेस मद्रास येथें नुकतीच भरून गेली होती.

पण हा काळ निराशेच्या अतिरेकाचा नसून निराशेच्या खोलगर्तेतून वर येण्याकरितां धडपड सुरू होण्याचा होता.

लोकमान्य टिळक व मिसेस बेझंट ह्या दोघांसहि युद्धकालीन साम्राज्य-संकटाचा पूर्ण फायदा घेण्याची स्फूर्ति झाली होती; इतकच नव्हे तर त्यांच्या-मध्यें सहकारिता सुरू झाली होती; मिसेस बेझंट ह्यांच्या प्रयत्नांनीं व गोखल्यांच्या समंजसपणामुळें कॉंग्रेसचें नष्टचर्य संपण्याच्या पंथाला लागलेलें होतें; लोकमान्यांच्या व मिसेस बझंट यांच्या होमरूल चळवळीला आस्ते आस्ते जोर चढू लागला होता; नेमस्तांना गोखल्यांच्या साधेभोळेपणामुळें कॉंग्रेस टिळकांच्या ताब्यांत जाईल कीं काय अशी भीति पडलेली होती.

जर्मनीचे रट्टे खात खात दोस्त सरकारें "व्यवस्थित माघार" घेण्यांत गुंतून गेलीं होतीं आणि हिंदुस्थानांत होतें नव्हतें तेवढें गोरें लष्कर लॉर्ड हार्डिंज यांनीं रणांगणावर रवाना करून दिलें होतें. इतकेंच नव्हे तर मनुष्य बळ, द्रव्यबळ आणि दारूगोळाबळ यांची प्रचंड उणीव सरकारला भासत होती !

एका बाजूस टिळक बेझंट ह्यांची वाढती व सरकारच्या दृष्टीनें भयप्रद वाढती चळवळ आणि दुसऱ्याबाजूस युद्धारंभीच घ्याव्या लागणाऱ्या चौफेर माघारीनें व सर्वतोपरी गरजू परिस्थितीमुळें हिंदुस्थान सरकारहि किंचित् चिडून गेलेलें आणि पुष्कळच हवालदिल झालेलें.

आमच्या गोड गोखल्यांचा पट्टशिष्य शांती आपणांत परत येत आहे ह्या कल्पनेनें नेमस्तांनीं अशा वेळीं परत येणाऱ्या गांधींचें जिव्हाळ्यानें स्वागत केलें. !

दंडुकेशाहीला आपलीच मनगटें चावीत बसण्यास लावणारा; आणि दिग्विजयी बोअर सरकारला भारी झालेला सत्याग्रही वीर आज आपणांत परत येत आहे ह्या कल्पनेनें राष्ट्रीय पक्षानें गांधींचें कळकळीनें स्वागत केलें.

अडचणीच्या वेळीं दानुश विसरून मित्रांसहि लाजविणारें सहाय्य करणारा,

शांततेचा कट्टा पुरस्कर्ता, आज टिळकवेझंट त्यांच्या मुत्सद्दी डावपेंचावर उलट मात करण्यालायक, साधाभोळा गांधी परत हिंदुस्थानांत येत असलेला पाहून सरकारनेंहि 'कैसर ई हिंद' पदक दान करून त्यांचें स्वागत केलें.

## गांधी व गोखले.

गांधींचे राजगुरु गोखले हे गांधी हिंदुस्थानांत येऊन एक महिना झाला नाहीं तोंच वारले. गांधी गोखल्यांना आपले राजकीय गुरू मानीत. शिष्याच्या नात्यानेंच त्यांच्याशीं आज्ञाधारकपणानें व श्रद्धेनें वागत. आणि आपले हे सत्त्वशील एकनिष्ठ शिष्य आपल्या मागें आपली परंपरा, आपला भारतसेवक समाज उत्तम रीतीनें चालू ठेवतील असें त्यांना वाटत असे.

" येथें ह्या लायब्ररींत इतकीं कपाटेंच्या कपाटें पुस्तकें हवींत कशाला ? भाराभर पुस्तकें वाचून कांहीं होत नाहीं. येथें वेंचक पांच पन्नास पुस्तकें असलीं म्हणजे पुरें आहेत " सर्व्हंट्स ऑफ् इंडिया सोसायटीची कै. वा. गोखले हे गांधींना प्रथमच माहिती करून देत होते. त्यावेळीं ह्या पट्टशिष्यानें आपल्या गुरुजींना रोकडा जबाब विचारला. हिंद स्वराज्य ह्या पुस्तकांतील गांधींच्या एकंदर संस्कृतिविषयक कल्पना चुकीच्या किंवा अपरिपक्व आहेत असें गोखल्यांचें ठाम मत होतें. तथापि आपल्यामागें गांधींनींच सोसायटीचें चालकत्व स्वीकारावें अशी त्यांची फार इच्छा होती. येथील एकंदर परिस्थिति पाहिल्यावर त्यांचीं मतें सुधारतील असें गोखल्यांना वाटे. पण गोखल्यांचे सहकारी शिष्य गोखल्यांइतके साधे व आशावादी नव्हते. त्यांनी गोखल्यांच्या मागें फार मोठ्या बहुमतानें गांधींचा सभासद करून घेण्याविषयींचा अर्ज नामंजूर केला. व ह्यामुळें गोखल्यांची सर्व्हंट्स ऑफ् इंडिया सोसायटी गांधींच्या स्वाधीन झाली नाहीं. गांधींनीं एक वर्षभर देशभर फिरून एकंदर परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करावें. आणि मग आपल्या एकंदर मतांचा फेरविचार करून आपलीं मतें सोसायटीच्या हेतूंशीं जमलीं तरच त्यांनीं सोसायटीचें चालकत्व आपणाकडे घ्यावें असें ठरलें.

गांधींनीं अशा रीतीनें केवळ नेमस्तांसच निराश केलें असें नाहीं. ह्यांचें गोखल्यांविषयींचें प्रेम, होमरूलच्या चळवळींत पडण्यास स्पष्ट इनकार, वगैरे कारणांनीं ते जहालपक्षालाहि मवाळ्यासारखे वाटूं लागले. द. आफ्रिकेंत गांधींनीं एक धेड कुटुंब आपल्या घरींच बाळगलें होतें. गुजरायच्या कट्या पुराणमतवादी लोकसमाजाला हा असला सुधारकी बाणा आवडणार कसा ?

लोकांच्या भित्र्या वृत्तीला नांवें ठेऊन राजद्रोहच तुम्हांला इष्ट वाटत असेल तर चोरटा व्यवहार करूं नका; उघड उघड राजद्रोहाचा प्रसार करा असा त्यांचा मर्दानी उपदेश ऐकून आपला हा मित्र कीं शत्रु असा सरकारपुढेंहि प्रश्न उपस्थित झाल्यास नवल नाहीं.

## सत्याग्रहाश्रम.

तीन चार महिने देशांत चोहोंकडे फिरून आणि निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या खासगी भेटी घेऊन अखेर गांधींनीं अहमदाबाद येथेंच आपलें कायम राहण्याचें ठिकाण निश्चित केलें. परंतु त्यांना शहरांतील गलबल्याची, गलिच्छ व गुंतागुंतीची राहणी आवडेना. ह्यामुळें त्यांनीं पवित्र साबरमतीच्या प्रशांत तटावर शहराला लागूनच पण शहराबाहेर अशी जागा पसत केली.

वैशाख शुद्ध ६ गुरुवार ता. २० मे १९१५ च्या शुभमुहूर्तावर गांधींनीं त्या ठिकाणी सत्याग्रहाश्रम संस्थेची स्थापना केली. ह्या आश्रमानें २० एकर जमीन व्यापलेली असून ह्यासाठीं इमारती वगैरे सुद्धां एकंदर तीन लाख रु. खर्च झाले आहेत. त्यांतील अर्धी रकम रगूनचे थॅ. व जव्हेरी डॉ. पी. जे. मेथा ह्यांनीं दिलेले असून बाकीचा खर्च अहमदाबादच्या १०-१२ व्यापाऱ्यांनीं दिलेला आहे.

सत्याग्रहाश्रम हा खरोखरच एक आश्रम व्हावा अशी त्यांची इच्छा होती. तें एक राजकीय व इतर चळवळींचें, धडपडीचें व बडबडीचें केंद्रस्थान व्हावें अशी त्यांची इच्छा नव्हती. ह्या ठिकाणी आपल्या विशिष्ट ध्येयाला अनुरूप असे नागरिक तयार व्हावेत; आपल्या कल्पनासृष्टीतील आदर्शब्रह्मांड पिंडरूपानें येथें निर्माण करावें ह्या कल्पनेनेंच त्यांनीं ह्या आश्रमाची स्थापना केली. त्यांना ह्या ठिकाणी त्रिखंडपंडित शिक्षक नको होते; चारी खंडांतील छात्र एकत्र जमवून संस्कृतिसंमेलनाचा जाहीर कारखाना चालवावयाचा नव्हता; किंवा " आहे तरी काय मौज ती तर पाहूं या ! " असें म्हणणाऱ्या पालकांना व प्रेक्षकांना आकर्षून घेण्याचीहि त्यांची इच्छा नव्हती. त्या ठिकाणीं त्यांना जगावें कसें आणि कशाला जगावें ? हें आचरून दाखविण्याचें व दाखविण्याचें कार्यक्षेत्र निर्माण करावयाचें होतें. परंतु नजर चुकीनें म्हणा किंवा चुकीच्या सहानुभूतिपर नजरेमुळें म्हणा ह्या आश्रमाचें उद्देशपत्रक व नियमपत्रक कित्येक वर्तमानपत्रकर्त्यांच्या हातीं पडलें व तें प्रसिद्ध झालें. आश्रमाचा वाजा गाजावाजा झाला आणि टीकाहि झाली.

### कर्मवीराचीं किरकोळ कामें.

गांधी तापसी असतील; सत्यमूर्ति असतील, अहिंसामय असतील आणि शांतिप्रिय असतील—नव्हे आहेत. परंतु ते कांहीं संन्यासी नव्हते व नाहींत. ते कर्मयोगी आहेत. कर्मवीर आहेत. मग ते एखादा मठ किंवा आश्रम स्थापन करून त्यांत अध्ययन अध्यापन किंवा ध्यान चिंतन करीत भारीच बसणार ?

हिंदुस्थानांत आल्यापासूनच त्यांनीं आपल्या साध्या राहाणीच्या शपथेला अनुसरून देशी ( काठेवाडी ) पोशाख स्वीकारला, अगदीं जरूरीवांचून इंग्रजी भाषा वर्ज्य केली. तिसऱ्या वर्गाच्या डब्यांतून प्रवास करण्याचा प्रघात त्यांनीं पाडलाच होता. गांधी प्रथमच कलकत्त्याला गेले त्यावेळीं तर त्यांच्या ह्या नियमांमुळें प्लॅटफॉर्मवर त्यांच्या स्वागताकरितां जमलेल्या शेंकडो बडया लोकांची मोठीच धांदल उडाली ! पहिल्या वर्गाचे आणि मागाहून दुसऱ्या वर्गाचे डबे धुंडाळतांना पुरेवाट ! इतक्यांत गांधी तिसऱ्या वर्गाच्या एका डब्यांतून शांतपणें खालीं उतरले !

तिसऱ्या वर्गातून प्रवास करूं लागतांच हिंदुस्थानच्या आगगाड्यांतील तिसऱ्या वर्गाच्या उतारूंच्या अमानुषी हालअपेष्टांची गांधींना चांगलीच कल्पना आली.

काठेवाडच्या आगगाड्यांचें विरमगांव हें सदर स्टेशन ब्रिटिश व संस्थानी मुलखांच्या सरहद्दीवर असल्यामुळें तेथें येणाऱ्या जाणाऱ्या उतारूंकडून जवळच्या मालावर जकात घेण्यांत येत असे. ह्या कामीं उतारूंना, विशेषत: तिसऱ्यावर्गाच्या उतारूंना विलक्षण त्रास होत असे. गांधींच्या प्रयत्नांनीं ही जकात घेण्याची पद्धत बंद करण्यांत आली.

तिसऱ्या वर्गाच्या उतारूंनीं स्वत: कसें वागावें व रेल्वे अधिकाऱ्यांनीं कसें वागावें ह्यासंबंधानें त्यांनीं कांहीं सूचना करणारें एक हस्तपत्रक काढून त्याचा खूब प्रसार केला होता व बरीच लोकमतजागृति केली होती. उतारूंना उद्देशून त्यांनीं लिहिलें होतें, " प्रवास करतांना मी ब्राह्मण आहें, वैश्य आहें, शूद्र आहें आणि दुसरा निराळ्या जातीचा आहे, अथवा हा हिंदू आहे आणि तो मुसलमान आहे, अथवा मी मुंबईकर आहें आणि तो मद्रासी आहे असा भेद-भाव बाळगून द्वेष वाढविण्याऐवजीं आपण सर्व कारणपरत्वें एकाच छत्राखालीं जमलेले भाऊबंद आहोंत असें समजून वागतील तर ह्या घटकेमच सुखी व्हाल

आणि हिंदुस्थानचें नांव राखाल. " रेल्वे अधिकाऱ्यांना " इतकें समजलें पाहिजे कीं आपण जनतेचे नोकर आहोंत; त्यांचे धनी नाहीं. त्यांच्या अडचणी दूर कराव्यात हा आपला धर्म आहे. त्यांच्या अडचणी आपण वाढविणें हा तर मोठाच अन्याय आहे."

### कारस्थानी कर्टिस.

हिंदुस्थानांत ह्यावेळीं होमरूलची चळवळ चांगली जोरांत आली होती. आणि आपली अडचणीची परिस्थिति ब्रिटिश मुत्सद्दी पूर्णपणें ओळखून होते. अशा स्थितींत ह्या चळवळीसंबंधानें पुढें काय ? हा प्रश्न त्यांच्यापुढें आणि ब्रिटनमधील राजकारणी व विचारी गृहस्थांच्या मनांत उत्पन्न होणें साहजिकच आहे. तेव्हां राऊंड टेबल संस्थेचे सेक्रेटरी लायोनेल कर्टिस हे कारस्थानी गृहस्थ ह्यावेळीं हिंदुस्थानांत येऊन धिमेपणानें, व्यवस्थितपणानें आणि शास्त्रशुद्ध पद्धतीनें ह्या प्रश्नाचें उत्तर मिळविण्याच्या प्रयत्नांस लागले असल्यास नवल नाहीं. शिवाय कर्टिस ह्यांस असे राजकीय संक्रमणाच्यावेळीं राजकीय घटनांचे खेळ खेळण्याची कला चांगलीच अवगत झालेली होती. बोअर युद्धानंतर द. आफ्रिकेंतील निरनिराळ्या वसाहतींचा संयुक्तसंघ स्थापन करण्याची घटना तयार करण्याचे कामीं ह्यांचा बराच हात होता; द. आफ्रिकेंतून हिंदी लोकांची हकालपट्टी सर्वय व सुलभ करण्याचे कामीं ह्यांनीं बरीच सक्रिय सहानुभूति दाखवून द. आफ्रिकेंत शुद्ध सफेत साम्राज्य निर्माण करण्याच्या कल्पनेला त्यांनीं चांगलेंच पाठबळ दिलें होतें. कर्टिस हिंदुस्थानांत आले ते ब्रिटिश व हिंदी जबाबदार अधिकाऱ्यांच्या विनंतीवरून किंवा स्वतःच्या प्रेरणेनें तें समजण्यास नीटसा मार्ग नाहीं. परंतु त्यावेळचे संयुक्त प्रांताचे ले. गव्हर्नर सर जेम्स ( आतां लॉर्ड ) मेस्टन व एक कौन्सीलर सर वुइलियम मेरिस ह्यांची त्यांना सक्रिय व सढळ सहानुभूति होती; सर्व प्रांतिक सरकारांतून त्यांना मनमोकळेपणानें वावरतां येत होतें वगैरे गोष्टी जगजाहीर होत्याच.

*हातपणें, खासगी रीतीनें ठिकठिकाणीं लायक गृहस्थांचीं छोटीं मंडळें बनवावीं; त्यांनीं व्यक्तिशः व संघशः हिंदी राजकीय सुधारणांच्या भावी स्वरूपाचा व एकंदर धोरणाचा विचार करावा आणि आपली व्यवस्थित योजना वरिष्ठ मंडळाकडे पाठवावी व अशा रीतीनें अनेक ठिकाणच्या अनेक लायक लोकांच्या वैय्यक्तिक व संघटित विचारांचा परिपक्व विचारसंग्रह करून हिंदी राजकीय मोक्षप्राप्तीचा अखेर मुक्काम, मार्ग व त्यांतील टप्पे ह्यांचें स्वरूप निश्चित कर-*

त्याची त्यांची पद्धत शास्त्रशुद्ध होती ह्यांत शंका नाहीं; परंतु तिचे हेतु किती शुद्ध होते ह्यांची मात्र जबरदस्त शंका आहे.

हिंदी राजकीय प्रगतीचें पर्यवसान, टप्पे व वेग निश्चित करतांना साम्राज्य-वादाचा पगडा त्यांच्या मनावर पूर्णपणें बसलेला होता. पण साम्राज्य म्हणजे एक स्वयंशासक राष्ट्रसंघ अशी मात्र त्यांची कल्पना नव्हती. ( १ ) साम्राज्य ही गोऱ्या लोकांचें वर्चस्व काळ्या लोकांवर, वाढत्या भूगोलभागावर कोणत्या रीतीनें कायम राहून शकेल ? आणि हिंदुस्थानांत राजकीय सुधारणा तर करावयाच्याच; परंतु त्या योगानें ( २ ) हिंदुस्थानचा राजकीय मोक्ष शक्य तितका जवळ न येतां शक्य तितका, डोळ्यांत न भरतां, लांवणीवर कसा ढकलतां येईल हे दोनच प्रश्न वस्तुतः त्यांना सोडवावयाचे होते असें म्हणणें धाडसाचे होणार नाहीं. ह्या करितांच त्यांनीं ( १ ) साम्राज्यमंडळाची कल्पना काढली. ही कल्पना अशी होती कीं, साम्राज्यातील सर्व स्वयंशासक देशांचें एक प्रतिनिधिमंडळ असावें व त्यानें साम्राज्यविषयक प्रश्न सोडविण्यास प्रधानमंडळास मदत करावी. हिंदुस्थान स्वयंशासक नसल्यामुळे त्याला ह्या मंडळांत प्रतिनिधित्व नसावें व पुढें मार्ग मिळालें तरी हिंदुस्थानविषयक प्रश्नांत सर्व वसाहतींचे हितसंबंध एकच असल्यामुळे हिंदुस्थानाला अनुकूल असें बहुमत कधींच होऊं नये. ( २ ) आपल्या दुसऱ्या हेतूच्या सिद्ध्यर्थ त्यांनींच मूळ द्विदल राज्यपद्धतीची कल्पना काढली. जर मूळ काँग्रेसलीगच्या योजनेच्या धर्तीवर युद्धोत्तरकालीन राजकीय सुधारणा घडविण्यांत आल्या असत्या तर कौन्सिलें व तदनुषगानें एकंदर राज्यकारभारांत कार्यकुचंवणा उत्पन्न करून लोकपक्षाला संपूर्ण स्वराज्याच्या रोखानें पुढें पुढें धांव घेणें सुलभ पडलें असतें.

कर्टिस साहेबांचे हे अंतस्थ प्रयत्न सरकारी अधिकाऱ्यांच्या सहानुभूतीनें कित्येक दिवसपर्यंत किती तरी काळपर्यंत सुरू असूनहि आमच्या पुढाऱ्यांना त्याची दाद लागली नाहीं किंवा त्या पद्धतीवर परिश्रमपूर्वक एखादी योजना तयार करण्याची कल्पना त्यांना सुचली नाहीं किंवा आवश्यकता भासली नाहीं आणि हिंदुस्थान सरकार व स्टेट सेक्रेटरी ह्यांच्यांत सुधारणांच्या योजनेसंबंधानें पत्रव्यवहार सुरू आहे असें समजतांच ऐनवेळीं वरिष्ठ कायदे-कौन्सिलच्या कांहीं सभासदांनीं एक योजना तयार करून हिंदुस्थान सरकार-मार्फत स्टेट सेक्रेटरीकडे पाठवून दिली आणि अखेर लखनौ काँग्रेसनें त्याच योजनेवर आपल्या मान्यतेचा शिक्का ठोकून दिला.

मुदतबंदी मजूरपद्धत म्हणजे प्राचीनकाळच्या गुलामगिरीची सुधारून वाढविलेली व सरकारी कायद्यांनी सनदशीर ठरलेली गोरी आवृत्तीच होय. गांधींच्या द.आफ्रिकेतील मुक्कामांत त्यांना ह्या पद्धतीचें अंतर्बाह्य सैतानी स्वरूप माहीत झालें होतेंच. परंतु आतां फीजी वगैरे अनेक ठिकाणच्या ह्या पद्धतीचा विशेष बभ्रा झाला होता. अनाथनाथ गांधींना आतां स्वस्थ बसवेना. त्यांनीं ह्या पद्धतीची कायमची उचलबांगडी करण्याचा निश्चय केला.

ना. गोखले, पं. मदनमोहन मालवीय वगैरेंच्या प्रयत्नांनीं हिंदुस्थानांत सरकारला ह्या प्रश्नाचा अनुकूल निकाल करणें भाग पडलें. ही पद्धत अनीतीची वाढ करणारी आहे ही गोष्ट खुद्द व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज ह्यांनाहि कबूल होती. ह्या बाबतींत त्यांनी केलेल्या हिंदी लोकमताच्या निर्भीड पुरस्काराबद्दल त्यांना पुष्कळांचा बराच रोष सहन करावा लागला पण त्यांनीं ही पद्धत पूर्णपणें बंद करण्यापूर्वी पूर्वतयारीला कांहीं थोडी मुदत मागून घेतली होती.

आतां ती पद्धत बंद केव्हां होणार तें नीटसें कळेना. गांधींनीं हा प्रश्न हातीं घेतला व त्यांच्या आणि त्यांचे सहकारी अँड्रयूज व पोलाक ह्यांच्या प्रयत्नांनीं सर्व हिंदुस्थानचें लक्ष ह्या प्रश्नाकडे वेधलें. खुद्द स्त्रीवर्गांतहि ह्यावेळीं विलक्षण जागृति झाली होती व स्त्रियांचें एक शिष्टमंडळहि व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफोर्ड ह्यांच्या भेटीला गेलें. पं. मदनमोहन मालवीय ह्यांनीं हा प्रश्न वरिष्ठ कायदेकौन्सिलांत उपस्थित केला. मिशनरी लोकांनीं ह्या पद्धतीचा निषेध केला आणि अँग्लोइंडियन पत्रेंहि आपला देहस्वभाव विसरून ह्या चळवळीविषयीं सहानुभूति दर्शवूं लागलीं. परंतु लॉर्ड चेम्सफोर्ड ह्यांनीं ह्या सर्व चळवळीकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं कौन्सिलांत स्पष्ट सांगितलें कीं, केवळ हिंदी लोकांच्या मतांचाच विचार करून भागणार नाहीं. वसाहतींच्याहि सोयी गैरसोईंचा विचार केला पाहिजे. ही पद्धत बंद केल्यास वसाहतींना दुसऱ्या कोणत्या पद्धतीनें मजूरांचा पुरवठा करतां येईल त्याचाहि विचार केला पाहिजे!

आपल्या सोई करून घेणें हें काम वसाहतींचें आहे; हिंदुस्थानानें कांहीं वसाहतींना मजूर पुरविण्याचा मक्ता घेतलेला नाहीं असें लॉर्ड हार्डिंज ह्यांनीं ह्याच प्रकारच्या आक्षेपकांना ह्यापूर्वींच उत्तरें दिलीं होतीं. पण आतां हा प्रश्न समर्पक युक्तिवादानें सुटण्यासारखा नव्हता.

### सत्याग्रहाचें सूतोवाच

सत्यासाठीं समर्पक युक्तिवाद निरर्थक ठरल्यावर सत्याग्रहावांचून दुसरा

## कारस्थान उघडकीस आणलें.

ह्या लढतींत काँग्रेसच्या ऐन धांदलीत गांधींनीं ह्या बाबतींत एक मोठीच कामगिरी बजावली. कर्टिस ह्यांनीं आपल्या राऊंड टेबल संस्थेच्या सभासदांना उद्देशून सेक्रेटरी ह्या नात्यानें एक खासगी पत्र पाठविलें होतें. ह्या पत्रांत त्यांनीं आपली साम्राज्यमंडळाची योजना त्यांच्या विचाराकरितां पुढें मांडली होती. हें पत्र सुदैवानें म. गांधींच्या हातीं आलें आणि गांधींचे द. आफ्रिकेंतील सहकारी मि. पोलॅक ह्यांनीं तें जगजाहीर केलें!

कर्टिस आणि गांधी व कर्टिस आणि सत्याग्रह ह्यांचा संबंध कांहीं विचित्र आहे! एशियाटिक्स ॲक्टचे आद्यजनक हेच कर्टिस होत. आणि ह्या कायद्याला हाणून पाडणारे आधुनिक सत्याग्रह युद्धपद्धतीचे आद्यजनक गांधी हेच होत. हेच कर्टिस सध्यांच्या द्विदलराज्यपद्धतीचे व कौन्सिलकल्पनांचे जनक असून ह्याच सुधारणायोजनेवर बहिष्कार घालणाऱ्या असहकार-मार्गाचे आद्यजनक गांधीच आहेत!

ह्या पत्राच्या प्रसिद्धीनें अत्यंत महत्वाची राजकीय व राष्ट्रीय कामगिरी बजावली, ती ही कीं, खुद्द आपल्या घरीं येणाऱ्या हिंदी लोकांचा छळ करूनच न थांबतां वसाहती हिंदी लोकांच्या घरीं येऊन त्यांच्यावर उलट हुकमत चालविणार होत्या; ती योजना अखेर मनोराज्यांतच राहून गेली.

## प्रांतिक परिपदेंत.

" स्त्रीजातीचें संरक्षण केलें पाहिजे. अन्यायाची मर्दानी चीड, दया आणि स्वाभिमान ह्यांच्यासाठीं आपण मिसेस बेझंट ह्यांचा कैवार घेतला पाहिजे. सरकारनें एका स्त्रीवर हात उगारला आहे आपली स्त्रीदाक्षिण्याविषयीं प्रसिद्धि आहे. ह्यासाठीं ह्या नामुष्कीला कारणीभूत होणारें मूळ कारणच आपण दूर केलें पाहिजे." असें म्हणून गांधींनीं १९१६ च्या अहमदाबाद येथील प्रांतिक परिषदेंत मिसेस बेझंट ह्यांस राज्यरक्षक ( डीफेन्स ऑफ् इंडिया ) कायद्याखालीं मुंबई इलाख्यांत प्रवेश करण्याची मनाई करण्यांत आली होती; त्याबद्दलचा निषेध करणारा ठराव परिषदेपुढें मांडला.

मुदतबंदी कराराने परदेशीं मजूर पाठविण्याची पद्धतच सरकारनें बंद करावी अशा अर्थाचा ठराव गांधींनीच ह्या परिषदेपुढें सादर केला. गांधी अशा प्रचलित राजकारणांत भाग घेऊं लागले नव्हते. असें असूनहि ते ह्या परिषदेला हजर राहिले ते यासाठींच.

मुदतबंदी मजूरपद्धते म्हणजे प्राचीनकाळच्या गुलामगिरीची सुधारून वाढविलेली व सरकारी कायद्यांनी सनदशीर ठरलेली गोरी आवृत्तीच होय. गांधींच्या द.आफ्रिकेंतील मुक्कामांत त्यांना ह्या पद्धतीचें अंतर्बाह्य सैतानी स्वरूप माहीत झालें होतेंच. परतु आतां फीजी वगैरे अनेक ठिकाणच्या ह्या पद्धतीचा विशेष बभ्रा झाला होता. अनाथनाथ गांधींना आतां स्वस्थ बसवेना. त्यांनीं ह्या पद्धतीची कायमची उचलबांगडी करण्याचा निश्चय केला.

ना. गोखले, पं. मदनमोहन मालवीय वगैरेंच्या प्रयत्नांनीं हिंदुस्थानांत सरकारला ह्या प्रश्नाचा अनुकूल निकाल करणें भाग पडलें. ही पद्धत अनीतीची वाढ करणारी आहे ही गोष्ट खुद्द व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज ह्यांनाहि कबूल होती. ह्या बाबतींत त्यांनी केलेल्या हिंदी लोकमताच्या निर्भीड पुरस्काराबद्दल त्यांना पुष्कळांचा बराच रोष सहन करावा लागला पण त्यांनीं ही पद्धत पूर्णपणें बंद करण्यापूर्वी पूर्वतयारीला कांहीं थोडी मुदत मागून घेतली होती.

आतां ती पद्धत बंद केव्हा होणार तें नीटसें कळेना. गांधींनीं हा प्रश्न हातीं घेतला व त्यांच्या आणि त्यांचे सहकारी अॅंड्रयूज व पोलाक ह्यांच्या प्रयत्नांनीं सर्व हिंदुस्थानचे लक्ष ह्या प्रश्नाकडे वेधलें खुद्द स्त्रीवर्गांतहि ह्यावेळीं विलक्षण जागृति झाली होती व स्त्रियांचें एक शिष्टमंडळहि व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफोर्ड ह्यांच्या भेटीला गेलें. पं. मदनमोहन मालवीय ह्यांनीं हा प्रश्न वरिष्ठ कायदे-कौन्सिलांत उपस्थित केला. मिशनरी लोकांनीं ह्या पद्धतीचा निषेध केला आणि अँग्लोइंडियन पत्रेंहि आपला देहस्वभाव विसरून ह्या चळवळीविषयीं सहानुभूति दर्शवूं लागली. परंतु लॉर्ड चेम्सफोर्ड ह्यांनीं ह्या सर्व चळवळीकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं कौन्सिलांत स्पष्ट सांगितलें कीं, केवळ हिंदी लोकांच्या मतांचाच विचार करून भागणार नाहीं. वसाहतींच्याहि सोयी गैरसोईचा विचार केला पाहिजे. ही पद्धत बंद केल्यास वसाहतींना दुसऱ्या कोणत्या पद्धतीनें मजूरांचा पुरवठा करतां येईल त्याचाहि विचार केला पाहिजे!

आपल्या सोई करून घेणें हें काम वसाहतींचें आहे; हिंदुस्थानानें कांहीं वसाहतींना मजूर पुरविण्याचा मक्ता घेतलेला नाहीं असें लॉर्ड हार्डिंज ह्यांनीं ह्याच प्रकारच्या आक्षेपकांना ह्यापूर्वीच उत्तरें दिलीं होतीं. पण आतां हा प्रश्न समर्पक युक्तिवादानें सुटण्यासारखा नव्हता.

## सत्याग्रहाचें सूतउवाच

सत्यासाठीं समर्पक युक्तिवाद निरर्थक ठरल्यावर सत्याग्रहावांचून दुसरा

मार्गच उरत नाहीं; ही गोष्ट गांधींना दुसऱ्या कोणी शिकविण्याचें कारणच नव्हतें.

गांधींच्या अध्यक्षतेखालीं मुंबई येथील सुप्रसिद्ध शांतारामाच्या चाळींत ११ फेब्रुवारी १९१७ रोजीं एक खरोखरच जंगी जाहीरसभा भरली होती. ह्या सभेंत खुद्द लोकमान्य टिळकांनीं पुढील ठराव मांडला.:—

" ह्या सभेचें असें मत आहे कीं, मुदतबंदी पद्धतीनें परदेशीं मजूर पाठविण्याची चाल घातकी आहे; ती अनीतीला उत्तेजन देणारी आहे. त्या पद्धतीचे दुष्परिणाम केवळ परदेशीं जाणाऱ्यांवरच होत नसून त्याचे उलट परिणाम हिंदुस्थानांतही जाणवतात. आणि हिंदुस्थानाला ह्या पद्धतीपासून कसलाच फायदा होत नाहीं, याकरितां ह्या सभेचें असें मत आहे कीं, हिंदुस्थान-सरकारनें विलंब न लावतां विनशर्त ही पद्धत बंद करावी. ३१ मे १९१७ ह्या तारखेच्या आंत ही पद्धत बंद करण्याची मुदत व्हाइसरायांस देण्यांत येत आहे. ह्या मुदतींत व्हाइसरायांनीं सल्लागार मंडळाचा सल्ला घ्यावा.

" ह्या सल्लागार मंडळांत हिंदी जाहीरसभांतून निवडलेल्या लोकपक्षीय सभासदांचा परिणामकारक प्रमाणांत समावेश करण्यांत यावा.

" ह्या मंडळीनें केलेल्या सूचना सरकारनें लोकांच्या विचाराकरितां जाहीर कराव्यात व त्यावर लोकमत स्पष्टपणें व्यक्त होईपर्यंत त्यांची कोणत्याहि प्रकारें अंमलबजावणी होऊं नये.

" ता. ३१ मे पर्यंतच्या मुदतींत जे मजूर परदेशीं पाठविण्यांत येतील ते सहकुटुंब पाठविण्यांत यावेत. एकटीच स्त्री किंवा एकटाच पुरुष मजूर म्हणून पाठविण्यांत येऊं नये आणि ज्या शर्तीवर मजूर परदेशीं रवाना होत असेल त्या शर्ती मजुराला त्याच्या भाषेंत समजावून सांगण्याची खात्रीलायक व्यवस्था झाली पाहिजे."

ह्या ठरावावर मतें घेतांना गांधींनी सर्वांस बजावून सांगितलें कीं, ह्या ठरावाचें रहस्य व त्या योगानें स्वतःवर येणारी जबाबदारी नीट लक्षांत घ्या आणि मग हात वर करा. सभेंतील भाषणांचा समारोप करतांना गांधी पुन्हा म्हणाले, ता. ३१ ची आठवण ठेवा आणि आपल्या कर्तव्यालाहि विसरूं नका.

गांधींचा हा ठराव पुढील परिणामांच्या बाबतींत मुग्ध होता. पण गांधींची ही धमकी कांहीं पोकळ नव्हती. फक्त लोकांची धाक दवडण्याची गांधींची इच्छा नव्हती.

सरकारला युद्धकार्यासाठीं मनुष्यबळाची अत्यंत जरूरी असल्यामुळें ह्यापुढें डिफेन्स ऑफ् इंडिया ॲक्टखालीं परदेशीं मजूर पाठविणें बंद करण्यांत येत आहे असा हिंदुस्थान सरकारनें ३१ मेच्या आंतच ठराव केला!

## हिंदु विश्वविद्यालय.

पं. मदनमोहन मालवीय ह्यांचें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत अजरामर करणाऱ्या हिंदुविश्वविद्यालयाची कोनशीला बसविण्याचा समारंभ त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज् ह्यांच्या हस्तें ४-२-१९१६ रोजीं झाला. त्यावेळीं महात्मा गांधींचेंही एक व्याख्यान झालें.

गांधींनीं प्रथम इंग्रजींत भाषणें करण्याची प्रवृत्ति, हिंदूंचा घाणेरडेपणा व गबाळेपणा आणि दरिद्री हिंदुस्थानांतील श्रीमान् राजे रजवाड्यांचा व जमीनदार, वकील डॉक्टर ह्यांचा डामडौल ह्यांजवर टीका करून तें पुढें प्रचलित राजकीय परिस्थितीचा विचार करतांना "अराजकांच्या स्वदेशप्रीतीबद्दल मला मोठा आदर आहे" असें सांगून त्यांच्या अत्याचारी व चोरट्या मार्गाचा त्यांनीं निषेध केला. इतक्यांत मिसेस बेझंट त्यांच्या व्याख्यानास हरकत घेऊं लागल्या. अराजकांचा अत्याचारी व चोरटा मार्ग हा नैतिक अधोगतीचा मार्ग आहे; इंग्रजांनीं येथून निघून जावें असें तुम्हांला वाटत असेल तर तसें उघड बोलून दाखवा; मग त्यासाठीं मृत्यु आला तरी डरूं नका. "सध्यांच्या उभयपक्षीं वसत असलेल्या संशयपूर्ण वातावरणांतून हिंदुस्थानाला मला मुक्त करावयाचें आहे" अशा सारखे विचार प्रगट करून ते पुढें खास हिंदी लोकांच्या खुशामती व लबाडीच्या वृत्तीचा निषेध करूं लागले.

मिसेस बेझंट ह्यांनीं मूळ चिथावणी दिलेला व आतांपर्यंत सारखा धुमसत चाललेला कांहीं व्यक्तींचा विरोध ह्यावेळीं वाढत जाऊन व्यासपीठावरील राजे-महाराजे एकामागून एक उठून जाऊं लागले. अखेर व्याख्यान अर्धवटच राहिलें.



# प्रकरण १२ वें.

# चंपारण्यांतील कार्य



गांधी अद्याप राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेऊं लागले नव्हते. परंतु राष्ट्रांतील सर्व प्रकारच्या विचारप्रवाहांची व कार्यप्रवाहांची प्रत्यक्ष ओळख करून घेण्याची संधि ते कधींच व्यर्थ दवडीत नसत उलट कॉंग्रेसमधील जहालमवाळ्यांचा समेट अशासारख्या प्रत्यक्ष राजकीय किंवा पक्षविषयक नसलेल्या कामांत ते स्वतः खटपटही करीत. १९१६ च्या संस्मरणीय लखनौ कॉंग्रेसला ते हजर होते.

उत्तरबहार प्रांतांमधील चंपारण्यांतील १६ लाख रहिवाशांची करुण कहाणी राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या कानांवर घालावी आणि राष्ट्रीय सभेची सहानुभूति मिळवावी ह्या हेतूने पं. राजकुमार शुक्ल हे गृहस्थ चंपारण्य जिल्ह्यातर्फे प्रतिनिधि म्हणून लखनौ कॉंग्रेसला हजर राहिले होते. पं. मदन मोहन मालवीय आणि गांधी ह्यांच्यापुढें साश्रुनयनांनी त्यांनी आपल्या करुणकहाणीचा पाढा वाचला. त्या दोघांच्या प्रयत्नांनी कॉंग्रेसनें असा ठराव मंजूर केला कीं, सरकारनें चंपारण्यामधील युरोपियन मळेवाल्यांविरुद्ध रयतेचीं जीं गाऱ्हाणीं असतील त्यांची चौकशी करण्याकरितां हिंदी व युरोपियन लोकांचे एक चौकशी कमिशन नेमण्यांत यावें. वस्तुस्थिति प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिली नसल्यामुळें गांधींनीं सर्वांच्या आग्रहास न जुमानतां या ठरावावर भाषण करण्याचे मात्र नाकारलें.

सरकार त्या ठरावाचा विचार करणार आणि चौकशी कमिशन नेमून विचार करणार ही गोष्ट अशक्य नसली तरी इतकी कालावधीची होती कीं, पुष्कळ पुढाऱ्यांनीं तेथपर्यंत वाट न पाहतां गांधींनीं समक्ष जाऊन तेथील परिस्थितीची पहाणी करावी अशी त्यांना आग्रहाची विनंति केली.

## प्रत्यक्ष चंपारण्यांत.

एक दिवस बाबू राजेंद्रप्रसाद वर पहातात तर समोर गांधीजी उभे!

म. गांधी आले ! म्हणून चोहोंकडे कुजबुज सुरू झाली. मझरूल हक् हे राजेंद्र-बाबूंच्या घरीं आले आणि गांधींना तेथून आपल्या घरीं घेऊन गेले.

गांधींनीं आपण तिकडे केव्हां येणार किंवा काय, तें कोणासहि आगाऊ कळविलें नव्हतें. ह्यामुळें बांकीपूर स्टेशनवर गांधी उतरले, त्यावेळीं कोणासहि त्यांची दाद नव्हती. गांधी मुकाट्यानें स्टेशनमधून उतरले ते पायींच राजेंद्र-प्रसाद ह्यांच्या घरीं गेले.

इतक्यांत गांधींच्या कानावर अशी कुणकुण आली कीं, आपणाला चंपारण्य जिल्ह्यांत प्रवेश करण्याची मनाई करण्यांत येणार आहे. लगेच गांधी उठले ते परत स्टेशनवर गेले आणि मोतीहारी गांवाला जाणाऱ्या पहिल्याच गाडींत बसून चंपारण्याच्या मुख्य ठिकाणीं जाऊन दाखल झाले. व एका प्रमुख वकीलाच्या घरीं त्यांनीं आपलें बिऱ्हाड केलें.

ता. १५ एप्रिल १९१७ रोजीं गांधींनीं प्रत्यक्ष चंपारण्यांत पाऊल ठेविलें आणि दुसऱ्याच दिवशीं जिल्हा मॅजिस्ट्रेटनें त्यांच्यावर अशी नोटीस बजावली कीं, गांधींच्या वास्तव्यानें जिल्ह्यांतील सार्वजनिक शांततेला धोका येऊन भयंकर अस्वस्थता माजण्याचा संभव असल्यामुळें त्यांनीं नोटीस पोंचतांच पुढें मिळणाऱ्या पहिल्या गाडीनें जिल्ह्याबाहेर निघून जावें.

## कायदेभंग.

" सार्वजनिक जबाबदारीकडे पाहतां मला हा हुकूम मानतां येत नाहीं. ह्या कायदेभंगाबद्दल अधिकाऱ्याच्या मर्जीस येईल तें प्रायश्चित भोगण्यास मीं तयार आहें " असें म्हणून गांधींनीं आपल्या आयुष्यांतील हिंदुस्थानांतील पहिलाच कायदेभंग केला. परंतु त्यावेळीं त्यांनीं अधिकाऱ्यांना असेंहि कळविलें कीं, आपल्या येथील आगमनाचा मुख्य हेतु चळवळ करण्याचा नसून वस्तुस्थितीचें निरीक्षण करावें हाच आहे.

कायदेभंगाचा परिणाम महात्माजी जाणूनच होते. आणि म्हणूनच त्यांनीं आपलें हातीं घेतलेलें काम आपल्या गैरहजीरींत बंद पडूं नये म्हणून आपले सहकारी मित्र मि. पोलॅक ह्यांना तारेनें बोलावून आणलें आणि बिहारमधील नामांकित वकील व पुढारी ह्यांस जमवून आपल्यामागें आपलें काम व्यवस्थितपणें सुरू राहील अशी तजवीज केली. ह्यावळीं सत्याग्रह तर दूर राहिला; पण साधी समाजसेवा सुद्धां अपरिचित असलेले किती तरी धनाढ्य वकील वगैरे त्यांचे कामाला मदत करण्यास पुढें सरसावले.

तुरुंगांत जावयाचें हें निश्चित असल्यामुळें गांधी १८ एप्रिल रोजीं कोर्टांत हजर झाले. बरोबर बिहारमधले बहुतेक सर्व नामांकित वकील व पुढारी हजर होतेच. मॅजिस्ट्रेटनीं खटला २१ तारखेपर्यंत तहकूब ठेविला आणि त्या दिवशीं वरिष्ठ सरकारी हुकमावरून आपला हुकूम रद्द केला.

वरिष्ठ सरकारी हुकूम मिळेपर्यंत तुम्हीं प्रत्यक्ष चौकशी करूं नये असें मॅजिस्ट्रेटनीं त्यांना सूचविलें होतें. आतां हें बंधन न राहिल्यामुळें गांधी एकदम आपल्या कामाला लागले. गांवोगांवीं जाऊन तेथीच परिस्थिति समक्ष पहावी आणि रहिवाशांच्या लेखी जवान्या घ्याव्या असा सपाटा त्यांनीं सुरू केला. गांधी जात त्या ठिकाणीं आसपासचे शेंकडो गांवकरी गोळा होत आणि आपली गाऱ्हाणीं आपखुषीनें निवेदन करीत. अशा रीतीनें गांधींनीं एक महिन्यांत सुमारें सात हजार लोकांच्या जवान्या घेतल्या. आणि त्यांच्या आधारानें आपला रिपोर्ट तयार करून सरकारकडे रवाना केला.

## गाऱ्हाण्यांचें स्वरूप.

ह्या चौकशींत गांधींनीं एक महिन्यांत नमूद केलेल्या गाऱ्हाण्यांचें सामान्य स्वरूप अशासारखें होतें;--

दहा अकरा वर्षे वयाच्या कोंवळ्या मुलांना वेठीस ( फुकट काम करण्यास ) धरण्यांत येई. इजारदार व मुकादम स्त्रियांना जबरदस्तीनें कामावर नेत. आणि ह्या सगळ्यांना सकाळीं ७ ते संध्याकाळीं सातपर्यंत कामावर राबवीत. बारा वाजल्यापासून एक तासपर्यंत खाण्याजेवण्यासाठीं रजा मिळे. ह्या जुलमामुळें कितीतरी लोक आपली जन्मभूमि सोडून नेपाळच्या हद्दींत जाऊन राहिले होते. त्यांच्याकडून सारा जबरदस्तीनें वसूल करण्यांत येई. घरदार, शेतीभाती विकूनहि त्यांना साऱ्याची भरती करतां येत नसे. अशा लोकांकडून जबरीनें प्रॉमिसरी नोटा लिहून घेण्यांत येत व ह्या बाकीसाठीं त्यांना शंभर सव्वाशें रुपये बिघा अशा मातीमोलानें जमीन द्यावी लागे.

मळेवाले रयतेकडून तूप व दुधदही हक्कानें घेत. पण तुपाबद्दल दरशेरीं दोन आणे देत. आणि दहींदुधाला तर किंमतच नसे !

कोठीच्या पटवाऱ्याला रुपयामागें एक आणा पोटत द्यावें लागे आणि पूजाकामाचे वेळीं दर बिघ्यामागें एक रुपया द्यावा लागे. इजारदाराला पण दर बिघ्यामागें एक रुपया द्यावा लागे.

मळेवाला साहेब दरवर्षी शेतकऱ्याच्या जागेपैकीं दर बिघ्यामागें तीन काठ्या, ह्या प्रमाणांत नवी नवी जागा निळीच्या लागवडीसाठीं निश्चित करी. ह्या जमिनींत दरवर्षी दोनदोन पिकें येतात. पण ह्या राखून ठेवलेल्या जागेंत शेतकऱ्याला स्वतःचें निराळें पीक काढण्याची मनाई असे. परंतु त्याबद्दल शेतकऱ्याला कांहींच नुकसान भरपाई मिळत नसे.

दर बिघ्यामागें ३०० ते ३५० रुपयांची निळी पिके. पण शेतकऱ्याला त्यापैकीं फक्त १४ ते २० रुपयेच मिळत. सरकारधारा ह्या रकमेंतूनच कापून घेण्यांत येई. निळीच्या उत्पन्नांत शेतकऱ्याला दर बिघ्यामागें ४० ते ६० रु. इतर खर्च येई. एकंदरींत शेतकऱ्याला निळीच्या लागवडीनें दर बिघ्यामागें १२०-ते १३५ रु. नुकसान येई.

सरकार आम्हांला ह्या त्रासांतून सोडवील तर आम्ही आपलें घरदारच, काय पण स्त्रियांच्या अंगावरचे दागदागिने सुद्धां युद्धखर्चासाठीं देऊन टाकूं असे उद्गार एका प्रतिष्ठित गृहस्थानें काढले होते !

कोठी ( मळयां ) वरील अधिकाऱ्यांच्या जुलूम जबरदस्तीच्या सामान्य गोष्टीविषयीं तर बोलावयासच नको.

## दंगे, लुटालूट आणि उपद्व्याप.

गांधी ह्या कामांत गढून गेले असतांच बिहारमध्यें कित्येक भागांतील कंगाल रयतेनें दुःखकष्ट असह्य झाल्यामुळें लुटालूट केली. कांहीं ठिकाणीं हिंदुमुसलमानांचे दंगेहि झाले.

गांधींच्या प्रयत्नांनीं आपलीं अंधेरांतील गुप्तकारस्थानें चवाट्यावर येणार हें निश्चित झाल्यामुळें सर्व मळेवाले व त्यांचे हितचिंतक जातभाई ह्यांची पुष्कळच त्रेधा उडून गेली होती. ह्या लोकांना ह्या दंग्याधोप्याचें निमित्त फारच चांगलें सांपडलें.

गांधींच्या उपद्व्यापामुळेच चोहोंकडे हे अतिप्रसंग होऊं लागले आहेत अशी ह्या सर्वांनीं ओरड सुरू केली.

आयर्विन् नांवाच्या मळेवाल्यांच्या म्होरक्यानें ह्याचवेळीं पायोनिअरमधून एक पत्र प्रसिद्ध केलें. त्याचा सारांश असा होता कीं;—"विक्षिप्त आणि भोळा, गांधी स्वार्थी वकील, दुष्ट सावकार व इंग्रजद्वेष्टे होमरूलवाले ह्यांच्या चिथावणीनें येथें नसते उपद्व्याप करीत आहे." पायोनिअरनें ह्या पत्रावर अशी मखलाशी केली कीं, बनारस येथील हिंदु युनिव्हर्सिटीच्या स्थापनेच्या वेळीं ह्या

गृहस्थांच्या अंतरंगाची लोकांना चांगली ओळख पटलेली आहे. अशा मनुष्याला सरकारनें उजळमाथ्यानें पाहिजे तिकडे फिरूं देणें धोक्याचें आहे.

" परकीय मनुष्याला बिहारमधल्या कुळांच्या आणि जमीनदारांच्या तंट्यांत पडण्याचें कारण काय ? ह्या तिऱ्हाइत मनुष्याला सरकारनें बिहारबाहेर घालवून द्यावें " असें युरोपियन असोसिएशननें सरकारला सूचविलें.

## सत्याग्रह सफल झाला.

सरकारला ह्या मळेवाल्यांइतका बेशरम उद्दामपणा दाखवितां येणें शक्यच नव्हतें. अखेर सरकारने सदा गृहस्थांची एक चौकशी कमिटी नेमली. आणि त्यातर्फे सभासद म्हणून गांधींचीच नेमणूक केली. ह्या नाटकी येशू ख्रिस्ताच्या पुढें आम्ही साक्षीला उभे राहणार नाहीं, अशी युरोपियन मळेवाल्यांनी ओरड करून पाहिली; पण ती व्यर्थ ठरली.

*कित्येक महिनेपर्यंत कमीटीचें काम चाललें होतें*, आपला द्रव्यार्जनाचा व्यवसाय सोडून कित्ये तरी वकील वगैरे मंडळी ह्या कामीं गांधींना मदत करीत होती.

ह्या कमिटीचें काम सुरू असतांना गांधींच्या सरळवृत्तीची युरोपियन सभासदांना चांगलीच ओळख पटली कमिटीचा रिपोर्ट एकमतानेंच तयार झाला. *ह्या रिपोर्टावर सरकारने जो ठराव प्रसिद्ध केला त्याचा सारांश असा आहे:*--

" रयतेनें आपल्या इच्छेस येईल तेवढ्याच व तितक्याच जमिनींत निळीची लागवड करावी. पिकाची विक्री मालाच्या वजनानें व बाजारभावानें व्हावी निळीचा कमींत कमी दर निळीच्या मळेवाल्यांच्या संस्थेनें ठरवून टाकावा.

" नीळ पिकविण्यासाठीं शक्ति करणेंच गैरकायदा असल्यामुळे त्या सक्तीच्या करारांत रयतांनी मळेवाल्यांस जमीन निळीच्या लागवडीकरितां घेऊं नये म्हणून दर विघ्यास देऊं केलेला तपान नांवाचा दंड आणि कायम मुदतीच्या रयतांनीं देऊं केलेला सारा वेशी नांवाचा जादा कर हे दोन्ही गैरकायदाच ठरतात. त्यासाठीं ' तवान ' बंद करण्यांत यावा आणि तारीखेपासून सोळा २६ टक्के वसा आर्जा राहिलेली रक्कम कायम सारा म्हणून ठरविण्यांत यावी. ' तपान ' परत न करणाऱ्या ठेकेदारांना यापुढें ठेक्यानें जमिनी देण्यांत येऊं नयेत. बेटिया व रामनगर ह्या दोन जमीनदारींत नीळ न पिकविणाऱ्या रयतांकडून " अबवाब " नांवाचा कर वसूल करण्यांत येतो तो बंद करण्यांत यावा. "

याशिवाय कमिशनच्या इतर शिफारशींचाहि अनुकूल परामर्श घेऊन अखेर सरकारी ठरावात गांधींचे ( व मळेवाल्यांच्या प्रतिनीधींचेहि ) त्यांच्या तडजोडीच्या धोरणाबद्दल आभार मानण्यांत आले आहेत.

ह्या शिफारसींना कायदेशीर स्वरूप देणारें चंपारण्य अॅग्रेरियन बिल डिसेंबर १९१७ मध्यें बिहार कायदेकौन्सीलपुढें मांडलें आणि पुढील वर्षी ४ मार्चला त्याला कायदेकौन्सीलनें अखेरची मंजुरी दिली.

## चंपारण्यांतील विधायक कार्य.

" ह्याला आधीं चंपारण्यांतून हांकून द्या " म्हणून युरोपियन मळेवाले ज्या गृहस्थाविषयीं ओरड करीत होते त्या गृहस्थांनाच अखेर बिहारसरकारनें अशी विनंति केली कीं, तुम्ही आणखी सहा महिने बिहारमध्यें रहा आणि गोरे मळेवाले व रयत यांच्यांतील वैमनस्य दूर करण्याचा प्रयत्न करा.

गांधींचें उत्पातकार्य लोकांच्या डोळ्यांत भरतें, त्यांचा कायदेभंग, त्यांचा प्रचण्ड प्रमाणावरील सत्याग्रह, अन्यायाचा तीव्र विरोध वगैरे लोकांना दिसतात, आवडतात व मानवतात. परंतु त्यांचें खरें व आवडतें जीवनकार्य उत्पात व चळवळी हें नमतेंच. समाजसेवा, समाजसुधारणा व त्यासाठीं समाजसंघटना हेंच त्यांचें आवडतें कार्य असतें. दुःखनिवारक उत्पात कार्य प्रवाहपतित म्हणून त्यांना करावें लागतें इतकेंच.

चंपारण्यांतील गरीब रयतेला चालताबोलता देव म्हणून वाटणाऱ्या गांधींनी इतर मोठमोठ्या राष्ट्रीय व प्रचण्ड चळवळींपेक्षां ह्या रचनात्मक-विधायक कार्यालाच विशेष महत्व देऊन पुष्कळशा गुजराथी व दक्षिणी स्वयंसेवकांच्या सहाय्यानें तेथें कामाला सुरुवात केली.

स्वयंसेवकांचीं दोन पथकें बनविण्यांत आलीं. एक खुद्द जिल्ह्याच्या शहरीं मोतीहारी येथें काम करी व दुसरें जिल्ह्यांत संडोपाडीं काम करी. ह्या दुसऱ्या पथकानें ठिकठिकाणीं मोफत शाळा सुरू केल्या. आपल्या संबंधांत येणाऱ्या सर्व गांवकऱ्यांत नवचैतन्य जागृत केलें. स्वयंसेवकांमध्यें कांहीं स्त्रिया होत्या. त्यांच्यामुळें जिल्ह्यांतील स्त्रीवर्गांतहि खूप जागृति झाली. ह्या स्वयंसेविका पडदानशीन स्त्रियांना भेटून त्यांना स्वच्छतेचा उपदेश करीत. मुलांना स्नान कसें घालावें वगैरे बालसंगोपनाची माहिती देत. दोन ठिकाणीं त्यांनीं मुलींच्या शाळाहि स्थापन केल्या. ह्या शाळांत ७ ते २० वर्षें वयाच्या मुली व तरुण स्त्रिया शिक्षण घेऊं लागल्या. पुरुष स्वयंसेवक शिक्षणाचें काम करून उरलेल्या

वेळीत पुरुष वर्गात आरोग्यज्ञानाचा प्रसार करीत. खुद्द गांधी सुद्धां स्वयंसेवकां-बरोबर गांवोगांवीं फिरून लोकांना स्वच्छतेचें महत्व व मार्ग समजावून देत, आणि घाणेरड्या विहिरी व तलाव आणि आजूबाजूची जागा स्वतः अंगमेह-नत करून स्वच्छ करून देत. ह्या भागांत मलेरियाचा उपद्रव फार असल्यामुळें एक खास डॉक्टर स्वयंसेवकाचीहि योजना करण्यांत आली. आणि रयतेला कायद्याचा सल्ला मोफत मिळावा म्हणून एक वकील स्वयंसेवकाचीहि नेमणूक केली.

ह्या संघटना कार्याचे सुपरिणाम प्रत्यक्ष चंपारण्यांत जाऊन येणारालाच सम-जले असते व अजूनहि समजून येईल इतके ते ठळक होते.

राष्ट्रीय असहकारितेच्या ऐन वावटळींतहि चंपारण्य व गांधी ह्यांना परस्प-रांचा विसर पडला नाहीं.



## प्रकरण १३ वें.

# " इकडे तिकडे चोहींकडे. "



वामन अवतारांत वामनाची मूर्ति फार चिमुकली होती. त्याचें पाऊलहि तसेंच चिमुकलें होतें. आणि तेंहि मर्त्यभूमीवरच. पण त्यानें पहिलें पाऊल उचललें, दुसरें उचललें आणि तिसऱ्याच पावलांत स्वर्गहि व्यापून टाकला.'

गांधींची हिंदी राष्ट्रीय चळवळींतील कामगिरी अशीच आहे. कोणत्याहि कार्यांत गांधींचा संबंध येणें हें त्या कार्यांतील युगांतराचें चिन्ह आहे म्हणून खुशाल समजावें.

प्रांतिक परिषदा पुष्कळ भरतात, दरवर्षी भरतात आणि नवे नवे अध्यक्ष त्या परिषदा पार पाडतात. परंतु गांधी गुजराथ प्रांतिक शिक्षण परिषदेचे व राजकीय परिषदेचे अध्यक्ष झाले ते कांहीं अशा मामूलीपद्धतीनें आणि मामूली कार्यासाठीं नव्हे. गांधींनीं हिंदुस्थानांत आल्यावर निवडक कामेंच हातीं घेतलीं. पण जीं जीं कामें हातीं घेतलीं तीं तीं त्या त्या क्षेत्रांत युगांतर घडवून आणण्याकरितांच, आणि त्या त्या दिशेनें उच्चतम कार्य हातीं घेण्याची पूर्व तयारी म्हणूनच !

### शिक्षण परिषद.

आपल्या शिक्षणविषयक विचारांचा राष्ट्राला पूर्णपणें परिचय करून देण्याचें व तदनुषंगिक आपल्या कार्यक्रमाचा राष्ट्राला परिचय करून देण्याचें कार्य गांधींनीं गुजराथ शिक्षणपरिषदेच्या अध्यक्षस्थानावरून केलें. ही परिषद गुजराथ केळवणी ( शिक्षण ) मंडळातर्फे ता. २१ व २२ आक्टोबर १९१७ रोजीं भृगु-कच्छ-भडोच येथें भरली होती. त्या परिषदेंत त्यांनीं आपलीं पुष्कळशीं शिक्षणविषयक प्रमेयें पुढें मांडलीं.

" आपण बोस व रॅाय ह्यांच्यावर अगदीं फिदा होऊन जात असतों. माझी खात्री आहे कीं, आपण ५० वर्षेपर्यंत जें शिक्षण मिळविलें तें जर मातृ-

भाषेतून मिळविलें असतें तर आपल्यांत इतके घोस व राय निर्माण झाले असते की, त्यांच्या अस्तित्वाचें आपल्याला आश्चर्य वाटलें नसतें." असें म्हणून गांधीनीं ह्या भाषणांत मातृभाषेतूनच शिक्षण देण्याची आवश्यकता सविस्तर प्रतिपादन केली आहे.

"इंग्रजी भाषा ही राष्ट्रीय भाषा होईल ही कल्पनाच आपल्या कमकुवतपणाची द्योतक आहे" असें म्हणून गांधीनीं "हिंदीच राष्ट्रीय भाषा होऊं शकेल" असें आपलें मत इतिहास व वस्तुस्थिति ह्यांच्या आधारें व्यक्त केलें.

"आधुनिक शिक्षणांत आपल्या कुटुंबव्यवस्थेकडे लक्ष दिलेलें नाहीं" असें म्हणून त्यांनीं प्रथम शिक्षणविषयांतील न्यूनता दाखविल्या आहेत.

"शिक्षणाचा हेतु शीलसंवर्धन हाच असला पाहिजे" हें तत्व सांगून धार्मिक शिक्षण, शेतीचें शिक्षण, विणकामाचें शिक्षण ह्यांच्या अभावांबद्दल त्यांनीं खेद प्रदर्शित केला आहे.

"आपल्या शिक्षणांत क्षात्रकलेला स्थान नाहीं. मला स्वतःला ती मोठीशी दुःखाची गोष्ट वाटत नाहीं, पण शस्त्रें वापरावयास शिकावें अशी राष्ट्राची इच्छा आहे. ज्याला शिकावयाचें आहे त्याला तशी संधि मिळाली पाहिजे."

'संगीताचा कोठें मागमूसहि दिसत नाहीं. गायनाचा परिणाम आपणावर फार होत असतो. ह्याची स्पष्ट कल्पना आपणाला राहिलेली नाहीं. कल्पना असती तर आपल्या मुलांना तें शिकविल्याखेरीज आपण राहिलोंच नसतों * * * राष्ट्राला जागें करण्यासाठीं संगीताची आवश्यकता आहे."

"आपल्या शाळांतून देशी खेळ, देशी कसरतीचे प्रकार आणि पाश्चात्य पद्धतीची कवाईत सुरू करण्याची आवश्यकता आहे."

"एक पक्षीं आपण स्त्रीला अज्ञानांत आणि अधमावस्थेत ठेवणें हे गैरवाजवी आहे आणि दुसऱ्या पक्षीं स्त्रीवर पुरुषाचें काम लादविणें हें कमकुवतपणाचें चिन्ह आहे. स्त्री जातीवर तो जुलूम आहे." म्हणूनच स्त्रियांना पुरुषांप्रमाणेंच चालू पद्धतीचें शिक्षण मिळावें असें वाटत नाहीं.

"प्राथमिक शिक्षणालयांतील शिक्षकांना शिक्षक म्हणणें हा "शिक्षक" ह्या शब्दाचा दुरुपयोग आहे"

"हायस्कूल, कॉलेजें वगैरे अपकेपाज संस्थांतून दरिद्री हिंदुस्थानाला अंसा खर्च करण्यांत येतो."

" स्त्रीच्या शिक्षणासंबंधानें मला प्रतिकूल अनुभव आलेला आहे. पण माझा अनुभव अल्प असल्यामुळें तो जमेस धरतां येत नाहीं."

" हे सर्व दोष दूर करण्याचा धोपट मार्ग अर्ज करणें हा नव्हे एवढी माझी खात्री आहे. सरकारला प्रयोग करावयास सांगण्याचे पूर्वी स्वतः प्रयोग करून दाखविले पाहिजेत."

" शिक्षणांत स्वराज्याची गुरुकिल्ली आहे."

गांधींच्या शिक्षणविषयक विचारांचा या ठिकाणीं त्यांच्याच शब्दांत मुद्देवार, भरपूर उल्लेख केला आहे. ह्याचें कारण तरी हेंच कीं, म. गांधींच्या पुढील कार्यांत राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीचें धोरण व स्वरूप ठरवितांना त्यांनीं आपल्या ह्या मतांना व्यवहारिक स्वरूप देण्याचा कसून प्रयत्न केलेला आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीचा पाया गांधींनीं ह्या परिषदेंतच घातला असें म्हणावयास हरकत नाहीं.

" डोक्यांत भरलेल्या ज्ञानाची किंमत कार्याच्या किंमती इतकीच असते. बाकी सर्व निष्कारण बोजा आहे." असें भागलपूर येथील १७ च्या छात्र-संमेलनांत अध्यक्ष ह्या नात्यानें भाषण करतांना त्यांनीं विद्यार्थ्यांना बजाविलें होतें.

गांधींच्या शिक्षणविषयक कल्पनांची ही गुरुकिल्ली आहे; म्हणूनच गांधी ग्रंथ लिहून दाखवीत नाहींत, तत्वें आचरून दाखवितात; म्हणूनच गांधी गुजराथ विद्यापीठ उघडतात, पण स्वतः सत्याग्रहाश्रमच चालवितात! समर्थ विद्यालय आणि सत्याग्रहाश्रम ह्यांत फरक होता तो ह्यामुळेंच आणि शांतिनिकेतन व सत्याग्रहाश्रम ह्यांचें वैशिष्ट्य ह्या तत्वानुसंधानांतच आहे.

## राजकीय परिषदेंत.

" येथील राजकीयविषयांत मीं अडीच वर्षांचें बालक आहें. द. आफ्रिकेंतील माझ्या अनुभवाच्या भांडवलावर मीं येथें व्यापार करूं शकणार नाहीं" असें म्हणूनच गांधींनीं गुजराथ राजकीय परिषदेंतील अध्यक्षपदावरून आपल्या भाषणास सुरवात केली.

गांधींच्या राजकीय विचारांचा विश्वसनीय व विस्तृत परिचय लोकांस अद्याप झालेला नव्हता. ह्या प्रसंगानें लोकांची ही जिज्ञासा तृप्त झाली.

गुजराथ राजकीय परिषदेची ही बैठक नोव्हेंबर १९१७ मध्यें गोध्रा येथें भरली होती.

गांधींचा ब्रिटिश साम्राज्यावरील विश्वास व प्रेम हीं अढळ होतीं. भावी वादळाचीं पूर्वचिन्हें ह्या भाषणांत बिलकूल दिसून येत नव्हतीं.

" राजकीय " ह्या शब्दाचा अर्थच सध्यां अगदीं संकुचित करण्यांत येतो असें म्हणून गांधीनीं राजा आणि प्रजा ह्यांच्या संबंधावांचून इतर गोष्टींचाहि राजकारणांत समावेश झाला पाहिजे असें सूचविलें.

" हिंदुस्थान हा आपल्या सुदैवानें धर्मबद्ध देश आहे. यामुळें देशसेवा हीच सध्यांचे काळीं धर्माची परिसीमा आहे " असें सांगून त्यांनीं धर्म व राजकारण ह्यांचा अभेदभाव दाखवून दिला.

येवढ्यावरच न थांबतां पुढें त्यांनीं राजकारण व इतर राष्ट्रीय जीवनकर्मांतील अंगें हीं परस्परांपासून अलग ठेवतां येण्यासारखीं नाहींत ह्या " सर्वांगीण सुधारणा " तत्वाचा पुरस्कार केला:—

## सुधारणा सर्वांगीण पाहिजे.

" कार्य व्यवस्थितपणें होण्याकरितां आपण कामाचे निरनिराळे विभाग करावेत हें योग्यच आहे. परंतु त्या सर्वांचा एकमेकांशीं अत्यंत संबंध आहे या गोष्टीकडे दुर्लक्ष होतां कामा नये. राजकीय प्रश्नांशीं धर्माचा कांहीं संबंध नाहीं, हा विचार खोटा आहे. धार्मिक वृत्तीनें राजकीय प्रश्नांचा केलेला विचार एक प्रकारचा होईल; तर धार्मिक वृत्तीला फांटा दिल्यास भलताच प्रकार होईल. राजकीय प्रश्नांचा विचार करीत असतांना आज देशभर भटकणाऱ्या ५६ लाख साधूंचा विचार केल्यावांचून चालणार नाहीं. मुसलमानभाईनांहि आपल्या फकीरांचा विचार केल्यावांचून चालणार नाहीं. हिंदूंना विधवांचा किंवा बालविवाहाचा विचार करावाच लागेल. मुसलमानांना पडदाप्रकरणाकडे डोळेझांक करून चालणार नाहीं. दोन्ही धर्मीयांच्या धार्मिक वादांकडेहि कानाडोळा करतां यावयाचा नाहीं."

अशा सर्वांगीण सुधारणेचा आग्रह कां ?

" एकदां राज्यभारभार हातीं आला म्हणजे सर्व सुधारणा सहज होतील असें मानण्यांत येतें, परंतु यासारखा दुसरा भ्रम नाहीं. कोणतेंहि राष्ट्र अशा रीतीनें स्वतंत्र होऊं शकलें नाहीं. वसंताचा बहार आला म्हणजे प्रत्येक झाडावर त्याचा प्रभाव दिसूं लागतो. सर्व अरण्यभर नवयौवन मुसमुसूं लागतें. त्यावेळीं आपण स्वराज्यरूपी वसन्तऋतूंत प्रवेश करीत असूं त्यावेळीं बाहेरून येणारा प्रवासी आपणांत नवजीवन भरलेलें पाहील ! "

" चुका करण्याची मोकळीक आणि ती सुधारण्याची सत्ता ही स्वराज्याची एक व्याख्या आहे. आणि हें स्वराज्य पार्लमेंट या संस्थेत आहे."

" स्वराज्य आजच पाहिजे. ' आजच ' केव्हां उगवेल ती गोष्ट आपल्या स्वत:वर अवलंबून आहे."

" ब्रिटिश प्रजेपाशीं रडगाणें गाइल्याने हें स्वराज्य मिळणार नाहीं. ते म्हणतील, लायक व्हा म्हणजे तुम्हांला स्वराज्य मिळेलच."

" ही लायकी यावी कशी ?"

" आपल्याला स्वराज्य मिळविण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली आहे हीच आपली लायकी आहे * * * एवढी लायकी आपल्या कार्याला पुरेशी आहे."

आत्मोद्धार, अस्पृश्योद्धार, समाजशुद्धि, बळकट शरीरें, गोरक्षण, हिंदुमुसलमानांचें ऐक्य, स्वदेशी चळवळ, लोकजागृतीच्या जोडीला आंतरिक चळवळ, विधायक कार्य, स्त्रियांना राजकारणांत प्रविष्ट करून घेणें आणि सुशिक्षित—अशिक्षितांतील दुजा भाव नष्ट करणें ह्या स्वराज्याच्या पायऱ्या आहेत.

### अखेर एवढ्यावरच भागणार नाहीं

" साध्यवस्तु मिळविण्याचे दोन मार्ग आहेत:—सत्याग्रह आणि दुराग्रह. * * * हिंदुस्थानांत दुसरीहि पुष्कळ शस्त्रें आहेत; परंतु ह्या सत्याग्रहाचा येथें विशेष उपयोग झालेला आहे ही सर्वव्यापक शक्ति आहे. सर्व काळीं वापरता येण्यासारखी आहे; सर्वस्थळीं वापरावयाची आहे."

ह्या ठिकाणीं गांधीनीं आपल्या अहिंसात्मक सत्याग्रहाचें फार सुंदर, सरळ विवेचन केलें आहे.

प्रेम लढूं शकतें; " शस्त्रधारी आणि सत्याग्रही दोघेहि लढवय्ये आहेत. या दोन कोटींत जो येऊं शकत नाहीं तो पुरुषच नव्हे." अशा शब्दांनीं त्यांनीं आपल्या मर्दानी अहिंसेचें मार्मिक स्पष्टीकरण व जोमदार समर्थन केलें आहे.

गांधींना आठवड्यांत इतक्यांत होणाऱ्या प्रचण्ड राजकीय उलथापालथीची कल्पना नव्हती. आणि म्हणूनच तित्याचें सत्याग्रहाचें ह्या भाषणांतील विवेचन, दिग्दर्शन व समर्थन हीं निर्विकार, प्रशांत व प्रेमेयात्मक अशीं आहेत.

आपल्या भावी राजकीय धोरणाचें त्याप्रमाणें त्यांनीं केलेलें दिग्दर्शन, प्रमेयात्मक होतें, परंतु त्यांनीं आपल्या भावी कार्यपद्धतीचें केलेलें दिग्दर्शन अगदीं

व्यावहारिक होतें. ह्या सभेंत लोकमान्यांना तर मराठींत बोलावें लागलेंच परंतु यॅ. जिन्हा ह्यांना सुद्धां कधीं न आलेला गुजराथींत बोलण्याचा प्रसंग ओढवला. परिषदेचें काम वर्षभर चालू व्हावें म्हणून कार्यकारी मंडळाची योजना करण्यांत आली, स्त्रिया व मुसलमान ह्यांपैकीं ज्यांची इच्छा असेल त्या सर्वांना विषयनियामक परिषदेंत येण्याची परवानगी दिली आणि अशा रीतीनें आपल्या सूचनांच्या व्यावहारिक अंमलबजावणीस सुरवातहि केली.

## समाजसुधारणा आणि समाजसेवा.

गोध्रा येथील गुजराथ राजकीय परिषदेबरोबरच सामाजिक सुधारणा परिषदहि आणि अंत्यज परिषद भरली होती, पहिल्या परिषदेंत त्यांनी प्रामुख्यानें भाग घेतला होता व दुसऱ्या परिषदेचे तर ते अध्यक्षच होते

*अखिल भारतीय समाजसेवा परिषदेची बैठक कलकत्ता येथें* कॉंग्रेसबरोबरच ( १९१७ डीसेंबर ) भरली होती. तिचें अध्यक्षस्थान गांधींनाच देण्यांत आलें होतें. " दुष्काळ, महापूर, अपघात हेंच कांहीं समाजसेवेचे प्रसंग नव्हते, खऱ्या समाजसेवेला सदासर्वदा अवकाश आहेच " असें म्हणून गांधींनीं रेल्वे उतारूंचे हाल, अस्पृश्योद्धार, सत्य, अहिंसा व ब्रह्मचर्य व्रताची आवश्यकता, वरिष्ठ वर्गांतील व्यसनबाजी वगैरेंचा विचार केला होता.

## अहमदाबादच्या मजूरसंघ.

ह्या जगांत इतका अनाथ कोणीच नाहीं कीं, ज्यांची आपत्ति पाहून गांधी त्याच्या मदतीला धावणार नाहींत ! ह्या जगांत इतका क्षुल्लक अन्याय कोणताच नाहीं कीं जो गांधींना उपेक्षणीय वाटेल. ह्या जगांत इतका क्षुद्रवर्ग कोणीच नाहीं कीं जो गांधींजवळ आपलें गाऱ्हाणें घेऊन जाणार नाहीं आणि ह्या जगांत इतकें हलकें कार्य कोणतेंच नाहीं कीं गांधी त्यांत भाग घ्यावयास अनमान करतील ! मग मजूर वर्गासारख्या अनाथ, उपेक्षित, अज्ञानी आणि दुबळ्या वर्गाच्यावर त्यांची प्रेमळ दृष्टि पडणार नाहीं असें होईल तरी कसें ?

हिंदुस्थानांत आल्यापासून तुरुंगांत पाऊल टेकीपर्यंत अहमदाबादच्या मजूर वर्गाकडे त्यांचें अंतःकरण सदैव ओढ देत असे. आपल्या मोठमोठ्या राजकीय दौऱ्यांतील कार्यक्रम एकदम बदलून अहमदाबादच्या मजूरांसाठीं ते लगबगीनें अहमदाबादला आलेले आहेत.

अहमदाबाद शहरांत १९१७ अखेर प्लेगनें मोठाच कहर उडवून दिला होता. उठला-सुटला जीव घेऊन बाहेर जाऊं लागला. गिरण्यांना मजूरांचा

तुटवडा फारच जाणवूं लागला. अशा वेळी मजुरांनीं काम व गांव सोडून जाऊं नये म्हणून गिरणीवाल्यांनीं विणकरांस माणशीं रोज बारा आणे भत्ता देण्यास सुरुवात केली अशा रीतीनें सुमारें दहाहजार मजुरांना हा भत्ता मिळत होता; प्लेग संपल्यामुळें हा भत्ता १५ फेब्रुवारी १९१८ पासून बंद करण्यांत यावा असा ठराव गिरणीवाल्यांच्या संघानें केला.

महागाई विलक्षण वाढली होती. बाजरीचा भाव दुपटीनें तर गव्हांचा पावणेदोन पटीने आणि कापडाचा दिढीनें याप्रमाणें भाव कडाडले होते अशा स्थितींत गिरणीवाले मात्र त्यांना मजुरींत फक्त २० टक्के वाढ देण्यास तयार होते.

## तडजोडीचे प्रयत्न.

अखेर मजुरांतर्फे गांधी, श्री. बँकर व श्री. पटेल आणि गिरणीवाल्यांतर्फे शेट अंबालाल साराभाय, शेट जगाभाई आणि शेट चंदूलाल चुनीलाल ह्यांची पंच म्हणून नेमणुक होऊन त्यांच्याकडे वादाचा निर्णय संपविण्यांत आला. मि. चॅटफिल्ड–कलेक्टर विशेष लोकप्रिय होते. त्याना सरपंच निवडण्यांत आलें. गिरणीवाल्यांना मनांतून ही तडजोड नकोच होती. त्यांनीं कांहींतरी निमित्त काढून २२ फेब्रुवारीपासून गिरण्याच बंद करून टाकल्या. ११ मार्च पर्यंत गिरण्या बंद ठेवल्यावर त्यांनीं गिरण्या उघडल्या. पण आतां मजूरच गिरणींतील कामें सुरू करीनात !

मजूरांना ३५ टक्के वाढ द्यावी असें गांधीनी काळजीपूर्वक एकदां परिस्थितीचा विचार करून ठरविलें. परतु गिरणीवाले २० टक्यांपेक्षां जास्त वाढ करण्यास बिलकुल तयार होईनात. " म्हातारी मेली तर हरकत नाहीं; पण काळ सोकावतो " असें त्यांना वाटत असल्यामुळें कांहींहि होवो पण मजुरांची चांगलीच खोड पळवावयाची असें त्यांनीं ठरविले

मजुरांची कोंती शिल्लक संपून जात चालली. उपासमारीचा प्रसंग जवळ येऊं लागला. परंतु सार्वजनिक फंडांतून मदत घेऊन मजुरांनीं जगावें ही स्वाभिमानाला कमीपणा आणणारी कल्पना मजूरांनीं अमलांत आणावी हें गांधींना पटेना. त्यांनीं मजरांना कामें मिळवून देण्याचा प्रयत्न केला. परंतु दहा हजार लोकांना एनवेळी कामें पुरविणार कोण ? आणि ज्या कांहीं लोकांना कामें मिळत त्यांना तीं त्यांच्या यांत्रिक जीवनक्रमानें नियत मर्यादच्या अवस्थेला पोंचलेल्या वृत्तीला रुचेनात आणि पचेनात..

## अखेर उपवासाचें शस्त्र

"वीस दिवस अशा स्थितींत गेले. सैतान मजुरांच्या कानांत गुणगुणूं लागला; जगांत मनुष्यमात्राला प्रसंगीं उपयोगी पडावयास ईश्वर आहे कोठें ? आणि शपथ ही तर बोलून चालून दुबळ्या लोकांची फसवणूक आहे" असें गांधींनीं त्या परिस्थितीचें वर्णन केलें आहे.

माध्यान्हकाळच्या भुकेच्या वेदनामुळेच केवळ दहा हजार लोकांनीं सत्याला मूठमाती देण्यास तयार होणें भाग पडावें ही कल्पना गांधींच्या हृदयांत सलूं लागली.

"शपथ मोडल्यापेक्षां मेलेलें बरें म्हणून गांधी आम्हाला सांगतात पण आमची उपासमार होत त्याची वाट काय ?" ह्या मजुरांच्या कुरकुरीला उत्तर देण्यास गांधी कांहीं असमर्थ नव्हते. आणि दुसऱ्याला उपदेश करणारे ते परोपदेशे पंडितहि नव्हते.

"शपथेसाठीं तुम्हींच मरा म्हणून मीं सांगत नाहीं. मीहि तुमच्यासाठीं, तुमच्या बरोबर मरण्यास तयार आहें" असें गांधींचें मजुरांच्या वरील प्रश्नाला उत्तर होतें. मजुरांच्या तोंडांत अन्नाचा घांस पडेपर्यंत माझ्या तोंडांतहि अन्नाचा घांस जाणार नाहीं अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली. मजूर वर्गांत नवजीवन संचारलें; गिरणीवाले काळजींत पडले. गिरणीवाले तत्वतः गांधींच्या विरुद्ध कितीहि असले तरी गांधींना उपाशी मारण्याइतके गांधीविषयीं अनुदार असणें शक्यच नव्हतें.

अखेर तडजोड झाली. मजुरांनीं कामावर जावें, पहिल्या दिवशीं ३५ टक्के वाढीच्या दरानें मजुरी द्यावी, दुसऱ्या दिवशीं २० टक्के वाढीच्या दरानें द्यावी, पुढें २७॥ टक्के वाढ कायम समजण्यांत यावी आणि अखेर निर्णय पंचानीं द्यावा असें ठरलें. पंचांनीं पुढें ३५ टक्के वाट द्यावी असाच निकाल दिला.

ह्या तडजोडीच्या उभयपक्षीं समाधान देणाऱ्या अटी तर विलक्षण होत्याच परंतु ही तडजोड घडवून आणण्याचा मार्गहि एकंदर संपाच्या इतिहासांत किंबहुना कोणत्याहि आधुनिक सामुदायिक वादनिर्णयांत, विलक्षण होता ह्यांत संशय नाहीं. गांधींच्या ह्या लोकविलक्षण पद्धतीबद्दल सर्वांनाच कौतुक वाटलें; पुष्कळांना समाधान वाटलें पण कित्येकांना आश्चर्य वाटलें। ह्या उपवासाचा मार्ग हास्यास्पद आहे असेंच त्यांचें मत पडलें; पण, हें टीकाकार एक गोष्ट

विसरतात, ती ही कीं गांधीनीं उपवास केला तो गिरणीवाल्यांना वठणीवर आणण्यासाठीं नव्हे, तर शपथ मोडण्यापेक्षां उपाशीं मेलेलें फार बरें. हा उपदेश त्यांनीं ज्यांना केला त्या लोकांना आपला उपदेशक उपदेशाप्रमाणें वागणारा आहे हें पटविण्याकरितां, समदुःखीपणा तात्विक नसून जिव्हाळ्याचा असल्यामुळें आणि ध्येय अगदीं शक्य, सुलभ व उभयपक्षीं सारखेंच श्रेयस्कर होतें अशा प्रसंगीं.

आचारविचारांतील एकतानता, समरसतेची परिसीमा आणि श्रेयःसाधनाची उत्कटता ह्याचा हा आदर्श आहे.

कोठून तरी, कसें तरी, कांहीं तरी कमावूं पाहणाऱ्या व्यवहारदक्ष व्यवहारशास्त्रज्ञाचा हा मार्ग नव्हे व गांधीनीं कोणासहि केव्हांहि हा मार्ग आचरण्याविषयीं व्यक्तिशः किंवा संघशः सल्ला दिलेला नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.



## प्रकरण १४ वें.

# खेडा सत्याग्रह.

### असें कां व्हावें ?



हिंदुस्थान हें कांहीं रामराज्य नव्हे, कीं त्या टिकाणीं गांधींसारखा कर्मवीर, नीतिधर्मात्मा, सत्याग्रही आणि अनाथकैवारी गांधी हजर असतांहि त्याला कांहींच काम मिळूं नये ! गांधींना तशीं कामें मिळालीं आणि त्यांनीं तीं केलीं पण—

हिंदुस्थानांतील ब्रिटिशराज्य म्हणजे रामराज्यच होतें कां काय ? १९१५ ते १७ पर्यंतच्या सबंध तीन वर्षांत गांधी व सरकार ह्यांच्यांत कधींच तेढ उत्पन्न होऊं नये हें ह्या दृष्टीनें हिंदुस्थानसरकारच्या सफाईदार कार्यसाधुत्वाला मोठेंच प्रशसापत्र आहे ह्यांत शंका नाहीं.

गांधी क्रान्तिकारक तर खरेच; परंतु ते उत्क्रांतिमय क्रांतिकारक आहेत. Evolution of the Revolufinary sheed. अशी त्यांची कार्यपद्धति असते आणि पापाचे शंभर घडे भरल्यावांचून गांधींकडून पाप्यांना प्रायश्चित मिळण्याची भीति नसते. ह्या दोन गोष्टींच्या संयुक्त परिणामामुळेंच आतांपर्यंत मालक व मजूर, रयत व जमीनदार अशा झगड्यांतच त्यांचा वेळ गेला. हिंदुस्थानांतील नोकरशाहीशीं त्यांचा संबंधच आला नाहीं. परंतु खेडा जिल्ह्यांतील गरीब रयतेवरील आपत्तीनें हा योगायोग घडवून आणला, आणि त्या झगड्याला तोंड लागलें तेंहि अगदीं नाजूक टिकाणीं.

सुशिक्षित आणि अशिक्षित ह्यांच्यांतील पुरापुरा दुजाभाव, परस्परांविषयींची उपेक्षाबुद्धि हेंच आतांपर्यंत सरकारच्या येथील अमलाचें अधिष्ठान, लोकपक्षीय पुढाऱ्यांना निरुत्तर करण्याचें निर्णायक उत्तर आणि विनबोभाट सारा भरणी करून राज्याला जीवन पोंचविणारें हृदय सुरक्षित राखणारा छातीचा कोट होता !

इंग्रजी भाषेवर बहिष्कार, देशी भाषांचा पुरस्कार आणि हिंदी राष्ट्रभाषेचा कैवार ह्या त्रिविध धोरणानें गांधींनीं ह्या दोन वर्गांस दूर राखणारा व एकमेकांपासून एकमेकांस अदृश्य व दुर्गम ठेवणारा तट उध्वस्त करण्यास प्रारंभ केलाच होता. आतांच्या ह्या नवीन कामगिरीनें त्यांनीं ह्या दोन्ही पक्षांमध्यें दळणवळणाचे मार्ग प्रस्थापित केले–सुशिक्षितांचा सत्याग्रह व अशिक्षितांची शान्हाणी ह्यांची सांगड घालून ह्या परस्परपोषक दोस्तीचा उपयोग सरकारच्या अन्यायाविरुद्ध लढण्याकडे केला.

कायदेशीर रीतीनें सरकारनें सारा माफ करणें भाग असूनहि सरकार अन्यायानें सारा वसूल करूं पाहील तर तो न देण्याचा सामुदायिक सत्याग्रह करावयाचा ही कल्पना हिंदी राजकारणांत गांधींनीच प्रथम काढली असें नाहीं. लोकमान्य टिळकांनीं १८९६ सालच्या दुष्काळांत ह्याच कल्पनेला व्यावहारिक स्वरूप देण्याचा प्रत्यक्ष प्रयत्न केला होता. आणि बनारस काँग्रेसच्या वेळीं ( १९०५ मध्यें ) कर न देण्याची सामुदायिक चळवळ सुद्धां सदनशीरच आहे असें म्हणून कै. वा. गोखल्यांनींहि नेमस्तांच्या दृष्टीनें ह्या गोष्टीवरील अस्पृश्यता तत्वत: तरी दूर केलीच होती.

गांधींनीं विशेष कांहीं केलें असेल तर हेंच कीं, त्यांनीं ह्या चळवळीला शास्त्रोक्त, निश्चित व संघटित स्वरूप दिलें. ह्या चळवळीचें एक शास्त्र निर्माण केलें.

## खेडा प्रकरणाचा उपक्रम.

नडियाद येथील रहिवाशांची एक जाहीरसभा २५ नोव्हेंबर १९१७ रोजीं रा. गोपाळदास विहारीदास देसाई ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. त्या सभेंत पुढील अर्थाचे ठराव करण्यांत आले होते:—

( १ ) चालू सालीं अतिवृष्टीमुळें जिल्ह्यांतील शेतीचें पीक साफ बुडालें आहे. त्यासाठीं सभेंत वाचून मजूर करण्यांत आलेल्या अर्जावर पुष्कळशा शेतकऱ्यांच्या सह्या घेऊन तो अर्ज कलेक्टर व गव्हर्नर ह्यांजकडे पाठविण्याची तजवीज जिल्हा सभा, शेतीसभा, आणि होमरूल लीगच्या शाखा ह्यांनीं करावी आणि एकंदर जिल्ह्यांतील कांहीं प्रतिष्ठित लोकांचें एक शिष्टमंडळ कलेक्टरच्या भेटीस पाठवावें.

( २ ) ह्या अर्जाच्या नकला ना. गोकुळदास कहानदास पारेख आणि ना विठ्ठलभाई पटेल ह्यांजकडे पाठवाव्या व त्यांनीं ह्या मुद्याची प्रत्यक्ष माहिती मिळवून कौन्सिलांत प्रश्न उपस्थित करावा अशी त्यांस विनंति करण्यांत यावी.

(२) १८७२ ते १९११ ह्या ४० वर्षांच्या अवधींत खेडा जिल्ह्याची लोकसंख्या ९११९४ इतक्या संख्येनें घटली आहे. गुजराथेंतील जबरदस्त ज़मीन महसूलाचा हा परिणाम आहे. हा सारा कमी करण्यांत यावा, कमी केलेला सारा कायम ठेवण्यांत यावा, आणि ह्या दुःखपीडित शेतकऱ्यांचीं दुःखें दूर होण्याकरितां कॉंग्रेसलीगची सुधारणा योजना लवकर अमलांत यावी म्हणून मि. मॅंटेग्यु व व्हाइसरॉय ह्यांजकडे पुष्कळशा सह्यांचा एक अर्ज रवाना करण्यांत यावा.

ह्या ठरावाला अनुसरून ना. पारेख व पटेल हे डीसेंबरच्या पहिल्या आठवड्यांत खेडा जिल्ह्यांत जाऊन दाखल झाले. १५ तारखेला ह्या जिल्ह्यांतील प्रमुख पुढाऱ्यांचें एक शिष्टमंडळ कलेक्टरच्या भेटीस गेलें व त्यानें आपल्या निश्चित मागण्या कलेक्टरपुढें ठेविल्या. " ह्या बाबतींत मी जरूर तपास करतों; जरूर तर सारातहकूबीचाहि हुकूम देईन; सूट देण्याचा अधिकार मला नसल्यामुळें मी कांहींच सांगूं शकत नाहीं. तथापि ह्या प्रश्नाचा निकाल होईपर्यंत रयतेला तगादा लावूं नये म्हणून मामलेदारांना हुकूम सोडतों. " अशा सहानुभूतिपर शब्दांनीं कलेक्टरनें शिष्टमंडळाची बोळवण केली.

" सरकारनें आमची मागणी नामंजूर केली तरी आमची मागणी मात्र बंद पडणार नाहीं. " अशी सूचक इशारत त्याच वेळीं शिष्टमंडळानें कलेक्टरला देऊन ठेविली होती.

सारा वसूलीचा तगादा लावण्यांत येणार नाहीं असें कलेक्टरनें आश्वासन दिलें; पण त्याची अंमलबजावणी मात्र झाली नाहीं. सारावसूलीसाठीं तलाटयांनीं कसून प्रयत्न चालविले आणि पुष्कळशा कुळांकडून सक्तीनें पुरापूर सारा वसूल करण्यांत आला.

## वस्तुस्थितीचें दिग्दर्शन.

हा सगळा परजिल्ह्यांतल्या चळवळ्यांचा उपद्व्याप आहे. असा सारा भरूं नये म्हणून उपदेश करणारांवर १४८ ( क्रि. प्रो. को. ) कलमाखालीं खटले करण्याचा सरकारचा इरादा आहे. " कलेक्टरनें पूर्ण विचारांशतीप हुकूम काढला होता. परंतु केवळ राजकीय हेतूनीं प्रेरित होऊन एका समृद्ध व समर्थ जिल्ह्यांतील सारावसूलीला कोणीहि अडथळा करूं नये " अशा आशयाचें एक पत्रक मध्यविभागाच्या कमिशनरच्या सहीनें प्रसिद्ध झालें.

त्यावेळीं सर्व्हंट्स ऑफ् इंडिया सोसायटीचे एक समासद श्री. अमृतलाल विठ्ठलदास ठक्कर हे चौकशीसाठीं खेडा जिल्ह्यांत गेले. तेथून त्यांनीं मुंबईच्या टाइम्स ऑफ् इंडियामध्यें एक पत्र प्रसिद्ध केलें. त्यांत ते लिहितात:—

" मीं सुमारें दहा गांव फिरलों; लोकांच्या व अधिकाऱ्यांच्या भेटी घेतल्या. कपडवंज तालुक्यांत दोन दिवस फिरून शेती व शेतकरी ह्यांचा अनुभव मिळविला. माझें मत असें झालें आहे कीं चौमाशी अथवा खरीब पीक सर्वस्वी बुडालें आहे. हिंवाळू अथवा रबी पीक समूळ बुडालें नाहीं, परंतु उंदरांच्या उपद्रवामुळें आठ आणे पीक तरी हातांत येईल किंवा नाहीं ह्याची शंका आहे. शेतकऱ्यांची तक्रार अशी आहे कीं, मूळ पीकच जास्त धरण्यांत आलें. आणि तालुक्याच्या अधिकाऱ्यांनीं त्यांत आणखी वाढ धरली. पहिला अंदाज १ ते ४ आणे होता. पुढें तो ४॥ ते ६ किंवा ८ आणेपर्यंत वाढला! महसूलीखात्याचा नियम असा आहे कीं, पीक ४ आण्यांपेक्षां कमी असेल तरच साऱ्याची एक वर्षपर्यंत तगाई देण्यांत यावी. ४ ते ६ आणे पीक असेल तेव्हां अर्ध्या साऱ्याची तहकूबी देण्यांत यावी. गांवकामगारांकडे चौकशी करतां असें समजलें कीं, "पहिला अदाज दुरुस्त करण्याविषयीं त्यांना तालुक्याच्या अधिकाऱ्यांकडून समजूत मिळाली होती." आणि असें असूनहि "शक्य तितक्या रयतांकडून पुरापुरा सारा वसूल करण्याविषयीं मामलेदारांना आणि गांवकामगारांना हुकूम सुटले आहेत असें समजतें." सारा वसूलीसाठीं रयतांना कसे छळण्यांत येतें त्याचीहि ह्या पत्रांत ठक्कर ह्यांनीं कित्येक उदाहरणें दिलीं होतीं.

### गांधी कामास लागले.

ना. पारेख व ना. पटेल ह्यांनीं सरकारी यादीला उत्तर प्रसिद्ध केलें. गुजराथ सभा लोकमतजागृति करीत होतीच व तिला गांधींचें साहाय्य होतेंच. मुंबईंत खेडा जिल्ह्यांतील पाटीदार रहिवाशांची व नंतर मुळजी जेठा कापड मार्केटमध्यें एक जाहीर सभा श्री. जमनादास द्वारकादास ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. गांधींनीं ह्या सभेंत भाग घेतला होता. ता. ५ फेब्रुवारी रोजीं कित्येक पुढाऱ्यांचें शिष्टमंडळ तडजोडीकरितां गव्हर्नरांच्या भेटीला गेलें होतें. त्यांत गांधीहि होतेच. ह्या शिष्टाईचा परिणाम म्हणूनच कीं काय, मार्च महिन्यांत खेडा जिल्हा कलेक्टरनीं पुढील हुकूम काढला:—

(१) पीक आकारणीची फेरतपासणी होत आहे अशा कल्पनेनें कित्येक लोक सारा भरण्याची टाळाटाळ करीत आहेत असें दिसून येतें.

( २ ) ह्या गोष्टींत कांहीं तथ्य नाहीं. तरी सर्वांनीं ताबडतोब सारा नाहींतर नाइलाजास्तव सक्तीचे उपाय अमलांत आणावे लागतील.

खेडा सत्याग्रहाची उभारणी ह्या हुकमाच्या मजबूद पायावरच झाली होती. आतां खुद्द गांधी जिल्ह्यांत गांवोंगांव फिरून वस्तुस्थितीचें निरीक्षण लागले. २२ मार्च रोजीं नडियाद येथें श्री. गोकुळदास तलाठी ह्यांच्या खालीं एक जंगी जाहीर सभा भरली होती. सातहि तालुक्यांतील पुढारी सभेला हजर होते.

आमच्या गांवचें पीक ४ आण्यापेक्षां कमी होतें; त्यासाठीं चालू साऱ्याची तहकुबी मिळावी म्हणून आम्हीं सरकारकडे अर्ज केला; पण पसंद झाली नाहीं. " म्हणून आम्ही खालीं सही करणार अशी प्रतिज्ञा करीं, आम्हीं ह्या वर्षाचा सगळा किंवा बाकी राहिलेला सारा भरणार नाहीं. परंतु तो वसूल करण्यासाठीं सरकार जे कायदेशीर इलाज करील ते करूं व वांटयास येईल तें दुःख सहन करूं. " असा ठराव ह्या जाहीर करण्यांत आला.

" ज्यांचें पीक चार आणे सुद्धां नसेल त्यांनीं सारा भरण्याचें खोटें काम नये. पैसेवाल्या शेतकऱ्यांनींहि आपल्या गरीब बांधवांच्या बचावासाठीं भरूं नये. " असें गांधींनीं ह्या सभेंत शेतकऱ्यांस बजावून ठेवलें.

" खेडा जिल्ह्यांतील रयतेचें कर्तव्य " ह्या प्रसंगीं काय आहे त्याचें स्पष्टीकरण करणारें एक पत्रक गांधींनीं २७ मार्च रोजीं प्रसिद्ध केलें. "पूर्ण विचार' 'अंतींच प्रतिज्ञापत्रावर सही करावी " असा ह्या पत्रकांत गांधींनीं शेवटीं सर्वांना इशारत दिली होती.

" वाटल्यास फांशावर चढवा नाहीं तर तोफेच्या तोंडीं द्या; पण आम्ही सारा कांहीं भरणार नाहीं. " गांवोगांव फिरून सारा वसूलीसाठीं निकराचे प्रयत्न करणाऱ्या सरकारी अंमलदारांना जावें तेथें असें उत्तर मिळूं लागलें.

गांधी व त्यांचे सहकारी पुढारी व स्वयंसेवक खेड्यापाड्यांतून फिरून शेतकऱ्यांमध्यें कर्तव्यजागृति करूं लागले होते; त्याचाच हा परिणाम होय.

## अधिकारी आणि रयत ह्यांची पुढभेट.

जप्तीचा धूमधडाका सुरू झाला. पाणी पिण्याचा लोट्या जितळेचा लोटा, दाणागोटा, गायबैल, घरीं कोणी नसेल तर त्याच्या भाऊबंदाचें सामानसुमान जें कांहीं मिळेल तें सरकारजमा होऊं लागलें.

दंडनीति अपुरी पडणार ह्याची पूर्ण जाणीव असल्यामुळें सामनीतीचाहि अधिकारी उपयोग करूं लागले.

"ह्या सभेंत प्रतिज्ञावाले किती आहेत तें मला माहीत नाहीं. आपली मर्जी असेल तर आपणापैकीं प्रतिज्ञावाल्यांनीं हात वर करावेत." मि. प्रॅट-कमिशनर ह्यांनीं १२ एप्रिल रोजीं नडियाद येथील मामलेदार कचेरीत बोलावलेल्या रयतांच्या सभेंत हा प्रश्न करतांच सुमारें ५०० हात वर झाले मि. प्रॅट आपणास इतक्या प्रतिज्ञावाल्यांस उद्देशून बोलतां येत असल्याबद्दल आनंद प्रदर्शित करून म्हणाले;—"गांधी फार थोर मनुष्य आहेत. ते जें कांहीं सांगतात तें अत्यंत शुद्ध हेतूनेंच सांगतात. ते म्हणतात कर देऊं नका. तुम्हीं म्हणतां गरीबांचें संरक्षण झालें पाहिजे. म्हणजे सरकार गरीबांचें संरक्षण करीत नाहीं असें तुमचें म्हणणें आहे काय? मीं पुन्हां सांगतों, गांधी अत्यंत थोर सत्पुरुष आहेत. परंतु सर्व प्रकारच्या शिक्षा, चौथाई, दंड, जप्त्या ह्या कांहीं त्यांच्यावर होणार नाहींत. दयाळू सरकारला त्यांची अंमलबजावणी तुमच्यावरच करावी लागेल." मि. प्रॅट गांधींची अशी ओतप्रोत स्तुति करून आणि त्या स्तुतीबरोबर गोडशब्दांत रयतांना चांगलीच दमबाजी करूं लागले. ते म्हणाले "तुमच्या जमिनी खालसा होणार नाहींत असें समजूं नका. तुम्हीं कराल तें मला प्रमाण आहे असें गव्हर्नरनीं मला पत्र लिहून कळविलें आहे. मि. प्रॅट ह्यांना ह्या कोऱ्या चेकवर सही करून देणारे गव्हर्नर लॉर्ड वुइलिंग्डन हेच होते.

ज्या कमिशनरचें सामान्य जनतेला दर्शनसुद्धां दुर्लभ त्या कमिशनरला ह्या भाषणानंतर शेतकऱ्यांपैकीं एकेक जण उठून चोकस प्रश्न करूं लागला व आपली गाऱ्हाणीं सांगूं लागला. मि. प्रॅट ह्यांनीं सभा बरखास्त करतांच चोहोंकडे 'वंदे मातरम्' आणि 'महात्मागांधीकी जय' असा जयघोष झाला.

गांधी वगैरे पुढाऱ्यांनीं ह्या भाषणाला दुसऱ्यावेळीं चोख उत्तरें दिलीं. गांधी यांच्या बरोबर त्यावेळीं श्री. पटेल, श्री. जम्नादास द्वारकादास, श्री. बँकर, श्री. रतनसी धरमसी, मगु सुभेदार, मोहनलाल पंड्या, वगैरे धनाढ्य व्यापारी व थोर पुढारी खेडोखेडीं फिरून शेतकऱ्यांस सारा न देण्याचें तत्व समजावून देत होते. मुंबई येथें २३ एप्रिल रोजीं भरलेल्या जाहीर सभेंत लो. टिळक, श्री. हॉर्निमन, बॅ. जयकर वगैरेंचीं भाषणें झालीं होतीं. त्या सभेच्या दुसऱ्याच दिवशीं मुंबईसरकारानें एक खलिता प्रसिद्ध करून गांधी वगैरेंच्या सूचनेप्रमाणें

स्वतंत्र फेरचौकशी करण्याची आवश्यकता नाहीं असें जाहीर केलें. सरकारी अंमलदार दुप्पट जोमानें सारा वसूलीच्या प्रयत्नांस लागले.

## सत्याग्रह आणि समाजशुद्धि.

ही चळवळ केवळ सारा न भरण्याच्या सत्याग्रहापुरती नसून आत्मशुद्धीची कशी होती तें २६ एप्रील १९१८ रोजीं नवागांव येथें भरलेल्या जातपंचायतीच्या पुढील ठरावांवरून दिसून येईल:—

( १ ) कोणीहि सरकार सारा भरावयाचा नाहीं. जो भरील त्याला वाळीत टाकावें.

( २ ) जो कोणी सरकार धारा भरील त्याला पूर्णपणें वाळींत टाकावें.

( ३ ) सरकारनें जप्त केलेली जमीन कोणी घेईल त्यालाहि जमातीनें केलेला दंड भरीपर्यंत वाळींत टाकावें.

( ४ ) कोणी कितीहि जुलूम केला तरी वेठीस जावयाचें नाहीं.

( ५ ) प्रत्येकानें आपल्या मुलाबाळांच्या शिक्षणाची तजवीज करावी.

( ६ ) कोणीहि दारू पिऊं नये.

स्वयंप्रेरणेनें केलेल्या ह्या ठरावांकडे पाहिलें म्हणजे सत्याग्रहानें समाजशुद्धि आपोआपच कशी होऊं लागते तें दिसून येतें.

सरकारी लोकांना जप्तीसाठीं आसपासच्या गांवांतहि पंच मिळत नसत; जप्त केलेला माल घेऊन जाण्यास माणसें मिळत नसत; पण जप्ती झाली कीं, घरवाला आनंदच करी ! गांवोगांव जप्तीवाल्यांबरोबर स्वयंसेवकहि तेथें जात व लोकांस कर्तव्यजागृत ठेवीत. आम्हांला तरी हीं कामें आवडतात असें नाहीं. पण काय करावें ? पोटासाठीं सगळें कांहीं करावें लागतें असें म्हणून सरकारी अंमलदार आपली हयातदिल वृत्ति प्रगट करीत.

## अखेर सरकारनें माघार घेतली.

एप्रिल महिना अखेर गांधींना दिल्ली येथें युद्धपरिषदेला जावें लागलें तेथून परत आल्यावर १३ मे पासून त्यांनीं पुन्हा जिल्ह्यांत फिरण्यास सुरवात केली.

आतां तर सारावसूलीसाठीं सरकारी अंमलदारांनीं अगदीं कहर करून सोडला. पण सर्व प्रयत्न व्यर्थ गेले. वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांना आपली चूक समजून आली. ही समजूत प्रथम कोणाची पटली तें रहस्य अद्यापहि उकललेलें नाहीं. परंतु इतकें मात्र खरें कीं, सारासूटीचा हुकूम कलेक्टरनें १५ एप्रिल रोजीं काढून मामलेदाराकडे रवाना केला होता; हुकुमाची अंमलबजावणी मीट

व्हावी म्हणून पुन्हा २२ मे रोजीं दुसरा हुकूम काढला होता; परंतु जूनच्या प्रारंभापर्यंत हा हुकूम जाहीर मात्र झाला नव्हता !

" सरकार गरीब लोकांना तहकुबी देणार आहे. आतां ज्यांना शक्ति असेल त्यांनीं सान्याचा भरणा करावा. " असा जाहीरनामा गांधी व वल्लभभाई पटेल त्यांच्या सहीनें नडियादच्या सत्याग्रह छावणींतून ६ जून रोजीं बाहेर पडला आणि सत्याग्रह यशस्वी ठरून समाप्त झाला.

प्रत्यक्ष ह्या लढयांत कोणासच तुरुंगतीर्थाची यात्रा करतां आली नव्हती. परंतु त्यांतील एक प्रमुख कार्यकर्ते मुलाभाई पटेल ह्यांस त्याच वेळीं कांहीं सात्विक अपराधावरून २० दिवसांची शिक्षा झाली होती. सुटकेनंतर सर्व जिल्ह्याभर त्यांचें स्वागत होऊन अखेर नडियाद येथील सत्याग्रह मंडपांत ३० जून रोजीं ५ हजार लोकांच्या जाहीर सभेंत गांधींना एक मानपत्र अर्पण करण्यांत येऊन सत्याग्रह यज्ञाची पूर्णाहुति करण्यांत आली.

## वसाहतींतील नव्या भानगडी.

युरोपियन महायुद्धांत सैन्यभरतीसाठीं केलेल्या परिश्रमांनीं अत्यंत बिघडून गेलेली प्रकृति नीट सुधारली नाहीं तोंच गांधींना पुन्हां एकवार द. आफ्रिकेच्या प्रश्नांत लक्ष घालावें लागलें. ट्रान्सव्हाल ब्रिटिश इंडियन असोसिएशनकडून गांधींना फेब्रुवारी १९१९ मध्यें एक महत्वाची तार आली. ह्या तारेंत असा मजकूर होता कीं, क्रूगर्स दोषर भागांत सर्वांआधीं जाऊन राहिलेल्या हिंदी व्यापाऱ्यांच्या जागा १८९९ च्या मूल्यवान् धातूंच्या कायद्याखालीं हिरावून घेण्याचा प्रयत्न होत आहे. ह्यासंबंधाच्या खटल्याचा निकाल हिंदीव्यापाऱ्यांच्या विरुद्ध झाल्यास विटवॉटर्सरँडमधील व्यापाऱ्यांच्या हक्कांची पुरी पायमल्ली होणार आहे. १९१२ चा ट्रान्सव्हाल ९ वा ऑर्डिनन्स व हिंदी लोकांसंबंधींचे इतर कायदे ह्यांची अत्यंत सक्तीनें अंमलबजावणी होत आहे. आणि ह्या धोरणाचा खरा हेतु युरोपियन व्यापाऱ्यांच्या फायद्यासाठीं हिंदी व्यापाऱ्यांचा येथून समूळ उच्छेद करावा हाच आहे.

" द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या ह्या प्रश्नाविषयीं हिंदुस्थान सरकार परिणामकारक धोरण स्वीकारणार नाहीं आणि हिंदी लोकमतहि ह्या बाबतींत कांहीं करूं शकणार नाहीं; तर मग द. आफ्रिकेंत पुन्हां सत्याग्रह सुरू करावा लागेल. " असा स्पष्ट इशारा देणारें एक पत्र त्यावेळीं गांधींनीं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केलें. द. आफ्रिकेंतील परिस्थितीचें निरीक्षण करण्याकरितां एक लोकप्रिय सर-

-फारी अधिकारी आणि एक लोकप्रिय हिंदी पुढारी ह्यांस हिंदुस्थानसरकारनें द. आफ्रिकेंत पाठविणें जरूर आहे असेंहि गांधींनीं ह्या पत्रांत सुचविलें. गांधींचें म्हणणें असें होतें कीं, केवळ द. आफ्रिकेंतील हिंदी लोक ब्रिटिश प्रजाजन आहेत म्हणूनच नव्हे तर १९१४ च्या सत्याग्रहयुद्धांत झालेल्या अखेरनिर्णयांत हिंदी लोकाना मिळालेल्या हक्कांचें रक्षण झालेंच पाहिजे.

गांधी ह्याप्रमाणें १९१४ च्या सत्याग्रहयुद्धांतील अखेर तहनाम्याला चिकटून बसूं पाहत होते. पण द. आफ्रिकन सरकार तर शक्य त्या उपायांनीं तेथून हिंदी व्यापाऱ्यांची सर्वस्वी उचलबांगडी करण्याचे प्रयत्न वारंवार करीत होतें. आणि त्या कामीं १९१४ च्या तडजोडीचा पाहिजे तसा भंग करीत होतें. त्या संबंधाने गांधी आपल्या ह्या लेखाच्या शेवटीं म्हणतात:—

" थोडयाच काळांत हिंदी लोकांना जबाबदार राज्यपद्धति मिळणार आहे; त्यावेळीं हिंदुस्थान ह्या सहाय्ययाचनेला काय उत्तर देईल ? द. आफ्रिकेंतील लक्षावधी हिंदी लोकांना हिंदुस्थान सरकार व हिंदी लोक ह्यांच्याकडे आशेनें पाहण्याचा हक्कच आहे ! "

ह्याच सुमारास ह्या कार्याकरितां मुंबईतील जे. बी. पेटिट व इतर अनेक नेमस्त व स्वतंत्र पक्षांतील पुढारी व व्यापारी ह्यांच्या नेतृत्वाखालीं इंडियन ओव्हरसीज असोसिएशन स्थापन करण्यांत आली.

सर दि. वाच्छा ह्यांच्या अध्यक्षतेखालीं १८ जुलै रोजी मुंबई येथें द.आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या ह्या नव्या गाऱ्हाण्यांचा विचार करणाऱ्या जाहीर सभेंत म. गांधी ह्यांच्याबरोबर सर नारायण चंदावरकर वगैरेंनींहि भाग घेतला होता.

वसाहतींतील हिंदी लोकांचा दर्जा हा प्रश्न पुढें अधिकाधिकच बिकट होत गेला व द. आफ्रिकेच्या जोडीला केनियाचा प्रश्न उपस्थित होऊन शिवाय फिजी, मॉरिशस, सिलोन, मलाया वगैरे ठिकाणच्या मजुरांचा प्रश्न, तसेंच कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यू झीलंड वगैरे स्वयस्वतंत्र वसाहतींतील प्रश्न उपस्थित झाले. परंतु म. गांधींनीं आतां आपलें सर्व लक्ष स्वराज्यावर एकवटलेलें असल्यामुळें व स्वराज्याच्या प्रश्नाशिवाय हे सर्व प्रश्न सुटणें शक्य नसल्यामुळें त्यांचें ह्या प्रश्नांकडील लक्ष कमी कमी होऊं लागलें.

( लॉर्ड ) सिंह ह्यांनीं पहिल्या साम्राज्य परिषदेंत; ना. शास्त्री ह्यांनीं वसाहतींतील दौऱ्यांत आणि सर तेजबहादुर सप्रू ह्यांनीं ( लंडन. १९२३ ) दुसऱ्या साम्राज्य परिषदेंत ह्या प्रश्नासंबंधानें केलेले प्रयत्न हे ' राजमान्य ' प्रयत्न असून लोकमान्य प्रयत्नांचें प्रामुख्य गांधींच्यामागें ॲंड्रयूज ह्यांजकडेसच आलें आहे.

प्रकरण १९ वें.

# युद्धपरिषदा व युद्धकार्य.



" माझ्या देशबांधवांची समजूत पाडून त्यांना मागें पाय घ्याव-यास लावणें माझ्या हातांत असतें तर मीं काँग्रेसचे सर्व ठराव तहकूब ठेवले असते. आणि होमरूल हे शब्द सुद्धां उच्चारूं नयेत असें केलें असतें. हिंदभूमीच्या एकंदर लायक मनुष्यांना साम्राज्यासाठीं आहुति देण्यास तयार केलें असतें आणि मला माहीत आहे, हिंदुस्थान आपल्या ह्या कृत्यानेंच साम्राज्यांतील एक अत्यंत आवडता भाग बनून गेलें असतें. परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं जवळ जवळ सर्वच सुशिक्षित हिंदी लोकमतानें याहून कमी परिणामकारक असा मार्ग स्वीकारण्याचा निश्चय केला आहे. "

गांधींनीं दिल्ली येथील युद्धपरिषदेच्यावेळीं ( ता. २९ एप्रिल १९१८ ) व्हाइसरॉयांस लिहिलेल्या पत्रांत वरील विचार ग्रथित केलेले आहेत.

## गांधींची आठवण झाली.

गांधी हिंदुस्थानांत आले तेच युद्धाच्या ऐन धामधुमींत आणि पुढील जवळ जवळ तीन वर्षे ते राजकारणापासून अलिप्त तर होतेच, होमरूलसारख्या चळवळींपासून ते अंशत: अशा विचारसरणीमुळेंच दूर तर राहिले होतेच, परंतु शिवाय हिंदीफौजेंत रिक्रूटभरती करण्यासाठींहि ते झटत होते. द. आफ्रिकेंत बोअर युद्धाचे वेळीं त्यांनीं स्वीकारलेलें धोरण व अडचणीचा फायदा घेणें हा दुर्बळपणाचा मार्ग आहे ही त्यांची विचारसरणी लक्षांत घेतां त्यांचें हें वर्तन अगदीं सुसंगत होतें आणि म्हणूनच सरकाराला सारा देऊं नका असें खेडा जिल्हाभर लोकांना सांगत फिरणाऱ्या आणि सरकारी इभ्रतीच्या व दराऱ्याच्या मुळावरच घाव घालणाऱ्या गांधींना दिल्ली येथील युद्धपरिषदेंत व्हॉइसरायांनीं आमंत्रण पाठविलें; आणि गांधींनीं तें स्वीकारलें. सारा सत्याग्रहांत ऐन आणीबाणीचा काळ आला असतांहि ते दिल्लीस निघून गेले.

वगैरे पुढारी ह्यांचें फार मोठ्या जनसमुदायावर वजन आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. परिषदेच्या कमीटयांतून सर्व प्रकारचीं मतें निःसंकोचपणें पुढें येतील असें करावयास पाहिजे होतें."

## खुद्द गांधींनीं काय केलें असतें आणि काय केलें?

ह्याच पत्रांत गांधीनीं पुढें माझ्या हातांत असतें तर मीं सर्व राजकीय चळवळी बंद करून सरकारला बिनशर्त भरपूर मदत केली असती असे स्वतःचे विचार प्रगट केले आहेत.

" साम्राज्याचें संरक्षण करण्याच्या प्रयत्नांतच आपणास स्वराज्य मिळूं शकेल हें आम्हांला स्पष्टपणें कळलें पाहिजे. " असें म्हणून गांधीनीं ह्या पत्रांत ब्रिटिश साम्राज्यावरील आपली निष्ठा प्रगट केली होती व म्हणूनच त्यांनीं परिषदेच्या ठरावांस स्पष्ट व सविस्तर संमति न देतां मूकसंमति देऊनच वेळ मारून नेली. मात्र ही संमति निर्विकल्प होती.

ह्या ठरावांप्रमाणें साम्राज्याला मनुष्यबळ पुरविण्यास गांधी तयार होते परंतु द्रव्यबळ पुरविण्याच्या बाबतींत मात्र ते साशंक होते. ते लिहितात, " रयतवर्गाशीं माझा संबंध अगदीं निकटचा आहे. त्यावरून माझें असें मत झालें आहे कीं, हिंदुस्थानने साम्राज्यतिजोरींत आतांपर्यंत जी भरती केली तीच हिंदुस्थानच्या शक्तीबाहेरची आहे." गांधींची ही प्रासंगिक इशारत त्यावेळच्या राजनिष्ठेच्या उसळींत बहुतेक सगळेच कौन्सिलर विसरून गेले आणि त्यांनीं उदारबुद्धीनें साम्राज्याच्या हातावर दीड अब्ज रुपयांचे दान सोडलें !

" आम्ही ह्या युद्धांत जें स्वात्मार्पण करीत आहों तें केवळ भविष्यकालीन आशेवर. मी ह्या संबंधानें सौदा करूं इच्छित नाहीं. पण ह्या आशेची आपणास जाणीव तरी करून देणें भाग आहे. ह्या आशेचा भंग होईल तर इंग्रजांवरील आमची श्रद्धा नष्ट होईल. "

गांधींची ही इशारत व्यर्थ गेली; ह्या राष्ट्रीय आशेचा निर्दयपणें भंग करण्यांत आला आणि ह्या आशाभंगांतच गांधींच्या पुढील घोरपाचें बीजारोपण झालें.

## गुप्त तहनामे.

" मुसलमानी राज्यांसंबंधानें पादशहांच्या प्रधानमंडळाकडून निश्चित आश्वासन मिळणें जरूर आहे. मुसलमानी राज्यांबद्दल आदरपूर्वक

व त्यांच्या पवित्र स्वाभावइलच्या त्यांच्या भावनांना मान देणें व हिंदी लोकांच्या स्वराज्याच्या मागणीचा वेळींच विचार करणें यांतच साम्राज्याची सुरक्षितता आहे " असा ह्याच पत्रांत गांधींनीं व्हाइसरॉयांस स्पष्ट इषारा दिला होता. वचनें मिळालीं आणि तीं फोल ठरलीं ! असहकारितेचें बीज ह्या पत्रांतच आहे.

म. गांधी हे दिल्ली परिषदेला जात असतां त्यांना भेटण्यासाठीं श्री. अँड्रयूज हे शांतिनिकेतनमधून दिल्लीस जात होते. लढाईच्या प्रारंभींच्या काळांत दोस्तराष्ट्रांनीं आपापसांत काहीं गुप्त तहनामे केले होते. रशियन परराष्ट्रीय ऑफिसांत बोल्शेव्हिक अधिकाऱ्यांना ते सर्व कागदपत्र सांपडले आणि त्यांनीं ते १९१७ नोव्हेंबरमध्यें प्रसिद्ध केले. त्यांची एक प्रत अँड्रयूज ह्यांच्या हातीं ह्या प्रवासांतच पडली. त्यांनीं हा सर्व प्रकार गांधींपुढें मांडला व गांधी अँड्रयूज ह्यांच्या व्हाइसरॉयांशीं त्या बाबतींत काहीं मुलाखतीहि झाल्या. प्रसिद्ध झालेली माहिती संशयास्पद ठिकाणांतून बाहेर पडलेली आहे आणि ती परान्यानें सिद्ध झालेली नाहीं असें म्हणून व्हाइसरॉयांनीं सर्व प्रकरण उडवाउडवीवर टाकलें. अँड्रयूज ह्यांस व्हाइसरॉयांचें म्हणणें पटलें नाहीं. परंतु गांधींना पटलें व त्यांनीं पुढें ह्या प्रश्नाचा विचारच सोडून दिला. तथापि गांधींच्या पत्रांतील वरील धोक्याच्या सूचनेचें बीज ह्या त्यांच्या माहितींतच असावें किंवा त्यामुळे त्यांनीं हा प्रश्न प्रामुख्यानें विचारांत घतला असावा असें वाटतें.

## दिल्ली परिषदेच्या प्रान्तिक आवृत्त्या.

ह्या दिल्ली परिषदेच्या प्रांतिक आवृत्त्या लवकरच चोहोंकडे निघूं लागल्या. १० जून रोजीं मुंबई येथें लॉर्ड वुइलिंग्डन ह्यांच्या अध्यक्षतेखालीं प्रांतिक युद्ध परिषद् बोलावण्यांत आली. मात्र ह्यावेळीं दिल्ली येथील चुकीची पुनरावृत्ति करण्यांत आली नाहीं. ह्या सभेंत लोकमान्य टिळक व त्यांच्या बरोबरच श्री. केळकर, श्री. जमनादास द्वारकादास, एम्. आर. बोमनजी, श्री. हॉर्निमन वगैरे प्रमुख होमरूलर पुढाऱ्यांना आमंत्रणें गेलीं होतीं

लोकांच्या पुढाऱ्यांना परिषदेला बोलावून लॉर्ड वुइलिंग्डन ह्यांनीं एक चूक टाळली. परंतु ही चूक टाळली म्हणून किंवा अजाणपणेंच त्यांच्या हातून दुसरी यापेक्षांहि मोठी अशी एक चूक घडली. " होमरूलर्स शक्य त्या त्या ठिकाणीं सरकारच्या मार्गांत अडथळे उपस्थित करीत असतात

असें एक विधान करून लॉर्ड वुइलिंग्डन ह्यांनीं अध्यक्षस्थानावरून केलेल्या आपल्या भाषणात होमरूलवाल्यांच्या सद्हेतूवर आक्षेप घेऊन अगदींच असत्य व उपमर्दकारक टीका केली आणि म्हणूनच ह्या आक्षेपाला उत्तरादाखल म्हणून लोकमान्य टिळक योग्यवक्तीं स्वराज्यवाल्यांची राजनिष्ठा निर्विवाद आहे असे सांगू लागताच राजकीय चर्चा करण्याचें हें ठिकाण नव्हे असें म्हणून लॉर्ड वुइलिंग्डन् ह्यांनीं त्यांना भाषण बंद करावयास लावलें मागाहून श्री केळकर हे बोलू लागले त्यानाहि बंदी करण्यात आली तेव्हां मात्र जास्त उपमर्द सहन करणें अशक्य होऊन सर्व होमरूलवादी पुढारी परिषदेंतून बाहेर निघून गेले

लॉर्ड वुइलिंग्डन ह्यांच्या ह्या अशिष्ट वर्तनाचा निषेध करण्याकरिता १६ तारखेला शांतारामाच्या चाळींत भरलेल्या प्रचण्ड जाहीरसभेचें अध्यक्षस्थान गांधीनीं स्वीकारलें होतें ते आपल्या भाषणांत म्हणाले —

" *दिल्ली परिषदेंत होमरूलवाल्यानीं भरपूर भाग घेतला व राजकीय स्वरूपाचीं भाषणें झालीं ही गोष्ट लॉर्ड वुइलिंग्डन विसरले* "

" टिळक ही जनतेची देवमूर्ति आहे त्याच्यांत व माझ्यात तीव्र मतभेद आहेत, पण त्यांच्या तोडीचा देशभक्त देशांत दुसरा कोणी मिळणार नाहीं हे मीं कबूल न करीन तर मीं आत्मवंचना केल्यासारखें होईल त्यांचा शब्द हाच कायदा समजून वागणार हजारों लोक आहेत त्यांचा आणि त्यांच्या द्वारें झालेला होमरूललीगचा अपमान हा तितक्या प्रमाणात जनतेचा उपमर्द आहे "

गांधीनीं ह्या सर्व विरोधी परिस्थितीलाहि न जुमानता रिक्रूटभरतीसाठीं शिकस्तीचे प्रयत्न सुरू केले

गांधीनीं नडियाद येथून ( २२ जून १९१८ ) रिक्रूटभरतीसाठीं पुढील अर्थाचें जाहीरपत्रक काढलें होतें —

" जर आपणांस शस्त्रांचा उपयोग कसा करावा हें झटपट शिकावयाचें असेल तर आपण लष्करांत दाखल होणें हें आपलें कर्तव्य आहे

" प्रबळ आणि दुर्बळ ह्यांच्यात स्नेहभाव जमणच शक्य नाहीं आपण भाग्यवान आहोंत असें समजलें जातें जर आपणास ह्या आरोपांतून मुक्त व्हावयाचें असेल तर आपण शस्त्रांचा उपयोग करावयास शिकलेंच पाहिजे

" म्हणून स्वराज्य कमावण्याचा सर्वांत सुलभ आणि सर्वांत सीधा मार्ग म्हणजे असेल तर तो साम्राज्याचें संरक्षण करणें हाच आहे. "

सामान्य जनांच्या पायरीवर येतात–त्यांना तसें करणें भाग पडतें तेव्हांच ते असा उपदेश करतात. ह्यासंबंधानें गांधींनीं यंग इंडिया ( १७ नोव्हे. १९२१ ) मध्यें फार मार्मिक खुलासा केला आहे.

## अहिंसातत्वाची मीमांसा.

" माझी अहिंसेची कल्पना अशी आहे कीं, तिच्यामुळें हातीं घेतलेलीं बहुतेक सगळींच कामें सोडून द्यावीं असें मला वाटतें. जोंपर्यंत एखादा सुद्धां अन्याय किंवा दुःख असहाय्य होऊन मुकाट्यानें पहावें लागत आहे तोंपर्यंत मला समाधान प्राप्त होणार नाहीं. परंतु प्रत्येक अन्याय दूर करणें किंवा प्रत्येक दुःख दूर करणें हें अथवा माझ्या डोळ्यांपुढें घडणाऱ्या अन्यायांच्या दोषापासून स्वतःला अलिप्त ठेवणें हें माझ्यासारख्या अशक्त, दुबळ्या, क्षुद्र प्राण्याला शक्य नाहीं. ह्या दोन्ही गोष्टींच्या दोषांपासून अलिप्त राहतां येणें शक्य आहे. परंतु ही अलिप्तता प्राप्त करून घेण्याचा मार्ग फार कष्टमय आणि दूरचा आहे. कांहींच न करतां हातपाय जोडून स्वस्थ बसून मला ही अलिप्तता प्राप्त करून घेतां येणार नाहीं; त्यासाठीं समंजसपणानें आणि निष्कामवृत्तीनें कर्मच करीत राहिलें पाहिजे आहे. आत्मा सर्वस्वी मुक्त व्हावा म्हणून जड देहाची सतत आहुति देत राहणें असेंच ह्या झगड्याचें स्वरूप आहे.

" शिवाय मींहि एक सामान्य नागरिक होतों. माझ्या इतर बांधवांपेक्षां मी कांहीं अधिक शहाणा नव्हतों. मीं अहिंसातत्वावर श्रद्धा ठेवीत होतों पण इतरांची त्या तत्वावर मुळींच श्रद्धा नव्हती. असें असूनहि ते रागानें व ईर्ष्येमुळें सरकारला मदत करण्यास तयार नव्हते. ते अज्ञानामुळें आणि दुबळेपणामुळें मदत करावयास तयार नव्हते. म्हणून मीं त्यांना त्यांच्या सरळ कर्तव्याची जाणीव करून दिली; अहिंसातत्वाचें स्पष्टीकरण करून सांगितलें आणि त्यावेळीं कोणता मार्ग स्वीकारावयाचा तें त्यांच्या मर्जीवर सोपविलें. कारण स्वराज्यामध्यें सुद्धां मीं ज्यांच्या अंगांत धमक आहे त्यांना हातीं शस्त्र घ्या आणि देशासाठीं लढा असाच सल्ला देईन. "

## साम्राज्य, कायदा आणि स्वराज्य.

स्वातंत्र्यासाठीं झगडणारे झुलू व जर्मन किंवा रुवें जग आपल्यावर उठलें आहे असा वेळीं जीवासाठीं झगडणारे जर्मन्स वगैरे विरुद्ध गांधींनीं ब्रिटिश सरकारला मदत कां म्हणून करावी ? दोघांच्या झगड्यांत जो तो मीच निरपराधी असें सांगत असतो. मग दोन्ही बाजूंचे गुणदोष सर्वबाजूनीं समजावून

" कित्येकांना असें वाटतें कीं, त्यावेळीं आपणास हक्क न मिळाले, तर पुढें आपली फसवणूक करण्यांत येईल. साम्राज्यसंरक्षणाच्या निमित्तानें आपण जी शक्ति कमावूं तीच आपणांस हे हक्क कमावून देईल."

जेव्हां सरकारनें ६००० हिंदी स्वयंसेवकांचें पथक उभारण्याची तयारी दर्शविली, तेव्हां खुद्द लोकमान्य टिळक अत्यंत उत्साहानें " सुशिक्षितांनो, आधीं बंदुक तर हातांत घ्या." असें म्हणून सुशिक्षितांनीं ह्या पथकांत दाखल व्हावें म्हणून प्रयत्न सुरू केले. परंतु पुढें ह्या पथकांतील सैनिकांचा दर्जा व इतर गोष्टी ह्या संबंधांतील सरकारचें अनुदार धोरण दिसून येतांच टिळकांनीं तो नाद सोडून दिला. गांधी मात्र रिक्रूट भरतीसाठीं गुजराथभर फिरूं लागले. त्यांनीं हें कामहि सत्याग्रहाइतक्याच निष्ठेनें केलें. आणि अखेर त्या श्रमानींच त्यांची प्रकृति अगदीं खराब झाली. ते अंथरुणास खिळले. परंतु त्यांचे हे सर्व प्रयत्न अगदीं निष्फळ झाले.

गांधींच्या साधुत्वाला भुलून लोकांची विचारशक्ति नष्ट होते; ते अंधभक्तीनें गांधींच्या मागें धांवतात असा आक्षेप घेणारांनीं खास गुजराथेंत, त्यांच्या आवडत्या नडियाद जिल्ह्यांतहि गांधीविषयीं लोकांनीं दाखविलेला हा सविनय मतभेद लक्षांत ठेवावा.

## गांधींचे आक्षेपक.

" गांधी अहिंसेचे कट्टे पुरस्कर्ते; मग त्यांनीं सरकारला सैन्यभरतीच्या कामीं मदत करून जगांतील हिंसेला मदत केली कशी ? "

असा प्रश्न सगळ्याच टिकाकारांच्या व बऱ्याच चहात्यांच्या मनांतहि उत्पन्न झाल्यावाचून राहत नाहीं. परंतु गांधींची मर्दानी अहिंसा आणि दुबळ्यांची अपरिहार्य अहिंसा यांतील भेद न कळल्यामुळेंच हा आक्षेप घेण्यांत येतो. गांधी अहिंसा आणि सत्य हीं दोन तत्वें भिन्न मानीत नाहींत आणि अहिंसा हें साध्यहि मानीत नाहींत. गांधी सत्य हेंच साध्य व सर्वस्व समजतात. आणि सत्याला हिंसा ही पोषक होऊं शकत नाहीं. अशी त्यांची निश्चित कल्पना असल्यामुळेंच ते अहिंसेचा पुरस्कार करतात.

आक्षेपक व सामान्य मनुष्य ' आपलें सत्य आणि गांधींची अहिंसा ' यांची गल्लत करतात. ' रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें ' हें ज्यांचें सत्य तत्व आहे त्यांनीं रणधुरंधर होण्याचा प्रयत्न न करणें ही आत्मवंचना आहे; त्यांत दुबळे-पणा आहे, दंभ आहे, अज्ञान आहे. गांधी जेव्हां आपली धर्मयुद्ध पामरी सोडून

सामान्य जनांच्या पायरीवर येतात-त्यांना तसे करणें भाग पडतें तेव्हांच ते असा उपदेश करतात. ह्यासंबधानें गांधींनी यंग इंडिया ( १७ नोव्हे. १९२१ ) मध्यें फार मार्मिक खुलासा केला आहे.

## अहिंसातत्वाची मीमांसा.

" माझी अहिंसेची कल्पना अशी आहे कीं, तिच्यामुळें हातीं घेतलेलीं बहुतेक सगळींच कामें सोडून द्यावीं असें मला वाटतें. जोंपर्यंत एखादा सुद्धां अन्याय किंवा दुःख असहाय्य होऊन मुकाट्यानें पहावें लागत आहे तोंपर्यंत मला समाधान प्राप्त होणार नाहीं. परंतु प्रत्येक अन्याय दूर करणें किंवा प्रत्येक दुःख दूर करणें हें अथवा माझ्या डोळ्यांपुढें घडणाऱ्या अन्यायांच्या दोषापासून स्वतःला अलिप्त ठेवणें हें माझ्यासारख्या अशक्त, दुबळ्या, क्षुद्र प्राण्याला शक्य नाहीं. ह्या दोन्ही गोष्टींच्या दोषांपासून अलिप्त राहतां येणें शक्य आहे. परंतु ही अलिप्तता प्राप्त करून घेण्याचा मार्ग फार कष्टमय आणि दूरचा आहे. कांहींच न करतां हातपाय जोडून स्वस्थ बसून मला ही अलिप्तता प्राप्त करून घेतां येणार नाहीं; त्यासाठीं समंजसपणानें आणि निष्कामवृत्तीनें कर्मच करीत राहिलें पाहिजे आहे. आत्मा सर्वस्वी मुक्त व्हावा म्हणून जड देहाची सतत आहुति देत राहणें असेंच ह्या झगड्याचें स्वरूप आहे.

" शिवाय मीहि एक सामान्य नागरिक होतों. माझ्या इतर बांधवांपेक्षां मी कांहीं अधिक शहाणा नव्हतों. मीं अहिंसातत्वावर श्रद्धा ठेवीत होतों पण इतरांची त्या तत्वावर मुळींच श्रद्धा नव्हती. असे असूनहि ते रागानें व ईर्ष्येमुळें सरकारला मदत करण्यास तयार नव्हते. ते अज्ञानामुळें आणि दुबळेपणामुळें मदत करावयास तयार नव्हते. म्हणून मीं त्यांना त्यांच्या सरळ कर्तव्याची जाणीव करून दिली; अहिंसातत्वाचें स्पष्टीकरण करून सांगितलें आणि त्यापैकीं कोणता मार्ग स्वीकारावयाचा तें त्यांच्या मर्जीवर सोपविलें. कारण स्वराज्यामध्ये सुद्धां मी ज्यांच्या अंगांत धमक आहे त्यांना हातीं शस्त्र घ्या आणि देशासाठीं लढा असाच सल्ला देईन. "

## साम्राज्य, कायदा आणि स्वराज्य.

स्वातंत्र्यासाठीं झगडणारे झुलू व जर्मन किंवा रूर्वे जग आपल्यावर उठले आहे असा वेळीं जीवासाठीं झगडणारे जर्मन्स वगैरे विरुद्ध गांधींनी ब्रिटिश सरकारला मदत कां म्हणून करावी ? दोघांच्या झगड्यांत जो तो मीच निरपराधी असें सांगत असतो. मग दोन्ही बाजूंचे गुणदोष सर्वबाजूनीं समजावून

घेणें शक्य नसताना एका पक्षाचा कैवार घेणें गैर नाहीं काय असेंहि गांधींच्या ह्या धोरणावर आक्षेप घेण्यात येत असे. वरील लेखातच गांधींनीं ह्या आक्षेपालाहि उत्तर दिलें आहे —

" मी ह्या साम्राज्याचा एक नागरिक आहें ही माझी कल्पना चुकीची आहे हें आता मला समजलें. पण त्यावेळीं माझी प्रामाणिक समजूत होती कीं, माझ्या देशाचीं गाऱ्हाणीं कितीहि असलीं तरी त्याची स्वातंत्र्याच्या दिशेनें प्रगति होत आहे आणि लोकांच्या दृष्टीनें सरकार एकदरींत कांहीं वाईट नाहीं आणि ब्रिटिश राज्यकर्ते एकलकोंडे आणि आतघमे असले तरी प्रामाणिक आहेत माझें असें मत असल्यामुळें ह्या परिस्थितींत एखादा इंग्रज मनुष्य जसा वागेल तसेंच वर्तन मीं केलें, स्वतंत्र धोरण स्वीकारण्या इतकें मला शहाणपणहि नव्हतें. किंवा महत्वहि नव्हतें प्रत्येक मनुष्य आपलें मत हाच कायदा समजून भावी राष्ट्रीय कायदे मंडळाचें प्रत्येक कृत्य धारवाडी कांटयानें तोलून पाहू लागेल तर मला अत्यंत दुःख होईल. स्वराज्यात सुद्धा प्रत्येक हिंदी मनुष्यानें असेंच वागावें अशी माझी अपेक्षा आहे नाहीं तर बहुजनसत्ताक सरकार एक दिवस सुद्धा टिकणार नाहीं.

" परंतु आतां माझे डोळे उघडले आहेत आतां साम्राज्याची अंतर्बाह्य सुधारणा व्हावी किंवा त्याचा नायनाट व्हावा अशीच मी प्रार्थना करीन. "

## प्रकरण १६ वें.

# रौलॅट कायदा आणि कायदेभंग.

### युद्धसमाप्तीनंतरच्या आशा आणि अपेक्षा

"शिमगा जातो; पण कवित्व रहातें."—ही म्हण जवळ जवळ ग्राम्य अशी आहे; पण तंतोतंत खरी आहे.

लहान राष्ट्रांच्या स्वातंत्र्याकरितां उत्पन्न झालेलें युरोपियन महायुद्ध संपलें. "वीरांना रहावयास योग्य आणि लोकसत्तेला सुरक्षित" करणारा असा लोक चातकाप्रमाणें वाट पहात असलेला तह घडून आला. अशा वीरोचित मातृभूमीतील आपल्या प्रेमाच्या मुलांमाणसांत येऊन सुखानें कालक्रमणा करावी म्हणून युद्धवीर घरोघर जावयास निघत होते; सदैव वाढती महागाई आतां माघार घेईल; युद्धकाळांत अपरिहार्य असलेली सर्व सरकारांची लोकमतावर पडलेली मगरमिठी ढिली होईल; अशा कल्पनेनें कष्टपीडित व आशाळभूत लोक नवें जग आणि नवा स्वर्ग ह्यांची मार्गप्रतीक्षा करीत होते!

भारत संरक्षण ( डीफेन्स ऑफ इंडिया ) ॲक्ट रद्द होईल, दुसरे तात्पुरते युद्धकालीन कडवे कायदे बंद पडतील आणि विजयानंदानें उन्मत्त झालेलें आणि आमच्या शक्तीबाहेरच्या स्वार्थत्यागानें व कल्पनेबाहेरच्या राजनिष्ठेनें कृतज्ञ झालेलें ब्रिटिश सरकार आम्हांला जबाबदार राज्यपद्धतीचा मोठासा पहिला हप्ता देऊन टाकील अशा कल्पनेनें हिंदी लोक स्वराज्याची मार्गप्रतीक्षा करीत होते!

युद्ध संपलें; पण युद्धाच्या निमित्तानें सरकार जे ज्यादा अधिकार पटकावून बसलें होतें ते सोडून देण्याची मात्र त्याची तयारी नव्हती. आधुनिक सुधारणांचा आणि विभ्रांततेचा जगभर शिमगा उडाला होता. हा शिमगा गेला; पण स्थायिक करण्यांत आलेलें जुलमी कायद्यांचें कवित्व मात्र मागें राहिलें होतें; रहावेंच अशी सरकारची इच्छा होती.

## रौलेट कमीटी.

भारतसंरक्षण कायद्याची मुदत संपत आल्यामुळें त्या कायद्यानें हातीं आलेले अधिकार पुढेंहि हातीं ठेवितां येतील किंवा नाहीं; ठेवितां आले तरी ते उजळमाथ्यानें कसे ठेवितां येतील; इतरंहि जुने पुराणे जुलमी कायदे रद्द करावे ही मागणी फारच वाढल्यास त्याला तोड म्हणून आगाऊ तजवीज काय करावी? असे प्रश्न हिंदुस्थान सरकारपुढें उपस्थित झाले होते. आणि म्हणूनच देशांत "बेकायदा गुप्त मंडळ्यांचा,–असल्याच तर त्यांचा,–प्रसार कितीसा झालेला आहे व त्यांचें स्वरूप काय आहे आणि त्यांचा परिणामकारक बंदोबस्त करण्याकरितां जरूर तर सरकारने कशा स्वरूपाचा कायदा करावा ह्या गोष्टींची चौकशी करून रिपोर्ट करण्याकरितां सरकारनें एक कमीटी नेमली. ह्या कमिटीचें अध्यक्षस्थान इंग्लंडमधील एक न्यायाधीश सर सिडने रौलेट ह्यांस देण्यांत आलें होतें. ह्या कमीटीनें इकडे तिकडे फेरफटका करून व सरकारी अधिकाऱ्यांकडून कांहीं माहिती मिळवून सरकारकडे एक रिपोर्ट रवाना करून दिला. ह्या शिफारशींतच रौलेट ॲक्टचें बीजारोपण केलें.

बादशाही अभिवचनांनीं नेमस्त भाळून गेले होते; वरिष्ठ कायदेकौन्सिलांतील लोकपक्षीय नामदार आपापसांत झगडत होते; लोकमान्य टिळक इंग्लंडमध्यें होते; मि. मॅंटेग्यू हिंदुस्थानाला इच्छादान देण्यास तयार आहेत अशी नेमस्तांची कल्पना होती; आणि म्हणूनच इच्छादान घेण्यास तयार झालेल्या ह्या नेमस्तांकडून अनिच्छापूर्वक कां होईना आपण मागूं ते अधिकार देण्याची कबूली, जरा धोरणानें वागल्यास, मिळविता येणें शक्य आहे असा जबाबदार सरकारी अधिकाऱ्यांचा समज होणें साहजिक होतें.

## कमीटीचा रिपोर्ट.

हा रिपोर्ट ता. १९ जुलै १९१८ रोजीं प्रसिद्ध झाला. डीफेन्स ऑफ इंडिया ॲक्टमधील बहुतेक सगळ्याच आक्षेपार्ह कलमांचा निराळ्या नांवाखालीं सरकारच्या शस्त्रागारांत कायमचा संग्रह करून ठेवण्याची सोय त्या रिपोर्टानें सरकारला करून दिली होती. "अराजक आणि क्रांतिकारक चळवळींचे खटले भरभर निकालांत काढतां यावेत म्हणून त्या रिपोर्टांतील सूचनान्वयें सरकारला मिळणाऱ्या हक्कांनीं, ( १ ) जूरी किंवा असेसर ह्यांच्यापुढें खटला चालविला जाणें ( २ ) खटल्याची प्राथमिक चौकशी ( Proceedings of Commitment ) व्हावयाची आणि त्याबरोबरच ( ३ ) शिक्षेवर अपील करण्याचा

(४) कधीं कधीं उघड चौकशी केली जाण्याचा (५) उलट तपासणी करण्याचा आणि (६) चौकशी कोर्टानें लेखी नमूद न केलेला पुरावा खटल्यांत दाखल न होण्याचा असे आरोपींचे हक्क नष्ट होणार होते. (७) न्यायमंदिरांचा आश्रय न करतांच जमानत मागून कोणाच्याहि हालचालींचें नियमन करावें इतकेंच नव्हे तर त्याला (८) पकडावें आणि कैदेंत टाकावें अशासारखे अत्यंत अनिष्ट अष्टाधिकार सरकारला मिळणार होते.

रौलॅट कमीटीच्या शिफारशींचा विचार सध्यां तहकूब ठेवावा अशा अर्थाचा एक ठराव ना. गणेश श्रीकृष्ण खापर्डे ह्यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलपुढें आणला होता. परंतु शास्त्री-सप्रू-सुरेंद्रनाथ अशा नेमस्त पुढाऱ्यांनीच ह्या ठरावास विरोध केला आणि तीन तासांच्या आंत हा ठराव हाणून पाडण्यास सरकारला मदत करण्याचे श्रेय घेतलें. मग सरकारचा नेमस्तांविषयीं असा समज कां होऊं नये ?

" साम्राज्याची अडचण म्हणजेच हिंदुस्थानची संधि " Need of the Empire is India's opportunity. असा बादशाही संदेश २७ एप्रिल १९१८ च्या दिल्ली युद्धपरिषदेच्या वेळीं जाहीर करण्यांत आला होता. पण आतां साम्राज्याची अडचण संपली होती. आणि अर्थातच हिंदुस्थानला संधि उरली नव्हती ! कारण युद्धतहकुबी जाहीर झाली होती !

डीफेन्स ऑफ् इंडिया ॲक्टमधील कलमांच्या दुरुपयोगांनीं देश अगदीं वैतागून गेला होता आणि आतां नवयुगाची मार्गप्रतीक्षा करीत होता. अशा वेळीं वरील रिपोर्टानें आशाळभूतांच्या डोळ्यापुढें काजवे चमकले, अंधश्रद्धावानांचे डोळे उघडले आणि श्रद्धाहीनांनीं डोळे वटारले असले तर त्यांत नवल कसचें ? ह्या सूचनांवर चौफेर टीकेचा भडिमार झाला. टीकाकारांत जहाल मवाळ वगैरे भेद उरलेले नव्हते.

### रौलॅट बिलें कौन्सीलपुढें आलीं.

अखेर ता. ६ फेब्रुवारी १९१९ रोजीं वरिष्ठ कायदेकौन्सीलच्या दिल्ली येथील बैठकींत सर वुइलियम् व्हिन्सट ह्यांनीं रिपोर्टांतील सूचनांस अनुसरून धि इंडियन क्रिमिनल लॉ ॲमेंडमट बिल नं० १ आणि क्रिमिनल लॉ इमर्जन्सी पॉवर्स बिल नं. ११ अशीं दोन बिलें विचाराकरितां पुढें मांडलीं.

हिंदी लोकपक्षांत ह्यावेळीं दिसून आलेलें मतैक्य नभूतो ( नभविष्यति ?) अशा स्वरूपाचें होतें ह्यांत शंका नाही. जहाल, मवाळ तर सोडाच, परंतु तटस्थ

स्थितींत तरी नेमस्त याहून काय करणार? ना. शर्मा ह्यांनीं रागारागानें राजीनामा खरडला परंतु तो तितक्याच तातडीनें मागें घेतला! इतकेंच नव्हे तर ह्या माघारीचें अखेर पर्यवसान शर्मा ह्यांनीं सरकारशीं सायुज्यमुक्ति मिळविण्यांत झालें! पं. मदन मोहन मालवीय, श्री. मझरुल हक्क व श्री.बी. डी. शुक्ल ह्या स्वाभिमानी सभासदांनीं मागाहून शांतपणें विचार करून राजीनामे दिले! आणि अखेर सर्वाहून कडक शब्दांनीं परंतु सर्वांच्या मागाहून श्री. जिन्हा ह्यांनीं राजीनामा दिला. एकंदर विरोधी सभासदांनीं तत्काळ राजीनामा देण्याची क्रांतिकारक कल्पना नेमस्तांच्या डोक्यांत भरेल तर ते नेमस्त कसचे?

" शिष्टाईसाठीं कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाचे एक सभासद म्हणून आपण इंग्लंडला जावयाला तयार व्हाल काय ?" अशी प्रश्नार्थक तार मालवीय ह्यांनीं गांधींना फेब्रुवारी अखेरच केली होती. माझा शिष्टमंडळांवर विश्वास राहिलेला नाहीं असें त्यावेळींच गांधींनीं मालवीयांना उत्तर दिलें होतें. आणि ह्या प्रश्नाला आपलें खरें उत्तरहि त्यांनीं जगजाहीर केलें.

> माझी अशी प्रामाणिक समजूत आहे कीं, वरिष्ठ कायदेमंडळा-पुढें दाखल झालेलें रौलॅट बिल अन्याय्य आहे; लोकांच्या स्वातंत्र्याच्या हक्कांवर गदा आणणारें आहे; आणि नागरिकत्वाच्या ज्या मूलभूत हक्कांवर समाजाची आणि राज्यांची उभारणी होते त्या मूलभूत हक्कांचाच नाश करणारें आहे. म्हणून मीं अशी प्रतिज्ञा करतों कीं, जर हें बिल मंजूर होईल तर हा कायदा आणि त्यानंतर नेमण्यांत येणारी कमीटी जे कायदे योग्य ठरवील त्यांचा सविनय भंग मीं करीन. मीं आणखी अशीहि प्रतिज्ञा करतों कीं, ह्या लढ्यांत मीं अगदीं कसून सत्याला धरून चालेन आणि कोणाच्याहि शरीराला किंवा मालमत्तेला अपाय करणार नाहीं."

ह्या प्रतिज्ञेवर सह्या करावयाच्या हें गांधींचें मालवीयांच्या प्रश्नाला खरें उत्तर होतें. गांधींनीं हें प्रतिज्ञापत्रक ता. १ मार्चलाच प्रसिद्ध केलें.

### नेमस्तांचे निषेध.

नेमस्तांनीं एकमतानें, एकाच वेळीं व तत्क्षणीं कौन्सिलांतील जागांचे राजीनामे देण्याचें नाकारून आपल्या लोकमतदर्शकत्वाच्या उरल्यासुरल्या हक्कां-

चाहि राजीनामा दिला हें एका अर्थी बरेंच झालें. कारण तसा कांहीं प्रकार होऊन सरकार लवकर शहाणें झालें असतें तर गांधींच्या पुढील सार्वजनिक आयुष्यक्रमाला कोणतें वळण लागलें असतें, त्याचा काय नियम ?

राजीनामा देण्याची गोष्ट पुढेंच राहिली परंतु प्रथम तर ना. शास्त्री ना. सप्रू ना. सुरेंद्रनाथ हे तीन नेमस्त सरदार ह्या बिलास अनुकूल होणार अशीच बातमी पसरली होती. ही बातमी पुढें खोटी ठरली. परंतु ह्या कायद्याविरुद्ध म. गांधींनीं काढलेल्या सत्याग्रह पत्रिकेला विरोध करणारा एक जाहीरनामा काढलाच.

" रौलॅट बिलाविरुद्ध सर्व देशभर अशी चळवळ उडून गेली असता आणि कौन्सीलांतील मवाळ पुढाऱ्यांनीं देखील ह्या बिलाला आपण अखेरपर्यंत विरोधच करूं असें जाहीर केलें असून आतां त्यांनींच आपल्या सहीनें म. गांधींच्या सत्याग्रहाच्या चळवळीविरुद्ध एक जाहीरनामा काढला आहे. मवाळ पुढाऱ्यांचा हा असला ' अव्यापारेषु व्यापार ' पाहून मन खरोखरच उद्विग्न होतें. बाबू सुरेंद्रनाथ किंवा ना. शास्त्री यांना कांहीं तुम्ही या सत्याग्रह शपथपत्रिकेवर सही करा असा जुलूम कोणी केला नाहीं ना ? मग मवाळांनीं ' न मया ' ' न मया ' असें म्हणून इतक्या उतावीळपणें हा सत्याग्रहविरोधी जाहीरनामा काढण्याचें कारण काय ? ( केसरी ४-३-१९ )"

रौलॅट बिलें मंजूर झाल्यास गांधी सत्याग्रह पुकारतील असें त्यावेळीं कायदे कौन्सिलांत सांगण्यांत आलें होतें. परंतु आम्हीं अशा धमकावणीला भीक घालणार नाहीं असें सरकारतर्फे आडमुठेपणाचें आणि अविचाराचें उत्तर देण्यांत आलें.

" म. गांधी ह्यांनी सत्याग्रहाची पताका खांद्यावर घेऊन पुढील धोरणाची दिशा लोकांना दाखविण्यास दहाबारा दिवसांपूर्वी जोरानें सुरवात केली आहे. तेव्हां सर्व प्रांतांनीं धोरण कायमचें ठरून सर्व प्रांत मिळून म. गांधींचे नेतृत्वाखालीं सत्याग्रह . जोरावर हे नवे दडपशाहीचे कायदे रद्द करावयास लावतील अशी आम्हांला आशा आहे.—" ( केसरी ११-३-१९ ) ही आशा अर्थात सर्वांचीच होती आणि ती पूर्ण होणेंहि स्वाभाविक होतें.

ह्याच कायदा मंजूर होण्याच्या आठवड्यांत ( ता. १७ व १८ मार्च ) सोलापूर जिल्हा परिषदेची बैठक प्रो. शिवराम महादेव परांजपे ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. त्यावेळीं हा कायदा मंजूर झाला. तरी आम्ही मुळीच

मानणार नाहीं असे सत्याग्रही उद्गार श्री. केळकर यांनी काढले होते. यांसमोरील प. खानदेश जि. परिषद श्री. पंढरीनाथ काशीनाथ तेलंग यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. मार्च एप्रिल हे महिने परिषत्पर्वणीचे असल्यामुळें महाराष्ट्रांत व इतरत्र अशा पुष्कळ जिल्हा सभा होऊन त्यांत ह्या कायद्यांचा निषेध व क्वचित् गांधींच्या सत्याग्रहास संमति व्यक्त करण्यांत आली होती. महाराष्ट्राबाहेरील अनेक प्रातिनिधिक व संघटित संस्थांमार्फत हेंच लोकमत प्रगट होत होतें.

## गांधींची प्रकृति.

ह्या रौलॅट ॲक्टच्या प्रसूतिवेदनांनीं सर्व राष्ट्र खडबडत होतें त्यावेळीं गांधी इकडे काळाशीं झगडत होते. गांधींची प्रकृति इतकी अत्यवस्थ झाली होती कीं, गांधींच्या विषयीं केव्हां एखादी अनिष्ट बातमी वाचण्याचें आपल्या नशीबीं येईल कोण जाणे, अशी सर्वांस काळजी लागून राहिली होती. खुद्द गांधींनीं सत्याग्रहाश्रमांत आपल्या अनेक जिव्हाळ्याच्या मित्रांस एकदां भेटून जाण्याविषयीं आमंत्रणें पाठविलीं होतीं !

गांधींचें आतांपर्यंतचें हिंदुस्थानांतील कार्य दिसावयास तरी सामान्य असेंच होतें. त्यांत प्रत्यक्ष राजकारण असें फारसें नव्हतें; गाजावाजा धामधूम अशी त्यांत कांहींच नव्हती; उलट युद्धविषयक बाबतींत लोकांनीं त्यांच्याविषयींचा आपला मतभेद कृतीनें व्यक्त करून दाखविलेला होता ! आणि असें असूनहि ह्यावेळीं जनतेमध्यें त्यांच्याविषयीं जो विलक्षण प्रेमादर दिसून आला तो विचार करण्यासारखा होता ह्यांत शंका नाहीं. ह्याचें कारण गांधींची तत्वनिष्ठा आणि सत्यनिष्ठा, निर्भयवृत्ति आणि निर्ममोनिरहंकारः–वृत्ति हेंच होय. जनतेला सर्व वृत्तीचे, सर्व दर्जाचे आणि सर्व मतांचे पाहिजे तितके व पाहिजे तसे पुढारी लाभलेले होते. परंतु वरील गुणसमुच्चयानें शोभणारा पुढारी मात्र जनतेला लाभलेला नव्हता. पण जनता अजाणपणें, आंतल्या आंत अशा गुणांची पुढाऱ्यांकडून अपेक्षा करूं लागलेली होती ! ही आशा गांधी तृप्त करतीलच अशी जनतेची कल्पना नव्हती किंवा जनतेची तशी प्रत्यक्ष अपेक्षाहि नव्हती. सर्व कांहीं गूढ व अज्ञान होतें. परंतु कांहीं तरी होतें खरें; आणि हा प्रेमादर हे त्या कांहींतरीचें स्पष्ट लक्षण होय असें आम्हांला वाटलें.

सुदैवानें गांधींची प्रकृति हळूहळू सुधारूं लागली होती. "तुम्ही अगदीं अंथरुणावर पडून राहिलेंच पाहिजे" असें डॉक्टर गांधींना बजावीत होतेच;

पण त्यांची प्रकृति आतां धास्ती करण्यासारखी नव्हती. इतकेंच, अशा वेळींच गांधींनी मागें दिलेलें प्रतिज्ञापत्रक बाहेर काढलें. " रात्रीमागून रात्री जागून काढून " पूर्णविचारा अंतीं " हिंदुस्थानच्या इतिहासांत बहुधा युगांतर घडवून आणणारा " असा हा मार्ग गांधींनीं स्वीकारला होता.

## गांधींनीं दौरे सुरू केले.

सत्याग्रहपत्रकावर सह्या घेण्याकरितां, आणि इतर कामाकरितां श्री. सौ. सरोजिनी नायडू, श्री. हॉर्निमन, श्री. जमनादास द्वारकादास, श्री. जमनादास मेहेता, श्री. एल्. आर्. तेरसी, श्री. शंकरलाल बँकर वगैरे पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रह सभा मुंबई येथें स्थापन करण्यांत आली. म. गांधी हे मार्चच्या दुसऱ्या आठवड्यापासून दौऱ्यावर निघाले ते सिंध, बंगाल, संयुक्तप्रांत, मद्रास वगैरे निरनिराळ्या भागांत फिरून आले. ता. ३ एप्रिलला गांधींचें त्रिचनापल्ली येथें महत्वाचें व्याख्यान झालें.

*न्याय! न्याय!! न्याय!!!*—अशी सात्विक सिंहगर्जना करीत हिंदुस्थानांत निव्वळ न्यायाचें साम्राज्य स्थापन करण्याकरितां आलेले लॉर्ड रेडिंग गांधींच्या ह्या अभिनव राजकारणानें चकित झाले आणि त्यांनीं गांधींना दिल्ली येथें प्रत्यक्ष भेटीस बोलाविलें. ता. ४ मार्च रोजीं गांधी व लॉर्ड रेडिंग ह्यांची मुलाखत झाली. परंतु फलनिष्पत्ति कांहींच झाली नाहीं. गांधी आतां सर्व हिंदुस्थानभर वाऱ्यासारखे भ्रमण करूं लागले.

मद्रास येथून ता. २३ मार्च रोजीं गांधींनीं एक आदेशपत्रक काढून ता. ३० मार्च हा राष्ट्रीयमानभंगाचा दिवस म्हणून सर्व राष्ट्रानें त्या दिवशीं कडक हरताळ पाळावा असें सूचविलें. १८ मार्चला वरिष्ठ कायदेकौन्सीलांत केवळ सरकारी सभासदांच्या मतांनीं मंजूर झालेल्या एका रौलेट बिलाला व्हाइसरॉयांची संमति मिळणार होती.

## आगीची ठिणगी—दिल्लीचा गोळीबार

विसाइयाई करून व्हाइसरॉयानीं रौलेटबिलाला ३० मार्च ऐवजीं आधींच संमति देऊन टाकली. त्यामुळें पूर्वी राष्ट्रीय मानभंग दिवस ३० मार्च ऐवजीं ता. ६ एप्रिल रोजीं पाळण्यांत यावा असें ठरलें. परंतु हा बदल अगदीं ऐनवेळीं झाला होता. दिल्लीपंजाबकडील पुढाऱ्यांस ही बदललेली तारीख फारच उशीरां समजली परंतु व्हाइसरॉयानीं बिलाला संमति देऊन टाकली हें मात्र त्यांना नक्की समजलें. त्यामुळें दिल्ली येथें ३० तारखेलाच हरताळ पाळण्यांत आला.

दिल्ली येथील हरताळ अत्यंत यशस्वी, परिपूर्ण होता. ह्या हरताळाच्या यशस्वितेनें अधिकारी वर्ग अगदीं बेभान झाला असला पाहिजे. त्यावेळी दुकानें बंद करण्यासाठीं शांतपणें दुकानदारांची मन वळविणाऱ्या स्वयंसेवकांपैकीं दोन स्वयंसेवक आणि रेल्वेस्टेशनवर मिठाई विकणारा परवानेवाला ह्यांच्यांत कांहीं बोलाचाली होऊन स्वयंसेवकांना पकडण्यांत आलें. स्टेशनबाहेर जमलेल्या प्रचण्ड जनसमुदायानें स्वयंसेवकांना सोडून देण्याचा आग्रह धरला. आणि अखेर ह्या बोलाचालीचें पर्यवसान गोळीबारांत झालें.

" दंगा आटोक्याबाहेर वाढण्यापूर्वीच अत्याचाराला आळा घालणें हें सरकारचें आद्यकर्तव्य आहे. प्रत्येक सुधारलेल्या देशांत विटाधोंड्याच्या फेकीली गोळीबारानेंच उत्तर मिळणार हें ठरलेलेंच " असें आतां सर्वतो मुखीं झालेलें विलक्षण तत्व मिसेस बेझंट ह्यांनीं ह्या दंग्यांना उद्देशूनच प्रतिपादन केलें होतें. ह्या प्रतिपादनाच्या मुळाशीं स्त्रीस्वाभाविक भीरुत्व होतें; साम्राज्यप्रेमदर्शक भीरुत्व होतें; कीं " सुधारलेलें " मर्दानी नीतिशास्त्र होतें त्याचा येथें खोल विचार करण्याचें कारण नाहीं. परंतु इतके मात्र खरे कीं, बरेचसे लोक घायाळ होऊन कांहीं मुडदे पडेपर्यंत कायद्यानें अवश्य असलेला गर्दी मोडण्याचा हुकूम लोकांना ऐकविण्यांत आला नव्हता किंवा प्रथम वारंवार काढून लोकांना गोळीबाराची इशारतहि देण्यांत आली नव्हती ! लोक गोळीबार करण्याइतके खवळले होते असें म्हणावें तर इकडे लष्करी लोक व अधिकारी बंदुकांवर संगिनी ठेवून तयार असतांनाच स्वामी श्रद्धानंद हे चाळीस हजार लोकांची जाहीरसभा व्यवस्थितपणें पार पाडूं शकले ! ह्यावरून जनसमूहांतील शिस्तबाज शांतपणा तर सिद्ध होतोच पण दंडुकेशाहीला न जुमानणारी धीरवृत्तीहि दिसून येते आणि ही धीरवृत्तीच गोळीबारालायक आहे असें अधिकाऱ्यांस वाटत होतें किंवा काय कोण जाणे !

## पहिला हरताळ.

राज्यांच्या उलथापालथींना, राजरक्ताच्या सड्यांना आणि सरसहा कत्तलींना शतकेंच्या शतकें सरावलेल्या दिल्लीनें ता. ३० मार्चच्या लहानशा गोळीबाराला न जुमानतां ६ एप्रिल रोजीं राष्ट्रीय मानखंडना दिवस पहिल्या इतक्याच उत्साहानें पाळला आणि मागील दिवशीं बळी पडलेल्या हिंदुमुसलमानांच्या स्मारकाकरितां फंड सुरू करण्यांत आला. एकाच गृहस्थानें ह्या फंडांत १ लाख रुपये त्याच वेळीं देऊं केले.

हरताळाच्या दिवशीं खुद्द गांधी मुंबई येथें होते. मुंबई शहरांत त्या दिवशीं दिसून आलेला देखावा हा राष्ट्रांतील युगांतराची खरी, खुरी कल्पना आणून देणारा होता. पहाटेपासूनच लोक अनवाणी आणि उघड्या मस्तकानें चौपाटीवर स्नानाला जाऊं लागले. समुद्रस्नानानंतर तेथील प्रचण्ड जनसमूहासमोर गांधीचें दिल्ली येथील गोळीबारासंबंधाचें भाषण झालें. दिल्लीच्या मृतवीरांसंबंधानें सहानुभूति व्यक्त करणारा आणि मुख्य प्रधानांना रौलॅट कायदा रद्द करण्याविषयीं बादशहास सल्ला द्यावी अशी विनंति करणारा असे दोन ठराव त्या ठिकाणीं मंजूर करण्यांत आले. त्यानंतर जमलेल्या सर्व लोकांची माधवबागेंत जाण्याकरितां मिरवणुक निघाली. चौपाटीवरील ह्या कार्यक्रमांत एकंदर दोन लाख लोकांनीं भाग घेतला असावा अशी कल्पना आहे. ताडदेववरील मुरगागिरीन मशिदींत मुसलमानांची जाहीर सभा भरेल; त्यावेळीं हिंदूंनीहि हजर रहावें असें माधवबागेंतील सभेंत जाहीर करण्यांत आलें होतें. मशीदींत बंदगी झाल्यावर हिंदुमुसलमानांच्या ऐक्यावर भाषणें झालीं. ह्या सभांतून गांधीशिवाय श्री. सौ. सरोजिनी नायडू, मि. हॉर्नीमन, श्री. जम्नादास द्वारकादास, वगैरेंनीं भाग घेतला होता. स्त्रियांची एक निराळी जाहीर सभा भरली होती. आणि रात्रीं फ्रेंच पुलाजवळ व शांतारामच्या चाळींत अशा दोन प्रचण्ड सभा एकाच वेळीं भरल्या होत्या.

मुंबई शहरांतील त्यावेळीं सर्व मोठमोठे बाजार-चहा फराळाच्यासुद्धां सर्व दुकानें, भाड्याच्या व्हिक्टोरिया व मोटारी वगैरे सर्वांचे व्यवहार अगदीं बंद पडले होते.

हिंदुस्थानांतील एकंदर मोठ्या शहरांतून व लहान लहान गांवांतूनहि हा हरताळ असा यशस्वी रीतीनें पार पडला कीं, या यशस्वितेबद्दल खुद्द हरताळ पाडणारे लोक सुद्धां चकित झाले असल्यास नवल नाहीं.

हिंदुस्थानच्या आधुनिक इतिहासांतील नवयुगाचा, जगाच्या राज्यक्रांतीच्या इतिहासांतील अभिनव प्रयोगाचा, हिंदुस्थानच्या राजकारणाला नवें वळण लावणाऱ्या व जगाच्या राजकारणाला नवें वळण लावूं पाहणाऱ्या, नवयुगाचा हा प्रत्यक्ष युगांतराचा साजेसा प्रमाणावरच पाडण्यांत आला यांत शंका नाहीं.

### कायदेभंगाला सुरुवात केली.

सरकारी अन्याय्य कायद्यांचा भंग करण्यापूर्वी नीतीचे सर्वधर्म नियम पाळण्याची तयारी असली पाहिजे, नाहींतर कायदेभंग यथाप्रमाणें न करतां सभा-

जविदारणा करील. म्हणूनच गांधींनीं, कायदेभंगाच्या प्रारंभीं आत्मशुद्धि व आत्मसंयमन ह्याचा प्रत्यक्ष धडा घ्यावा ह्या हेतूनें हरताळ पाडण्याची योजना केली होती.

ह्या हरताळाच्या दुसऱ्या दिवशींच मुंबई येथें प्रत्यक्ष कायदेभंगाला सुरवात करण्यांत आली. प्रथम सरकारच्या दृष्टीनें आक्षेपार्ह ठरलेलीं पुस्तकें सरकार जमा करण्याच्या कायद्याचा आणि वर्तमानपत्रें नोंदविण्याच्या कायद्याचा भंग करावयाचा असें ठरविण्यांत आलें होतें. सरकारजमा पुस्तकांच्या प्रसारासाठीं पुढील पुस्तकांची निवड घरण्यांत आली:—( १ ) हिंदस्वराज्य ( २ ) सर्वोदय ( ३ ) एक सत्यवीराची कथा ( ४ ) मुस्ताफा केमाल पाशाचें भाषण आणि त्याची कारकीर्द हीं सगळीं पुस्तकें पूर्वी द. आफ्रिकेंतील गांधींच्या इंडियन ओपीनियन छापखान्यांत छापलेलीं होतीं. हिंदस्वराज्य पुस्तकाच्या १५ हजार प्रति काढण्यांत आलेल्या होत्या. गांधी, सरोजिनी नायडू, अनुसूया बेन, अवंतिकाबाई गोखले, जम्नादास द्वारकादास, जम्नादास मेथा, हंसराज प्रागजी ठाकरसी, शंकरलाल बँकर ह्यांनीं संध्याकाळीं ७ वाजल्यापासून पुस्तकें विकण्यास सुरवात केली. रात्रीं दीड वाजेपर्यंत हें काम सुरू होतें. हिंदस्वराज्य पुस्तकाच्या सगळ्या प्रति खलास होऊन गेल्या.

सत्याग्रही हें गांधींचें रजिस्टर केल्यावांचून प्रसिद्ध करण्यांत आलेलें हस्तलिखित पत्र दोनप्रहरपासूनच विकण्यांत येऊं लागलें होतें. गांधींनीं त्याची एक प्रत पोलिसकमिशनरकडे माहितीकरितां पाठवून दिली होती. ह्या पत्राचे पुढें आणखी १–२ अंक प्रसिद्ध करण्यांत आले होते.

तील पलवल स्टेशनवर पंजाब सरकारच्या हुकमावरून त्यांना ता. ९ रोजी रात्रीं पकडून मथुरेला आणण्यांत आलें. तेथून मुंबईस आणण्याकरितां ता. १० रोजीं सकाळीं बी. बी. सी. आय् रेलवच्या गाडींत बसविण्यांत आलें. आपणास कोठें नेण्यांत येत आहे ह्याची गांधींना कांहींच कल्पना नव्हती. गांधींना पकडण्यांत आलें त्यावेळी त्यांनीं आपले खासगत चिटणीस ( प्रायव्हेट सेक्रेटरी ) महादेव भाई देसाई ह्यांच्या मार्फत आपल्या देशबांधवांस एक संदेश पाठविला. त्यांत ते म्हणतात:-

" रौलेट कायदा मंजूर होऊनहि आपण तुरुंगाबाहेर रहावें ह्याबद्दल मला फारच वाईट वाटत होत. आतां मीं खरोखर स्वतंत्र झालों आहें. मला आपली कांहीं सेवा बजावावयाची होती. आणि तिचें स्वरूप सत्याग्रह पत्रिकेंतून मीं व्यक्त केलें आहेच. " " हिंदु, मुसलमान, शीख, पारशी, ख्रिस्ती, यहुदी आणि हिंदुस्थानांत जन्म घेतलेले किंवा घर करून राहिलेले सगळ लोक ह्या राष्ट्रीय-चळवळींत भाग घेतील अशी मला आशा आहे. स्त्रियासुद्धां पुरुषाप्रमाणेंच ह्या चळवळींत भरपूर भाग घेतील अशी मला आशा आहे. "

## पकडलें नव्हतें-नुसती अटक केली होती

" आम्ही गांधींना चांगल्या रीतीनें ओळखतों आणि जाणतों. जरी आम्हांला त्यांचीं सगळींच ध्येयें आणि मार्ग मान्य नाहींत तरीपण आमची अशी पुरी समजूत आहे कीं, प्रक्षुब्धतेच्या आणि अस्वस्थतेच्या काळांत, दंगलीच्या भागांत गांधी हजर असतील तर त्याचा परिणाम चांगला व्हावयाचाच, वाईट परिणाम व्हावयाचा नाहींच " असें म्हणून टाइम्स आफ् इंडियासारख्या पत्रानेंच गांधींच्या ह्या अटकेचा निषेध केला होता. " परिस्थिति सुधारावी म्हणून गांधींचें सहाय्य घ्यावयास पाहिजे होतें; कारण गांधींच्या स्वभावाला हेंच विशेष रुचतें " असें म्हणून ना. शास्त्री ह्यांनींहि सरकारच्या ह्या कृत्याचा कडक निषेध केला. दिल्ली व पंजाब येथील सरकारांचीं मतें निराळीं पडलीं आणि हिंदुस्थान सरकारचेंहि मत तसेंच पडलें. परंतु ह्या तिघांच्या शहाणपणाचा व मतैक्याचा परिणाम एका लहानशा चुकींत झाला आणि ह्या लहानशा चुकीचा घोर परिणाम एकंदर राष्ट्राला व साम्राज्याला सोसावा लागला, लागत आहे व लागणार आहे.

गांधींना पकडण्याच्या तारा पोहोंचतांच ठिकठिकाणीं, विशेषत: पंजाबांत जो विलक्षण चित्तक्षोभ उसळला त्याची नुसती झुळूक लागतांच बहुधा सरका-

रचा गांधींना पकडण्याचा बेत बदलला असावा आणि आम्ही गांधींना पकडलें नव्हतें; केवळ त्यांच्या पुढील प्रवासाला मनाई केली होती (Detained) असें त्या अटकेला मागाहून स्वरूप देण्यांत आलें असावें; असाहि तर्क करण्यास जागा आहे. जर गांधींना पकडण्याची किंवा हद्दपार करण्याची सरकारची इच्छा नव्हती तर त्यांनीं प्रथमच तसें जाहीर करावयास पाहिजे होतें; म्हणजे त्या थोड्या चुकीचा घोर परिणाम सहज टळला असता.

गांधींना बुधवारीं रात्रीं पकडण्यांत आलें; शुक्रवारीं मुंबईस येणाऱ्या पंजाब-मेलनें मुंबईस आणून मरीन लाइन्स स्टेशनवर त्यांना मोकळें सोडण्यांत आलें.

गांधींना पकडून हद्दपार करणार, कीं कोणत्या तरी अज्ञात ठिकाणीं नेऊन ठेवणार, अथवा त्यांच्यावर खटला करणार तें कोणास कांहींच कळेना. या दोन दिवसांत सर्व मुंबईशहर—आणि सर्व देश—भर भयंकर हलकल्लोळ उडून गेला होता.

## दंगेधोपे व जाळपोळ

*शांत रहा ! शांत रहा ! शांत रहा !*—गांधींनीं आपल्या देशबांधवांस असा आग्रहाचा संदेश पाठविला होता आणि गांधींचे सहकारी लोकांस असा कळ-कळ्यानें जीव तोडून उपदेश करीत होते. परंतु प्राणांतिक वेदना होत असतांना रोगी ज्याप्रमाणें शांत र हू शकत नाहीं त्याप्रमाणेंच आपल्या प्राणप्रिय पुढा-ऱ्याच्या अज्ञात अवस्थेमुळें हवालदील झालेल्या लोकांचीं मनें स्वस्थ राहणें शक्य नव्हतें.

खवळलेल्या समुद्राप्रमाणें मुंबई शहरांत जनसमूहाच्या गर्दीच्या आणि त्यांच्या हृदयांतील मनोविकारांच्या लाटा उसळत होत्या. मुंबईत पायधुणी नाक्यावर दगड-फेकहि झाली. परंतु पुढाऱ्यांची तत्परता आणि अधिकाऱ्यांचा शहाणपणा यामुळें लोकक्षोभ विकोपास गेला नाहीं. इतर कित्येक ठिकाणीं मात्र तत्परता व शहाणपणा यांचा मिलाफ आढळून आला नाहीं.

या सर्व अनर्थाला आदिकारण ठरलेल्या सर मायकेल ओडवायर यांच्या राजधानींत—लाहोरमध्यें या घोरप्रकाराला अगोदर गोळीबार सहन करावा लागला. मशीनगन्स आणि लष्करी घोडदळ व पायदळ यांचें जंगी प्रदर्शन करण्यांत आलें. अमृतसर येथील परिस्थिति याहूनहि बिकट होती. तेथील हिंदुमुसल-मानांचे दोन नामांकित पुढारी डॉ. सत्यपाल आणि डॉ. किचलू यांना ता. १० रोजीं पकडून त्यांची अज्ञात ठिकाणीं रवानगी करण्यांत आली. त्यांची

सुटका व्हावी म्हणून मागणी करण्यासाठीं जमलेल्या लोकसमूहावर डेप्युटी कमिशनरच्या हुकमानें गोळीबार करण्यांत आला. तेव्हां लोक चवताळले आणि त्यांनीं बँका, पोस्टऑफिस व इतर कित्येक सरकारी ऑफिसांची जाळपोळ केली. १४ तारखेस लाहोर येथें लाला हरकिसनलाल, लाला दुनीचंद, व पं. रामभुजदत्त चौधरी ह्यांना पकडून त्यांची अज्ञात ठिकाणीं रवानगी करण्यांत आली. मागाहून ट्रायब्यून पत्राचे संपादक कालीचरण राय ह्यांना पकडण्यांत आलें.

गुजरायेंतहि आगगाड्यांचे रस्ते उखळण्यांत आले; तारा तोडण्यांत आल्या; जाळपोळ व खून झाले. अहमदाबाद, विरमगांव वगैरे ठिकाणीं गोळीबार होऊन अखेर लष्करी कायदा पुकारण्यांत आला. कलकत्त्याला थोडीशीच दंगल उडाली.

## जालियांवाला बागेंतील कत्तल.

लवकरच चोहोंकडे शांतता प्रस्थापित करण्यांत आली. परंतु ले. गव्हर्नरांच्या हुकमावरून ज. डायर ११ तारखेस रात्रीं अमृतसर येथें आला. आणि त्यानें मुलकी अधिकाऱ्यांकडून शहरचा ताबा आपल्याकडे घेतला. १३ तारखेस जालियांवाला बाग ह्या एका तटबंदीच्या मोकळ्या जागेत सभा भरविण्यांत येईल असें जाहीर करण्यांत आलें. शहरांत कोठेंहि जमाव दिसल्यास जमावांतल्या लोकांना गोळ्या घालून ठार करण्यांत येईल असा ज. डायर ह्यानें हुकूम काढला आणि जालियांवाला बागेंत जाहीरसभा भरणार आहे असें समजतांच सैन्य व मशीनगन्स घेऊन तिकडे गेला. दिवस हिंदूंच्या उत्सवाचा असल्यामुळें बागेंतील प्रचण्डगर्दीत स्त्रिया व मुलें ह्यांचीहि खूब गर्दी झालेली होती. बागेजवळ येतांच ज. डायरनें आगाऊ सूचना न देतांच लष्करी लोक बागेच्या तोंडाशीं उभे करून अर्ध्या मिनिटाच्या आंत गोळीबार करण्याचा हुकूम सोडला. हा गोळीबार सैनिकांचीं काडतुसें संपेपर्यंत, दहा मिनिटें अत्यंत गर्दीच्या भागावर सारखा सुरू होता. जागेला भिंती असल्यामुळे लोकांस बाहेर पडण्यास मार्गच नव्हता. सुमारें पांचशें ते सहाशें लोक ठार करून आणि त्याच्या तिप्पट तरी लोकांस जखमी करून ज. डायर तेथून निघून गेला. प्रेतांची वासलात लावण्याची किंवा जखमी लोकांची सुश्रूषा करण्याची त्यानें कांहींच तजवीज केली नाहीं. सुश्रुषेसाठीं खटपट करण्याची लोकांस सवड ठेविली नाहीं. मागाहून अमृतसर, लाहोर, गुजराणवाला व लियालपूर ह्या जिल्ह्यांत लष्करी कायदा पुकारण्यांत आला.

ह्या प्रसंगाचा येथें सविस्तर उल्लेख करण्याचें कारण नाहीं. कॉंग्रेस चौकशी कमिटीच्या इंग्रजी रिपोर्टीत व त्याच्या संक्षिप्त मराठी अहवालांत ही सर्व माहिती आलेली आहेच.

## शांत व्हा ! शांत व्हा !

गांधी मरीन लाइन्स स्टेशनवर उतरले तेव्हां बुधवार रात्रीपासून शुक्रवार दोनप्रहरपर्यंत हिंदुस्थानच्या प्रचण्ड भूप्रदेशांत ह्या राजकीय भूकंपानें केवढे अनर्थ उडवून दिले असतील ह्याची कांहींच कल्पना नव्हती. गांधींची प्रशांत प्रेमळ मूर्ति अहिंसेच्या कल्पनेतच गुंग होती. परंतु स्टेशनवर उतरल्यानंतर अगदीं अल्प काळांतच त्यांना वस्तुस्थितीची पूर्ण कल्पना येऊन चुकली. आधीं ते सर्व मुंबईभर मोठमोठ्या चौकांतून प्रचण्ड जमावानें अधीर व प्रक्षुब्ध झालेल्या जमावांतून इकडे तिकडे फिरले. शांत व्हा ! शांत व्हा म्हणून प्रत्यक्ष गांधींचे शब्द कानावर येईपर्यंत, गांधींची प्रेममूर्ति प्रत्यक्ष डोळ्यांनीं डोळे भरून पाहीपर्यंत कोणासहि गांधींच्या सुटकेची बातमी खरी वाटत नव्हती व कोठेंहि गर्दी मोडत नव्हती. त्याच दिवशीं संध्याकाळीं चौपाटीच्या वाळवंटावर पन्नास हजाराहून अधिक लोकांच्या प्रचण्ड जनसमूहापुढें त्यांनीं शांतता राखण्याविषयीं उपदेशपर भाषण केलें. एवढें करूनच न थांबतां शहरांतील सर्व पुढाऱ्यांची एक सभा बोलावून शांतताप्रस्थापनेची योजना तयार केली. त्या कामासाठीं स्वयंसेवकांची उभारणी केली; निरनिराळ्या संस्थांच्या कार्यालयांत जाऊन शांतिमंत्राची सर्वांस दीक्षा दिली; आणि अशा रीतीनें मुंबईंत स्थिर-स्थावर केल्यावर गांधी अहमदाबादेस गेले. १४ तारखेस संध्याकाळीं सत्याग्रहाश्रमांत त्यांचें जाहीर व्याख्यान झालें. त्यावेळीं त्यांनीं अत्याचाराबद्दल लोकांची कडक शब्दांनीं कानउघाडणी केली; अपराध्यांनीं आपल्या चुकीचें प्रायश्चित्त घ्यावें असें सूचविलें आणि स्वतःच्या पापाचें अल्प प्रायश्चित्त म्हणून आपण तीन दिवस उपवास करणार असें जाहीर केलें.

## धमकी आणि हितोपदेश.

ही गांधींची वाटती चळवळ दाबून पाडण्याच्या उद्देशानें मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड ह्यांचें एक दमदाटी करणारें व चिथावणी देणारें भाषण ता. १६ एप्रिल रोजीं मुंबई येथें झालें. ही चळवळ क्रांतिकारक आहे. हल्लीच्या चळवळीचा बंदोबस्त हरएक तऱ्हेनें करण्यास सरकार मागें पुढें पाहणार नाहीं." अशी धमकी देऊन गव्हर्नरनीं मुंबईच्या नेमस्तांना असा स्पष्ट इशारा दिला

कीं, " मुंबईच्या सर्व पुढाऱ्यांनीं एकत्र जमून ह्या दंगेधोपे उत्पन्न करणाऱ्या चळवळीशीं आपला कांहीं संबंध नाहीं असें जाहीर करावें. " गव्हर्नरांचा हा इषारा मान्य करण्याची धमक किंवा इच्छा मुंबईच्या पुढाऱ्यांत उरली नव्हती.

ऑल इंडिया कॉंग्रेस कमीटीची बैठक २० तारखेस मुंबई येथें पं. मदन मोहन मालवीय ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. कमीटीनें सत्याग्रहासंबंधानें विशिष्ट ठराव केला नाहीं. परंतु राष्ट्रीय चळवळीवर सरकारतर्फे घेण्यांत येणाऱ्या आक्षेपांना उत्तर देण्याकरितां एक कमिटी नेमली आणि अत्याचारांचा निषेध केलाच, परंतु ह्या एकंदर दंग्याधोप्यांची स्वतंत्रपणें जाहीर चौकशी व्हावी अशी मागणी केली.

मुंबई प्रांतिक परिषद बॅप्टिस्टा काकांच्या अध्यक्षतेखालीं एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यांत भरली होती. ती वेळ दंगेधोपे होऊन गेल्यानतरची होती. त्या वेळच्या आपल्या भाषणांत बॅ. बॅप्टिस्टा ह्यांनीं असें सूचविलें कीं, अशिक्षित सर्वसामान्य जनतेपुरती ही कायदेभंगाची चळवळ ३ महिनेपर्यंत तहकूब ठेवावी. फक्त सुशिक्षितांपुरताच ह्या मताचा प्रसार करावा. बॅ. बॅप्टिस्टा ह्यांचा ह्या चळवळीवर दुसरा मोठाच आक्षेप हा होता कीं, कायदे कोणते मोडावयाचे तें ठरविण्याचा अधिकार एका कमीटीवरच सपवूं नये. त्याचा जाहीररीतीनें विचार व्हावा व त्यांची यादी आगाऊ जाहीर करण्यांत यावी.

मिसेस बेझंट ह्या प्रथम सत्याग्रहास अनुकूल होत्या. परंतु पुढें त्यांनीं ह्या चळवळीवर दोन आक्षेप काढले. पहिला आक्षेप हा कीं, राष्ट्राची व कोणाचीहि सदसद्विवेक बुद्धि अशा रीतीनें मूठभर व्यक्तींच्या हातीं देणें हें अनिष्ट आहे. आणि दुसरा आक्षेप असा कीं, जो कायदा अन्याय्य म्हणून वाटत असेल व ज्याच्या विरुद्ध चळवळ करावयाची असेल तोच तेवढा मोडून कायदेभंग करावा. वडाची साल पिंपळास लावून कोणता तरी भलताच कायदा मोडूं नये. ह्या विचारसरणीप्रमाणें रौलॅट कायद्याविरुद्ध कायदेभंग करणेंच अशक्य होत होतें. रौलॅट कायद्यांत असें कोणतेंच कलम नव्हतें. कीं तें लोकांना मर्जीस येईल तेव्हां मोडतां यावें ? तो कायदा अभावात्मक होता, प्रत्यक्ष व्यवहारनियामक नव्हता. आणि म्हणूनच गांधींना पूर्वींच्या इतरांच्या व स्वतःच्या कायदेभंगाच्या कल्पना बदलून ही वडाची साल पिंपळास लावून सरकारच्या एका अन्याय्य कृत्याला आळा घालण्याकरितां दुसऱ्या कोणत्याहि कायद्याचा भंग करावा; मात्र त्या कायदेभंगानें नीतिभंग होत नसला म्हणजे झालें; अशा

नव्या मताचा पुरस्कार करावा लागला. यापुढें गांधींनी ह्या कल्पनेचा कधींच प्रामुख्यानें पुरस्कार केला नाहीं.

## कायदेभंग कीं आशाभंग.

" आपल्या सगळ्या चळवळींचा विपर्यास करण्यांत येत आहे. तेव्हां थोडया दिवसांसाठीं तरी कायदेभंगाची चळवळ तहकूब ठेवावी " अशी गांधी मुंबईस येतांच मि. हॉर्नीमन ह्यांनीं त्यांना सूचना केली.

हळुहळू परिस्थितीवर जास्त प्रकाश पडत चालला; अत्याचाराचें भीषण स्वरूप गांधींच्या ध्यानांत येऊं लागलें आणि म्हणून त्यांनीं स्वतः उपवासाचें प्रायश्चित्त घेतलें, अपराध्यांनीहि प्रायश्चित्त घ्यावें म्हणून सूचविलें, इतकेंच नव्हे तर स्वतः त्यांच्या दृष्टीनें मोठयांत मोठें असें प्रायश्चित्त त्यांनीं घेतलें. तें हें कीं, त्यांनीं सरकारी हुकमाचा भंग करून पुन्हां पंजाबांत शिरण्याचा आपला बेत रहित केला. अद्याप सरकारजमा पुस्तकें विकणें व सत्याग्रहाच्या शपथपत्रिकोवर सह्या घेणें हीं कामें सुरूच होतीं; सत्याग्रह पत्राचेहि आणखी एक दोन अंक प्रसिद्ध झाले. परंतु अखेर पंजाबांतील बातम्यांनीं त्यांना पराकाष्ठेचें दुःख होऊन त्यास मि. हॉर्नीमन ह्यांची विनंति मान्य करणें भाग पडलें. ता. १८ एप्रिल रोजीं त्यांनीं सत्याग्रह सभेला पत्र लिहून सत्याग्रह तात्पुरता बंद ठवावा असा सल्ला दिला. त्यापल्या पत्रांत ते म्हणतातः—

" मीं हा ( कायदेभग तात्पुरता बंद ठेवण्याचा ) सल्ला देत आहें त्याचे कारण आतां माझा त्याच्यावरील विश्वास कमी झाला आहे हें मात्र नव्हे; उलट त्याच्यावर, शक्य तर, पूर्वीपेक्षांहि अधिक विश्वास असल्यामुळेंच मीं असा सल्ला देत आहें. सार्वत्रिक चळवळीस हात घालण्यापूर्वी मला विघातक शक्तींचें सामर्थ्य नीट अजमावतां आलें नाहीं ह्याबद्दल मला वाईट वाटतें. आतां मला ह्या परिस्थितीला तोंड कसें द्यावें ह्या प्रश्नाचा जरा दम खाऊन विचार करणें अवश्य आहे. सत्याग्रह हें ह्या प्रक्षोभाचें कारणहि नाहीं आणि सत्याग्रह हा या प्रक्षोभाचा प्रसंगहि नव्हता. सत्याग्रह हा असंख्य शाखा फुटलेल्या वडाच्या झाडासारखा आहे. सत्याग्रह ही त्याची फक्त एक शाखा आहे. सत्य आणि अहिंसा हें ह्या झाडाचें मुख्य खोड आहे; त्यापासून इतर असंख्य शाखांची वाढ होते. कटु अनुभवानं आतां आपणास कळून चुकलें आहे कीं, कायदे न जुमानण्याच्या वातावरणांत कायदेभंगाच्या कल्पनेला ताबडतोब मान्यता मिळाली. परंतु ज्या मूळबुंध्यापासूनच कायदेभंगाची शाखा फुट

शकते त्या सत्य व अहिंसा ह्या मूलभूत कल्पनांना मात्र फारच थोडी मान्यता मिळाली आहे, किंबहुना मुळींच मान्यता मिळाली नाहीं. सत्य व अहिंसा ह्या कल्पनांचा आपण निर्भयतेनें प्रसार केला पाहिजे आहे. सत्याग्रही ह्या नात्यानें आपण अधिकाऱ्यांना चोहोंकडे सुव्यवस्था स्थापन करून बेकायदा प्रवृत्तीला आळा घालण्याचे कामीं निरलसपणें मदत केली पाहिजे."

अखेर कायदेभंग बंद पडला आणि त्याबरोबरच असंख्य उत्साही कार्यकर्त्यांचा आशाभंग झाला.

"सत्याग्रह पुन्हां सुरू केव्हां करणार?" अशी चोहोंकडून गांधींकडे चौकशी होऊं लागली. ह्या प्रश्नाला उद्देशून त्यांनीं २-५-१९ रोजीं काढलेल्या सत्याग्रहपत्रिकेंत असें उत्तर दिलें कीं, अहिंसेवांचून हिंदुस्थानचा तरणोपाय नाहीं; आणि जनतेला हें अनत्याचाराचें महत्व पटावें तितकें पटलेलें दिसत नाहीं. ह्याकरितां क्षोभकारक प्रसंगींहि "हिंदुस्थानचा शुद्ध स्वार्थ कशांत आहे तें पाहून लोक शांत राहतील" अशी जागृति प्रथम करूं. दिल्ली, अमृतसर, अहमदाबाद वगैरे ठिकाणचे दंगे सरकारला टाळतां आले नाहींत. कारण सरकारची तशी तयारीच नव्हती. परंतु दंग्यांची भीति दिसल्यास १।२ महिन्यांत सरकार सर्वत्र लष्करी बंदोबस्त करून अत्याचार अशक्य करील. आणि त्या परिस्थितीचा फायदा घेऊन आपणास कायदेभंग पुन्हां सुरू करतां येईल.

सत्याग्रह पुन्हां ऑगष्टमध्यें सुरू करण्याचा गांधींचा विचार होता परंतु पूर्ण विचारांतीं त्यांनीं तोहि बेत रहित केला आणि कायदेभंगाचा उपक्रम अनिश्चित काळपर्यंत लांबणीवर टाकला. ह्या तहकुबीचें लोकांस आश्चर्य वाटलें. गांधी केव्हां माघार घेतील आणि

## अनुयायांना दगा

देतील ह्याचा नियम नाहीं असें त्यांवेळीं पुष्कळांस वाटूं लागलें. परंतु एवढें मात्र निर्विवाद सिद्ध आहे कीं गांधींच्या सत्य व अहिंसा ह्या तत्वांच्या आणि त्यांनीं आपल्या चळवळीला घालून दिलेल्या बंधनांच्या दृष्टीनें गांधींची ही तहकुबी विसंगत किंवा अगदींच अनपेक्षित अशी नव्हती. आणि शिवाय गांधींच्या अभिनव विचारसरणीला व कार्यपद्धतीला भाळून गेलेले लोक हा आशाभंग लवकरच विसरून गेले.

इकडे कालांतरानें पंजाबच्या जखमी भागावरील लष्करी कायद्याचा पडदा दूर होऊन त्या भागांतील लष्करशाहीचा एकेक अनन्वित प्रकार बाहेर पडूं

लागला त्यावेळीं देशभर एकच क्षोभ आणि हाहा:कार उडाला. सरकारनें ह्या सर्व शक्य संभवनीय व सर्वश्रुत अत्याचारांच्या आरोपांतून व्यक्तिशः आपल्या नोकरांस दोषमुक्त करण्याकरितां इंडेम्निटी-दोषमुक्तता-बिल वरिष्ठ कायदे कौन्सीलपुढें आणलें. ह्यावेळीं पं० मदन मोहन मालवीय ह्यांनीं ह्या बिलाला कसून विरोध केला. प्रत्यक्ष जखमी भागांत स्वतः फिरून व इतर राष्ट्रीय कार्यकर्त्यांकडून मिळविलेल्या माहितीच्या बळावर त्यावेळीं त्यांनीं कौन्सिलांत परिस्थितीचें, हृदयद्रावक परिस्थितीचं अधिकारी वाणीने खरें वर्णन जगजाहीर केलें. परंतु एकट्या गांधींनी मात्र ह्या बिलास आपली पूर्ण संमति दिली. सरकारी नोकरांकडून कितीहि अत्याचार झाले असले तरी ते केवळ वैयक्तिक सूड बुद्धीनें झालेले नव्हते आणि म्हणूनच व्यक्तिशः त्यांना झालेल्या प्रकाराबद्दल जरास तसे ह्या स्वरूपावर शिक्षा होण्याचें कांहींच कारण नाहीं अशी त्यांची शुद्ध अहिंसावादी अप्रतिकार तत्वास शोभणारी विचारसरणी होती. हे बिल अखेर कौन्सिलनें मंजूर केलेंच.

### दोष कोणाचा ?

सरकारनें आपल्या नोकरास व्यक्तिशः दोषमुक्त केलें; तरी पण ह्या एकंदर अनन्वित व सैतानी प्रकारांना व्यक्तिशः व समष्टि रूपानें जबाबदार कोण व किती ? हा प्रश्न कांहीं त्यायोगानें सुटला नव्हता. ह्या एकंदर प्रकाराची स्वतंत्र कमिशन नेमून चौकशी व्हावी अशी लोकांची मागणी सुरूच होती. अहमदाबाद येथील दंग्याची चौकशी करण्याकरितां सरकारनें एक कमिटी मे महिन्यांत नेमली परंतु तींत बॅ. चिमणलाल हे एकटच हिंदी सदस्य होते.

सरकारकडून अशी चौकशीची तजवीज लवकर होण्याचीं चिन्हें दिसेनात आणि सरकारी चौकशीच्या व तिच्या पर्यवसानाच्या निःपक्षपातीपणाविषयीं लोकांत फारसा विश्वास नसल्यामुळें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें ८ जूनच्या बैठकींत एक स्वतंत्र कमिटी नेमलीच होती. पं० मालवीय व पं० मोतीलाल नेहरू त्यांच्या अव्याहत चिकाटीनें व कर्तबगारीनें चौकशीला सुरवात आधीं झालीच होती. ऑ. इं. कॉं. कमिटीनें नेमलेल्या पहिल्या कमिटींत पं. मदनमोहन, पं. नेहरू, सर रासबिहारी घोष, बॅ. बी. चक्रवर्ती, बॅ. दास, श्री. कस्तुरीरंग अय्यंगार, उमर सोभानी, पं. गोकर्णनाथ मिश्र वगैरेंची एक कमिटी नेमली. एकंदर भानगडीची नीट चौकशी करावी आणि ह्या अत्याचारासंबंधानें दाद लावून घ्यावी हें काम ह्या कमिटीला सांगण्यात आलें होतें.

शिवाय अलाहाबादच्या सेवासमितीमार्फत पीडित व अनाथ लोकांना सहाय करण्याची व्यवस्था केली; मृतांच्या वारसांना योग्य ती मदत करण्यासाठीं व जालियनवाला बाग राष्ट्रीय मालकीची करून तेथें राष्ट्रीय स्मारक उभारण्याची मालवीयजींच्या देखरेखीखालीं व्यवस्था केली. आणि दुःखी कष्टी पंजाबला धीर देण्याचे शिकस्तीचे प्रयत्न गांवोगांव फिरून केले.

## हंटर कमिटी.

हंटर कमीटीची नेमणुक सरकारतर्फे १४ अक्टोबर १९१९ रोजीं करण्यांत आली. लॉर्ड हंटर हे ह्या कमीटीचे अध्यक्ष होते आणि न्या. मू. रँकीन, सर चिमणलाल सेटलवाड, पं. जगत् नारायण, मि. कॅप, व साहेब जादा सुलतान अहंमदखान वगैरे ५ गोरे व ३ हिंदी गृहस्थ ह्या कमीटीचे सभासद होते.

कॉंग्रेस चौकशी कमीटीनें ह्या कमिशनपुढे लोकपक्षातर्फेचा पुरावा सादर करण्याचे काम करावें असें प्रथम ठरलें होतें. परतु पुरावा गोळा करण्यासाठीं तरी कैदेतील सर्व प्रमुख राजकीय पुढाऱ्यांस कांहीं काळपर्यंत तरी मोकळे सोडावें ही मागणी कमिशनच्या अध्यक्षांनीं मान्य करण्याचे नाकारल्यामुळें कॉंग्रेसतर्फे ह्या चौकशीवर पूर्ण बहिष्कार घालण्यांत आला आणि कमिशनपुढे एकहि महत्वाचा व स्वतंत्र बाण्याचा असा साक्षीदार हजर झाला नाहीं.

हंटर कमीटीपुढे गांधींनीं मात्र सत्याग्रहाचे प्रवर्तक ह्या नात्यानें आपली लेखी कैफियत सादर केली आणि कमिशननें त्यांची तोंडी जबानीहि घेतली.

ही सर्व कैफियत व जबानी गांधीनीं ५ नोव्हेंबर १९१९ च्या व त्यापटील यंग इंडिया पत्राच्या २।३ अंकांत मिळून प्रसिद्ध केली आहे. सत्याग्रहाचीं सर्व सामान्य तत्वें, सत्याग्रहाच्या उत्पत्तीचीं मूळ कारणें, दंगे व दंग्यांचीं कारणं आणि त्यासंबंधाचे सत्याग्रहाचे आद्यप्रवर्तक ह्या नात्यानें गांधींचें धोरण ह्या दृष्टीनें ही जबानी म्हणज सत्याग्रहगीताच होय यांत शंका नाहीं.

## कॉंग्रेस कमिटी.

हंटर कमिशनवर बहिष्कार घालून कॉंग्रेस कमिटीनें स्वतंत्र चौकशीला सुरुवात केली; म. गांधी, बॅ. दास, बॅ. जयकर, आणि बॅ. आबास तय्यबजी ह्यांच्या कमिटीनें तीन महिन्यांपेक्षां जास्त काळपर्यंत प्रांतभर फिरून सुमारें दोन हजार लोकांच्या कसून जबान्या घेतल्या. आणि ह्या सर्व साक्षीपुराव्या वरून आपल्या खास शिफारशींसह चौकशीचा रिपोर्ट २६ मार्च १९२० रोजीं प्रसिद्ध केला. हा रिपोर्ट अगदीं एकमतानें करण्यांत आलेला आहे.

## काँग्रेस कमिटीचा रिपोर्ट-सारांश.

" कित्येक ठिकाणीं आम्हांला कडक भाषा वापरावी लागली आहे. परंतु प्रत्येक विशेषण आम्हीं अत्यंत विचारपूर्वकच उपयोगांत आणलें आहे. धामधुमीच्या प्रसंगीं अधिकारी झाले तरी त्यांच्या हातून चुका होण्याचा संभव असतोच हेंहि आम्हांला समजतें. देशांत नवीन सुधारणांचा उपक्रम करण्यांत येत आहे आणि बादशहा आपल्या अधिकारी वर्गाला व लोकांना परस्परसहकारिता करण्याविषयीं सल्ला देत आहेत. अशा वेळीं अधिकाऱ्यांनीं आत्मसंयमन करणें जरूर होतें. पण त्या संबंधानें आम्हीं कांहीं लिहूं इच्छित नाहीं. परंतु त्यांनीं केलेल्या अत्याचारांकडे मात्र दुर्लक्ष करतां येणें अशक्य आहे.

आमचा असा समज झाला आहे कीं, गांधी, डॉ. सत्यपाल व डॉ. किचलू ह्यांना पकडण्यांत आलें नसतें तर निर्दोष इंग्रजांच्या जिवावरचा प्रसंग ओढवला नसता आणि मूल्यवान् मालमत्तेचा नाश झाला नसता.

पंजाबांत निरनिराळ्या ठिकाणीं झालेल्या प्रकारांचा योग्य तपास करण्याचे कामीं व्हाइसरॉयांनीं कांहींच प्रयत्न केले नाहींत. कित्येक प्रमुख गृहस्थ व कित्येक सार्वजनिक संस्थांकडून व्हाइसरॉयांकडे गेलल्या तारांकडे व पत्रांकडे लक्ष देण्यांत आलें नाहीं. कोणत्याहि प्रकारचा तपास न करतां पंजाबसरकारच्या सर्व कृत्यांस सरास संमति देऊन टाकली. हे सगळे प्रकार होऊन गेल्यानंतरहि त्यासंबंधानें तपास करण्याची आवश्यकता त्यांना भासली नाहीं. जाहीर चौकशी अंतीं आमची अशी खात्री झाली आहे कीं, गेल्या एप्रिल महिन्यांत उत्पन्न झालेली परिस्थिति आटोक्यांत ठेवण्याचें सामर्थ्य व्हाइसरॉयांच्यामध्यें नव्हतें. त्यांनीं हें जाणून बुजून केलें असें आमचें म्हणणें नाहीं. परंतु दिलगिरीपूर्वक आम्हांला असें म्हणावें लागतें कीं, व्हाइसरॉय हे आपल्या उच्चासनावर राहण्यास नालायक ठरले आहेत. त्यांना परत बोलावण्यांत यावें. ह्या शिवाय आमच्या सूचना अशा आहेत:—

१ सुशिक्षित वर्गाविषयींचा तिरस्कार, लष्कर भरती व युद्धफंड जमविण्याची जुलमी आणि घातकी पद्धत व वर्तमानपत्रें व छापखानें ह्यांची मुस्कटदाबी ह्यामुळें लोकमत सर कायकल ओडवायर ह्यांच्या विरुद्ध फार खवळलेलें होतें.

२ रौलेट कायद्याविरुद्ध प्रजेंत असंतोष फैलावलेला होता आणि सरकारविषयीं लोकांचीं मनें साशंक झालेलीं होतीं. ही जाहीर चळवळ दाबण्याकरितां

सर मायकेल ओडवायर ह्यांनीं डी फेन्स ऑफ इंडिया कायद्याचा आश्रय केला, आणि त्यामुळें जनतेंत असंतोष अधिकच फैलावला.

३ सत्याग्रहाची चळवळ व हरताळ हीं ह्या लोकांचा असंतोष योग्य वळणानें प्रगट व्हावा म्हणूनच सुरू झाली होतीं.

४ रौलॅट कायद्याविरुद्ध सुरू झालेली चळवळ ही इंग्रजांविरुद्ध चळवळ नव्हती. आणि सत्याग्रहाची चळवळ ही कांहीं खून जाळपोळ करण्याची चळवळ नव्हती.

५ पंजाब सरकारला दाबांत ठेवण्याचा जरासुद्धां प्रयत्न झाला नाहीं.

६ गांधी, डॉ. सत्यपाळ आणि डॉ. किश्लू ह्यांस पकडण्यांत अन्याय झालेला होता आणि लोक प्रक्षुब्ध व्हावयाला हेंच कारण होतें.

७ आगगाडीच्या पुलावर गोळीबार झालेला पाहून आणि मनुष्यें घायाळ व ठार झालेलीं पाहून लोक अधिकच खवळले.

८. लोकक्षोभाचीं कारणें कांहींहि असोत; परंतु लोकांनीं केलेले अत्याचार निंद्यच होते.

९. आतांपर्यंत जाहीर झालेल्या हकीगतीवरून लष्करी कायदा पुकारण्याचें कांहीच कारण दिसत नाहीं.

१०. प्रत्येक ठिकाणीं शांतता व सुव्यवस्था स्थापन झाल्यानंतरच लष्करी कायदा पुकारण्यांत आला.

११. लष्करी कायदा पुकारणें जरूरच होतें अशी जरी कल्पना केली तरी सुद्धां तो जरूरीपेक्षां फाजील काळपर्यंत जारी ठेवण्यांत आला ह्यांत शंकाच नाहीं.

१२. लष्करी कायद्याचा अंमल करण्याकरितां स्वीकारण्यांत आलेले पुष्कळसे मार्ग बेजबाबदार, घातकी, जुलमी, आणि लोकांच्या मनोभावना दुःखविणारे होते.

१३. लाहोर, रामनगर, गुजरात, जलालपुर, ल्यायलपूर आणि शेखपुरा येथील लोकांनीं प्रत्यक्ष कांहीं अत्याचार केलेले नव्हते.

१४. जालियनवाला बागेंतील कत्तल ही निरपराधी व निःशस्त्र स्त्रीपुरुष व मुलें ह्यांची अत्यंत घातकी आणि निर्दय कत्तल होती. इंग्रजी राज्याच्या सबंध इतिहासांत ह्या अत्याचाराला दुसरी तोड नाहीं.

१५. लष्करी कायद्याखालील स्पेशल ट्रायब्यूनल (खास चौकशीकोर्टे) आणि सरकारी झटपट न्यायकारी कोर्टे ही निर्दोष मनुष्यांचा छळ होण्यास आणि कायद्यांचा खून करण्यास साधनीभूत झाली आणि त्यांनी हजारों स्त्रीपुरुषांची सांपत्तिक व नैतिक हानि केली.

१६ पोटावर सरपटत जाण्याच्या आणि इतर असल्याच शिक्षा ह्या सुधारलेल्या राज्यपद्धतींत अश्रुतपूर्व अशा आहेत आणि त्या शोधून काढणारांचा नैतिक अधःपात स्पष्ट करणाऱ्या आहेत.

१७ अशासारख्या द्वेषभावपूर्ण शिक्षा केल्यावरहि मागाहून कित्येक ठिकाणी जादा पोलीस बसवून त्यांचा खर्च निरपराधी लोकांकडून वसूल करून घेण्याचें धोरण अत्यंत अन्यायी होतें.

१८ लष्करी कायद्याच्या अमलाच्या काळांत लांचलुचपत आणि इतर जे कांहीं प्रकार करण्यांत आले त्यांचा एक स्वतंत्र इतिहासच तयार करावा लागेल. योग्य अधिकाऱ्यांना ह्या स्थितीचा बंदोबस्त करतां आला असता.

१९ लोकांवर झालेल्या अन्यायांचें परिमार्जन व्हावें, राज्यकारभार अधिक शुद्ध आणि पवित्र व्हावा आणि अधिकाऱ्यांच्या हातून पुन्हां असले प्रकार कधींहि होऊं नयेत ह्यासाठीं पुढील उपाय अमलांत यावेत:—

( क ) रौलेट कायदा रद्द करावा.

( ख ) सर मायकेल ओड्वायर ह्यांस त्यांच्या उच्च अधिकारावरून कमी करण्यांत यावें.

( ग ) ज. डायर, क. जॉन्सन, क. ओब्रायन, मि. बॉस्वर्थ स्मिथ, रायसा. श्रीराम सूद आणि मलिक साहेबखान ह्यांना अधिकारच्युत करण्यांत यावें.

( घ ) इतर ठिकाणीं उल्लेख केलेल्या लहानसहान अधिकाऱ्यांनीं केलेल्या अनर्थांची स्थानिक चौकशी करून गुन्हे शाबीत होणारांस तडतर्फ करण्यांत यावें.

( ङ ) ना. व्हाइसरॉय ह्यांना परत बोलावण्यांत यावें.

( च ) खास ट्रायब्यूनलसनीं आणि तडकाफडकी कोर्टांनीं केलेले दंड ज्यांचे त्यांत परत करण्यांत यावेत आणि जादा पोलीस उठविण्यांत यावेत.

*आमची अशी पुरी खात्री पटली आहे कीं, सर मायकेल व इतर अधिकारी ( ग ) ह्यांचे अपराध कायदेशीर ठरले चालविण्यासारखे आहेत. परंतु आम्ही मुद्दामच तसा सल्ला देत नाहीं; कारण तसें न करण्यानेंच हिंदुस्थानचें हित*

होणार आहे. त्यांच्या मदतर्फीनें भविष्यकाळांतील विशुद्धतेची खात्री पटेल.

क. मेकर आणि कॅ. हौटन ह्यांनीहि क. ओव्रायन वगैरे प्रमाणेंच आपलें कर्तव्य दरोबर बजावलेलें नाहीं. परंतु त्यांच्याविषयीं विशेष उपाय योजण्यांत यावेत असें आम्ही सूचवीत नाहीं. कारण ते त्यांच्याप्रमाणें अनुभवी नव्हते आणि त्यांचें वर्तनहि त्यांच्या इतकें घातकी नव्हतें.

## हंटर कमिटीचा रिपोर्ट.

हंटर कमीटींत पांच गोरे व तीन हिंदी असे एकंदर आठ सभासद होते. अखेर युरोपियन व हिंदी सभासदांत मतभेद होऊन त्यांनीं आपापला स्वतंत्र रिपोर्ट सरकारला सादर केला.

गोऱ्या सभासदांच्या सूचना:—

( १ ) १९१९ अप्रिलमधील दंगे हे संघटित स्वरूपाचे होते आणि ते उघड उघड बंडाच्या स्वरूपाचे होते.

( २ ) जिल्ह्यांतील नेहमींच्या न्यायाच्या कचेऱ्या बंद ठेवणें, गोळीबार करणें आणि लष्करी कायद्याचा अंमल करणें ह्या बाबतींत सरकारी अंमलदारांचें वर्तन योग्य होतें. त्यांच्यावर टीका करण्यासारखें कांहीं नाहीं.

( ३ ) गांधींच्या हालचालींना करण्यांत आलेली बंदी महत्वाची होती.

( ४ ) अमृतसरचे दंगे सरकारविरुद्ध होते आणि १० एप्रिलचे दंगे गोऱ्या लोकांच्या विरुद्ध होते.

( ५ ) जालियांवाला बागेंतील गोळीबार आवश्यक होता. परंतु आगाऊ सूचना न देतांच गोळीबार करणें आणि लोकांची पांगापांग झाल्यावरहि तो चालूच ठेवणें ह्यांत ज. डायर ह्यानें मोठीच चूक केली.

( ६ ) घायाळ लोकांच्या औषधोपचारांची व्यवस्था न केल्याचा दोष ज. डायर यांजवर येऊं शकत नाहीं. कारण औषधपाण्यावांचून कोणी घायाळ लोक तेथें पडून राहिले नसतील अशी त्यांची खात्री होती.

( ७ ) पकडलेल्या लोकांपैकीं पुष्कळांचे खटले चालविण्याचें लष्करी कमिशनांचें काम अन्यायाचें अथवा जुलमाचें नव्हतें.

( ८ ) पोटानें सरपटत जाण्याचा हुकूम, फटक्यांच्या शिक्षा व त्याचप्रमाणें विमानांतून बॉंब फेंकण्याचा हुकूम ह्या गोष्टी आक्षेपार्ह होत्या.

हिंदी सभासदांची मतें:—

(१) १९१९ एप्रिल मधील दंग्याचें स्वरूप उघड उघड बंडाचें नव्हतें आणि ते दंगे पूर्वनिश्चित असेहि नव्हते.

(२) लष्करी कायद्याचा अंमल दंगे शांत झाल्यावरहि तो चालू ठेवणें ह्या गोष्टी राजकीय सनदशीरपणाच्या दृष्टीनें गैरवाजवी होत्या.

(३) गांधींच्या दिल्ली आणि पंजाबमधील हजीरीमुळें सार्वजनिक शांततेचा भंग होण्याचा संभव होता.

(४) जालियनवाला बागेंतील गोळीबार अनवश्यक होता आणि ज. डायर ह्याचे वर्तन मनुष्यपणाला आणि इंग्रजाला न शोभणारें होतें.

(५) लष्करी कायद्याची अंमलबजावणी आणि धरपकड करण्याची रीत ही फार असमाधानकारक होती.

(६) पोटानें सरपटत जाण्याचा, विमानांतून बाँब फेंकण्याचा, बांधून फटके मारण्याचा, विद्यार्थ्यांची हजीरी घेण्याचा, हे हुकूम गैरवाजवी होते. इतकेंच नव्हे तर हिंदी लोकांची मानखंडना करणारे व राष्ट्राचा उपमर्द करणारे होते.

(७) दंग्यांना बंडाचें स्वरूप देण्यांत व लष्करी कायदे पुकारण्यांत पंजाब-सरकारनें चूक केली.

ह्या रिपोर्टावरील आपला ठराव हिंदुस्थान सरकारने पादशाही सरकार-कडे पाठविला होता. त्यावर पादशाही सरकारनें केलेल्या ठरावांतील मुद्दे असे होते:—

१ ज. डायरनें जलियांवाला बागेंतील गर्दी मोडण्याकरितां उपयोगांत आण-लेलें लष्करी बळ वाजवीपेक्षां फाजील होतें.

२ गोळीबार करण्यापूर्वी सूचना न देणें ही ज. डायर ह्यांची चूक अक्षम्य आहे.

३ मरणोन्मुख व घायाळ लोकांना वैद्यकीय मदत देण्याची व्यवस्था न करण्यांत ज. डायर आपलें कर्तव्य विसरून गेला.

४ पोटानें सरपटत जाण्याचा हुकुम अमानुषी होता.

५ आपल्या जागेचा राजीनामा देण्याविषयीं ज. डायरला मुख्य सेनापतीनीं हुकूम केला आहे. यापुढें हिंदुस्थानांत कोणत्याही हुद्यावर त्याची नेमणूक होणार नाहीं. त्यासंबंधानें लष्करी कौन्सीलला कळविण्यांत आलें आहे.

६ जेव्हां ब्रिटिश बादशाही मुलुखांत दंगेधोपे मोडण्याकरितां लष्कराचा उपयोग करणें भाग पडेल तेव्हां लष्करी बळाचा उपयोग कमींत कमी प्रमाणावर करण्यांत यावा.

७ सर मायकेल ओड्वायर ह्यांनीं अत्यंत आणीबाणीच्या वेळीं आपलें कर्तव्य अत्यंत दृढनिश्चयानें आणि हिंमतीनें बजावलें आहे. त्याबद्दल बादशाही सरकार त्यांचें अभिनंदन करीत आहे.

८ दंग्याधोप्यांत झालेल्या प्राणहानीबद्दल बादशाही सरकार दिलगिरी प्रदर्शित करीत आहे. आणि ज्यांना नाहक दुःख सहन करावें लागलें असेल त्यांच्याविषयीं अंतःकरणपूर्वक सहानुभूति व्यक्त करीत आहे.

९ ना. व्हाइसरॉय ह्यांनीं आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजावल्याबद्दल बादशाही सरकार त्यांचे आभार मानीत आहे.

## अफगाण युद्ध.

पंजाबांत स्थिरस्थावर होत आहे तोंच ता. २ मे रोजीं अफगाण सैन्य एकाएकीं खैबरघाटाचे दक्षिणेस ब्रिटिश मुलखांत शिरलें व हिंदुस्थानसरकारला अफगाणसरकारशीं युद्ध पुकारावें लागलें. त्यावेळीं हिंदुस्थान सरकारनें काढलेल्या जाहीरनाम्यांत पंजाबचा ह्या युद्धाशीं बादरायण संबंध जोडण्यांत आलाच. पंजाबांतील दंग्याधोप्यांमुळें अफगाणसरकारला हिंदुस्थानावर स्वारी करण्यास उत्तेजन मिळालें आहे. तरी अफगाणांस उत्तेजन मिळविण्यासारखें कोणतेहि कृत्य राजनिष्ठ हिंदी लोकांनीं करूं नये अशा अर्थाचा हा जाहीरनामा होता.

ह्या मे व जून महिन्यांत हिंदुस्थानांत चोहोंकडे दडपशाहीला सुरुवात झाली होती. वर्तमानपत्रकारांस हे दिवस फारच त्रासाचे गेले. हिंदीप्रताप, मद्रासचा हिंदू, लोहारचा ट्रायब्यून, मद्रासचें स्वदेशमित्रम्, हिंदूनेशन, वगैरे पत्रांकडून प्रेस ॲक्टखालीं जमानती घेण्यांत आल्या.

जून अखेर लोकमान्यहि विलायतेहून परत स्वदेशीं आले ता. ३० जून रोजीं लोकमान्यांच्या स्वागतार्थ मुंबई येथें भरलेल्या पहिल्याच प्रचंड जाहीरसभेचें अध्यक्षस्थान म. गांधींनीं स्वीकारलें होतें.

## स्वदेशी चळवळ.

ह्याच सुमारास म. गांधींनीं स्वदेशी चळवळीस प्रोत्साहन देण्यास सुरुवात केली. एक स्वतंत्र स्वदेशी सभा स्थापन करण्यांत आली. आणि तिच्यामार्फत स्वदेशीच्या तत्वांचा प्रसार करण्याचें आणि स्वदेशी शपथपत्रिकेवर सह्या

घेण्याचें काम सुरू करण्यांत आलें. जून अखेर गांधींनीं पहिली शपथ पत्रिका प्रसिद्ध केली.

त्यावेळीं सुद्धां गांधी खादी हीच खरी स्वदेशी म्हणून म्हणतच होते. परंतु खादीला अद्याप निर्विकल्प महत्व त्यांनीं दिलें नव्हतें. त्या शपथपत्रिकेंत त्यांनीं शपथा घेणारांस कांहीं सवलतीहि दिल्या होत्या. ज्यांना निरंतर व संपूर्ण स्वदेशी व्रत पाळतां यणें शक्य नसेल अशासाठीं नियमित काळपर्यंत पूर्ण स्वदेशी व्रत पाळण्याची किंवा कांहीं विशिष्ट मालापुरतेंच स्वदेशी व्रत पाळण्याची स्वतंत्र शपथपत्रिका तयार केली होती. गांधींना कागदी शपथांचें व देखाव्यांचें महत्व वाटत नाहीं. प्रामाणिकपणाचें व प्रत्यक्ष कार्याचेंच महत्व वाटतें *आणि म्हणूनच त्यांनीं शपथपत्रिकांची ही अगदीं नवीनच योजना* अंमलांत आणली.

१ ते ७ जुलै हा आठवडा स्वराज्य व स्वदेशी सप्ताह म्हणून पाळण्यांत आला होता.

ऑगस्टमध्यें मद्रास, बिहार व आंध्र ह्यांच्या प्रांतिक परिषदा भरल्या. मद्रासनें गांधींच्या चळवळीवरील आपला पूर्ण विश्वास एका स्वतंत्र ठरावाच्या रूपानें जाहीर केला होता. आंध्र परिषदेंत सुधारणायोजनेवर बहिष्कार घालण्याचा प्रश्न कांहीं लोकांनीं उपस्थित केला होता.

## अमृतसर कॉंग्रेस.

अमृतसर कॉंग्रेस ही हिंदुस्थानच्या सद्यःकालीन इतिहासांतील एक चिरस्मरणीय प्रसंग आहे. म. गांधी व लोकमान्य टिळक ह्या दोन राष्ट्रीय विभूति एकाच ठिकाणीं, एकाच कार्यासाठीं एकत्र होण्याचा हा पहिलाच योग होता.

याहूनहि महत्वाची गोष्ट म्हणजे ह्या बैठकींत गांधींचें सत्याग्रही राजकारण व लोकमान्यांचें रूढ राजकारण ह्यांच्यांत प्रत्यक्ष लढा उत्पन्न झाला. *आणि विशेष महत्वाची तिसरी गोष्ट ही की, ह्या बैठकींत दोन्हीहि राष्ट्रीय विभूति* आपल्या कार्यांत आणि आपापल्या क्षेत्रांत विजयी झाल्या.

अमृतसर कॉंग्रेसपुढें अत्यंत महत्वाचे प्रश्न दोन होते. एक मॉंटेग्यु चेम्सफोर्ड राजकीय सुधारणा व दुसरा पंजाबचें गाऱ्हाणें.

म. गांधींनीं प्रथमपासून सुधारणा प्रश्नाकडे विशेष लक्षच घातलें नव्हतें. त्यांनीं फक्त रौलेट ॲक्ट व पुढें त्यांतूनच उद्भवलेले पंजाबांतील अत्याचार

एवढाच प्रश्न आपलासा केला होता. आणि तेवढयापुरती ह्या बैठकींतील गांधींची कामगिरी निःसंशय विजयी होती.

## भावी कार्याची गुरुकिल्ली.

गांधींनीं आपली कायदेभंगाची चळवळ सत्य व अहिंसा ह्या दोन तत्वांवर उभारली होती. ह्या दोन तत्वांच्या बाबतींत कोणत्याहि प्रकारची मुळींसुद्धां माघार घेण्याची, तडजोड करण्याची किंवा उपेक्षा करण्याची त्यांची इच्छा नव्हती. आपल्या धोरणाची सुसंगतता कायम रहावी आणि आपल्या भावी चळवळीचा पाया स्थिर व मजबूत घातला जावा म्हणून त्यांनीं प्रयत्न करणें जरूर होतें. त्यासाठीं ह्या चळवळींत सरकारी चुका, गैरसमजुती व अन्याय ह्यामुळे चिडून किंवा इतर कोणत्याहि सबबीवजा किंवा सबळ कारणांमुळें जरी लोकांनीं अत्याचार केला असला तरी त्याचा स्पष्ट निषेध करणें व करविणें हें गांधींचें कर्तव्यच होतें आणि त्याप्रमाणें लोकमान्य टिळक व बहुतेक लोकमत ह्यांच्या सर्वसामान्य विरोधास न जुमानतां त्यांनीं जनतेच्या अत्याचारांचा निषेध करणारा ठराव कॉंग्रेसमध्यें मंजूर करून घेतलाच.

हा ठराव पुढें मांडतांना गांधींनीं उच्चारलेले पुढील शब्द संस्मरणीय आहेत:— " ह्या ठरावाच्या मुळाशीं असलेलें तत्व मान्य करणें ह्यांतच आपल्या भावी कार्याची गुरुकिल्ली आहे:—वेडाचा प्रतीकार वेडानें करूं नका; वेडाचा प्रतीकार शहाणपणानें करा. "

अमृतसर कॉंग्रेसमधील ह्या ठरावानें गांधींनीं आपल्या भावी कामगिरीचा मजबूद पायाच घातला ह्यांत शंका नाहीं.

सुधारणा हा विषय आतांपर्यंत तरी गांधींचा नव्हता; लोकमान्यांचा होता. आणि त्याप्रमाणें सुधारणा निराशाजनक म्हणून न म्हणतां त्यांचा शुद्ध बुद्धीने विचार करण्यांत यावा व त्याबद्दल मि. मॉंटेग्यु ह्यांचे आभार मानण्यांत यावेत ह्या गांधींच्या दोन्ही सूचना कॉंग्रेसमध्यें लोकमान्यांच्या विरोधामुळें मंजूर होऊं शकल्या नाहींत.

जेव्हां पुढें गांधींनीं सर्वसामान्य राजकारणहि आपलेसें केलें व सुधारणांचा विचार करूं लागले तेव्हां त्या वेळच्या लोकमान्यांच्या जहाल धोरणापेक्षांहि अधिक जहाल धोरण त्यांनीं स्वीकारलें ही गोष्ट सर्वश्रुतच आहे.

## प्रकरण १८ वें.

# खिलाफत.

### मियां-महादेव ह्यांचा मिलाफ.



हा मिलाफ घडवून आणण्याचें विचित्र व अभूतपूर्व कार्य गांधींनीं केलेलें खिलाफत चळवळीच्या मुळेंच होय. १९१९ सालीं एकंदर राष्ट्राचें लक्ष हिंदी सुधारणा कायद्याकडे लागलें होतें; परंतु अखेरपासून हिंदुस्थानांतील ७ कोटि मुसलमानांच्या पुढारी वर्गाचें लक्ष मात्र त्यावेळीं दुसरीकडेच गुंतलेलें होतें.

सन १९१४ मध्ये युरोपियन महायुद्ध उपस्थित झाल्यावेळीं हिंदुस्थानानें साम्राज्याला मनुष्यबळ, द्रव्यबळ व साधनबळ ह्याचा यथाशक्ति भरपूर पुरवठा करण्याचें व्रत स्वीकारलें परंतु पुढें जेव्हां तुर्कस्थानाला जर्मनीच्या बाजूनें इंग्लंडविरुद्ध युद्ध पुकारणें भाग पडलें तेव्हां हिंदी मुसलमान मोठ्याच पेचांत सांपडले.

एक शतकभर ज्या साम्राज्यांत आपण राहिलों त्या ब्रिटिश साम्राज्याशीं राजनिष्ठ रहावें किंवा ज्याची धार्मिक सत्ता आपण शतकानुशतकें मानीत आलों त्या मुसलमानी धर्माच्या खलीफाच्या व खलिफाच्या गादीच्या संरक्षणाकरितां धर्माशीं एकनिष्ठ राहून राजनिष्ठेवर लाथ मारावी?

ब्रिटिश मुत्सद्यांनीं त्यावेळीं दाखविलेली मुत्सद्देगिरी व प्रसंगावधान हीं निःसंशय अप्रतिम होतीं.

### अभिवचनें.

इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. लॉइड् जॉर्ज व हिंदुस्थानचे व्हाइसरॉय ह्यांनीं त्यावेळीं अत्यंत गंभीरपणें हिंदी मुसलमानांस आश्वासनें देऊन त्यांस शांत केलें. अरबस्तान, मेसापोटेमिया, जेरुसलेम वगैरे ठिकाणचीं मुसलमानी धर्मक्षेत्रें संबंधी

सुरक्षित व मुसलमानी अमलांतच राहतील असें व्हाइसरॉय सांगूं लागले आणि "तुर्कस्थानची राजधानी किंवा तुर्कांचा सधन व सुप्रसिद्ध एशिया मायनर व थ्रेस हे भाग बळकावून बसण्यासाठीं आम्हीं युद्ध पुकारलें नाहीं असें ब्रिटिश मुख्य प्रधान जगजाहीर आश्वासन देऊं लागले. हिंदी मुसलमानांचीं मनें शांत झालीं व धर्मयुद्ध पुकारण्याच्या किंवा देशत्याग करण्याच्या सर्व गोष्टी मागें पडल्या व हिंदुमुसलमान सैन्यानें पॅलेस्टाइन, अरबस्थान, मेसापोटेमिया वगैरे भागांत ब्रिटिश साम्राज्याचा विजयी झेंडा फडकाविण्यास मदत केली.

युद्ध संपलें; आणि तुर्कस्थानाशीं तहाचें बोलणें सुरू झालें. आणि तुर्कस्थानचे तुकडे तुकडे करण्यांत येणार, तुर्कस्थान हतबल, आंगठीच्या खड्याएवढें आटोपशीर आणि युरोपांतून उच्चाटण होऊन केवळ एशियाटिक बनविण्यांत येणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं.

## पहिली खिलाफत परिषद.

अशा मन:स्थितींत चिडलेले, किंकर्तव्यमूढ झालेले व धर्मनिष्ठेनें वेडावलेले मुसलमान कोणता मार्ग स्वीकारतील व काय करतील हा मोठाच बिकट प्रश्न सरकारपुढें उभा राहिला असल्यास नवल नाहीं. अशा परिस्थितींत ता. २३ नोव्हेंबर १९१९ रोजीं दिल्ली येथें पहिली खिलाफत परिषद ना. फझलुल हक् ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. म. गांधी हे खास निमंत्रित पाहुणे म्हणून ह्या बैठकीला हजर होते.

म. गांधी हे अगदीं प्रारंभापासूनच खिलाफतीच्या प्रश्नावर मुसलमान समाजाशीं अगदीं सहमत होते व दिल्ली येथील युद्धपरिषदेंत इतर मागण्यांबरोबर मुसलमानी धर्मक्षेत्रांचें व तुर्कस्थानचें राष्ट्र अभंग व स्वतंत्र राखण्यांत यावें ही मागणी स्पष्टपणें व ठळकपणें त्यांनीं पुढें मांडली होती.

समाजमताला धुडकावून लावण्याचा अधिकार शासनसंस्थेला नाहीं ह्या आपल्या राजकीय नीतिसूत्राला अनुसरून गांधींनीं रौलेट ॲक्टाविरुद्ध चळवळ हातीं घेतली. (वैयक्तिक व सामाजिक) दुबळेपणापेक्षां निसंतान पत्करलें. कोणालाहि नमविण्याचा नैतिक अत्याचाराचा अधिकार शासनसत्तेला नाहीं ह्या आपल्या अनाथकैवारी मर्दानी नीतिसूत्राला अनुसरून गांधींनीं पंजाबचा प्रश्न हातीं घेतला. पण ह्या खिलाफतीच्या मुद्यांशीं त्यांनीं निराळ्याच नीतिसूत्राचा आधार घेतला होता. अहिंसा हें तें नीतिसूत्र होय. संतप्त मुसलमानी लोकमत दुबळें व हतबल तर होऊं नयेच परंतु त्यानें अत्याचारी स्वरूपहि धारण करूं

नये ह्याच एका इच्छेनें ते खिलाफत चळवळींत पडले व त्यांनी आपल्या जीवन-कार्याला अनुसरून असहकारितेचा अभिनव कार्यक्रम मुसलमानी समाजापुढें ठेविला.

## असहकाराची उत्पत्ति.

ह्या परिषदेनें म. गांधी व हिंदुसमाज ह्यांचे त्यांच्या बहुमोल सहाय्याबद्दल आभार मानले व विलायतेंत शिष्टमंडळ पाठविण्याचाहि ठराव केला. परंतु ह्या परिषदेंतील मुख्य दोन ठराव निराळेच होते. ह्या परिषदेनें गांधींच्या विरोधाला न जुमानतां ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा ठराव प्रचण्ड बहुमतानें मंजूर केला. त्यावर गांधींनीं असें सुचविलें कीं, केवळ व्यापारी बहिष्कारच कां घालतां? तुमची इच्छा व ताकद असेल तर येथील ब्रिटिश शासनसंस्थेशींच असहकार कां करीत नाहीं? ह्याच बैठकींत ब्रिटिश सरकारशीं क्रमविकासी असहकार पुकारण्यांत आला व होऊ घातलेल्या विजयोत्सवांत मुसलमानांनीं भाग घेऊ नये असा ठराव करण्यांत आला.

दुसऱ्या दिवशीं म. गांधींच्या अध्यक्षतेखालीं हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांची संयुक्त परिषद भरली. त्यावेळीं भाषण करतांना हिंदू व खिलाफत चळवळ त्यांच्या संबंधानें गांधी म्हणाले:—

"आम्ही हिंदमुसलमानांच्या ऐक्याच्या गप्पा मारतों. मुसलमानांच्या जिव्हाळ्याचा प्रश्न उपस्थित झाला असतांना हिंदू त्यांच्यापासून दूर राहतील तर हें ऐक्य म्हणजे केवळ शब्दावडंबर ठरेल. कांहींचें असें म्हणणें आहे कीं, आपण कांहीं अटींवरच मुसलमानांस सहाय्य करावें. अटींवरील सहाय्य हें भेसळ सीमेंटसारखें आहे. त्यायोगानें सांधा सांधला जाणार नाहीं."

असहकाराची अंधुक कल्पना त्यावेळीं त्यांनीं पुढील शब्दांत व्यक्त केली:—
"मुसलमान बंधूंनीं काल रात्रीं आणखीहि एक महत्त्वाचा ठराव केला आहे. *ईश्वर करो व असें न होवो; परंतु जर तुर्की तहाच्या अटी हिंदी मुसलमानांच्या इच्छेविरुद्ध गेल्या तर त्यांनीं सरकारला द्यावयाचें सहाय्य बंद करण्याचा निश्चय केला आहे. माझें मत असें आहे कीं, प्रजेचा हा हक्कच आहे. सरकारचा किताब घ्यायला किंवा सरकारी नोकरी पत्करायला कोंही कोणी बांधलेला नाहीं. हा खुषीचा सौदा आहे. ज्यांच्या हातून आपलें भलें होत नाहीं त्याला मदत करायला आपण बांधलेले नाहीं हें उघड आहे."*

ता० १३ ते १६ डिसेंबर पर्यंत देशभर विजयोत्सव झाले. परंतु लोकांनीं अन्याय दृश्यप्रमाणांत त्यांनवर बहिष्कार घातला.

डिसेंबरमध्यें अमृतसर कॉंग्रेसच्यावेळीं दुसरी खिलाफत परिषद भरून इंग्लंड अमेरिकेंत, व्हॉइसराय यांजकडे आणि तुर्कस्थानमध्यें अशीं शिष्टमंडळें पाठविण्याचा व सेंट्रल खिलाफत कमीटीमार्फत खिलाफत फंड जमविण्याचे ठराव करण्यांत आले.

त्याच सुमारास अलीबंधूंची अटकेंतून सुटका झाली व खिलाफतीच्या चळवळीला नवजीवन मिळालें.

ता० १९ जानेवारी १९२० रोजीं डॉ. अन्सारी ह्यांच्या अध्यक्षतेखालीं म. गांधी सुद्धां एका मुसलमानी शिष्टमंडळानें व्हाइसराय यांची भेट घेतली. व्हाइसरायांनीं विलायतेंत शिष्टमंडळ पाठविण्याचे कामीं शक्य तितकें सहाय्य करण्याचें कबूल केलें.

तिसरी खिलाफत परिषद फेब्रुवारीमध्यें मुंबई येथें भरून विलायतेंत महंमद अलींच्या प्रामुख्याखालीं जाणाऱ्या शिष्टमंडळावरील आपला विश्वास जाहीर केला. आणि "भलताच निकाल केल्यास त्याची जबाबदारी आमच्यावर नाहीं. आमच्या मागण्या ह्या केवळ मुसलमानांच्या नसून एकंदर हिंदु समाजाचेंहि त्यांना पाठबळ आहे" अशा अर्थाचें एक महत्वाचें जाहीरपत्रक काढण्यांत आलें.

ता १८ ते २५ मार्च हा खिलाफत आठवडा म्हणून पाळण्यांत आला होता. १९ मार्च हा सार्वत्रिक हरताळाचा दिवस होता. ह्यावर्ळी गांधीनीं गिरणीमजुरांस मालकांच्या आगाऊ परवानगीवांचून हरताळ पाडूं नये असें सूचवून हरताळ विशेषच शास्त्रशुद्ध व शांतिमय करून टाकला.

## मुख्य प्रधानांचा वचनभंग.

पुढें लवकरच महंमद अलींच्या शिष्टमंडळाची ब्रिटिश मुख्य प्रधानांशीं मुलाखत झाली. मुख्य प्रधानांनीं शिष्टमंडळास स्पष्टपणें बजावलें कीं, "जर्मनी आणि ऑस्ट्रियाप्रमाणेंच तुर्कस्थानालाहि पराभूत करण्यांत आलें आहे. जर्मनी व ऑस्ट्रिया ह्यांनीं आपल्या पराभवाचें प्रायश्चित्त घेतलें आहे. ख्रिश्चन राष्ट्रांना लागू केलेल्या नियमांहून निराळ्या नियमांनी मुसलमानी राष्ट्राचा प्रश्न निकालांत काढण्याची आमची इच्छा नाहीं." "अरबस्थानाला स्वातंत्र्य पाहिजे आहे; स्मर्नामध्यें मुसलमानांपेक्षां ख्रिस्ती लोकांचीच संख्या जास्त असून त्यांना ग्रीक

अंमलाखाली जाण्याची इच्छा आहे; अशा सारख्या सडेतोड उत्तरांनीं मुख्य प्रधानांनीं त्यावेळीं मुसलमान शिष्टमंडळ व एकंदर हिंदी मुसलमान ह्यांस अर्धमेमूढ व संतप्त करून टाकलें.

आतां असहकारितेवांचून गत्यंतरच उरलें नव्हतें. ह्या असहकारितेच्या उपक्रमासाठीं ऑल इंडिया खिलाफत कमिटीनें गांधी, शौकतअल्ली व अबदुल कलम अमद ह्यांची एक कमिटी नेमली होती. ह्या कमिटीनें असे ठरविलें कीं, तुर्की तहाच्या शर्ती सरकारी रीतीनें जाहीर होण्यापूर्वी मात्र असहकार पुकारण्यांत येऊं नये. तोहि दिवस लवकरच उगवला.

" ह्या शर्तींतील कांहीं शर्ती एकंदर मुसलमानांस खेदजनक वाटतील अशी मला भीति वाटते. त्यांच्या ह्या कसोटीच्या प्रसंगीं मी त्यांच्याविषयीं अंतःकरणपूर्वक सहानुभूति व्यक्त करीत आहें. त्यांनीं आपलें मन घट्ट करावें. " अशा अर्थाचा खुलासेवजा संदेश जोडलेलें जादा गॅझेट काढून हिंदुस्थान सरकारनें ता० १४ मे १९२० रोजीं तुर्की तहाच्या शर्ती जाहीर केल्या.

## आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास.

त्याच वेळीं हंटर कमिटीचा रिपोर्ट बाहेर पडला. सर्व युरोपियन एका बाजूस आणि सर्व हिंदी सभासद एका बाजूस अशा ह्या रिपोर्टांतील अखेर शिफारशींचा प्रकार होता. विशेषच महत्वाची गोष्ट म्हणजे त्या हिंदी सभासदांच्या शिफारशी सुद्धा अगदींच अपुऱ्या व एकदर सरकारी कृत्यांवर पांघरूणच घालणाऱ्या अशा होत्या.

कॉंग्रेस कमीटीच्या आधींच प्रसिद्ध झालेल्या अतिनेमस्त व अतिनिर्विकार रिपोर्टानेंहि लोकमन अतिशय प्रक्षुब्ध झालें होतें आणि त्या सरकारी कृष्णकृत्यांच्या समर्थनानें तर लोकमत अधिकच प्रक्षुब्ध झालें.

## गांधींच्या दृष्टीनें आतां मात्र ब्रिटिश साम्राज्याच्या पापाचे घडे भरले.

आतां असहकारिता तो राजकीय आशावाद व सहकारितावाद पार मावळला. त्याच्या आधी एक महिना गांधींनीं पंजाबांतील निर्दोष माणसांच्या गेलेल्या बळींचें स्मारक म्हणून ६ ते १३ एप्रिल हा सप्ताह आठवडा सर्व देशभर पाळण्या जाण्याची तजवीज केली होती.

ता. ६ ला सर्वांनीं उपवास करावा; व ६ ते १३ तारखेपर्यंत प्रत्येक स्त्रीपुरुषानें आपल्या प्रांतांतील कांहीं अंश जालियनवाला बागेच्या स्मारक फंडास

यावा; ६ तारखेस सर्व देशभर जाहीर सभा भरवून रौलॅट कायद्याचा निषेध करावा; ९ तारखेस सर्वदेशभर जाहीर सभा भरवून खिलाफत चळवळीस पाठबळ देण्यांत यावें आणि १४ तारखेस देशभर जाहीर सभा भरवून अशा अत्याचारांची पुनरावृत्ति होऊं दिली जाणार नाहीं असा निश्चय व्यक्त करण्यांत यावा असा ह्या आठवड्याचा कार्यक्रम होता.

## शुद्ध राजकारणांत प्रवेश.

आतांपर्यंत गांधींनीं शुद्ध राजकारण सर्वस्वी वगळलेलें होतें. पण आतां त्यांना हा सोंवळेपणा कायम ठेवणें अशक्य झालें. ते ऑल इंडिया होमरूल लीगमध्यें सामील झाले आणि त्या संस्थेचे ह्याच सुमारास अध्यक्ष बनले. त्यावेळीं काढलेल्या आपल्या जाहीरपत्रकांत ते म्हणतात:—

" केवळ आणि उघड उघड राजकीय संस्थेंत सामील होण्याचा आणि माझ्या एकमार्गी आयुष्यक्रमांत मोठेंच स्थित्यंतर घडवून आणण्याचा हा माझ्यावरील पहिलाच प्रसंग आहे. माझ्या राष्ट्रीय संघटनेच्या कल्पनेत सुधारणांचा दर्जा दुय्यम आहे. ( होमरूलची पूर्व तयारी म्हणून ) मला ज्या कार्याचा प्रसार करावयाचा आहे ती स्वदेशी, हिंदुमुसलमानांचें ऐक्य, विशेषत: खिलाफतीच्या द्वारें हिंदुस्थानी ही राष्ट्रभाषा करणें आणि भाषावार प्रांतरचना हीं आहेत. माझा असा विश्वास आहे कीं, राष्ट्राच्या राजकारणांत सुद्धां सत्य व प्रामाणिकपणा ह्यांचा अवलंब करतां येणें शक्य आहे. लीगनें माझ्या सत्याग्रहाच्या कल्पनेचा पुरस्कार करावा असें माझें म्हणणें नाहीं. परंतु आपल्या एकंदर राष्ट्रीय कार्यक्रमांत सत्य व अहिंसा ह्यांचा स्वीकार करण्यांत यावा यासाठीं मात्र मीं माझी शिकस्त करून पाहणार आहें. "

आतां ह्या नवीन युगांतराच्या वेळीं गांधींनीं ह्याप्रमाणें आपल्या राजकारणाचें प्रत्यक्ष स्वरूप व मर्यादा हीं निश्चित केलीं. आणि मगच प्रत्यक्ष राजकारणास हात घातला.



गांधी सुधारणांचा धुव्वा उडवून देण्यासाठीं पुढें सरसावले. हा चमत्कार तरी काय आहे? ब्रिटिश राजनीतींत अशी कोणती प्रचंड उलथापालथ होऊन गेली कीं त्या योगानें हा असा चमत्कार घडून यावा?

म. गांधींच्या चरित्रावर उपहासानें, अनादरानें किंवा आश्चर्यानें असा आक्षेप घेणारे एक गोष्ट विसरतात. त्यांना गांधींच्या चरित्रांतील एक गुण विशेष दिसत नाहीं किंवा पटत नाहीं.

गांधी मनुष्यस्वभावांतील मूलभूत व उपजत चांगूलपणावर विश्वास ठेवणारे आहेत; कोणत्याहि एक किंवा अनेक विशिष्ट कृत्यांवरून ते कोणतीहि व्यक्ति, संस्था, समाज किंवा राष्ट्र नितांत दुष्ट समजत नाहींत; सर्व अपराधांची ते शक्य तोंपर्यंत उपेक्षाच करतात; त्याची खात्री फारच उशीरा पटते; परंतु एकदां त्यांची खात्री पटली, एकदां त्यांनीं विशिष्ट मार्ग आक्रमण करण्याचा निश्चय केला म्हणजे जगांतील मोठयांत मोठा हिमालय पर्वत त्यांची गति कुंठित करूं शकत नाहीं; जास्तींत जास्त वेगवान् वाहन त्यांना मंद वाटतें आणि अंतिम निकालावांचून मध्यंतरींची तडजोड त्यांना मोह पाडूं शकत नाहीं.

लोकमान्यांचा ब्रिटिश दानतीवरील विश्वास सार्वजनिक कारकीर्दीच्या प्रारंभींच उडाला होता आणि गांधींचा विश्वास दोन महिन्यांपूर्वींच उडाला. परंतु असें असूनहि गैरविश्वासाच्या आणि त्याचें प्रायश्चित्त देण्याच्या कामीं गांधींनीं योजलेले उपाय लोकमान्यांनाहि इतके उग्र व कडक वाटले कीं, हे वीरा! शांत हो! शांत हो! असेच उद्गार त्या जहालाग्रणी राष्ट्रवीराला काढावे लागले.

ब्रिटिश दानतीवरील गांधींची अढळ निष्ठा हें जसें जगांतील एक महदाश्चर्य आहे, तसेंच ही निष्ठा ढळल्यावर ही सैतानी राज्यपद्धति एक तर सुधारीन किंवा संहारीन अशीच भीष्मप्रतिज्ञा त्यांनीं केली. हृदयपालट किंवा सद्दमुक्ति यांवांचून त्यांनीं त्या राज्यपद्धतीला दुसरें प्रायश्चित्तच सांगितलें नाहीं व तें प्रायश्चित्तहि तात्काळ द्यावयास सुरवात केली.

## लोकमान्य, गांधी व खिलाफत.

खिलाफतीच्या बाबतींत लोकमान्यांचें धोरण मुत्सद्दिगिरीचें आणि तर्कशुद्ध होतें यांत मुळींच शंका नाहीं. लोकमान्यांचें म्हणणें असें होतें कीं, "या बाबतींत मुसलमानांनीच स्वतः पुढाकार घ्यावा. पूर्ण वादविवादानंतर त्यांनीं स्वतःच काय तो एक विचार ठरवावा. तो निश्चय कोणताहि असो; तो उच-

प्रकरण १९ वें.

# असहकार पुकारला.

## आतां पुढें काय?



हा प्रश्न सोडविण्याकरितां ता. २८ मे १९२० रोजी खिलाफत कमिटीची बैठक मुंबई येथें भरून त्या बैठकींत गांधींच्या असहकारितेच्या कार्यक्रमाचा स्वीकार करण्यांत आला.

हंटर कमिटीचा रिपोर्ट व तुर्की तह यांचा विचार करण्याकरितां ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक ता. ३० मे रोजीं दिल्ली येथें भरली. कमीटीनें असहकार चळवळीच्या कार्यक्रमाचा विचार करून आगष्टमध्य कलकत्ता येथें जादा कॉंग्रेस भरवून त्या प्रश्नाचा निकाल लावावा असें ठरविलें.

हिंदुमुसलमानांची संयुक्त परिषद ता. १ व २ जून रोजीं अलाहाबाद येथें भरली. त्या परिषदेला देशाच्या सर्व भागांतील एकंदर ३०० पर्यंत पुढारी हजर होते त्या परिषदेंत निश्चित ठराव असा कांहींच झाला नाहीं. सर्व भार कॉंग्रेसवरच टाकण्यांत आला. परंतु त्या बैठकींत गांधींना निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या, प्रांतांच्या व समाजांच्या मतांचा एकंदर कल कोणीकडे आहे व एकंदर परिस्थिती कशी काय आहे याचा नीट अंदाज बांधतां आला.

कॉंग्रेस काय निकाल देते तें पहात बसण्याइतकी त्यावेळी गांधींना फुरसत नव्हती. खिलाफत कमिटीनें असहकारितेचा कार्यक्रम मान्य केला होता आणि प्रचण्ड चळवळीची इमारत वर उभारण्यास गांधींना हा एवढा आधार पुरेसा होता

"चमत्कार"

अमृतसर कॉंग्रेसच्या वेळीं ब्रिटिश सरकारशीं सहकारिता करा म्हणून आग्रहानें, कळकळीनें, आणि कळवळ्यानें सांगणारे गांधी दोनच महिन्यांत कडे-कट असहकारी बनले, सुधारणांबद्दल मि. मॉंटेग्यूचे आभार माना म्हणून म्हणणारे

गांधी सुधारणांचा धुव्वा उडवून देण्यासाठीं पुढें सरसावले. हा चमत्कार तरी काय आहे? ब्रिटिश राजनीतींत अशी कोणती प्रचंड उलथापालथ होऊन गेली कीं त्या योगानें हा असा चमत्कार घडून यावा?

म. गांधींच्या चरित्रावर उपहासानें, अनादरानें किंवा आश्चर्यानें असा आक्षेप घेणारे एक गोष्ट विसरतात. त्यांना गांधींच्या चरित्रांतील एक गुण विशेष दिसत नाहीं किंवा पटत नाहीं.

गांधी मनुष्यस्वभावांतील मूलभूत व उपजत चांगुलपणावर विश्वास ठेवणारे आहेत; कोणत्याहि एक किंवा अनेक विशिष्ट कृत्यांवरून ते कोणतीहि व्यक्ति, संस्था, समाज किंवा राष्ट्र नितांत दुष्ट समजत नाहींत; सर्व अपराधांची ते शक्य तोंपर्यंत उपेक्षाच करतात; त्यांची खात्री फारच उशीरा पटते; परंतु एकदां त्यांची खात्री पटली, एकदां त्यांनीं विशिष्ट मार्ग आक्रमण करण्याचा निश्चय केला म्हणजे जगांतील मोठ्यांत मोठा हिमालय पर्वत त्यांची गति कुंठित करूं शकत नाहीं; जास्तींत जास्त वेगवान् वाहन त्यांना मंद वाटतें आणि अंतिम निकालावांचून मध्यंतरींची तडजोड त्यांना मोह पाडूं शकत नाहीं.

लोकमान्यांचा ब्रिटिश दानतीवरील विश्वास सार्वजनिक कारकीर्दीच्या प्रारंभीच उडाला होता आणि गांधींचा विश्वास दोन महिन्यांपूर्वीच उडाला. परंतु असें असूनहि गैरविश्वासाच्या आणि त्याचें प्रायश्चित्त देण्याच्या कामीं गांधींनीं योजलेले उपाय लोकमान्यांनाहि इतके उग्र व कडक वाटले कीं, हे वीरा! शांत हो! शांत हो! असेच उद्गार त्या जहालाग्रणी राष्ट्रवीराला काढावे लागले.

ब्रिटिश दानतीवरील गांधींची अढळ निष्ठा हें जसें जगांतील एक महदाश्चर्य आहे, तसेंच ही निष्ठा ढळल्यावर ही सैतानी राज्यपद्धति एक तर सुधारीन किंवा संहारीन अशीच भीष्मप्रतिज्ञा त्यांनीं केली. हृदयपालट किंवा सद्गमुक्ति यांवांचून त्यांनीं त्या राज्यपद्धतीला दुसरें प्रायश्चितच सांगितलें नाहीं व तें प्रायश्चित्तहि तात्काळ द्यावयास सुरवात केली.

## लोकमान्य, गांधी व खिलाफत.

खिलाफतीच्या बाबतींत लोकमान्यांचें धोरण मुत्सद्दिगिरीचें आणि तर्कशुद्ध होतें ह्यांत मुळींच शंका नाहीं. लोकमान्यांचें म्हणणें असें होतें कीं, " ह्या बाबतींत मुसलमानांनीच स्वतः पुढाकार घ्यावा. पूर्ण वादविवादानंतर त्यांनीं स्वतःच काय तो एक विचार ठरवावा. तो निश्चय कोणताहि असो; तो उच-

ऊन धरणें हें मग हिंदूंचें कर्तव्यच आहे." हिंदुमुसलमानांच्या संयुक्त परिषदेला लोकमान्यांनीं त्याच अर्थाचा संदेश व आश्वासन पाठविलें होतें.

हें धोरण तत्वतः तर्कशुद्ध आणि मुत्सद्देगिरीचें असलें तरी व्यक्तिशः पुढारीपणाला योग्य असें नव्हतें. मुसलमानांत सर्व कांहीं होतें; फक्त बुद्धिबळ त्यांना पाहिजे होतें व त्या कामीं हिंदूंकडे ते आशाळभूत व अपेक्षापूर्ण दृष्टीनें पाहत होते. अशा वेळीं तुमचें तुम्ही पाहून घ्या असें म्हणणें म्हणजे एकाअर्थी हिंदुमुसलमानांच्या संयुक्त व सर्व राष्ट्रीय पुढारीपणाचा इनकार करणेंच होय यांत शंका नाहीं.

लोकमान्यांनीं आपणाकडे चालून आलेल्या ह्या सर्व राष्ट्रीय व आंतर्राष्ट्रीय पुढारीपणाचा मान स्वीकारला नाहीं ह्याचें कारण असें दिसतें कीं, लोकमान्य हे शुद्ध राजकारणी पुरुष होते. त्यांना राजकारण समजे व राजकारण तेवढेंच रुचे. कायदेमंडळांत हिंदुमुसलमानांच्या प्रतिनिधींच्या प्रमाणाचा प्रश्न लखनौ येथें उपस्थित झाला तो शुद्ध राजकीय व राष्ट्रीय स्वरूपाचा होता. लोकमान्यांनी तो प्रश्न आपणाकडे पुढारीपण घेऊन सोडविला. इतकेंच नव्हे तर त्या बाबतींत मुसलमानांच्या मागण्यांचा त्यांनीं कांहींसा लडिवाळपणानें विचार केला.

खिलाफतीचा प्रश्न हा शुद्ध राजकीयहि नव्हता आणि राष्ट्रीयहि नव्हता. तो धार्मिक होता. राष्ट्रबाह्य होता आणि आंतर्राष्ट्रीय होता. लोकमान्य हे कट्टे हिंदु होते आणि कट्टे मराठा होते. ह्या कट्टया हिंदुपणांत व कट्टया मराठा बाण्यांत मुसलमानांविषयीं अगदीं अपरिहार्य त्यापेक्षां जास्त सहानुभूतीला व सहकारितेला जागाच नाहीं; धार्मिक व राष्ट्रबाह्य बाबतींत तर नाहींच नाहीं. ह्यामुळेंच आपल्या एकंदर कर्तृत्वाचा व तपश्चर्येचा उपयोग ह्या कामाकडे करण्यास लोकमान्यांना स्फूर्ति होणेंच शक्य नव्हतें.

गांधींची वृत्ति लोकमान्यांच्या अगदीं उलट होती. गांधी हिंदु असले तरी गांधींचा धर्म हा कोणत्याहि एका विशिष्ट धर्मांत आग्रहानें राहण्याइतका कोता नाहीं; गांधी परिस्थितीमुळें राष्ट्रीय असले तरी त्यांची वृत्ति राष्ट्रें, साम्राज्यें व वर्ण ह्यांच्या पलीकडे विश्वबंधुत्वाच्या मुलखांत वावरणारी; द. आफ्रिकेतील कामगिरीमुळें आणि त्यास हिंदुस्थानांतील तेथीपासून अलिप्त राहिल्यामुळें हिंदु-मुसलमानांतील ऐक्य हा त्यांचा एक देहस्वभावच होऊन गेला होता; कौटुंबिक स्याहि व कोणत्याहि अन्यायाला विरोध हें तत्व त्यांच्या रोमरोमांत भिनलेलें होतें आणि त्याबरोबरच हा विरोध अप्रतिकारी अहिंसामार्गानेंच करावयाचा

हें त्यांचें अवतार कार्य; ह्या सगळ्या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे खिलाफत चळवळ हा सबंध आयुष्यांत एकदांच येणारा कपिला पष्टीचाच योग गांधींना लाभला ह्यांत शंकाच नाहीं.

## व्हाइसरॉयांस निर्वाणीचा खलिता.

" जादा कॉंग्रेसचा निकाल होईपर्यंत वाट पाहण्यास सवड नसल्यामुळें गांधींनीं खिलाफत कमिटीनें मंजूर केलेल्या ठरावाच्या बळावर ता. २२ जून रोजी अनेक मुसलमान पुढाऱ्यांच्या सह्यांचें एक पत्र व्हाइसरॉयांकडे पाठविलें. तुर्की तहाच्या अटी फिरवून घेण्याचा आपण प्रयत्न करावा, आणि ब्रिटिश प्रधान मंडळ मुसलमानांच्या इच्छा गुंडाळून ठेवील तर हिंदी मुसलमानांशीं *त्या कामांत सहकारिता करावी. व्हाइसरॉय ही सूचना अमान्य करतील तर एक आगष्टपासून आम्हांला नाइलाजास्तव सरकारशीं करीत असलेली सहकारिता बंद करावी लागेल असा ह्या पत्रांत व्हाइसरॉयांना निर्वाणीचा निरोप* पाठविण्यांत आला.

" ह्या अटींनीं प्रधानांनीं दिलेलीं अभिवचनें मोडलीं आहेत आणि मुसलमानांच्या भावनांविषयीं अत्यंत बेपर्वाई दाखविली आहे. आपल्या मुसलमानी देशबांधवांशीं अत्यंत सलोख्याच्या नात्यानें राहूं इच्छिणारा एक कट्टा हिंदू ह्या नात्यानें त्यांच्यावरील ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं मीं त्यांच्या खांद्यास खांदा लावून न लढलों तर मी हिंदभूमीच्या पोटीं व्यर्थ जन्म घेतला असें होईल. * * * हंटर कमिटींतील बहुमताचा रिपोर्ट व त्यावरील आपला खलिता ह्यांच्या योगानें अविश्वास अधिकच वाढला आहे. अशा स्थितींत वैतागानें ब्रिटिश साम्राज्याशीं असलेला सर्वच संबंध तोडून टाकावा किंवा ब्रिटिश घटनेंतील जन्मजात चांगुलपणावर अद्याप भरंवसा असेल तर केलेल्या अन्यायाचें परिमार्जन होऊन हा विश्वास पुन्हां प्रस्थापित करावयाचा ह्यापैकीं कोणता तरी एक मार्ग मला मोकळा आहे, अशा चांगुलपणावरील माझा विश्वास अद्याप उडालेला नाहीं आणि जरूर तितक्या प्रमाणांत आत्मक्लेश सहन करण्याची आमची तयारी असेल तर कोणत्यातरी रीतीनें न्याय झाल्याशिवाय राहणार नाहीं अशी मला अद्याप आशा आहे.

पुढें गांधी ह्या पत्रांत म्हणतातः—( १ ) रक्तपात ( २ ) देशत्याग-हिजरात किंवा ( ३ ) सरकारशीं सहकारिता करण्याचें सोडून देऊन अन्यायापासून अलिप्त रहावयाचें हे तीन मार्ग मुसलमानांस मोकळे होते. " मी असें म्हण-

-ण्याचें धाडस करतों की, मी अत्याचारी पंथाला त्या मार्गापासून परावृत्त करण्यांत यश मिळविलें आहे. हिजरात पक्षाचें कार्यहि सर्वस्वी बंद पडलें नसतें तरी त्याला आळा पडला आहे. पुष्कळसा स्वार्थत्याग करावा लागेल आणि लोक यऱ्याच मोठ्या प्रमाणावर अवलंब करतील तर यश आल्यावांचून राहणार नाहीं असा एखादा हातघाईच्या लढयाचा मार्ग लोकांपुढें नसता तर किती हि दडपशाही केली असती तरी अत्याचारांचा स्फोट झालाच असता अशी माझी खात्री आहे. असहकार हाच एक स्वाभिमानास साजेसा आणि सहनशील मार्ग मोकळा आहे असें मला वाटतें. सामान्य जनतेकडून असहकारितेचें आचरण करविण्यांत धोका आहे हें मला कबूल आहे. परंतु अशा आणीबाणीच्या वेळीं विशेष धोक्याचे मार्ग स्वीकारल्यावांचून इष्ट तो फरक घडवून आणणें शक्यच नाहीं.

कॉंग्रेसमधील आपलें कार्य सुलभ व्हावें आणि लोकमताला निश्चित वळण लागावें या हेतूनेंच की काय, ऑगष्टमध्येच अहमदाबाद येथें भरलेल्या गुजराथ प्रांतिक परिषदेंत असहकारितेचा चार कलमी ठराव त्यांनीं मंजूर करून घेतला. अशा रीतीनें शुद्ध राजकारणांत असहकारितेचा प्रथम पुरस्कार करण्याचा मान गांधींच्या गुजराथ प्रांतानेंच मिळविला हें साहजिकच आहे. या बैठकींत परदेशी मालावरील बहिष्काराचा प्रश्न उपस्थित झाला होता. परंतु असहकारितेच्या अगदीं प्रारंभापासूनच त्यांनी बहिष्काराच्या मुळाशीं द्वेषभाव विशेष संभवतो या कल्पनेवर बहिष्काराच्या ठरावास विरोध चालविला होता. हा विरोध येथपर्यंतच यशस्वी झाला. कलकत्ता जादा कॉंग्रेसपासून बहुमतास मान देऊन त्यांना बहिष्कारालाच मान्यता देणें भाग पडलें.

## संस्मरणीय १ ऑगष्ट.

या संस्मरणीय एक ऑगष्टच्या दिवशीं लोकमान्यांनी आपली इहलोकींची यात्रा संपविली आणि गांधींच्या हातीं राजकारणाचीं सूत्रें दिलीं.

या संस्मरणीय एक ऑगष्टच्या दिवशीं देशभर खिलाफत दिवस म्हणून पाळण्यांत येऊन सार्वत्रिक हरताळ पाडण्यांत आला. " अशा सरकारविषयीं माझ्या मनांत आदरहि असणें शक्य नाहीं आणि प्रेमहि असणें शक्य नाहीं " असें म्हणून गांधींनी या दिवशीं आपलें कैसर-ई हिंद पदक व राजीनामापत्र व्हाइसरॉयांकडे रवाना केलें.

मुसलमानी लोकमताविषयींची बेपर्वाई आणि हिंदुस्थानांतील अँग्लोइंडियन लोक, विलायतेंतील साम्राज्यवादी पत्रें व हौस ऑफ् लॉर्ड्स ह्यांचा डायर ओड्वायर विषयीं कैवार ह्यामुळें हिंदी लोकमत अधिकच प्रक्षुब्ध होत गेलें.

कलकत्त्याची जादा काँग्रेस ( ४ सप्टेंबर ) भरण्यापूर्वी म. गांधी व शौकत अल्ली ह्यांनीं देशांतील बहुतेक भागांत विद्युद्वेगानें दौरे काढीत प्रचण्ड लोकमत-जागृति घडवून आणली.

## कलकत्ता जादा काँग्रेस.

ही सुद्धां काँग्रेसच्या इतिहासांतील एक नवयुग प्रवर्तक व क्रांतिकारक अशीच काँग्रेस झाली.

असहकारितेच्या तपशिलाच्या बाबतींत मांझें मलाच धड कांहीं समजत नाहीं असे काँग्रेसच स्वागताध्यक्ष बी. चक्रवर्ती ह्यांनीं आपल्या भाषणांत प्रांजलपणें कबूल केलें. मिसेस बेझंट ह्यांच्यावांचून इतर सर्व पुढारी व खुद्द काँग्रेसचे अध्यक्ष लाला लजपतराय ह्यांची मनःस्थितिसुद्धां जवळ जवळ अशी होती.

" ह्यावर तुमची निराळी योजना कांहीं असेल तर पुढें आणा " ह्या एका वाक्यांतच गांधींचे प्रतिपक्षी आतां चीत होऊन जात होते. डॉ. सप्रूसारखे नेमस्त हिंदुमुसलमानांच्या संयुक्त बैठकींत व दास-पाल वगैरेसारखे पुढारी राष्ट्रीय सभेंत ह्याच प्रश्नापुढें चीत होऊन गेले. मुख्य प्रधानांकडे शिष्टमंडळ पाठवावें, गांधींच्या कार्यक्रमाची छाननी करण्याकरितां प्रातिनिधिक कमीटी नेमावी आणि तत्पूर्वी सर्व देशभर लोकमतजागृतीसाठीं प्रचण्ड चळवळ करावी ही दासपाल बाबूंची आजन्मे मरण उद्यांवर ढकलणारी उपसूचना नामंजूर होऊन ह्या बैठकींत प्रचण्ड बहुमतानें म. गांधींच्या असकारितेचा ठराव मंजूर झाला.

कौन्सीलबहिष्काराचा मुद्दा मात्र बहुमतास इतका पटण्यासारखा नव्हता. परंतु गांधींनीं त्रिविध बहिष्काराला क्रमविकासी हें विशेषण लावण्याचें कबूल केलें, व परदेशी मालावरील बहिष्काराचा समावेश आपल्या ठरावांत करून घेतला आणि ह्या सवलतींच्या व तडजोडीच्या बळावर कौन्सील बहिष्कार दिङ्मूढ सभासदास मान्य करावयास भाग पाडलें. कौन्सिलबहिष्काराच्या बाबतींत ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही होती कीं, बहुतेक सर्व नामांकित जुने पुढारी ह्या मुद्द्यावर सर्वस्वी गांधींच्या विरुद्ध होते.

## असहकारितेचा ठराव.

असहकारितेच्या ठरावाचा सारांश असा आहे:—

ज्याअर्थी खिलाफत प्रकरणांत बादशाही सरकार व हिंदी सरकार ह्यांनी हिंदी मुसलमानांविषयींच्या आपल्या कर्तव्याची सर्वस्वी उपेक्षा केली आहे आणि पंजाबांतील अत्याचारांपासून अनाथांचें रक्षण त्यांनी केलेलें नाहीं किंवा त्यांना करतां आलेलें नाहीं. व हौस ऑफ लॅार्ड्सची तीव्र कर्तव्यभ्रष्टता दिसून आली आहे व पंजाबांतील सुसंघटित अत्याचारांचें व सोटेशाहीचें समर्थन करण्यांत आलें आहे, त्या अर्थी राष्ट्रीय स्वाभिमान प्रस्थापित करण्यासाठीं आणि असे अन्याय यापुढें होऊं नयेत ह्यासाठीं स्वराज्य हेंच एक परिणामकारक साधन आहे.

कॅांग्रेसचें आणखी असेंहि मत आहे कीं हे दोन चार अन्याय दूर होऊन स्वराज्य प्रस्थापित होईपर्यंत हिंदी लोकांना प्रगतिपर अहिंसात्मक असहकाराचांचून दुसरा मार्ग नाहीं.

ह्यासाठीं ही कॅांग्रेस लोकांस असा सल्ला देत आहे कीं, त्यांनीं (अ) पदव्या, अवेतनीय अधिकार व स्थानिक संस्थांतील सरकारनियुक्त सभासदत्व ह्यांचे राजीनामे द्यावेत. (आ) सरकारी दरबार, समारंभ वगैरेस हजर राहू नये. (इ) सरकारशीं संबंध ठेवणाऱ्या शाळा कॅालेजांतून हळुहळू मुलें बाहेर काढावीत व त्यांच्या ऐवजीं राष्ट्रीय शाळा कॅालेजें स्थापन करावींत. (ई) सरकारी न्यायमंदिरांवर वकील व अशील ह्यांनीं हळूहळू बहिष्कार घालून लवादांमार्फत वाद निकालांत काढण्याची तजवीज व्हावी. (उ) लष्करी कारकुनी व मजूरी पेशाच्या लोकांनीं मेसापोटेमियांत कामावर आपखुषीनें जाण्याचें नाकारावें. (ऊ) कौन्सिल उमेदवारांनीं माघार घ्यावी व मतदारांनीं कोणाहि उमेदवारांस मतें देऊं नयेत. (ऋ) परदेशी मालावर बहिष्कार घालावा.

कॅांग्रेस आणखी असाहि सल्ला आहे कीं, स्वदेशी कापडाचा फारच विस्तृत प्रमाणावर उपयोग करण्यांत यावा आणि गिरणींतील मालाच्या जोडीला भर म्हणून हातरहाट व हातमाग ह्यांचा बरोबर उपयोग करण्यांत यावा."

कॅांग्रेस ही आतां मात्र लोकप्रतिनिधि सभा ह्या नांवास पात्र राहिली नाहीं. आतां कॅांग्रेस ही राष्ट्रीय सभा म्हणून राहिली नसून गांधीसभा झाली आहे असे मोठमोठे नामांकित राष्ट्रीय पक्षाचे पुढारीसुद्धां उद्गार काढूं लागले.

## प्रकरण २० वें.

# मोहीम सुरू झाली.



"माझे टीकाकार असें म्हणतांना ऐकतों की, " असें धीरोदात्त कार्य पार पाडण्याइतकी कार्यनिष्ठा आणि स्वार्थत्यागवृत्ति हिंदुस्थानांत नाहीं. " त्यांचें म्हणणें अंशतः बरोबर आहे. हिंदुस्थानांत हें गुण आतां नाहींत हें खरें; परंतु आपणामध्यें हे गुण आतां नसले तरी ते अंगीं आणतां येणार नाहींत काय ? आणि सगळें राष्ट्र ह्या गुणांनीं भारून टाकतां येणार नाहीं काय ? हा प्रयत्न करून पाहण्यालायक नाहीं काय ? अशा थोर कार्यासाठीं करावा तितका स्वार्थत्याग थोडाच होणार नाहीं काय ? "—यंग इंडिया (२०-६-२३)

असहकारितेच्या ठरावाची अंमलबजावणी कशी करावी ? यासंबंधानें खुलासेवार कार्यक्रम आखण्याकरितां कलकत्ता कॉंग्रेसनें एक पोटकमीटी नेमली होती. ता. २ अक्टोबर रोजीं ऑलइंडिया कॉंग्रेस कमीटीची बैठक भरून ह्या कमीटीच्या रिपोर्टचा विचार करण्यांत आला आणि सर्व कॉंग्रेस संस्था व कार्यकर्ते ह्यांस उद्देशून तपशीलवार माहितीपत्रक प्रसिद्ध करण्यांत आलें

ह्यावेळीं गांधींच्या पुढें दुहेरी कार्य पडलेलें होतें. कौन्सिलनिवडणुकी अगदीं जवळ आल्या होत्या आणि कौन्सीलबहिष्कार यशस्वी करावयाचा होता. शिवाय नागपूर कॉंग्रेसपर्यंत येवढा एक प्रश्न निकालांत निघत असला तरी इतर कार्यक्रमांत फेरफार करून घेण्यासाठीं शिकस्तीचे प्रयत्न होण्याचा संभव होता. त्यासाठीं ही आपत्ति टळावी व त्याबरोबरच वेळ न गमावतां कार्यक्रमाला प्रत्यक्ष स्वरूप मिळावें म्हणून लोकमतजागृति करावयाची होती.

### कौन्सिलनिवडणुकी.

कलकत्त्याची जादा कॉंग्रेस भरण्यापूर्वीच अमृतसर कॉंग्रेस संपतांच कौन्सिलांत कॉंग्रेसनें आपले प्रतिनिधि पाठवावेत किंवा काय हा वाद उपस्थित होऊन लोकमान्यांनीं आपल्या बृहन्महाराष्ट्र व कर्नाटक भागापुरता स्वतंत्र

काँग्रेस डेमोक्रॅट पक्षहि स्थापन केला होता व ह्या पक्षाचा जाहिरनामा बाहेर पडून ह्या पक्षामार्फत निरनिराळ्या जागांकरितां उमेदवार उभे करण्याचा व त्यांची तरफदारी करण्याचाहि प्रयत्न सुरू होता. इतर प्रांतांतूनहि निरनिराळे अव्वल व दुय्यम दर्जाचे पुढारी कौन्सिलांसाठीं उमेदवार म्हणून उभे राहिले होते किंवा राहण्याच्या विचारांत होते.

जादा काँग्रेसनें कौन्सिलबहिष्कार पुकारतांच लोकमान्यांच्यामागें अनाथ झालेल्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं खुद्द कलकत्याला व नंतर मुंबईस खास बैठक भरवून नाखुषीनें को होईना परंतु काँग्रेसच्या ठरावास मान देऊन, कौन्सिल-बहिष्कार मान्य केला. सुसंघटित व जोमदार महाराष्ट्र पक्षाच्या ह्या धडाडीच्या निकालानें इतर प्रांतांसहि चांगलेंच उदाहरण मिळालें. आणि सर्व देशभर राष्ट्रीय उमेदवारांसाठीं मतें मिळविण्याकरितां केलेल्या योजना, आंखलेले कार्यक्रम व योजिलेले उपाय हीं सर्व कौन्सिल निवडणुकीस काँग्रेसच्या इच्छेविरुद्ध उभ्या राहिलेल्या उमेदवारास मतें देऊं नका असें लोकमत घनविण्याच्या कामीं उपयोगांत आणलीं गेलीं.

लाला हरकिसनलाल, ना. खापर्डे वगैरे एका हाताच्या बोटावर मोजतां येणाऱ्या नामांकित काँग्रेस भक्तांवांचून इतर सर्व काँग्रेस भक्तांनीं उमेदवारीतून आपलीं नांवें मागें घेतलीं १६ नोव्हेंबर हा मुंबई कौन्सीलच्या निवडणुकीचा दिवस होता. हा दिवस आपल्या परीक्षेचा आहे" असें म्हणून गांधींनीं ह्यावेळीं मतदारांनीं व स्वयंसेवकांनीं कसें वागावें ह्या संबंधानें स्पष्ट व खुलासेवार सूचना तयार केल्या होत्या.

एकंदर निवडणुकी सुखानें पार पडल्या आणि अनेक ठिकाणच्या मतदान-केंद्रांत एकहि मतदार मत देण्यास पुढें आला नाहीं अशीं उदाहरणें कितीतरी ठिकाणीं घडून आलीं. एकंदर मताची नोंद शेकडा २० सुद्धां झाली नाहीं.

" मुंबई इलाख्यांतील आणि इतर भागांतील निवडणुकींवरून मतदारांपुरतेंच पाहिलें तर असहकारितेचा विजय स्पष्ट झालेला आहे. कांहीं ठिकाणीं तर एक सुद्धां मतदार मत धावयास गेला नाहीं. "

निवडणुकीसंबंधानें गांधी नंतर लिहितात:—

" मतदारांनीं अगदीं निश्चितपणें असें दाखवून दिलें आहे कीं, ह्या सुधारलेल्या कौन्सीलांशीं आम्हांला कांहीं कर्तव्य नाहीं. अशी अत्यंत स्पष्ट विरुद्ध

आज्ञा असतांहि-सभासद कौन्सीलांत कामें करण्यास तयार होतील-तर तें प्रतिनिधिक संस्था म्हणजे केवळ पोरखेळ ठरवितील. " ( य. इं. ४-११-२० )
-: ह्या कॉंग्रेसविरोधी सभासदांनीं अखेर प्रातिनिधिक संस्था ह्या पोरखेळ ठरविल्याच.-

## वकील व कोर्टांवरील बहिष्कार.

" आपली हांव, सूड किंवा न्याय्य मागण्या तृप्त करून घेणाऱ्या कज्जेदलालांनीं ह्या न्यायमंदिरांच्या अंतिम उद्देशाकडे दुर्लक्ष करूं नये. ज्या सरकारतर्फे तीं न्यायदान करतात त्या सरकारची सत्ता स्थिर करणे हा त्यांचा अंतिम उद्देश असतो. न्यायमंदिरें नसतील तर एकाच दिवसांत सरकार नामशेष होईल. माझ्या कार्यक्रमाप्रमाणें हिंदी वकीलांनीं वकील्या सोडल्या आणि दिवाणी मुकद्दमे लढविण्यास वादीप्रतिवादीच पुढें सरसावले नाहीत तरी सुद्धां ही न्यायमंदिरांमार्फत लोकांवर अधिकार गाजविण्याची सत्ता अस्तित्वांत राहणारच. परंतु मग निदान तीं आमची फसवणुक तरी करणार नाहींत." (य. इं. ६-१०-२०)

अशा वृत्तीनें गांधींनीं कोर्टें व वकीली ह्यांच्यावरील बहिष्काराचा प्रश्न हातीं घेतला. ६ अक्टोबरच्या यंग इंडियाच्या अंकांत बाबू राजेंद्रप्रसाद ह्या बिहारच्या अव्वल दर्जाच्या वकीलाचें आणि १३ अक्टोबरच्या अंकांत प. मोतीलाल नेहरू ह्या सबंध हिंदुस्थानांतील पहिल्या प्रतीच्या वकीलांतील प्रमुख वकीलाचें अशीं दोन पत्रें प्रसिद्ध झालीं; दोघांनींहि वकीली व न्यायमंदिरें ह्यांतील कज्जेदलालीच्या अनिष्ट स्वरूपाचें अधिकारी वाणीनें मार्मिक निरूपण केलें आहे. आपल्या लेखाच्या प्रारंभींच प. नेहरू म्हणतात, " न्यायमंदिरांत खटले लढविण्याचें टाळावें आणि सर्व वाद खासगी लवादांमार्फत तोडावेत ह्या गोष्टींच्या इष्टतेबद्दल मतभेदच नाहीं. " आणि अखेर ते म्हणतात, " असहकारावर ज्यांचा भरंवसा आहे—आणि अशांची संख्या कांहीं थोडी नाहीं—अशांना माझें असें सांगणें आहे कीं, तुम्हांला कितीहि नुकसान सोसावें लागो किंवा अडचणी सोसाव्या लागोत एकदां मनाचा निर्धार करा आणि न्यायमंदिरांवर पूर्ण बहिष्कार घालाच. "

आणि हा उपदेश कांहीं कोरडा नव्हता. ज्यांची प्राप्ति दरमहा हजारों, ५ ते ५० हजार रुपयांपर्यंतहि आहे व जे आपापल्या प्रांतांतील व एकंदर हिंदुस्थानांतील पहिल्या दर्जाचे वकील आहेत असे- द. बं. दास, पं. मोतीलाल नेहरू, बाबू राजेंद्रप्रसाद, बाबू जे. एन्. सेन गुप्त, वगैरे कितीतरी वकीलांनीं वकीली

सोडली किंवा तहकूब केली, व अगदीं पांच रुपये दरमहा प्राप्तीच्या होतकरू वकीलांपर्यंत सर्व दर्जाच्या वकीलांतील कितीतरी वकीलांनीं हळुहळू हाच मार्ग स्वीकारला. पुढील वर्षी अशा वकीली सोडलेल्या व निर्धन बनलेल्या राष्ट्रकार्य करणाऱ्या वकीलांच्या मदतीकरितां वर्धा येथील शेट जन्मालाल बजाज ह्यांनीं १ लाख रुपयांची देणगी दिली होती.

पदव्यांवरील बहिष्कार हा कार्यक्रमांतील भागहि असा होता कीं, त्या सूचनेच्या आधीच व सर्वस्वी सरकारमय बनून गेलेल्या पदवीवाल्यांकडून विशेष उत्साहानें अंमलबजावणी होईल अशी अपेक्षाच नव्हती. तथापि पुष्कळच लहान मोठ्या पदवीवाल्यांनीं आपल्या पदव्या सोडल्याच. आणि पदवीवाल्यांना व पदव्यांच्या संस्थेला जनतेंत इज्जत म्हणून कांहीं उरलीच नाहीं.

" शिक्षण संस्थांवरील बहिष्काराच्या सूचनेविरुद्ध पुष्कळच लिहिण्यांत व बोलण्यांत येत आहे. ही सूचना 'खोडसाळ' आहे, 'घातक' आहे, ' देशाच्या सर्वश्रेष्ठ हितसंबंधांस बाधक आहे. ' अशा सारख्या शब्दांनीं त्याचें वर्णन करण्यांत येत आहे. " गांधी २९ सप्टेंबरच्या यंग इंडियांत म्हणतात, ह्या बाबतींतील " माझी चूक शोधून काढण्यासाठीं मीं अगदीं शिकस्त करीत आहें. परंतु ह्या प्रयत्नांमुळें माझी अशी अधिकच खात्री पटत आहे कीं, अति उत्तम दूध असले तरी त्यांत विष पडलें म्हणजे त्याचा उपयोग करणें जसें पाप आहे तसेंच शिक्षण कितीहि उच्च दर्जाचें असले तरी सध्यांच्या सरकारमार्फत तें मिळविणें हें पाप आहे. " * * ह्या शिक्षण संस्थांवर सरकारचा ताबा आहे, आणि मला असें वाटतें कीं, ह्या सरकारनें राष्ट्राचा राष्ट्रीय स्वाभिमान जाणून बुजून लुबाडून घेतला आहे. आणि म्हणूनच त्या संस्थांतून पालकांनी आपलीं मुलें काढून घेतलीं पाहिजेत.

म. गांधी आणि विलायतेंत गेलेल्या शिष्टमंडळांतून नुकतेच परत आलेले महंमद अल्ली ह्यांनीं १२ अक्टोबर रोजीं अलीगड येथें तळ दिला, आणि तेथूनच सरकारी शाळांवरील बहिष्काराच्या मोहिमेस सुरुवात केली. आणि पुढील चार पांच महिनेपर्यंत ही मोहिम फारच नेटानें चालविण्यांत आली. म. गांधींनी अलीगड कॉलेजचें ट्रस्टी व विद्यार्थ्यांचे पालक ह्यांस उद्देशून दोन पत्रें प्रसिद्ध केलीं. कॉलेजच्या ट्रस्टींपैकीं कांहीं असहकारी ट्रस्टी व कांहीं इतर मुसलमान पुढारी ह्यांनीं कॉलेजच्या इतर ट्रस्टींना पत्र लिहून संस्था सरकारी देखरेखीखालून काढून घ्यावी असें सुचविलें. १७ अक्टोबर रोजीं ट्रस्टींची खास बैठक

झाली. व संस्था पूर्वीच्याच तत्वांवर चालू ठेवण्यांत यावी असाच बहुमतानें निकाल झाला.

राष्ट्रीय मुस्लीम विश्वविद्यालयाची स्थापना लगेच ता. २९ अक्टोबर रोजी शेख-उल-हिंद मौलाना महंमद-उल-हसन साहेब ह्यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. मौ. महंमद अली ह्यांस प्रिन्सिपॉल नेमण्यांत आलें. नंतर गांधींनीं पंजाबवर दृष्टि फिरविली. तेव्हां त्या भागांतील विद्यार्थिवर्गांत प्रचण्ड खळबळ उडून गेली. लाहोर कॉलेज, खालसा कॉलेज, दयानंद अँग्लोवैदिक कॉलेज व इतर शिक्षण संस्थांतील विद्यार्थ्यांचे प्रचण्ड संप होऊन त्या संस्था राष्ट्रीय करण्यांत याव्यात म्हणून विद्यार्थ्यांनीं मागणी केली.

खास गांधी हे कुलपति ( चॅन्सेलर ) आणि गिडवानी हे आचार्य अशा थाटानें खास गांधींच्या हस्तें गुजराथ विद्यापीठाची स्थापना अहमदाबाद येथें १५ नोव्हेंबर रोजीं करण्यांत आली. सुरुवातीसच ह्या विद्यालयाला ५०० विद्यार्थी मिळाले. काशी विद्यापीठांतहि प्रत्यक्ष गांधींनीं प्रयत्न केले व विद्यार्थीनीं संपहि केले. परंतु पं० मालवीयजींच्या प्रयत्नांमुळें ही संस्था राष्ट्रीयहि बनली नाहीं, तिच्यांतून फारसे विद्यार्थीहि बाहेर पडले नाहींत.

डीसेंबरच्या सुरुवातीस गांधींनीं बिहार प्रांतांत दौरा काढला. पाटणा येथील राष्ट्रीय विद्यापीठाची स्थापना ५ जानेवारी १९२१ रोजीं करण्यांत आली.

टिळक महाविद्यालयाची व विद्यापीठाची स्थापना ११ डीसेंबर रोजीं करण्यांत आली. खुद्द मुंबई येथेंहि बहिष्काराची ही चळवळ चालवून आचार्य गुणतांबेकर व मुख्याध्यापक श्री. पडविद्री ह्यांच्या प्रामुख्याखालीं राष्ट्रीय कॉलेज व हायस्कूल सुरू करण्यांत आलें.

अमळनेर येथील खानदेश एजुकेशन सोसायटीची *शाळा व कॉलेज व चिंचवड येथील अनाथ विद्यार्थीगृह ह्या सरकारी नियंत्रणाखालून बाहेर पडलेल्या महाराष्ट्रांतील दोन प्रमुख संस्था होत.

डॉ. साठ्ये, भडकमकर वगैरेंच्या प्रयत्नांनीं डॉ. कोठारे ह्यांच्या आचार्यपदाखालीं चाललेलें मुंबई येथील नॅशनल मेडिकल कॉलेज ही ह्या चळवळींतून निघालेली एक अत्यंत उपयुक्त व कार्यक्षम संस्था आहे.

* आतां इतर कित्येक संस्थांप्रमाणें ही संस्थाहि पुन्हां सरकारी मदत घेऊं लागली आहे.

प्रकरण २१ वें.

# नागपूर कॉंग्रेस.



## आणखी एक पाऊल पुढें.



आपल्या इच्छित हेतूसाठीं अमुक एक सभा, संस्था किंवा सद्गृहस्थ ह्यांच्या सहाय्याची वाट पाहत न बसतां असेल त्या साधन सामुग्रीचा पुरा उपयोग करून आपण पाऊल पुढें टाकावयाचें, आपण मार्गदर्शक व्हावयाचें हा गांधींचा बाणा आहे. ह्यामुळें कॉंग्रेसनें असहकारितेचा ठराव मंजूर करतांच तेवढयावर संतुष्ट होऊन तेवढयाच कार्यांत गुंतून जाण्यास ते तयार नव्हते.

कॉंग्रेसनें असहकार तर पुकारलाच परंतु राष्ट्रांतील लोकक्षोभ इतका तीव्र होता व असहकारितेची मर्यादा इतकी मोठी करण्याची गांधींची तयारी होती कीं, कॉंग्रेसच्या मान्यतापत्रिकेंतील प्रयत्नांचा सनदशीरपणा आणि ध्येयांतील स्वराज्याचा ब्रिटिशसाम्राज्यांतर्गतपणा ह्या दोन्ही गोष्टी कार्याच्या व्यापकपणाला आणि पुष्कळांच्या सदसद्विवेक बुद्धीला नडण्यासारख्या होत्या.

बरेच मुसलमान निदान तत्वत: तरी, खिलाफतीच्या प्रश्नामुळें, धर्मविरोधी ब्रिटिशसाम्राज्यसत्ता मान्य करण्यास तयार नव्हते. त्याचप्रमाणें असहकारितेंतील कित्येक मुद्यांच्या सनदशीरपणाबद्दल शंका घेण्यांत येऊं लागल्या होत्या. ह्यासाठीं गांधींनीं ह्या दोन्ही अडचणींतून बाहेर पडण्याचा मार्ग काढला वसाहतींच्या धर्तीवरील स्वराज्य हे राष्ट्रीय ध्येयांतील शब्द बदलून केवळ " लोकांच्या इच्छांस अनुरूप असें संपूर्ण स्वराज्य " असे शब्द घालावयाचे. आणि साधनांवर मर्यादा घालतांना ती फक्त ' न्याय्य व सनदशीर ' येवढीच असावी असें त्यांनीं ठरविलें.

आपल्या अध्यक्षत्वाखालील ऑल् इंडिया होमरूल लीगचें नांव बदलून गांधींनीं प्रथम तिला ' स्वराज्य सभा ' हें देशी नांव दिलें आणि त्या सभेच्या

उद्देशपत्रकांतच इच्छित फरक करण्याचा निश्चय केला. कलकत्ता काँग्रेसच्या वेळींच कलकत्ता येथें गांधींनीं हा फेरफार करून टाकला आणि ३ अक्टोबरला मुंबई येथें सभेच्या सर्वसाधारण सभेनें ह्या फेरफारास कायमची मजुरी दिली.

ह्या फेरफारांस मुख्य विरोध बॅ. जिन्हा यांचा होता. आणि हा विरोध निरर्थक ठरल्यावर बॅ. जिन्हा, श्री. जयकर, श्री. जम्नादास मेथा, श्री. जम्नादास द्वारकादास, शेठ हंसराज प्रागजी, शेठ गुलाबचंद देवचंद वगैरे मंडळीनें सभेच्या सभासदत्वाचे राजीनामे दिले.

" आजपर्यंतच्या बैठकींत अत्यंत मोठी आणि अत्यंत महत्वाची अशी कॉंग्रेसची बैठक होऊन गेली. सध्यांच्या राज्यपद्धतीविरुद्ध आतांपर्यंत कधीं झाला नाहीं इतका मोठा हा देखावा होता. अध्यक्ष व पुढारी ह्यांनीं लोकांना पुढें पुढें ढकलण्याऐवजीं लोकच मला आणि पुढाऱ्यांना पुढें पुढें दामटीत नत होते हें अध्यक्षांचें म्हणणें नितांत सत्य आहे. व्यासपीठावरील प्रत्येकजण हें समजून चुकला होता कीं, आतां लगाम लोकांनीं आपल्या हातीं घेतला आहे." ( यं. इ. ५-१-२१ )

अठरा हजारांहूनहि अधिक प्रतिनिधि व शिवाय प्रेक्षकसमूह अशा अद्वितीय प्रातिनिधिक स्वरूपाच्या नागपूर कॉंग्रेसमध्यें महात्मा गांधींचें दिसून आलेलें वैय्यक्तिक वर्चस्व व म. गांधींच्या नेतृत्वाखालीं मंजूर झालेल्या ठरावाचें महत्व हीं सर्व आश्चर्यकारक व क्रांतिकारक होतीं.

१८ हजार प्रतिनिधींच्या अनुकूलतेस न जुमानतां बॅ. जिन्हा ह्यांनी कॉंग्रेसच्या भर बैठकींत म. गांधींच्या कॉंग्रेसचें ध्येय व हेतुपत्रक बदलणाऱ्या ठरावास स्पष्टपणें विरोध केला व लोकांनीं तो निमूटपणें सहन केला. '

म. गांधींनीं आपल्या कारकीर्दीच्या अत्यल्प काळांत जनतेला अहिंसेचें तत्व किती प्रमाणांत पटविलें; सार्वजनिक कार्यांत किती शिस्त आणली व जनतेच्या हृदयावर आपला किती एकसूत्री अंमल बसविला ह्याचे हें उत्कृष्ट उदाहरण होतें.

## साम्राज्य व सनदशीरपणा.

" हिंदी लोकांनीं सर्व न्याय्य व शांतिमय मार्गांनीं स्वराज्य मिळवावें हा हिंदी राष्ट्रीय सभेचा उद्देश आहे" असा हा कॉंग्रेसची ध्येयपत्रिका सुधारण्याचा ठराव होता.

" जर ब्रिटिश संबंध हिंदुस्थानच्या प्रगतीला पोषक होईल तर तो तोडून टाकण्याची आम्हांला जरूरी नाहीं. परंतु जर हा संबंध आमच्या राष्ट्रीय स्वाभिमानाशीं विसंगत ठरेल तर तो साफ नष्ट करणें हें आमचें कर्तव्यकर्मच ठरतें. ह्या ठरावांत दोहींसहि जागा आहे. "

मद्रासचे माजी ॲडव्होकेट जनरल श्री. एस्. श्रीनिवास अय्यंगार, ह्यांच्या मतें असहकार हा एकंदरींत बेसनदशीर ठरतो, तर जादा काँग्रेसचे अध्यक्ष व खुद्द मि. जिन्हा वगैरेंच्या मतें तो पूर्णपणें सनदशीर ठरतो. गांधींच्या मतें प्रत्यक्ष अत्याचारांवांचून ब्रिटिश राज्यघटनेंत बेसनदशीर असें कांहींच नाहीं. परंतु गांधींना हा असला वादच मुळीं नको होता. ब्रिटिश साम्राज्यसंबंधाचा जसा त्यांना खास राग लोभ कांहींच नव्हता तसाच सनदशीरपणा किंवा बेसनदशीरपणा ह्यांच्यावरहि त्यांचा खास राग लोभ असा कांहीच नव्हता. त्यांचा राग फक्त अत्याचारांवर होता आणि लोभ अहिंसेवर होता. आणि म्हणूनच त्यांनीं " सनदशीर " शब्दाऐवजीं " न्याय व शांतिमय " अशी अधिक व्यापक कल्पना रूढ करून टाकली. कॉंग्रेसमध्यें हा ठराव मूठभर लोकांच्या विरोधानें मंजूर झाला.

नागपूर काँग्रेसचा असहकारितेचा ठराव हा जादा काँग्रेसच्या ठरावापेक्षां विशेष व्यापक, निश्चित आणि परिणाम कारक स्वरूपाचा करण्याचा गांधींचा संकल्प होता. कलकत्ता कॉंग्रेसचा ठराव हा ओमदार परंतु ज्याला आगा पिछा कांहीं नाहीं असा होता. ' सनदशीर ' पणाची कल्पना मागें ठेवावी लागेल इतका तो थेट अंतर गांठणारा नव्हता; सर्वांसच राष्ट्रकार्यांत आव्हान देणारा नव्हता किंवा त्यांत असहकारितेंतील सर्वच तत्वांचा त्यांच्या प्रामुख्याच्या प्रमाणांत खुलासा झालेला नव्हता.

## परराष्ट्रांतील चळवळ

नागपूर काँग्रेसमधील राष्ट्रांत विशेष खळबळ न उडाली तरी सुशिक्षित वरच्या वर्गांत विशेष खळबळ उडविणारा एक ठराव गांधींनीं पास करून घेतला. ह्या ठरावान्वयें दादाभाईंच्या प्रयत्नांनीं अस्तित्वांत आलेली व लोकमान्यांच्या प्रयत्नांनीं सुधारलेली ब्रिटिश काँग्रेसकमीटी ही मोडून टाकण्यांत आली व तिचें इंडिया हें पत्र बंद करण्यांत आलें.

कमीटी मोडून टाकणें "हा तत्वाचा प्रश्न होता. काँग्रेसनें जाणून बुजून जमीनीवर पाय टेवतांच होडगा जाळून टाकल्या आहेत. तिनें स्वावलंबी होण्याचा

निश्चय केला आहे * * तुह्मीं गाजावाजा करा किंवा करूं नका; ज्या शरीराला अन्न मिळत नाहीं तें मृत्युमुखीं पडणार. आपण गाजावाजा केला किंवा न केला तरी सरकारला मदत करणें आपण बंद केलें कीं तत्क्षणीं तें आपोआप मृत्युवश होणार * * प्रत्येक सत्कृत्य ही स्वयंमेव जाहिरात आहे (१९-१-२१)

ही विचारसरणी कॉंग्रेसच्या इतर पुढाऱ्यांस रुचली नाहीं. ३१ जानेवारी रोजीं सुरत येथें काँग्रेसच्या वर्किंग कमीटीची सभा भरून असा ठराव करण्यांत आला कीं, "हिंदी राजकीय परिस्थितीविषयीं परदेशांत वार्ताप्रसार करणें अत्यंत जरूर आहे. तरी म. गांधीनीं त्या सबंधाची निश्चित योजना कमीटीच्या पुढील बैठकीपुढें सादर करावी."

गांधीनी २२ फेब्रुवारीला कमीटीपुढें आपला रिपोर्ट सादर केला, "सध्यांच्या स्थितीत परराष्ट्रांत वार्ताप्रसारक मंडळ नेमणें अयोग्यच नव्हे तर अनिष्ट आहे. म्हणून माझे मत असें आहे कीं काँग्रेस वार्तापत्रकच लायक संपादकत्व.खालीं चांगल्या रीतीनें काढून जगांतील प्रमुख बातम्या पुरविणाऱ्या संस्थांकडे पाठविण्यांत यावें. असा ह्या रिपोर्टाचा सारांश होता.

पुढील आठवड्यापासून यंग इंडियाची पुरवणी म्हणून हें वार्तापत्रक प्रसिद्ध करण्यांत येईल; त्यासाठीं सर्व काँग्रेस व खिलाफत कमीट्यांनीं माहिती पुरवावी असें गांधीनी ९ मार्चच्या यंग इंडियांत जाहीर केले.

ही वार्तापत्रकाची योजना एकदरीत नांवारूपास कधींच आली नाहीं.

## असहकारितेचा ठराव.

"ज्याअर्थी या राष्ट्रीय सभेच्या मतें हिंदुस्थानच्या हल्लींच्या सरकारनें लोकांच्या विश्वासास स्वतःस अपात्र करून घेतल आहे, ज्याअर्थी हिंदी लोकांचा आतां स्वराज्य स्थापण्याविषयीं निर्धार झाला आहे, आणि ज्याअर्थी कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेच्या पूर्वी त्यांचे हक्क व स्वातंत्र्य यांस योग्य मान्यता मिळविण्याकरितां व त्यांच्यावर झालेल पुष्कळ व दुःसाद अन्याय -विशेषतः पंजाब व खिलाफत–प्रकरणीं घडलेल अन्याय, यांचे निवारण करण्याकरितां अमलांत आणलेले सर्व उपाय निष्फळ ठरले, त्याअर्थी ही राष्ट्रीय सभा कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेंत मंजूर झालेल्या अनत्याचारी असहकारितेच्या ठरावाची जोराने पुनरुक्ति करून जाहीर करते कीं, एका टोकास प्रचलित सरकारशीं आपखुषीनें केल्या जाणाऱ्या साहचर्यांचा त्याग व दुसऱ्या टोकास कर

देण्याची बंदी यांमधील अत्याचारविरहित असहकारितेच्या ठरावांतील कोण-तीहि एक संपूर्ण बाब अथवा अनेक बाबी हिंदी राष्ट्रीय सभा अगर ऑल-इंडिया कॉंग्रेसकमिटी ठरवील त्यावेळीं प्रचारांत आणल्या जाव्या; ही सभा असेंहि जाहीर करते कीं, मध्यंतरीं असहकारिता स्वीकारण्यास राष्ट्राची तयारी करण्याकरितां जोराचे प्रयत्न खालीलप्रमाणें सुरू रहावे.

## राष्ट्रीय शिक्षण.

( अ ) सोळा वर्षांच्या आंतील मुलांच्या आईबापांस आणि पालकांस ( मुलांस नव्हे ) आपल्या मुलांना सरकारच्या मालकीच्या, सरकारनें मदत दिलेल्या अथवा कोणत्याहि रीतीनें सरकारचा ताबा असलेल्या शाळांतून काढून घेण्याचा अधिक जोरानें प्रयत्न करण्यास, व त्याबरोबरच राष्ट्रीय शाळांत अगर अशा शाळा नसल्यास स्वशक्त्यनुसार इतर उपायांनीं त्यांच्या शिक्षणाची तर-तूद करण्यास सांगणें.

( आ ) सोळा वर्षांच्या आणि त्याहून जास्त वयाच्या विद्यार्थ्यांस, परिणा-माविषयीं क्षिती न बाळगतां, सरकारच्या मालकीच्या, सरकारनें मदत दिलेल्या अगर कोणत्याहि रीतीनें सरकारचा ताबा असलेल्या संस्थांतून, राष्ट्रानें ज्या सरकारास समाधि देण्याचा निश्चय केला आहे त्या सरकारचा अधिकार ज्या संस्थांतून वरचढ आहे अशा संस्थांत राहणें त्यांच्या सदसद्विवेक बुद्धीस विरुद्ध असेल तर तावडतोब आपलीं नावें काढून घेण्यास सांगणें, आणि त्यांस असह-कारितेच्या चळवळीच्या कोणत्याहि अंगाचें काम करण्यास अथवा राष्ट्रीय संस्थां-तून शिक्षण चालू ठेवण्यास उपदेश करणें.

( इ ) सरकारशीं संबंध असलेल्या अथवा सरकारनें मदत केलेल्या शाळांच्या चालकांस, व्यवस्थापकांस आणि शिक्षकांस शाळा राष्ट्रीय करण्याला मदत कर-ण्यास सांगणें, त्याचप्रमाणें म्युनिसिपालिटया आणि लोकलबोर्डे यांसहि शिक्षण संस्था राष्ट्रीय करण्यास सांगणें.

## परदेशी मालावर बहिष्कार.

( उ ) हिंदुस्थान आर्थिक दृष्ट्या स्वायत्त व स्वावलंबी करण्याकरितां व्यापाऱ्यांस व धंदेवाल्यांस परदेशी व्यापारी संबंधावर हळूहळू बहिष्कार घालण्यास व हातानें सूत काढण्याच्या आणि हातमागांवर विणण्याच्या कलांस उत्तेजन देण्यास सांगणें; आणि तत्संबंधीं ऑल-इंडिया कॉंग्रेसकमिटीनें नेमलेल्या तज्ज्ञांच्या कमिटीकरवीं आर्थिक बहिष्काराची घटना योजून तयार करविणें.

## स्वार्थत्यागाकरितां आव्हान.

( ऊ ) आणि साधारणतः ज्याअर्थीं असहकारिता फलद्रूप होण्यास स्वार्थत्यागाची अवश्य जरूरी आहे त्याअर्थीं राष्ट्रांतील प्रत्येक घटकावयवास—प्रत्येक पुरुषास व स्त्रीस राष्ट्रीय चळवळींत स्वार्थत्यागाची जेवढी भर टाकतां येईल तेवढी टाकण्यास सांगणें.

( ऋ ) असहकारितेच्या फैलावास जोर देण्याकरितां प्रत्येक खेडयांत अथवा खेडयांच्या प्रत्येक समूहांत कार्यकारी मडळें व प्रांताच्या मुख्य ठिकाणीं एकेक मध्यवर्ती मंडळ निर्माण करणें.

( ॠ ) इंडियन नॅशनल सर्व्हिस या नांवाचें राष्ट्रीय कार्य करण्याकरितां काम करणारांचे एक पथक तयार करणें.

( ऌ ) उपरिनिर्दिष्ट पथकाच्या व्यवस्थेकरितां व सर्वसाधारण असहकारितेच्या चळवळीस पैशाचा पाठिंबा देण्याकरितां ऑल-इंडिआ टिळक मेमोरिअल स्वराज्य फंड नामक एक फंड उभारण्याकरितां जारीनें खटपट करणें.

## कौंसिलर्सना राजीनामा देण्यास आव्हान.

मतदारांनीं कौन्सिलांवर बहिष्कार घालण्यांत, असहकारितेच्या तपशिलाची जी अंमलबजावणी आतांपर्यंत केली आहे त्याबद्दल ही राष्ट्रीय सभा राष्ट्राचें अभिनंदन करीत आहे; राष्ट्रीय सभा असें ठासून सांगते कीं, ज्या परिस्थितींत ही कौन्सिलें अस्तित्वांत आणली आहेत तिचा विचार करतां सदर कौन्सिलें देशाच्या प्रातिनिधिक स्वरूपाचीं नव्हत; आणि या राष्ट्रीय सभेची अशी खात्री आहे कीं, मतदार संघांतील बहुतेक सर्व लोकांनीं बुध्या मतें दिलीं नसूनहि जे लोक निवडून आले असतील ते कौन्सिलांतील आपल्या जागांचे राजीनामे देतील, आणि याउपर जर ते आपल्या मतदारसंघाच्या जाहीर इच्छेविरुद्ध व लोकशाहीच्या तत्त्वालाच हरताळ फांसून कौन्सिलांतील जागा सोडणार नाहींत

तर त्यांच्याकडून कोणत्याहि प्रकारची राजकीय कामगिरी करून न घेण्याची मतदार लोक काळजीपूर्वक खबरदारी घेतील.

## सरकारी नोकर.

या राष्ट्रीय सभेस पोलीस, सैनिक व इतर जनता यांमधील वाढत्या प्रेमभावाची जाणीव आहे; तिला अशी आशा आहे कीं, पोलीस व सैनिक हे स्वदेश व ध्येय ह्यांस उपरि अधिकाऱ्यांच्या हुकमाच्या अंमलबजावणीपेक्षां कमी लेखणार नाहींत आणि ते आपल्या लोकांशीं सभ्य व विचारशील वर्तन ठेवून स्वकीयांच्या विचारांची व भावनांची त्यांना कांहींच दिक्कत नाहीं असा त्यांच्यावर असलेला लोकापवाद नाहींसा करतील; या राष्ट्रीय सभेची त्यांस राष्ट्र हांक मारील तेव्हां आपल्या नोकऱ्यांवर पाणी सोडण्याबद्दल विनंति आहे; तोंपर्यंत त्यांनीं लोकांशीं वागण्यांत अधिक प्रामाणिकपणा व जास्त ममताळूपणा दाखवावा, आणि सार्वजनिक सभांत कोणत्याहि रीतीनें प्रत्यक्ष भाग न घेतां उघड व न डगमगतां त्यांनीं हजर राहावें व राष्ट्रीय चळवळीला उघड रीत्या सांपत्तिक मदत करून राष्ट्रकार्यास हातभार लावावा.

## अत्याचारविहीनतेवर जोर.

असहकारितेच्या ठरावाचा अत्याचारविहीनता हा अत्यंत महत्वाचा भाग आहे म्हणून त्यावर विशेष जोर देण्याची या राष्ट्रीय सभेची इच्छा आहे; आणि शाब्दिक आणि कृतिविषयक अत्याचाररहित्य सरकारशीं वागण्यांत जितकें जरूरीचें आहे तितकेंच लोकांच्याहि परस्पर वर्तनांत जरूर आहे या गोष्टीकडे ही सभा लोकांचें लक्ष वेधीत आहे. या सभेचें असें मत आहे कीं, लोकशाहीच्या खऱ्या तत्वाच्या वृद्धीस अत्याचार विघातक आहे इतकेंच नव्हे तर असहकारितेच्या या ठराव्या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीस ( जरूर पडल्यास ) अडथळा आणणारा आहे.

दोवटी पंजाब व खिलाफत यासंबधींचे अन्याय दूर केले जावे व एक वर्षांत स्वराज्यस्थापना व्हावी म्हणून राष्ट्रीय सभेशीं संलग्न असलेल्या अथवा इतर संस्थांना अत्याचाररहित्य व सरकारशीं असहकारिता या दोन गोष्टीकडे सर्व लक्ष पूर्णपणें देण्याची ही सभा अत्यंत आग्रहाची विनंति करीत आहे आणि ज्याअर्थी असहकारितेची चळवळ सर्व लोकांच्या संपूर्ण सहकार्यानेंच यशस्वी होणारी आहे त्याअर्थी ही राष्ट्रीय सभा सर्व सार्वजनिक संस्थांना हिंदु-मुसलमानांचे ऐक्य वाढविण्याविषयीं आग्रह करीत आहे. या सभेचें हिंदु प्रति-

निधि हिंदु पुढाऱ्यांना ब्राह्मण-ब्राह्मणेतर यांमधील तंटा मिटवून टाकण्याबद्दल व हिंदुधर्मावरील अस्पृश्यतेचा कलंक धुवून टाकण्याबद्दल कळकळीनें सांगत आहेत. या सभेची धार्मिक गुरूंना अशीहि आदरपूर्वक विनंति आहे की, त्यांनीं खालावलेल्या जातीच्या बाबतींत हिंदु धर्मात सुधारणा करण्याच्या लोकांच्या मनांतील वर्तमान इच्छेस दुजोरा द्यावा."

वरील ठराव बॅ. दास यांनीं पुढें आणला. त्यांनीं आपल्या भाषणांत हा ठराव अधिक संपूर्ण, अधिक निश्चित व अधिक व्यापक कसा झाला आहे हें दाखवून स्वराज्य हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे याची जाणीव प्रत्येक हिंदी मनुष्यास झाली तर नोकरशाहीच काय पण कोणतीहि 'शाही' आपल्या ध्येयसंपादनांत अडथळा आणूं शकणार नाहीं असें सांगितलें

महात्मा गांधींनीं अनुमोदन देतांना आपल्या लहानशा भाषणांत हा ठराव कलकत्त्याच्या ठरावाच्या एक पायरीच्या वर गेला आहे असें प्रतिपादन केलें.

नंतर पाल, लाला लजपतराय, श्यामसुंदर चक्रवर्ती, किचलू, श्रीशंकराचार्य, अजमलखान, कस्तुरीरंग आयंगार, जितेंद्रलाल बॅनर्जी, रामस्वामी वगैरेंनीं ठरावास दुजोरा दिला. महात्मा गांधींनीं अखेरचें भाषण केल्यावर ठराव सर्वानुमतें पसार झाला.

यानंतर कॉंग्रेस क्रीडसंबंधीहि ठरावावर मतें घेण्यांत आलीं. फक्त दोन मतें विरुद्ध पडून ठराव मंजूर झाला.

## (नागपूर) मुस्लीमलीगचे ठराव.

अध्यक्षांचें भाषण झाल्यानंतर दुसऱ्या दिवशीं मुस्लीमलीगच्या बैठकीस सुरुवात झाली. अध्यक्षांनीं खालील ठराव मांडले व ते सर्वानुमतें मंजूर झाले. (१) शेख—उल—महंमद यांच्या निधनाबद्दल खेदप्रदर्शन, (२) अलीगड येथील राष्ट्रीय मुस्लीम युनिव्हर्सिटीचें अभिनंदन व तीस सर्व तऱ्हेची मदत करण्यास लोकांस विनंति. (३) लखनौच्या मुमताझ हुसेन यांच्या मृत्यूबद्दल खेद, (४) अमृतसर येथील गाईसंबंधीच्या ठरावाचा पुनरुच्चार व त्यास अनुलक्षून अधिक झटून प्रयत्न करण्यास लोकांस सांगणें. (५) कादयानीं गोरक्षण न करण्याबद्दल हिंदू लोकांस आग्रह, (६) खिलाफत शिष्टमंडळाने, विशेषत: महंमद अलीनें केलेल्या कामगिरीस मान्यता, (७) सरकारशीं संबंध न तोडणाऱ्या शाळांच्या व्यवस्थापकांचा निषेध व नडायत-उल-उलेमा कॉलेज राष्ट्रीय झाल्याबद्दल अभिनंदन.

## नागपूर कांग्रेसला हजर असलेले ब्रिटिश मजूर पुढारी मि. वेजवूड ह्यांचें मत

हिंदी राष्ट्रीयत्वाच्या चळवळींतील ही मोठ्यांत मोठी सभा होय इतकेंच नव्हे, तर मी पाहिलेल्या सर्व जगांतील सभांमध्यें हिचाच पहिला नंबर लागेल. दररोज जवळ जवळ तीस तीस हजार लोक मंडपांत दिसत. पुरुष, स्त्रिया, सर्व विचारांच्या, सर्व जातींच्या तेथें एकवटत. उच्च दर्जाच्या ब्राह्मणांचे खांदे अस्पृश्य जातींतील लोकांच्या खांद्यांशीं भिडत व सुशिक्षित लोक अशिक्षितांच्या मांडीला मांडी लावून बसलले आढळून येत. ही राष्ट्रीय सभा प्रातिनिधिक नव्हे अशी कांहीं लोक शंका घेतात. दुर्दैवानें हें खरें आहे कीं, कांहीं सुप्रसिद्ध मवाळ गृहस्थ अलिप्त राहिले, परंतु तेवढ्यानें राष्ट्रीय सभा अप्रातिनिधिक ठरूं शकत नाहीं. मवाळ मतांचा तेथें पुरस्कार केला गेला, पण विरुद्ध मताचा लोंढा अवाढव्य असल्यामुळें मवाळ मतें त्या प्रवाहांत कोठें वाहून गेलीं त्याचा पत्ताहि नाहीं. प्रवाह राष्ट्रीयत्वाच्या दिशेनें वाहत आहे म्हणून कॉंग्रेस जहालपक्षाचीच आहे हें म्हणणें अनुचित व चुकीचें आहे असें म्हणणाऱ्या लोकांस सर्व लोक एकाच परिस्थितीच्या भयंकर दडपणाखालीं एकमताचे कसे होऊं लागले आहेत हें कळत नाहीं. आयर्लंडाप्रमाणें हिंदुस्थानांतहि पण सरकारचें धोरण, धोरणाचा अभाव म्हटल्यास बरें.—नेमस्त मताच्या स्त्रीपुरुषांस राजकीय सैन्याच्या आघाडीच्या रांगेंत लोटून देत आहे. नागपूरच्या सभेंत दृग्गोचर झालेल्या विलक्षण एकीकरणाचा सबंध जगावर परिणाम झालाच असला पाहिजे. जहालपणाचा गुण हल्लीं अगदीं सर्वसाधारण होऊं लागला आहे, आणि 'वंदेमातरम्' ची रणगर्जना परस्परविरुद्ध मताच्या सर्व लोकांस एका निशाणाखालीं खेंचीत आहे. देशाचा या दृष्टीनें नागपूरची राष्ट्रीय सभा निखालस अप्रतिम परिणाम करणारी अशीच झाली. सुदुर्दैव असा एकवटलेल्या भावी हिंदुस्थानचें हें शुभसूचक चिन्ह नव्हे काय?

### राष्ट्रीय सभेची पुनर्घटना.

ही म. गांधींच्या राजकारणांतील अत्यंत महत्त्वाची बाब आहे.

कॉंग्रेसच्या इतिहासांत एकमुखी कार्यचालकत्व आणि व्यक्तिमाहात्म्य या दृष्टीनें सर फेरोजशहा मेथा आणि म. गांधी हेच खरेखुरे राष्ट्रसूत्रधार व नवयुगप्रवर्तक होते. कॉंग्रेसच्या इतिहासांत फेरोजशहांचें नांव अजरामर राहील. त्यांनीच बनारस ( १९०५ ) कॉंग्रेसपर्यंतची कॉंग्रेसच्या घटनेची उत्पत्ति व

कर्तृत्वाची देशकालानुरूप दिसून आलेली वाढ केली. हें केवळ सर फेरोजशहा मेथा यांच्या विशुद्ध राजकीय, संघटनापटु, स्थिर आणि एकनिष्ठ कर्तृत्वाचें फळ आहे. त्यानंतरच्या वंगभंग युगांत आणि त्याच्यापुढील कॉंग्रेसमधल्या 'नेमस्त' युगांत कॉंग्रेसमध्यें व्यक्तिमाहात्म्यहि कोणाचें नव्हतें व संघटनाकार्यहि विशेष झालें नाहीं. कॉंग्रेसच्या इतिहासांत लोकमान्यांच्या कामगिरीला स्वतंत्र स्थळ नाहीं. त्या होमरूल युगांत धोरण, ध्येय व घटना ह्या दृष्टीनें कॉंग्रेसमध्यें विशेष फरक झालाच नाहीं.

सर फेरोजशहानंतर म. गांधी हेच कॉंग्रेसमधील खरेखुरे नवयुगप्रवर्तक झाले. त्यांनीं कॉंग्रेसला नवें ध्येय, नवें धोरण व नवी घटना दिली. महात्माजींनीं ह्या नव्या धोरणानें, संघटनेनें व विशेषत: कौन्सिलांवर यशस्वी बहिष्कार पुकारून हिंदी राजकारणाचें केंद्र कौन्सिलांतून कॉंग्रेसमध्यें आणलें. कॉंग्रेस हीच राष्ट्रांतील व राष्ट्राची मार्गदर्शक, चालक व नियामक संस्था बनविली.

## पुनर्घटनेचें स्वरूप.

ह्या घटनेच्या स्वरूपाचें थोडक्यांत दिग्दर्शन येथें करून देणें अवश्य आहे. हें दिग्दर्शन क्रमवार न करतां संकीर्ण स्वरूपानें खालीलप्रमाणें करतां येईल. "राष्ट्रीय सभेचें शिर म्हणजे उत्तमांग दरसाल भरणारें अधिवेशन हें होय. राष्ट्रीय सभेच्या नांवानें होणाऱ्या सर्व कारभाराचा मुख्याधिकार या अधिवेशनांत जमलेल्या प्रतिनिधींना हल्लींप्रमाणें राहील. कायमची घटना या अधिवेशनांतच मंजूर व्हावयाची. तिच्यांतील फेरफार अधिवेशनांत ठरावयाचे. इतर दिवसांत काम चालू ठेवण्याकरितां ऑल-इंडिया कॉंग्रेसकमिटी नांवाचा सर्वाधिकारी नेमावयाचा तो अधिवेशनांतच नेमावयाचा. या सर्वाधिकाऱ्यानें वाटेल तर पोटकारभारी म्हणून नऊ माणसांची कमिटी नेमावी व तिजकडून कच्चें काम करवावें हें झालें उत्तमांग. उलट राष्ट्रीय सभेचे पाय म्हटले म्हणजे सर्व देशभर पसरणाऱ्या कॉंग्रेसकमिट्या होत. या कमिट्या खेड्याकरितां, खेड्यांच्या संघांकरितां, तालुक्यांकरितां, तालुक्यांच्या संघांकरितां, जिल्ह्यांकरितां व जिल्ह्यांच्या संघांकरितां म्हणजे प्रांतांकरितां अशा राहतील. कॉंग्रेसच्या क्रीडवर सही करून अगदी थोडीशी फी दिल्यास खालच्या गांवकमिट्यांचा सभासद कोणासही होतां येईल, व गांव कमिटीपासून जिल्हाकमिटीपर्यंतचे लोक हेंच राष्ट्रीय सभेचे घटक मानले जाऊन त्यांना यथाधिकार प्रतिनिधि निवडून पाठवितां येतील. सर्व हिंदुस्थान भारतवर्षें काम जसें ऑल-इंडिया कॉंग्रेसकमिटी करील, तसेंच प्रांतांपुरतें काम

करण्याला प्रांत कमिटी मुखत्यार राहील. हे प्रांत मात्र यापुढें भाषेच्या अनुरोधानें ठरविले जातील. व अशा दरएक प्रांतास एक कमिटी या प्रमाणानें सुमारें एकवीस प्रांतकमिटया तूर्त होतील. नवीन मंजूर झालेल्या प्रांतिक कमिटया म्हटल्या म्हणजे मुंबई शहर, महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक, केरळ, उत्कल, आसाम वगैरे होत. ही वांटणी सर्वांना इष्ट अशी असून अत्यंत सोइस्करहि आहे. वार्षिक अधिवेशनाचे प्रतिनिधि, ऑल-इंडिया कॉंग्रेसकमिटीचे सभासद, वगैरेंची निवडणूक घडवून आणण्याचें काम प्रांतिक कमिटीस देण्यांत आलें आहे. ऑल-इंडिया कमिटीवर साडेतीनशें सभासद राहतील, व प्रत्येक प्रांताला किती सभासद मिळावे हें लवकरच ठरविण्यांत येईल. राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींच्या संख्येला यापुढें मर्यादा घालण्यांत आली असून, सुमारें पन्नास हजार लोकसंख्येला एक प्रतिनिधि या हिशेबानें सर्व प्रांतांतून मिळून जास्तींत जास्त सहा हजार प्रतिनिधि निवडतां येतील. पुढील वर्षाच्या खानसुमारीनें हा आंकडा थोडा बदलेल. गांवकमिटीपासून प्रांतिक कमिटीपर्यंत कोणत्या तरी एखाद्या कमिटीचा जो सभासद असेल तोच प्रतिनिधि होऊं शकेल.

## प्रतिनिधींची निवडणूक.

कोणत्या जिल्ह्यानें किती प्रतिनिधि निवडावे, किंवा मोठया शहरांनी किती निवडावे या बाबद नियम करण्याचा अधिकार प्रांतिक कमिटीस दिला आहे. या संबंधांत विशेष महत्वाची गोष्ट ही की, प्रांतिक कमिटयांचे क्षेत्रांत आजवर फक्त खालसा मुलुखाच्या प्रजेची गणना होत असे. ती यापुढें देशी संस्थानांतील प्रजेचीहि होण्यास राष्ट्रीय सभेची मंजुरी मिळाली आहे. म्हणजे संस्थानी प्रजेला आपल्या इच्छेप्रमाणें किंवा सोईप्रमाणें लगतच्या कनिष्ठ अगर वरिष्ठ कॉंग्रेसकमिटीचे सभासद होतां येईल, व प्रतिनिधि म्हणून निवडून राष्ट्रीय सभेस जातां येईल. सर्वसाधारण प्रतिनिधि निवडतांना अल्पसंख्याक पक्ष, स्त्रिया व मागासलेले लोक यांचे प्रतिनिधि योग्य प्रमाणांत टाकून निवडतां येतील अशीच निवडणुकीची रीति ठरवावी, अशी प्रांतिक कमिटयांना शिफारस करण्यांत आली आहे. यामुळें प्रतिनिधींची वरसंख्या नियमित झाली तरी तींत सर्वांचा यथोचित समावेश होण्यास हरकत पडणार नाही. प्रतिनिधींची निवडणूक होऊन त्यांच्या यादीं यावा १५ डिसेंबरपर्यंत राष्ट्रीय सभा जेथें भरणार तेथल्या स्वागतमंडळाकडे रवाना व्हाव्या. या यादींत ज्यांचीं नांवें असतील त्यांनाच प्रतिनिधींची तिकिटें मिळतील. अर्थात् राष्ट्रीय सभेचा प्रतिनिधि होणें

ही गोष्ट यापुढें अधिक मानाची व अधिक जबाबदारीची होईल. आज वाटेल त्यानें वाटेल तेव्हां प्रतिनिधि म्हणून जावें व वाटेल त्यानें वाटेल त्या गांवचा प्रतिनिधि व्हावें या अव्यवस्थेला आळा पडून प्रतिनिधींच्या निवडणुकीच्या कामीं आज जो सैलपणा आला आहे तो जाऊन चढाओढ लागेल व ती फायदेशीर होईल. प्रांतिक काँग्रेसकमिटीचे सभासद इतर कमिटया कांहीं ठराविक प्रमाणांत निवडून देतील, तींत स्वतंत्र असे सभासद रहाणार नाहींत. यामुळें या कमिटयांनाहि खरें प्रातिनिधिक स्वरूप येईल. ऑल इंडिया काँग्रेसकमिटीची निवडणूक दरसाल नव्हेंबरअखेर व्हावी असें ठरविण्यांत आलें आहे. या कमिटीच्या सभासदांची संख्या साडेतीनशें असून सर्व प्रांतांतून त्यांची निवडणूक मोठया कसोटीनें व चुरशीनें होणार हें उघड आहे; म्हणून या कमिटीनेंच यापुढें काँग्रेसच्या अधिवेशनाच्या विषयनियामक कमिटीचेंही काम करावें; शिवाय या कमिटीनें अधिवेशनाच्या आधीं दोन दिवस जमून ठरावांचे मसुदे बनवावे असें मंजूर झालें आहे. आमच्या दृष्टीनें ही सुधारणा घटनेतील इतर सर्व सुधारणांपेक्षां अधिक उपयुक्त अशी आहे. कारण हल्लीं काय प्रकार होतो तो सर्व जाणतातच. राष्ट्रीय सभा भरेल त्या ठिकाणीं सर्व प्रतिनिधि एकत्र जमल्यावर मग त्यांनीं फिरून प्रांतवार विभागून विषयनियामक कमिटीचे सभासद निवडणें ही गोष्ट फार मुष्किलीची झाली असून, तिचा निकाल समाधानकारक होत नाहींच पण अतिशय वेळ जाऊन भांडणें व मारामाऱ्याहि होतात. यामुळें जेथल्या तेथें प्रांतवार एक महिनाभर आधीं निवडणुकी झाल्या तर त्याच फार यत्या. दुसरी गोष्ट, हल्लीं विषयनियामक कमिटी अधिवेशनाच्या दुसरे दिवसापासून आपलें काम सुरू करते व हें काम इतकें लांबतें कीं, अधिवेशनाच्या तासांपेक्षां विषयनियामक सभेचे तासच कितीतरी अधिक भरतात! हजारों प्रतिनिधींना या कमिटींत काय चाललें आहे हें कानावरहि येत नाहीं, निरुद्योगीपणानें खर्च खात, गैरसोयी सोसून परगांवीं आठवडाभर कुचंबत पडावें लागतें. हा सर्व त्रास नवीन व्यवस्थेनें चुकणार आहे. कारण, यापुढें अधिवेशनाच्या पहिल्या दिवसांपूर्वींच ठरावांचे मसुदे तयार होतील, अधिवेशनास एकदां सुरवात झाली म्हणजे सर्व काम तीन दिवसांचे आंत संपून जाईल, व प्रतिनिधींची संख्या मर्यादित झाली असल्यानें सर्वांना भाषणें वगैरे ऐकूं येतील. वरील सर्व सुधारणा केवळ प्रतिनिधींची हल्लींची गैरसोय लक्षांत घेऊन मंजूर झाल्या आहेत व त्या सर्व अमलांत आल्यास राष्ट्रीय सभेला खालपासून वरपर्यंत नीटस स्वरूप व व्यवस्थितपणा येऊन अधिवेशनाचें कामहि अत्यंत नीट रीतीनें पार पडेल. (केसरी.)

---

## प्रकरण २१ वें.

# प्रचण्ड कार्यक्रम व प्रचण्ड कार्य.

नागपूर कॉंग्रेसनंतर.



गांधींच्या प्रयत्नांना व असहकारितेच्या कार्यक्रमाला दुप्पट बळ चढलें.

जनतेंतील उत्साह, अपेक्षा व आकांक्षा हीं विलक्षण रीतीनें स्फुरूं लागलीं. हिंदी राजकारण हें युरोपियन महायुद्धांतील ऐन आणीबाणीच्या काळाइतकेंच विलक्षण खळबळीचें, अपेक्षापूर्ण, क्षणोक्षणीं खळबळीचे प्रसंग उत्पन्न होणारें व लोकपक्षाचें पाऊल धडाडीनें पुढें पुढेंच पडत असलेलें असें त्यावेळचें राजकीय वातावरण होतें.

" कॉंग्रेसच्या ठरावास अनुसरून शेंकडो वकीलांनीं वकीलया सोडल्या आणि ते राष्ट्रसेवेला लागले. पंचायतींची स्थापना होऊं लागली व कज्जे सांगणारे लोक कोर्टांपासून दूर राहूं लागले. न्यायमंदिरांत फिर्यादीच कमी दाखल झाल्यामुळें स्टँपांचें उत्पन्न सर्व देशभर कमी झालें. "

" शिक्षण संस्थासंबधानें सांगावयाचें म्हणजे हजारों विद्यार्थ्यांनीं सरकारी शिक्षणसंस्था सोडल्या किंवा पालकांनीं त्यांना शिक्षणसंस्थांतून बाहेर काढलें. कित्येक शाळा अगदींच ओस पडल्या. हें कार्य केवळ बहिष्कारापुरतेंच यशस्वी झालें असें नाहीं; राष्ट्रीय विश्वविद्यालयें, राष्ट्रीय विद्यापीठें व राष्ट्रीय शाळा देशभर स्थापन होऊं लागल्या. पंजाब, संयुक्त प्रांत व मुंबई यांतील चळवळींचा उल्लेख मागें आलाच आहे. जानेवारीच्या मध्यकाळांत दे. बंधु दास यांनीं बंगाल्यांत या बहिष्काराचा पुरस्कार घेतला आणि हजारों विद्यार्थी शाळा व कालेजें व परीक्षा सोडून बाहेर पडले. म. गांधीनीं बलकत्याकडे दौरा काढला आणि ४ फेब्रुवारी रोजीं तेथील राष्ट्रीय कॉलेजचा उद्घाटन समारंभ त्यांच्या हस्तें करण्यांत आला; म. गांधीनीं त्यांच्या बिहारमध्यें

दुसरा दौरा काढला. आणि पाटणा येथें बिहार विद्यापीठाची स्थापना केली. ह्याप्रमाणें चार महिन्यांच्या आंतच अलीगड, गुजराथ, बिहार, बनारस, बंगाल व ( टिळक ) महाराष्ट्र अशा विद्यापीठांची व किती तरी राष्ट्रीय शाळांची स्थापना झाली. ''

अहमदाबाद, सूरत व नडियाद येथील म्युनसिपालट्यादि असहकारितावादी लोकांच्या ताब्यांत येऊन पुढें त्यांनीं आपापल्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळांवरील सरकारी ताबा उठवून त्यांस राष्ट्रीय स्वरूप दिलें.

कॉंग्रेसनें कौन्सिलें, शाळा व कोर्टें ह्यांजवर बहिष्कार पुकारला होता; परंतु स्थानिक स्वराज्य संस्थांवर मात्र बहिष्कार पुकारला नव्हता. नडियाद वगैरे म्युनसिपालट्यांनीं आपल्या शिक्षण संस्था राष्ट्रीय बनविल्या, ठाणें जिल्हाबोर्डानें मद्यपाननिषेधासाठीं पिकेटिंगला मदत करण्याचा ठराव केला, रायपूर व लाहोर म्युनसिपालट्यांनीं खादीचा पोषाक नोकरांस देण्याचें ठरविलें आणि ह्या व अशासारख्या इतर सर्व प्रयत्नांचें गांधींनीं अभिनंदनच केलें. परंतु कौन्सिलांवर बहिष्कार घालून स्थानिक स्वराज्य संस्थांवर मात्र बहिष्कार घालावयाचा नाहीं ह्यांतील सूक्ष्म व तात्विक भेद लोकांच्या लक्षांत कांहीं फारसा आला नाहीं आणि सामान्यत: स्थानिक स्वराज्यसंस्थांची असहकारी पक्षानें उपेक्षाच केली. गांधींनींहि त्यांना ह्या बाबतींत उत्तेजन दिलें नाहीं.

## दडपशाही.

'' कमालीच्या मूर्खपणाची योजना '' असें नांव देऊन लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं ऑगस्ट १९२० मधील आपल्या एका भाषणांत असहकारितेची थट्टा उडविली होती. गांधींच्या अप्रतिकार तत्वाचा अप्रत्यक्ष संसर्ग बाधल्यामुळेच कीं काय, हिंदुस्थान सरकारनें ही चळवळ उपेक्षेनेंच मारावयाची असें धोरण प्रथम स्वीकारलें. परंतु पुढें हळुहळू सरकारचा धीर सुटत चालला.

असहकारितेचें वाढतें बळ व विरोधकांचा वाढता विरोध ह्यांमुळें सरकारची ही उपेक्षाबुद्धि मावळत चालली आणि ६ नोव्हेंबर रोजीं एक खास प्रसिद्धीपत्रक काढून सरकारतर्फे असें जाहीर करण्यांत आलें कीं, असहकारितेच्या प्रवर्तकांनीं असहकारितेबरोबरच अनत्याचाराचाहि पुरस्कार चालविला असल्यामुळें त्यांच्यावर खटले भरण्याचा सरकारचा विचार नाहीं. परंतु '' स्थानिक सरकारांस अशा सूचना देण्यांत आल्या आहेत कीं, ह्या चळवळीच्या प्रसारासाठीं, मूळ प्रवर्तकांनीं प्रथमच घालून दिलेल्या मर्यादांचें जे उल्लंघन करतील; आणि आपल्या

लेखांनीं किंवा भाषणांनीं अत्याचारास उत्तेजन देण्याचा अथवा लष्कर व पोलीस ह्यांच्या राजनिष्ठेंत ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न करतील त्यांजवर योग्य इलाज करण्यांत यावेत. ”

.. ह्या धोरणाची अंमलबजावणी मात्र प्रत्यक्ष व्यवहारांत नीट झालीच नाहीं असें म्हणतां येईल. दडपशाहीला प्रथमच व फार जोराची सुरवात बिहारमध्यें झाली.

“ जालियनवाला बागेची पुनरावृत्ति बिहारमध्यें न निघेल तर त्याचें कारण मात्र सरकारी चिथावणी हें न ठरतां बिहारी लोकांचें अनुपम आत्मसंयमन हेंच ठरेल.” ( यं. इं. २–३–२१ ) असें गांधींनीं ह्या दडपशाहीचें वर्णन केलें आहे. क्रि. प्रो. को. च्या १४४ व १०७ कलमांखालीं जामीन मागण्याचा व जामीन न दिल्यामुळें राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांना तुरुंगांत पाठविण्याचा अधिकाऱ्यांनीं सपाटाच सुरू केला. ही क्रान्तिकारक चळवळ दडपून टाकण्यासाठीं अधिकाऱ्यांनीं शक्य त्या मार्गाचा उपयोग करावा असा त्यांना बिहारसरकारनें कुलमुखत्यारनामाच लिहून दिला होता.

संयुक्तप्रांत, पंजाब व मद्रास इकडेहि दडपशाहीला सुरवात झाली होती किंवा दडपशाही बरीच रंगांत येत होती. मलबारमध्यें भाषणें करण्याची मनाई करून तो हुकूम तोडल्यामुळें मद्रासचे प्रमुख मुसलमान पुढारी जनाब याकुब हसन ह्यांस कालिकतच्या मॅजिस्ट्रेटनीं तुरुंग दाखविला होता.

ह्या दडपशाहीबरोबरच असहकारितेच्या वाढत्या जोरामुळें ठिकठिकाणीं गुलामसभा ऊर्फ अमन ( अथवा लायल्टी लीग ) सभा स्थापन करण्याचे प्रयत्न सर्वत्र व मुख्यतः संयुक्त प्रांतांत करण्यांत आले. ऑगस्ट १९२१ मध्यें विजापूरच्या कलेक्टरनीं गुलाम सभा स्थापन करण्याचा केलेला प्रयत्न श्री. वालचंद कोठारी ह्यांच्या स्पष्टोक्तीमुळें हास्यास्पद ठरला. आणि ह्या सभा कधींच व कोठेंच जीव धरूं शकल्या नाहींत.

## बेझवाडा कार्यक्रम.

“ बेझवाडा कार्यक्रम हा स्वयंसिद्ध स्वराज्य प्रस्थापनेला पुरेसा नाहीं हें मला कबूल आहे. परंतु त्या दिशेनें तो बरीच प्रगति करणारा आहे अशी माझी ठाम समजूत आहे. हा कार्यक्रम पुरा केल्यानें देशाचा स्वाभिमान स्फुरण पावेल आणि त्याला जरूर तर पुढच्या पायरीवर पाऊल टेवण्याचें सामर्थ्य देईल. ”
( यं. इं. ८–६–२१ )

असहकारितेच्या इतिहासांत यरीच मोठी क्रांति घडवून आणणारा व अमरकीर्ति झालेला बेझवाडा कार्यक्रम ऑल इंडिया कॉंग्रेस कमीटीच्या ज्या बैठकींत मंजूर झाला ती बैठक असहकारितेचा कार्यक्रम असा जोरांत असून नुकाच दडपशाहीला तोंड देऊं लागला आहे अशावेळीं ३१ मार्चला बेझवाडा येथें भरली होती.

आतांपर्यंतच्या प्रयत्नांनीं झालेली विलक्षण लोकमतजागृति पाहून आणि सरकारनें सुरू केलेल्या दडपशाहीला तोंड देण्याच्या उत्कट इच्छेमुळें कमीटीच्या बऱ्याच सभासदांना असें वाटत होतें कीं, सविनय कायदेभंगाला तावडतोब सुरुवात करण्यांत यावी.

" नागपूर कॉंग्रेसच्या ठरावांत सविनय कायदेभंगाला परवानगी दिलेली नाहीं आणि असहकारितेच्या ठरावांतहि कायदेभंग कोठेंच आढळत नाहीं " असें म्हणून गांधींनीं ह्या उत्सुकतेला उतास येऊं दिलें नाहीं. देशहि कायदेभंगाला तयार नव्हता असें गांधींचें मत होतें आणि नुकाच अधिकारारूढ झालेले व्हाइसरॉय कोणतें धोरण स्वीकारतात तेंहि अजमावण्याचा गांधींचा विचार होता. ज्यांच्यावर जमानतीच्या नोटीसा बजावण्यांत येतील त्यांनीं आपखुषीनें त्या मानाव्यात. त्यांचें काम करण्यास इतर कार्यकर्ते पुढें येतीलच असाहि कमीटीनें वर दोरा दिला.

कायदेभंगा ऐवजीं कायदेभंगाची पूर्वतयारी म्हणून गांधींनीं सूचविलेला विधायक कार्यक्रमच कमीटीनें मंजूर केला.

तीस जून १९२१ पूर्वी कॉंग्रेसनें ( १ ) १ कोटि टिळक स्वराज्यफंड जमवावा. ( २ ) कॉंग्रेसला १ कोटि सभासद मिळावेत आणि २० लाख चरखे देशांत सुरू करावेत असा हा विधायक कार्यक्रम होता.

हा कार्यक्रम ठरावाच्या रूपानें पुढें मांडतांना गांधी म्हणाले, " आतांपर्यंत आपल्या कार्यक्रमांतील ज्या मुद्यांवर जोर देऊन आपण चळवळ केली त्या मुद्यांवर आतां जोर देण्याचें कारण उरलेलें नाहीं. शिक्षणसंस्था सोडलेल्या विद्यार्थ्यांची आणि वकीली सोडलेल्या वकीलांची संख्या थिोडी असो; परंतु देशांतील जुलमी राजसत्तेच्या ह्या संस्थांची इभ्रत कॉंग्रेसनें साफ नाहींशी करून टाकली आहे. पुढील कार्यभाग उरकण्याचे कामीं कॉंग्रेसनें आतां कालगतीवरच भरंवसा टेंवण्यास हरकत नाहीं. आतां स्वराज्याचा कार्यक्रम पुरा कर-

त्याकरितां ज्या मुद्यांनीं जनता प्रत्यक्ष स्वराज्य उपभोगूं शकेल अशा मुद्यांवर आपली शक्ति एकवटली पाहिजे.

म. गांधी लगेच ह्या ठरावाची अंमलबजावणी करण्याच्या कामाला लागले व बंगाल, बिहार व ओरीसा वगैरे निरनिराळ्या भागांतून दौऱ्यांस सुरुवात झाली. ह्या दौऱ्यांतील कार्यक्रम फारच गर्दीचे असत. आणि प्रवासांत लहान मोठ्या प्रत्येक स्टेशनवर व ठिकाणीं गांधींच्या दर्शनासाठीं अलोट गर्दी जमत असे.

## गांधी-रेडिंग मुलाखत.

" असहकारितेच्या जनकानेंच व्हाइसरॉयांची मुलाखत कां घ्यावी असें कांहीं विचारतात. सर्वांनाच मुलाखतींतून काय निष्पन्न झालें तें जाणून घेण्याची इच्छा आहे. मला असहकाऱ्यांतील ही सूक्ष्म नजर आवडते; सीतेपेक्षांहि त्यांचें चारित्र्य अधिक निर्मळ असलें पाहिजे. "

सामान्य जनतेला मनुष्याच्या सूक्ष्म, अंतर्गत मनोभावना नीट समजत नाहींत. त्यांना फक्त ढोबळ कृत्य व त्या संबंधाचीं ढोबळ अनुमानेंच दिसतात व सुचतात. गांधी-रेडिंग मुलाखतीसबंधानेंहि असाच प्रकार झाला.

पं. मालवीय व रे. अँड्रयूज ह्यांच्याशीं झालेल्या मुलाखतींत पंडितजी व रे. अँड्रयूज ह्यांनीं सुचविल्यावरून लॉर्ड रेडिंग ह्यांनींहि कबूल केलें कीं, गांधींची प्रत्यक्ष मुलाखत घेऊन त्यांच्या तोंडून त्यांचीं मतें ऐकणें फायदेशीर होईल. ह्यामुळेंच गांधी आपल्या मुलाखतीस येतील तर आपण ह्यांची भेट घेऊं असें त्यांनीं पंडितजींस कळविलें. ह्या पूर्वप्रसंगाची गांधींना कल्पना न देतांच पंडितजींनीं गांधींना सिमल्यास बोलाविलें आणि पंडितजींविषयीं अत्यंत आदर बाळगणारे गांधी सिमल्यास गेले. तेथें त्यांना व्हाइसरॉयांची इच्छा समजून आल्यावरून ते व्हाइसरॉयांच्या मुलाखतीस गेले. लाला लजपतराय ह्यांचीहि ह्याच वेळीं व्हाइसरॉयांनीं मुलाखत घेतली.

सर्व हिंदुस्थानचें लक्ष १३ ते १८ मे ( १९२१ ) ह्या दिवसांत सिमल्यावर एकाग्र झालेलें होतें. लोकांत नाना प्रकारचे तर्क सुरू होते व निरनिराळ्या अपेक्षा त्यांच्या मनांत उद्भवत होत्या. गांधींसारख्या भोळ्याभोळ्या व मोहिनी पाडणाऱ्या गृहस्थाच्या प्रत्यक्ष सहवासांत व्हाइसरॉय आलेले पाहून अँग्लो इंडियन चिंताग्रस्त झाले होते. जनतेंतहि गांधी हे साधेभोळे आहेत; व्हाइसरॉयांच्या गोड बोलण्यास बळी पडून माघार घेतील कीं, काय, अशी भीति

उत्पन्न झालेली होती. गांधींची व व्हाइसरॉयांची एकंदर ६ वेळ मुलाखत झाली परंतु त्या मुलाखतींतून कांहीं एक निष्पन्न झालें नाहीं व त्यासंबंधाची साधारण च खुलासेवार माहितीहि कधीं प्रसिद्ध झाली नाहीं.

## ' अल्लीबंधूंची माफी '

हें प्रकरण मात्र त्या मुलाखतींतून उपस्थित होऊन तेवढयापुरता मुलाखतीच्या अत्यल्प भागावर प्रकाश पडला.

त्या मुलाखतीनंतर लगेच अल्लीबंधूंच्या सहीनें एक खुलासा प्रसिद्ध झाला. हा खुलासा त्यांनीं आपल्या जनतेस उद्देशून केला होता. आणि त्यांत असें स्पष्ट म्हटलें होतें कीं, आमची तशी कल्पना नव्हती आणि इच्छाहि नव्हती परंतु असें असूनहि आमच्या भाषणांतील कांहीं वाक्यांचा अत्याचारास उत्तेजन देण्याचा भास होईल असा अर्थ करतां येतो असें आमच्या कांहीं सहकाऱ्यांचें मत आहे आणि म्हणूनच असा विपर्यास होऊं शकेल अशीं संदिग्ध वाक्यें उच्चारल्याबद्दल आम्हीं दिलगिरी प्रदर्शित करतों व पुन्हां आमच्याकडून असा प्रकार होणार नाहीं असें जाहीर करतों.

त्या खुलाशानें अल्लीबंधूंनी सरकारची माफी मागितली; आपल्यावर होणारे खटले टाळण्याकरितां माफी मागितली आणि त्यांची खटल्यांतून सुटका व्हावी म्हणून गांधींनी व्हाइसरॉयांशीं रदबदली करून त्यांना ही माफी मागण्यास लाविलें असें त्यासंबंधानें चोहोंकडून आक्षेप घेण्यांत येऊं लागले.

चोहोंकडून माझ्यावर दोषारोपांचा वर्षाव होत आहे. परंतु लवकरच हें वादळ शांत होईल अशी माझी खात्री आहे असें म्हणून म. गांधींनीं १५ जूनच्या यंग इंडियामध्यें आपल्या व अल्लीबंधूंच्या बाजूनें सुंदर व अशंकनीय समर्थन केलें. आणि पुढें ४ ऑगष्टच्या अंकांत म. गांधी व व्हाइसरॉय त्या दोघांसहि समत असलेले असें खुलासापत्रक प्रसिद्ध करण्यांत आलें.

ज्यावेळीं व्हाइसरॉयांनीं अल्लीबंधूंच्या अत्याचारप्रवर्तक भाषणांचा उल्लेख केला त्यावेळीं त्यांजवर खटला करण्याचे हुकूम सुटले आहेत ही गोष्ट व्हाइसरॉयांनी गांधींना कळविली नव्हती. त्यांचा तसा अर्थ होऊ शकतो असें गांधींनीं *म्हटल्यावर मग व्हाइसरॉयांनीं त्यांना ही गोष्ट कळविली.* " खटले होवोत किंवा न होवोत, उतारे पाहिल्यावर, त्यांच्या स्वतःच्या व कार्याच्या इभ्रतीसाठीं त्यांनीं जाहीर रीतीनें दिलगिरी प्रदर्शित करणेंच जरूर आहे असें गांधी त्याचवेळीं म्हणाले " त्या सर्व गोष्टी त्या खुलाशांत स्पष्ट झालेल्या आहेत.

गांधींची उलट सत्यनिष्ठा व तत्वनिष्ठा ह्यांचा फाजील फायदा घेण्यांत सरकार व गांधींचे व अलीबंधूंचे प्रतिपक्षीय ह्यांनीं चांगलीच धूर्तता व तत्परता दाखविली ह्यांत शंकाच नाहीं. परंतु गांधींची अति विशुद्ध सत्यनिष्ठा व अलीबंधूंची संशयातीत निर्भय वृत्ति ह्यांची पूर्ण ओळख पटलेल्या जनतेचें ह्या खुलाशानें पूर्ण समाधान झालें ह्यांत शका नाहीं.

## अफगाणिस्थानची हिंदुस्थानावर स्वारी.

झाली तर हिंदीमुसलमान त्यांचा प्रतिकार करणार नाहींत अशा प्रकारचा एक आक्षेप महंमदअली ह्यांच्या भाषणावर घेण्यांत येऊन अलीबंधूंची बदनामी करण्याचे प्रयत्न ह्याच सुमारास झाले. कॉंग्रेस व अलीबंधु आणि हिंदुमुसलमान ह्यांच्यांत बेबनाव घडवून आणण्यासाठीं व असहकारितावाद्यांना ब्रिटिश अंमलाच्या आभावीं होणारी असहाय्य स्थिती पटवून देण्यासाठींच हे आक्षेप घेण्यांत येत होते असें म्हणावयास हरकत नाहीं. महंमद अलीनीं ह्या आक्षेपाचा तात्काळ व स्पष्ट शब्दांत इनकार केला.

ह्या अफगाण स्वारीच्या कल्पनेनें गोंधळून गेलेल्या बाबू बिपिनचंद्र पॉल ह्यांच्या लेखास उत्तर देतांना गांधींनीं पॉल ह्यांस असें बजावून ठेविलें कीं, " घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. जर अफगाणिस्थान खरोखरच स्वारी करील आणि असहकारी हिंदुस्थान सरकारला सहाय्य करण्याचें नाकारील तर सरकारला हिंदी लोकांशीं सलोखा करणेंच भाग पडेल. "

## आणखी एक प्रयत्न.

*" अफगाणिस्थानच्या अमीराकडून महात्मा गांधी, अलीबंधु, पंडित मालवीयप्रभृति पुढाऱ्यांकडे एक गुप्त हेर आला होता व अमीरसाहेबांनी हिंदुस्थानावर स्वारी केल्यास या पुढाऱ्यांकडून कोणत्या प्रकारची मदत मिळेल. याविषयीं त्या हेरानें विचारपूस केली, अशी बातमी प्रसिद्ध करून ॲंग्लो-इंडियन पत्रांनीं हिंदी पुढाऱ्यांवर बंडाच्या कटाचा आरोप लादण्याचा अश्लाघ्य प्रयत्न केला. या टीकेस पंडित मदन मोहन यांनीं सणसणीत उत्तर दिलें असून त्यांत त्यांनीं तो हेर अमीराकडून येण्याऐवजीं त्याचा उगम हिंदुस्थानांतूनच कोठून तरी झाला असावा असें ध्वनित केलें होतें. पंडितजींचा हाच तर्क खरा ठरतो. कारण अफगाणिस्थानांत काबूल येथें 'अफगाण' नांवाचें जें पत्र निघतें त्या पत्राच्या संपादकानें ही हकीकत कळून त्यानें चौकशी करून असें जाहीर केलें आहे कीं, अफगाणिस्थानांतून असा कोणी हेर किंवा वकील हिंदुस्थानांत*

गेलाच नव्हता. अर्थातच या खुलाशानें अलीबंधूंच्या टीकाकारांचे दांत त्यांच्याच घशांत उतरतात. अमीराशीं आपला कांहीं पत्रव्यवहार झालेला सांपडला असल्यास तो जाहीर करा असें अलीबंधु उघड आव्हान करीत असतां सरकारनें मूग गिळून स्वस्थ बसावें आणि कोणातरी उपद्व्यापी व्यक्तीनें हेराची बतावणी करून सन्मान्य पुढाऱ्यांवर नसतें बालंट घेत सुटावें हा प्रकार खरोखरच शोचनीय व अक्षम्य होय." (केसरी ता. २४ मे १९२१)

लॉर्ड रेडिंग ह्यांना आपल्या शाब्दिक विजयाच्या अर्धवट व लवकरच विरघळून गेलेल्या आनंदांत मोकळे सोडून गांधी बेझवाडा कार्यक्रम यशस्वी करण्याच्या खटपटीस लागले.

स्वराज्यफंड, कॉंग्रेसचे सभासद व चरखे ह्यांची जुळवाजुळव आणि प्रसार करण्याचें कार्य निकरानें सुरू होतें. परंतु गांधींनीं आतां आपली कार्यपद्धति बदलली. सर्वच कामें एकाचवेळीं करूं लागल्यानें कोणतेंच कार्य धड होत नाहीं असा अनुभव असल्यामुळें बेझवाड्यापासून त्यांनीं पदव्या, शाळा व कोर्टें ह्यांजवरील बहिष्काराचें पुढील कार्य कालगतीवर सपवून टाकलें व नवा कार्यक्रम हातीं घेतला. ह्यावेळींहि त्यांनीं तोच नियम अमलांत आणला.

## अशक्य कोटींतील कार्य

सबंध जून महिना हा एक कोटि रुपये जमविण्यांत खर्च करावयाचा व ३० जून पूर्वी एक कोटीचा आंकडा पुरा करावयाचा असा संकल्प सोडून म. गांधी त्या कामाला लागले. सबंध हिंदुस्थान त्यांनीं पालथें घातलें आणि अखेरचा आठवडा खुद्द मुंबई शहरांत त्यांनीं खर्च केला. दे. बं. दास ह्यांची तार उशीरा हातीं आल्यामुळें ३० तारखेच्या मध्यरात्रीला एक कोटि रुपयांत थोडी रक्कम कमी भरली. आणि राष्ट्राच्या हितशत्रूंना अत्यल्प समाधानहि झालें. परंतु हा केवळ सत्यनिष्ठेचा परिणाम होता. अद्याप कांहीं रकमा यावयाच्या आहेत, तोटा भरून निघणें अगदीं शक्य आहे असें पक्कें माहीत असूनहि प्रत्यक्ष अभिवचनें हातीं नसल्यामुळें ठराविक वेळीं त्यांनीं अपुरी रक्कमच जाहीर करून दुसऱ्या दिवशीं एक कोटींरक्षांहि जास्त रक्कम जमल्याचें जाहीर केलें. शेवटच्या १४ दिवसांतच ६५ लाखांहून जास्त देणग्या मिळाल्या; देणग्यांची अंदाजी प्रांतवारी अशी होती:—मुंबई शहर २७॥, बंगाल २५ गुजराथ व काठेवाड १५, पंजाब ५ मद्रास व आंध्र ४, महाराष्ट्र (मुंबई सबर्बन भागासह) २॥, वऱ्हाड व मध्यप्रांत ३, बिहार ३, सिंध २, ब्रह्मदेश १॥,

संयुक्तप्रांत २॥, कर्नाटक १, दिल्ली २, अजमीर-मेवाड १॥, ओरिसा, आसाम वगैरे १। एकूण १०७॥ लक्ष.

" एक कोटी रुपये आपणास स्वराज्य देऊं शकणार नाहींत; जगांतील एकंदर संपत्ति देऊं शकणार नाहीं. आपण सर्वस्वी स्वतंत्र होण्यापूर्वी सांपत्तिक स्वतंत्रता मिळविली पाहिजे. म्हणून जर आपणास एक वर्षाच्या आंत स्वराज्य मिळवावयाचें असेल तर आपण आत्मत्यागाच्या बळावर परदेशी कापडावर पुरा बहिष्कार घातलाच पाहिजे." असे म्हणून गांधींनीं ह्या विलक्षण यशामुळें आलेल्या त्याहूनहि विलक्षण उत्साहाला नवें काम लावून दिलें.

## पुढील कार्यक्रम.

बेझवाडा कार्यक्रमाच्या व मुदतीच्या पुढें राष्ट्रीय कार्याला नवी दिशा लावण्याचें काम करणारी ऑ. इं. कॉंग्रेस कमीटीची नवी बैठक २८ जुलैला मुंबई येथें श्री. विजयराघवाचार्य यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. सर्व प्रांतांतील मिळून सुमारें २५० सभासद हजर होते. सभेंत खालीलप्रमाणें ठराव पास झाले:—

१ युवराजांच्या स्वागतसमारंभावर बहिष्कार.

२ बेझवाड्याचा कार्यक्रम पुरा झाल्याबद्दल सर्व प्रांतांचें व मुख्यतः मुंबईकरांचें अभिनंदन, सप्टेंबर १० पर्यंत परदेशी कापडावर बहिष्कार पुरा करण्याची शिकस्तीची खटपट करणें, राष्ट्रीय शिक्षणसंस्थांतून शक्य तितका सूत काढणें व विणणें या कामाकडे वेळ देणें, देशांतील कोष्टी, चरखे, हातमागावरील कापड यांची खानेसुमारी करणें, परदेशी कापड मालकांच्या खुषीप्रमाणें जाळणें अगर स्मर्नास पाठविणें, कापडाचे दर न वाढविण्याबद्दल कारखानदारांस विनंति.

३ मद्यपानाविरुद्ध किंवा मद आणणारे पदार्थ यांच्या उपयोगाविरुद्ध सध्या चाललेल्या चळवळीबद्दल कमिटीला संतोष वाटत असून पिकेटिंगला गैरवाजवी रीतीनें प्रतिबंध करण्याचें धोरण सरकारनें असेंच चालविल्यास या प्रतिबंधाला न जुमानतां पिकेटिंगचें काम तसेंच चालविण्याचा सल्ला देण्याला कमिटी तयार होईल.

४ दारूच्या व ताडीच्या दुकानदारांना कमिटीची विनंति आहे की, देशांतील सध्याचें लोकमत लक्षांत घेऊन त्यांनी आपला धंदा तावडतोब बंद करून लोकमताला मान द्यावा.

५ मालेगांवच्या व अलिगड शहराच्या कांहीं भागांतील लोकांकडून विरुद्ध पक्षाचें चीड आणणारें वर्तन सहन न होऊन जे अत्याचार झाले त्याबद्दल कमिटीला दुःख वाटत असून असहकारितेचें सर्व बळ ती चळवळ शांततेनें चालविण्यामध्येंच आहे ही गोष्ट लोकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न कॉंग्रेसकमिट्यांनीं करावा, अशी या कमिटीची शिफारस आहे. किरकोळ झालेले अत्याचार सोडून दिले तर एकंदरीत धारवाड, मातिआरी, गंतूर, कालिकत, चिराला पिराला वगैरे ठिकाणीं लोकांनीं जें आत्मसंयमन प्रकट केलें त्याबद्दल त्या त्या ठिकाणच्या लोकांचें ही कमिटी अभिनंदन करिते.

६ ठिकठिकाणीं निष्कारण करण्यांत आलेल्या गोळीबारामध्यें मरण पावलेल्या लोकांच्या कुटुंबाविषयीं सहानुभूति प्रकट करून ही कमिटी त्यांचें अभिनंदन करिते. त्याचप्रमाणें वरील गोळीबारांत जखमी झालेल्यांचें किंवा निरनिराळ्या खटल्यांमध्यें निरपराधी असून तुरुंगांत पडलेल्या शूर लोकांचेंहि ही कमिटी अभिनंदन करिते. तुरुंगांत गेलेल्या बहुतेक स्वदेशभक्तांनीं जामीन न देतां किंवा कोर्टांत आपला बचाव न करतां तुरुंगांत जाण्याचें पत्करलें, याबद्दल ही कमिटी समाधान व्यक्त करीत आहे.

७ ऑल इं. कॉ. क. चें असें मत आहे कीं, आपखुषीनें कष्ट भोगण्याच्या मार्गानेंच हिंदुस्थानाला स्वराज्य मिळवितां येईल; म्हणूनच निरपराधी स्त्रीपुरुषांनीं बचाव न करतां तुरुंगांत जाणें जरूर आहे.

८ सर्व प्रांतांतून व विशेषतः संयुक्तप्रांतांत जी दडपशाही चालू आहे हीच स्वराज्य जवळ येत चालल्याची खूण आहे असें या कमिटीचें मत असून या दडपशाहीनें लोक डरून जाणार नाहींत व मेलेल्या किंवा तुरुंगांत गेलेल्या निरपराधी देशभक्तांची जागा भरून काढण्याकरितां पुष्कळ देशभक्त पुढें येतील अशी या कमिटीस आशा आहे.

९ संयुक्तप्रांत वगैरे ठिकाणच्या कार्यकारी मंडळींची इच्छा सरकारच्या दडपशाहीला उत्तर म्हणून तावडतोब कायदेभंगाच्या चळवळीस सुरवात करावी अशी आहे, ती रास्त आहे असें कमिटीला वाटत आहे; तथापि सर्व हिंदुस्थानभर शांततेचें वातावरण टिकण्याची अधिक खात्री करून घेण्याकरितां, कायदेभंगाच्या चळवळीस स्वदेशीच्या ठरावांतील कार्यक्रम अंमलांत येईपावेतों सुरुवात करूं नये असें या कमिटीचें मत आहे. सदर कार्यक्रम बरोबर अमलांत आल्याबद्दल खात्री होतांच कमिटी जरूर पडल्यास राष्ट्रीय सभेचें खास अधि-

बेशल भरवूनहि, ' सिव्हिल डिसओबीडियन्स'चा कांही तरी कार्यक्रम सुरू करण्याची शिफारस करण्याला मागेंपुढें पाहणार नाहीं. तथापि एखाद्या ठिकाणीं अगर प्रांतांत ' सिव्हिल डिसओबीडीयन्स ' करण्याची आवश्यकता उत्पन्न झाल्यास त्या प्रांताच्या प्रांतिक कॉंग्रेसकमिटीच्या मार्फत वर्किंग कमिटीची मंजुरी मिळवून तें सुरू करण्यास हरकत नाहीं. वर्किंग कमिटीनें ही मंजूरी द्यावयाची ती मात्र राष्ट्रीय सभेच्या घटनेस अनुसरूनच दिली पाहिजे.

## बहिष्कार.

" *मुंबा सुंदरीनें हा अग्नि पेटविला आहे. तो पारशांच्या अग्न्यागारांतल्या विस्तवाप्रमाणें चिरकाल प्रज्वलितच राहिला पाहिजे आणि त्यांत आमचीं एकंदर पापें जळून गेलीं पाहिजेत* " असें म्हणून १ ऑगष्ट ह्या पुण्यश्लोक लोकमान्यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं गांधींनीं मुंबई येथें परदेशी मालाची पहिली होळी पेटविली.

लोकमान्यांच्या पुण्यस्मरणार्थ १ ऑगष्ट पूर्वी प्रत्येक राष्ट्रभक्तानें खादीमय झालेंच पाहिजे असा उपदेश चोहोंकडे चालविलाच होता. ऑल इंडिया कॉंग्रेस कमीटीच्या मुंबई येथील २८ जुलैच्या बैठकींत परदेशी मालावरील बहिष्काराचा ठराव करण्यांत आला व त्याला अनुसरून १ ऑगष्टला परदेशी मालाची होळी पेटवून गांधींनीं बहिष्काराचा पुकारा केला.

*सबंध जुलै, ऑगष्ट व सप्टेंबर हे महिने गांधींनी स्वदेशी व बहिष्कार यांच्या प्रसारासाठीं खर्च केले. हुंडणावळीच्या व्यापारी लढ्यामुळें* विलायती कापड मागविणें मुंबईच्या व्यापाऱ्यांनीं बंद केलेंच होतें. गांधींनीं प्रत्येक मोठमोठ्या शहरीं व्यापाऱ्यांकडून परदेशी मालच एक वर्षभर तरी मागवूं नये असा प्रतिज्ञा व्यक्तिशः व सघशः करून घेण्याचे पुष्कळच अंशीं यशस्वी प्रयत्न केले कित्येक ठिकाणीं परदेशी कापडाच्या दुकानांवर पिकेटिंग सुद्धा करण्यांत येऊं लागलें व त्यामुळें स्वयंसेवकांवरील खटल्यांसहि ऊत आला.

ता० ३० सप्टेंबरला बहिष्काराची मोहीम संपवून *सविनय कायदेभंगाचा उपक्रम करावयाचा असा गांधींचा बेत होता. परंतु मध्येंच एक निराळें प्रकरण उपस्थित झालें.*

## प्रकरण २३ वें.

# अलीबंधूंवरील खटले.



"मी सरकारला असें बजावण्याचें धाडस करतों कीं, देशाला चरखा व स्वराज्य ह्यांचें शुभवर्तमान पटलें आणि सैनिक व इतर लोक चरखा व हातमाग ह्यांचा उपयोग करण्यास तयार झाले. म्हणजे, मीं असें वचन देऊन ठेवितों कीं, मीं प्रत्येक सैनिकाकडे आणि प्रत्येक मुलकी नोकराकडे जाईन आणि सरकारी नोकरी सोडून द्या आणि चरखा हातीं धरा म्हणून उपदेश करीन."

### खटल्याचें निमित्तकारण.

सिंध प्रांतिक खिलाफत परिषद मौ. महंमद अली ह्यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ८ जुलै १९२१ रोजीं भरली होती.

"आजपासून ब्रिटिश लष्करांत नोकरी करणें, अथवा सैन्यभरतीच्या कामीं मदत करणें अथवा सहमत होणें हें प्रत्येक धर्मनिष्ठ मुसलमानास हराम आहे" असा ठराव ह्या परिषदेंत करण्यांत आला.

ब्रिटिश सरकार अंगोरा सरकारशीं युद्ध पुकारील तर हिंदी मुसलमान सविनय कायदेभंगाला सुरवात करतील, आपलें पूर्ण स्वातंत्र्य प्रस्थापित करतील आणि राष्ट्रीय सभेच्या अहमदाबाद येथील बैठकींत हिंदी प्रजासत्ताक राज्याचें निशाण उभारतील असेंहि ह्या परिषदेंत जाहीर करण्यांत आलें होतें.

नेमस्त व अँग्लोइंडियन पत्रांतून ह्या ठरावासंबंधानें आधींच ओरड होऊं लागली होती व कांहीं झालें तरी कॉंग्रेसनें पूर्व विचारांतीं मान्य केलेलें अनत्याचाराचें मत सुटूं नये म्हणून आपण शिकस्तीचे प्रयत्न करूं असें गांधींनी ह्या हल्ल्या मनाच्या आर्दाकांस आश्वासनहि दिलें.

ह्या लष्करासंबंधाच्या ठरावानें मुंबई सरकार विशेष घाबरून गेलें. असहकारितेचा विलक्षण वाढता जोम आणि परदेशी मालावरील परिणामकारक बहिष्कार ह्यांमुळें विचारांत पडलेल्या मुंबई सरकारनें हिंदुस्थानसरकारची संमति मिळवून अलीबंधु प्रभृति परिषदेच्या चालकांवर खटला करण्याचा निश्चय केला.

म. गांधीबरोबर कलकत्त्याहून मद्रासकडे जात असलेले मौ. महंमदअली ह्यांस व्हालटेअर येथें आणि मौ. शौकतअली ह्यांस मुंबई येथें १४ सप्टेंबरला पकडण्यांत आलें. अलीबंधूंशिवाय शारदा पीठाचे श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य डॉ. किचलू, मौ. निसार अहंमद, पिर गुलाम मुजाद्दिद आणि मौ. हुसेन अहंमद ह्यांसहि ह्या बाबतींत पकडण्यांत आलें.

कराची येथें मॅजिस्ट्रेटपुढें खटला चालून पुढें सेशन्स कोर्टानें श्रीमत् शंकराचार्यांस दोषमुक्त करून १ नोव्हेंबर १९२१ रोजीं इतर सहा आरोपींस प्रत्येकीं २ वर्षे सक्त मजूरीची शिक्षा दिली.

## चोहोंकडे कायदेभंग.

खटल्याचा निकाल होण्यापूर्वीच, पुढाऱ्यांची धरपकड होतांच, सबंध हिंदुस्थानभर शेंकडों सभा भरविण्यांत आल्या आणि प्रत्येक सभेंत कराचीचे आक्षेपित ठराव जाहीर रीतीनें मंजूर करण्यांत आले.

"सरकारच्या मुलकी खात्यांत किंवा लष्करी खात्यांत नागरिकांनीं नोकरी करावी अथवा धरावी किंवा नाहीं ह्यासंबंधानें आपलें मत व्यक्त करण्याचा अधिकार प्रत्येक व्यक्तीला जन्मसिद्धच आहे" हें सिद्ध करण्यासाठीं निरनिराळ्या प्रांतांतील सुमारें ५० प्रमुख पुढाऱ्यांच्या सह्यांनीं एक जाहीरनामा काढण्यांत येऊन त्यांत ह्या ठरावांचा पुनरुच्चार करण्यांत आला. सरकारनें ह्या पुढाऱ्यांकडे दुर्लक्ष करून फक्त कराची परिषदेतील सहा पुढाऱ्यांचीच तुरुंगांत रवानगी केली.

## कायदेभंगाची पूर्वतयारी.

"आपणापुढें असा कार्यक्रम पाहिजे कीं, जर आपण तो मंजूर केला तर तो आपल्या प्राणांची आहुति देऊनहि पुरा केला पाहिजे. प्रत्येकजण निदान स्वतः तरी कार्यक्रमानुसार इतिकर्तव्य बजावलें आहे अशा शुद्ध कल्पनेनें प्रेरित होऊन हजर राहूं शकेल अशी मला आशा आहे." (यं. इं. २०-१०-२१)

अशा रीतीनें निर्वाणीच्या लढ्याची तयारी करून बैठकीला हजर राहण्याविषयीं गांधींनीं आगाऊच सूचवून दिलेली ऑलइंडिया कॉंग्रेस कमीटीची बैठक

कराचीच्या खटल्यांचा निकालानंतर लगेच ४ नोव्हेंबर रोजीं दिल्ली येथें भरली. हकीम अजमलखान हे अध्यक्षस्थानीं होते.

" ऑल इंडिया काँग्रेस कमीटी हें दरवर्षी निवडण्यांत येणारें हिंदुस्थानचें पार्लमेंट आहे." ह्या पार्लमेंटनें " १२ तासांच्या आंत राष्ट्रापुढील अत्यंत महत्वाचें कार्य अत्यंत कार्यक्षम पद्धतीनें निकालांत काढलें. "

ह्या वर्षाच्या आंत स्वराज्य प्रस्थापित करावयाचें असा राष्ट्राचा निर्धार असल्यामुळें आणि अलीबंधु व इतर पुढारी ह्यांच्या अटकेच्यावेळीं लोकांनीं प्रशंसनीय आत्मसंयमन दाखविलें असल्यामुळें ही कमीटी कर न देण्याच्या चळवळीसुद्धां सविनय कायदेभंगाचा आपापल्या जबाबदारीवर उपक्रम करण्याचा अधिकार प्रांतिक काँग्रेस कमीटयांस देत आहे. अशा अर्थाचा कमीटीनें ठराव केला. परंतु त्याला सर्व सामान्य अशा कांहीं अटी घातल्या:—

( १ ) वैय्यक्तिक कायदेभंग करणारा परदेशी कापडावर पूर्ण बहिष्कार घातलेला, शुद्ध खादी वापरणारा, हिंदुमुसलमानांच्या व एकंदर जातींतील सलोख्यावर श्रद्धा असणारा, शुद्ध अहिंसावादी व हिंदू असल्यास अस्पृश्यता हें पाप मानणारा असावा. ( २ ) सामुदायिक कायदेभंग एकाच जिल्ह्यापुरता किंवा तहशीलपुरताच असावा; तो भाग पूर्ण खादीमय व स्वदेशी असावा आणि असहकारितेचे इतर मुद्दे पुष्कळच अंशीं अमलांत आणलेला असावा. " अशा ह्या अटी होत्या.

सत्याग्रहाला विशेष उत्सुक असलेल्या सभासदांना ह्या अटी फारच बिकट व अंशतः अनवश्यक वाटत होत्या आणि म्हणूनच त्यांना सवलत म्हणून ठरावाला अशी पुस्ती जोडण्यांत आली कीं, एखाद्या प्रां. कॉ. कमीटीनें खास विनंति केल्यास ह्या अटी सौम्य करण्याचा अधिकार कार्यकारी कमीटीला असावा.

" पुढील कांहीं आठवड्यांत हिंदुस्थानांतील एखाद्या भागांत पुरापुरा कायदेभंग सुरू झालेला आपणास दिसेल. अर्धवट किंवा वैय्यक्तिक कायदेभंगाचीं उदाहरणें राष्ट्राला आतां परिचित झालीं आहेतच. पूर्ण कायदेभंग म्हणजे अत्याचारहीन बंड होय. "

" हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही एखाद्या भागांत अत्याचार झाल्यास ह्या ( बंडाच्या ) प्रयोगाला हानि पोहोंचेल, किंबहुना तो प्रयोग बंद ठेवावा लागेल हें सांगण्याची जरूरी नाहीच. " ( यं. इं. १०—११—२१ )

प्रकरण २४ वें.

# गांधींचीं विविध कार्यें.

## संपादक गांधी



ह्या पुढील निर्वाणीच्या आणि अखेरच्या मुद्यावर जाण्यापूर्वी गांधींच्या काहीं पुढें मागें उल्लेख न आलेल्या कार्यांचा ह्या प्रकरणात सकलित विचार करण्यात येत आहे.

आधुनिक समाजघटनत ' राजसत्तेच्या ' खालोखाल किंवा राजसत्तेच्या तोडीचें महत्व वर्तमानपत्राच्या संस्थेला प्राप्त झालेलें आहे. आणि " आधुनिक संस्कृतीच्या मुळावर उठलेले ' गांधी ह्या संस्थेचा आपल्या जीवन कार्यात व जीवन कार्यासाठीं यथोचित उपयोग करून घेण्यास चुकलेले नाहींत.

द. आफ्रिकेंतील आपल्या कार्यासाठीं त्यांनीं ' इंडियन ओपीनियन ' हें पत्र काढून त्यातून पुष्कळ लेखन कार्य व भरपूर सार्वजनिक कार्य केलें.

हिंदी राजकारणात पदार्पणावर त्या कार्यासाठींहि त्यांना वर्तमानपत्राची आवश्यकता भासलीच. अहमदाबाद येथें श्री. इंदुलाल याज्ञिक हे नवजीवन आणि सत्य हें मासिक काढीत. महात्माजींनीं त्याचें साप्ताहिकांत रुपांतर करून संपादकत्व आपणाकडे घेतलें.

गांधींचें कार्य हे प्रांतिक नसून राष्ट्रीय, सर्वराष्ट्रीय आणि सर्वव्यापक होतें. अर्थात् त्यांना इंग्रजी वर्तमानपत्र चालविणें अपरिहार्य होतें आणि म्हणूनच श्री. जम्नादास द्वारकादास ह्यांनीं काढलेल्या यंग इंडियाचें संपादकत्व आपणाकडे घेऊन त्यांनीं तें ८ आक्टोबरपासून अहमदाबाद येथें सुरू केलें. गांधींना पकडलें त्यावेळीं यंग इंडियाचा खप ४० हजार होता.

हिंदी नवजीवन आगष्ट १९२० मध्यें सुरू करण्यात आलें.

वर्तमानपत्र ह्या संस्थेंत म. गांधींनीं आपल्या देहस्वभावानुसार चांगलीच क्रांति घडवून आणली. म. गांधींचें गुजराथी इतकेंच इंग्रजी भाषेवरील इंग्रजांसहि लाजविणारें किंवा हर्षविणारें प्रभुत्व होतें. थाल-बोध भाषासरणी व विषयविवेचन आणि साधें भोळें धाटणीग त्यांत कांहीं ही क्रांति दिसून आली असे नाहीं.

नितांत निर्विकार विचारसरणीनेंच म. गांधीनीं वर्तमानपत्र ह्या संस्थेंत क्रांति घडवून आणली आहे. प्रतिपक्षाविषयींची प्रेमळ व आदरबुद्धि, तीव्र सत्यनिष्ठा, केवळ तत्त्वाशीं गांठ ठेवण्याची व निरुपयोगी भागास छाट देण्याची पद्धत, जबाबदारीची पूर्ण जाणीव वगैरे गुणांमुळें जगांतील वर्तमानपत्रांच्या सस्थेंत यंग इंडिया पत्राला गांधी इतकेंच उच्च, स्वतंत्र व अमर स्थान मिळणार आहे.

आफ्रिकेंत असतांनाच इंडियन ओपीनियनमध्यें जाहिराती घेणें त्यांनीं बंद केलें होतें व हेंच धोरण त्यांनी पुढें कायम केलें. जाहिराती हा वर्तमानपत्रांचा कलंक ( कर्स ) आहे असेंच त्यांना वाटतें. " प्रत्येक प्रांतांत जनतेला उपयुक्त अशा वस्तूंची निरुपद्रवी आणि अगदीं खरीखुरी माहिती सरळ रीतीनें देण्याचें एकेक साधन-वर्तमानपत्र नव्हे-प्रत्येक प्रांतांत असेल तर देशाला कवढा तरी आर्थिक फायदा होईल ! " असें यंग इंडियाच्या पहिल्याच अंकांत त्यांनीं लिहिलें आहे.

## ऐक्यप्रवर्तक गांधी.

" आमच्या मातृभूमीसाठीं हिंदू व मुसलमान ह्या दोन प्रचण्ड पंथांचें समीकरण होईल, वेदांत हा मेंदू व इस्लाम हा देह-होईल तरच आमचा तरणोपाय आहे."- स्वामी विवेकानंद.

" स्वराज्य म्हणजे हिंदुमुसलमानांचें ऐक्य " अशी एकदां स्वराज्याची व्याख्या करून गांधीनीं हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचें महत्त्व जनतेस पटविण्याचा प्रयत्न केला होता.

" आम्हांला जें ऐक्य पाहिजे तें कसें तरी घडवून आणलेलें नको आहे. हिंदुस्थानांतील हिंदु व मुसलमान ह्यांच्यांत अभेद्य ऐक्य झाल्यावाचून स्वराज्य अशक्य आहे ह्या तत्वाचा पूर्ण उमज पडून त्यावरच हा ' हृदयांचा मेळ ' जमून आला पाहिजे. तें केवळ तात्पुरत्या युद्धतहकूबीच्या स्वरूपाचें असतां कामा नये. परस्पराविषयींच्या भीतीच्या कल्पनेवर तें उभारलेलें असतां कामा नये. समबल आणि परस्परांच्या धर्माविषयीं आदरभाव बाळगणाऱ्या दोन भागीदारांमधील ती एकी पाहिजे. " ( यं. इं. ६-१०-२० )

या उताऱ्यांत म. गांधींच्या हिंदुमुसलमानांच्या ऐक्यविषयक कल्पनेचें सार-सर्वस्व आहे. असहकारितेच्या कल्पनेचा उगमच मुळीं या कल्पनेंत होता.

" गोरक्षण ही हिंदुधर्माची मध्यवर्ती कल्पना आहे " (यं. इं. ६-१०-२०) असें गांधींचें स्पष्ट मत आहे. सार्वत्रिक भावनाहि अशीच आहे. आणि म्हणूनच हिंदुमुसलमानांचें ऐक्य ही कल्पना मनांत येतांच—

## गोरक्षणाचा प्रश्न

उपस्थित झाल्यावांचून राहत नाहीं.

" खिलाफत कार्य हें माझेंच कार्य आहे असें मी समजतों. कारण खिलाफतीच्या संरक्षणांतच मला पूर्ण गोरक्षणाचा संभव दिसतो. " परंतु " माझ्या सहाय्याचा मोबदला म्हणून गोरक्षण करा असें मात्र मी मुसलमानांस सांगत नाहीं. " म्हणूनच अगदीं पहिल्या खिलाफत व हिंदुमुसलमान परिषदेच्यावेळीं गोरक्षणाचा प्रश्न उपस्थित झाला तेव्हां गांधींनीं गोरक्षणाचा आग्रह धरला नाहीं. मागाहून खास मुसलमानांच्या निराळ्या परिषदेंत गोवधाच्या बाबतींत हिंदू लोकांच्या धर्मभावनांस मान देण्याविषयींचा ठराव करण्यांत आला.

या गोरक्षणाच्या बाबतींत आत्मनिरीक्षणाच्या दृष्टीनें गांधींच म्हणणें असें आहे कीं, खुद्द हिंदू लोकच गाईचे इतके हाल करतात कीं, " जर त्यांना वाचा असती व त्यांनीं आपल्या हालांचा पाढा अग्रापुढें वाचला असता तर सर्व जग दिङ्मूढ होऊन गेलें असतें. " त्यासाठीं मुसलमानांशीं गोरक्षणासाठीं तंटे करणें हें आमचें पहिलें कर्तव्य नसून गाईची जोपासना उत्तम रीतीनें करणें हेंच आमचें आद्यकर्तव्य आहे.

आतां मुसलमानांच्या गोहत्त्येसंबंधानें बोलावयाचें तर " एका मुसलमान मित्रानें लिहिल्याप्रमाणें गोमांस भक्षण हें मुसलमानी धर्मानें केवळ क्षम्य ठरविलें आहे. परंतु हिंदु त्या बाबतींत जबरदस्ती करतील तर गोरक्षण हें मुसलमानांचें धर्मकर्तव्य ठरेल. "

अहिंसेच्या दृष्टीनें बोलावयाचें तर " ज्याप्रमाणें कितीहि मौल्यवान् असले तरी एखाद्या मनुष्याच्या प्राणांसाठीं मी गोहत्त्या करणार नाहीं त्याप्रमाणेंच गाईच्या रक्षणासाठीं मी मनुष्यहत्त्याहि करणार नाहीं. "

मग गोरक्षण व्हावें कसें ?

हिंदु " गाईसाठीं स्वतः मरावयाला व कष्ट सहन करावयाला सिद्ध झाल्यानेंच " गोरक्षण करूं शकतील. कायद्यानें गोवध बंद करण्याच्या लाहोर येथील प्रयत्नांस ह्यामुळेंच गांधींनीं हरकत घेतली होती.

"माझा हिंदु बांधवांस असा उपदेश आहे कीं, दिलदार व स्वार्थत्याग वृत्तीनें मुसलमानांस त्यांच्या दुःखाच्या वेळीं मदत करा म्हणजे आपोआपच गोरक्षण होईल. इस्लाम धर्म हा दिलदार धर्म आहे. त्याच्यावर आणि त्याच्या अनुयायांवर विश्वास ठेवा." (यं. इं. ४-७-२१)

## परिणाम.

"खिलाफत संस्थांनीं मुसलमानांस गोहत्त्येपासून परावृत्त होण्याविषयीं केलेला उपदेश पालथ्या घड्यावर पाणी ओतण्यासारखाच झाला असें म्हणणें बरोबर नाहीं. स्वतः मुसलमान असलेल्या खिलाफत कार्यकर्त्यांनींच हें काम हातीं घ्यावें हाच प्रकार मुळीं हर्षप्रद नाहीं काय ? मीं अशी खात्री देतों कीं, ह्या उपदेशाचा सर्व देशांत विलक्षण परिणाम झालेला आहे. गोरक्षणाचा भार बहुतांशीं केवळ मुसलमान कार्यकर्त्यांनीच उचलावा ही गोष्ट अगदींच लहान सहान आहे काय ?"

कुरबानीला गोहत्त्या केलीच पाहिजे अशी कुराणाची आज्ञा नसून कुरबानीला गोहत्त्या फक्त क्षम्य आहे आणि स्वस्ताईच्या दृष्टीनेंहि ह्या प्रश्नाचा विचार करावयाचा असतो असें कुराणावरून स्पष्ट होतें. ही गोष्ट तरी ह्या चळवळींत मुसलमानांनीं तत्त्वतः सर्वस्वी मान्य केली आहे व व्यवहारांत मध्यंतरीं अंशतः मान्य केली होती.

## मग नडतें कोठें ?

हिंदुमुसलमानांच्या ऐक्यांत आणखी नडतें कोठें ह्या संबंधानें गांधींचे विचार मुख्यतः हिंदूंनीं मनन करण्यासारखे आहेतः— हिंदू किंवा मुसलमान ह्यांपैकीं एखादा समाज मायेकिंहु बनतो तेव्हां त्याला दोन मार्ग मोकळे असतात. एकतर प्रतीकार न करतां धीरोदात्त वृत्तीनें मरण पत्करावें म्हणजे अत्याचाराची प्रगतीच खुंटेल. किंवा प्रतीकार करून मारावें किंवा मरावें. हे दोन्ही मार्ग जगाच्या अंतापर्यंत अस्तित्वांत राहणारच. आम्ही असहाय्य झालों आहोंत म्हणूनच सर्व भानगडी उद्भवतात. प्रतीकार न करतांच स्वधर्मासाठीं मरण्याची दैवीकला आम्ही विसरून गेलों आहोंत आणि त्याचप्रमाणें प्रसंगीं जीव धोक्यांत घालूनहि स्वसंरक्षणासाठीं मनगटाचें बळ उपयोगांत आणण्याची कला विसरून गेलों आहोंत. दोन शूर स्त्रीपुरुष समाजांतील ऐक्य नसेल तर हें हिंदुमुसलमानांचें ऐक्य काय कामाचें ? आपण परस्परांवर विश्वास टाकलाच पाहिजे. परंतु अखेरच्या प्रसंगीं आपण स्वतःवर व परमेश्वरावरच विश्वसून असलें पाहिजे.

## हिंदु-मुसलमान व पारशी.

मुंबईच्या दंग्यांत पारशी समाजाला हिंदुमुसलमानांकडून विशेष त्रास पोंचलेला दिसल्यापासून पुढें गांधी-हे हिंदुमुसलमानांचें ऐक्य ह्या शब्दांऐवजी "हिंदु-मुसलमान-पारशी-जैन शीख," असा लांबलचक परंतु सर्वसंग्राहक शब्दप्रयोग ( व अर्थातच त्यांतील कल्पना ) प्रत्येकवेळीं उपयोगांत आणीत आणि हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचें पर्यवसान अल्पसंख्याकांना चिरडण्यांत होतां कामा नये असे वारंवार टांसून सांगत असत.

" दारू दुकानांवरील पिकेटिंगचा पारशी समाजाशीं जिव्हाळ्याचा संबंध येतो. आपल्या पारशी देशबांधवांशीं आम्ही फार क्षमाशीलतेनें वागलें पाहिजे असें गांधींनी पिकेटिंगच्या मुंबई येथील चळवळीच्यावेळीं जाहीर केलें होतें.

पारशी समाजासारखा अत्यंत सुशिक्षित, सुघटित, उदार, धार्मिक व व्यापारी पेशाचा समाज राष्ट्रीय चळवळीपासून अलिप्त असणें इष्ट नाहीं ह्याची पूर्ण जाणीव असल्यामुळें महात्माजींनी त्यांस आत्मसात् करण्यासाठीं आपला कांहीं काळ व उत्साह मुद्दाम खर्च केला होता.

" महात्मा गांधी व पार्शी सेंट्रल असोसिएशनचे कौन्सिल यांची मुंबई येथें शनिवार ता. १८ जून १९२१ रोजी मुलाखत झाली. मुलाखतीचे प्रसंगीं महात्माजींनी असहकारितेच्या चळवळीची पूर्ण छाननी केली, व वरील असोसिएशनच्या कित्येक सभासदांनी घेतलेल्या आक्षेपांचें निरसन केलें. हिंदुस्थानांत पार्शी लोक मूठभर असले तरी ते बुद्धिमान् आहेत, सधन आहेत, उदार अंतःकरणाचे आहेत, व्यापारांत पुढारी आहेत, धार्मिक आहेत, अशी महात्मा गांधींनीं त्यांची स्तुति केली, आणि असें ही तुमची सदसद्विवेकबुद्धि सांगत असेल तरच या चळवळींत सामील व्हा, असें त्यांस गांधींनीं पटवून सांगितलें. तथापि खेदाची गोष्ट ही कीं, महात्माजींनी आपल्या परी असहकारितेची चळवळ साफ पिंजून अगदीं उघड करून दाखविली तरी पर्दाशी सभासदांची अवास्तव संशयग्रस्तता सभेच्यावेळीं दृष्टिगोचर होत होती. महात्माजींचें स्वराज्य म्हणजे कोणच्या स्वरूपाचें असणार त्यांत ब्रिटिशांना वाव मिळणार कीं नाहीं, त्यांस वाव न मिळाल्यास आपलें कसें होणार, हिंदुमुसलमानांच्या एकींत आपल्या जातीला कोण पुसतो, अशा अर्थाचे भयाकुल उद्गार काढण्यांत आले! पार्शी गृहस्थांनीं काढलेल्या शंकाकुशंकांवरून चिरकाल परावलंबीपणापासून उत्पन्न होणारें त्यांचें मनोदौर्बल्य व ब्रिटिशांचा पगडा त्या जातीवर किती पक्का बसला

आहे हें व्यक्त होतें. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट ही कीं, कांहीं थोडे पार्शी लोक राष्ट्रकार्य करण्यास तयार आहेत व त्यांनीं ही मुलाखत होऊन गेल्यावर थोड्याच दिवसांनीं आपली एक सभा भरविली आणि महात्मा गांधींविषयीं आपला आदर व्यक्त केला व त्यांस मानपत्र देण्याचें ठरविलें. सभेचे अध्यक्ष यांनीं स्वच्छ सांगितलें कीं, आज जर दादाभाई जिवंत असते तर ते असहकारितेपासून कधींहि पराङ्मुख झाले नसते. असो; शेवटीं सर्व पार्शी जातीस एवढीच एक आग्रहाची विनंति करावयाची आहे कीं, हल्लीं आपलें राष्ट्रकार्य अशा थराला येऊन पोंचलें आहे कीं, यावेळीं राष्ट्रांतील कोणत्याहि जातीनें राष्ट्रकार्यांत कसलेंहि फांटें न फोडतां, मोकळ्या मनानें व सढळ हातानें, जितकी शक्य असेल तितकी, त्यांत भर टाकावी व कोणच्याहि प्रकारच्या संशयपिशाच्चास आपल्या अंतकरणांत थिन्हाड करण्यास जागा देऊं नये. प्रयत्न जितके अधिक संघटित व एकमुखी तितकी यशःप्राप्तीची खात्री अधिक असणार हें सांगणें नकोच."

## अस्पृश्यतानिवारक गांधी.

"अस्पृश्यतेला धर्माचा आधार नाहीं. ती सैतानाची कृति आहे. आणि सैतानसुद्धां नेहमीं धर्मग्रंथाचा आधार घेत असतो. (यं. इं. १९-१-२१)

"अस्पृश्यता हें हिंदुधर्मावरील लांछन आहे" असें गांधींचें मत आहे आणि म्हणूनच "डीसेंबर १९२० च्या नागपूर काँग्रेसच्या विषयनियामक मंडळानें अस्पृश्यतेच्या पापासंबंधाचा ठराव विरोध न करतांच मान्य केला हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे."

गांधींची अस्पृश्यांविषयींची कळकळ व अस्पृश्यतेचा तिटकारा हीं फार जुनीं आहेत. द. आफ्रिकेंतील आपल्या चळवळींत व जीवनक्रमांतच अस्पृश्यतेची हकालपट्टी त्यांनीं केली होती. अस्पृश्यताप्रथेची गांधींचीं मतें फार कडक आहेत अस्पृश्य हे 'दलित'–डिप्रेस्ड नसून सप्रेस्ड–आहेत आणि साम्राज्यशाही, द. आफ्रिकेंतील वसाहतशाही, आणि आमची सध्यांची गुलामगिरी हीं सर्व हीं आमच्या पापाचीं प्रायश्चित्तेंच होत असें त्यांना वाटतें. (यं. इं.१९-१-२१)

"त्यांच्यासाठीं केवळ चार शाळा उघडून भागणार नाहीं. त्यांच्याकडे आम्हीं थेट्याच्या भावनेनें पाहतां कामा नये. ते आपले एकाच रक्तामांसाचे बंधु आहेत आणि त्याप्रमाणें आपण त्यांस वागविलें पाहिजे."

" या सुधारणेला विरोध करणारांची मी समजूत तरी कशी घालूं ? " असेच म. गांधी कळवळयानें व हताश झाल्यासारखे उद्गार काढीत.

**अस्पृश्यता निवारक परिषद्.**—या परिषदेची दुसरी बैठक ता. २९ डिसेंबर रोजीं नागपूर येथें काँग्रेसच्या वेळींच महात्मा गांधींचे अध्यक्षतेखालीं भरली होती. सभेस लजपतराय, हरकिसनलाल, रामभुज दत्त, नेहरू, मालवीय, वेजवुड, जिना, पटेल, केळकर, गोखले, विजयराघवाचारियर वगैरे मंडळी हजर होती. सभेस सर्व जातींचे लोक व स्त्रिया वगैरे मिळून दहा हजारांवर समुदाय होता. गांधी आपल्या भाषणांत म्हणाले कीं, अस्पृश्यता मानणें हें पाप आहे व तें धुऊन टाकीपर्यंत हिंदुस्थान स्वराज्यास अपात्रच होय. मी स्वतः सनातन हिंदुधर्माचा व वर्णाश्रमधर्माचा कट्टा पुरस्कर्ता आहे परंतु अस्पृश्यतेला धर्मांत कोठेंच वाव नाहीं. जातिजातींत जेवणास अगर विवाहास धर्मानें मनाई केली असली तरी अस्पृश्यता मानावी असें कोठेंच सांगितलेलें नाहीं. अस्पृश्यता काढून टाकावी असें माझें ठाम मत आहे; पण त्याबरोबरच जातींचीं सर्व बंधनें झुगारून देऊन रोटी व बेटी-व्यवहार सर्रास सुरू करावा हें मत मला बिलकुल मान्य नाहीं. वर्ण व आश्रम मला मान्य आहेत. संन्यासी व संयमी यांनीं ते मानूं नयेत. सर्व संसाऱ्यांनीं मानावे.

आपली असहकारितेची चळवळ ही सर्वांनाच पवित्र करणारी असून अस्पृश्य लोकांनीहि त्यांत भाग घ्यावा असें त्यांनीं सुचविलें. ज्यानें त्यानें आपले धंदे पवित्रच मानले पाहिजेत असेंहि त्यांनीं सांगितलें. नंतर 'अस्पृश्य वर्गाला धार्मिक व सामाजिक बरोबरीचे हक्क देण्यांत यावे, व त्यांना देवळांत वगैरे प्रार्थनेस येऊं द्यावें ' अशा अर्थाचा ठराव पास झाला. देशाची आर्थिक परिस्थिती सुधारण्याकरितां अस्पृश्य वर्गातील लोकांस स्वयंनिर्णयानुसार ज्याला जो आवडेल तो धंदा स्वीकारण्यास उत्तेजन देण्यांत यावें, असाहि ठराव पास झाला !

या अस्पृश्यतेनें हिंदुसमाज सहा कोटी हिंदूंच्या मनुष्यबळाला आंचवत आहे. इतकेंच नव्हे तर त्या मानानें प्रतिपक्षाला बलवान् करीत आहे. गुंतूर जिल्ह्यांतील सार्वत्रिक कायदेभंगाच्या वेळीं अस्पृश्य लोकांस हातीं धरून सारा न देणारांच्या जमिनी जप्त करून त्या त्यांना देण्याची योजना स्थानिक अधिकाऱ्यांनीं पुढें आणली होती व ' पंचम ' समाजानें त्या योजनेस मूक व स्पष्ट अशी संमतीहि दिली होती, या एकाच गोष्टीवरून शुद्ध व्यावहारिक व राजकीय दृष्टीनेंसुद्धां अस्पृश्यता किती प्रगतिविरोधक आहे तें दिसून येतें.

अस्पृश्यतानिवारणासाठीं खास मुदत नेमून गांधींनीं अस्पृश्यतेविरुद्ध धडाडीची स्वतंत्र चळवळ केली नाहीं हें खरें; परंतु त्यांच्या ह्या चळवळीचा एकंदर परिणाम हिंदूधर्मीयांवर बराच झाला असा सार्वत्रिक अनुभव आहे. कायदेभंगाच्या प्रश्नांत अस्पृश्यतानिवारणाला ते आद्यस्थान देत.

" ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचा संबंध ह्या प्रश्नाशीं अगदीं निकटचा आहे " असें गांधींचें मत आहे. परंतु हा वाद अस्पृश्यतेप्रमाणें राष्ट्रीय नसून फक्त मद्रास व महाराष्ट्रापुरताच होता आणि गुजराथेंत त्याचा मागमूसहि नाहीं. अशा कारणांमुळेंच बहुधा गांधींनीं त्या प्रश्नांत नीटसें लक्ष घातलें नाहीं. परंतु कॅांग्रेसच्या ठरावांत त्यांनीं ह्या प्रश्नाचा समावेश केला होताच.

## मद्यपाननिषेधक गांधी.

" पोलीस गस्त म्हणजे सुद्धां चोरांविरुद्ध पिकेटिंग नव्हे काय ? चोर दुसऱ्याच्या घरांत शिरूं पाहतो तेव्हां पोलीस बंदुकीचा उपयोग करूं पाहतो. पिकेटिंग करणारा लज्जा म्हणजे प्रेम ह्या शस्त्राचा उपयोग करून आपल्या दुबळ्या बांधवाला दारूच्या पापापासून परावृत्त करूं पाहतो. आणि सरकारला जर पूर्ण मद्यपानबंदी सुद्धां करण्याचा अधिकार असूं शकतो तर लोकांना तो कां नसावा ?" असें म्हणून गांधींनीं मद्यपानप्रतिबंधासाठीं 'उत्तेजक औषधाप्रमाणें' तात्पुरता उपाय म्हणून पिकेटिंगच्या पद्धतीचें समर्थन केलें आहे.

मद्यपाननिषेध किंवा पिकेटिंग हा कार्यक्रम खास कॅांग्रेसच्या असहकारितेच्या ठरावांत कधींच समाविष्ट झाला नव्हता. परंतु असें असूनहि असहकारितेच्या प्रचण्ड जागृतीच्या व आत्मशुद्धीच्या काळांत मद्यपाननिषेधाच्या चळवळीला फारच महत्व आलें होतें. नागपूर कॅांग्रेसच्या आधींपासूनच देशांत कोठें कोठें पिकेटिंगचा उपक्रम करण्यांत येतच होता. परंतु पुढें नागपूर कॅांग्रेसनंतर त्या चळवळीला विशेषच जोर आला आणि तो अहमदाबाद कॅांग्रेसनंतरहि जीव धरून राहिलाच होता. ह्या काळांत ब्रह्मदेशासुद्धां हिंदुस्थानच्या एकंदर भागांत निरनिराळ्यावेळीं व कमीजास्त प्रमाणांत ही चळवळ सारखी सुरूच होती. दडपशाहीचा वरवंटा प्रथम प्रथम तर मुख्यत: मद्यपाननिषेधकांवरच फिरविला जात होता. नागपूर व धारवाड येथील गोळीबार हे ह्या चळवळींतील संस्मरणीय प्रसंग आहेत.

खुद मुंबई शहरांत मे जून १९२१ मध्येंच पिकेटिंगला सुरुवात झाली व पुढें ही चळवळ चांगलीच जोमांत आली. दारूमक्तेदार गांधींशीं तडजोडीची बोलणी करूं लागले व आम्हीं सरकारकडे ह्या अनपेक्षित आपत्तीमुळें ठेक्याचे पैसे परत मागतों व दुकानें बंद करतों असें आश्वासनहि गांधींस दिलें. परंतु पुढें गव्हर्नरसाहेबांकडे केलेल्या अर्जांत त्यांनीं ह्या चळवळीवर खूब तोंडसुख घेऊन वचनभंग केला. खुद्द गांधींच्या सल्यावरून हें पिकेटिंग पुढें बंद करण्यांत आलें.

ह्याच सुमारास पुणें येथील पिकेटिंगची चळवळहि विशेष जोमांत आली आणि पिकेटिंगला मनाई करण्याचा हुकूम जिल्हा मॅजिस्ट्रेटनीं काढतांच कायदेभंग करण्याचा निश्चय करण्यांत आला आणि श्री. केळकर, श्री. भोपटकर, श्री. परांजपे, श्री गोखले वगैरे पुढाऱ्यांनीं पहिल्याच दिवशीं स्वतः पिकेटिंग केलें. ह्या पुढाऱ्यास आणि स्त्री स्वयंसेवकांस कांहीं पकडण्यांत आलें नाहीं परंतु पुढें कांहीं महिनेपर्यंत हा कायदेभंग अखंड सुरू होता. कैदेच्या शिक्षेऐवजीं दंड करण्याची पद्धत मॅजिस्ट्रेटनीं स्वीकारून हें कार्य विशेष बिकट केलें खरें; तथापि शेंकडो स्वयंसेवक ह्या कायदेभंगांत सामील होऊन त्यांनीं पुण्याचें नांव राखलें यांत शंका नाहीं.

"हिंदुस्थानचा बहुतेक भाग मी फिरून आलों आहें. आणि मुख्य सरकारी अधिकाऱ्यांची भेट जागोजाग घेऊन त्यांच्याशीं मीं वादविवाद केला आहे. हे सर्व मला एकच रडकथा सांगतात. दारूच्या खपांत विलक्षण तुटवडा पडला असून त्यामुळ सरकारी तिजोरीहि बरीच रिकामी राहूं लागली आहे."

"हिंदुस्थानदेश आज कित्येक शतकें बहकून गेला होता. त्याचें चित्त थाऱ्यावर नव्हतें पण आतां तो शुद्धीवर आला असून ह्या महात्म्याच्या (गांधींच्या) झेंड्याखालीं तो एकात्मता पावला आहे. मद्याच्या भयंकर शृंखला तोडून टाकून त्याच्या भीषण जुलमांतून मोकळें होण्याची बळवत्तर इच्छा त्याला झाली आहे, ही गोष्ट अगदीं आडमुठ्या मनुष्यावांचून इतरांस सहज दिसून येण्याजोगी आहे.— " ( डब्ल्यू ई जॉन्सन-पुसीफुट ह्याचा अमेरिकेंतील ख्रिश्चियन हेरल्डमधला लेख. )

## समाजसुधारक गांधी.

" वर्णाश्रमधर्म हा माझ्यामतें मानवी स्वभावांत मुरलेलाच आहे. हिंदूनी फक्त त्याला शास्त्ररूप देऊन दिलें आहे. त्याचा जन्माशीं कांहीं संबंध नाहीं.

तो मर्जीनुरूप बदलताहि येत नाहीं. आपल्या वर्णाश्रमाला अनुसरून न वागणें म्हणजे आनुवंशिकतेचा कायदाच मोडणें होय. शेकडों जातींची वाढ ही मात्र ह्या मताच्या विपर्यासानें झालेली आहे. चार वर्ण हेच पुरेसे आहेत."

"वर्ण किंवा विभाग हे कर्तव्यमर्यादा घालून देतात. हक्क मर्यादा घालून देत नाहींत." परंतु गांधींना 'मिश्रविवाह' इष्ट व 'प्रेमभोजनें' आवश्यक वाटत नाहींत आणि हिंदुधर्म केवळ आहारधर्म आहे असेंहि त्यांना वाटत नाहीं. गांधींनीं ह्या संबंधानेहि खास स्वतंत्र चळवळ कधींच केली नाहीं. फक्त आचरणानें उदाहरण घालून दिलें आहे इतकेंच.

महाराष्ट्रीय ब्राह्मणेत्तरांनीं गांधींच्या ह्या वर्णाश्रमधर्माच्या पुरस्कारामुळें त्यांनाहि 'सोवळे व ब्राह्मणतराचे हितशत्रु' ठरविण्याचा प्रयत्न केला आहे ही गोष्ट नमूद करून ठेवण्यासारखी आहे.

गोध्रा येथील गुजराथ राजकीय परिषदेच्या वेळीं (नोव्हेंबर १९१७) भरलेल्या संसार (समाज) सुधारणा परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारून त्यांनीं आपल्या ह्या विषयावरील मतांचें सुंदर दिग्दर्शन केलें होतें.

## स्त्रीदाक्षिण्य.

एकंदर स्त्री जातीविषयींच्या गांधींच्या भावना अत्यंत उदात्त व उदार आहेत आणि कोणत्याहि कार्याची सांगता स्त्रियांवांचून होणार नाहीं अशीच त्यांची कल्पना आहे.

"एक पक्षीं आपण स्त्रीला अंधकारांत आणि अधमावस्थेंत ठेवणें हें गैरवाजवी आहे आणि दुसऱ्या पक्षीं स्त्रीवर पुरुषाचें काम सोंपविणें हें कमकुवतपणाचें लक्षण आहे—स्त्रीजातीवर तो जुलूम आहे."

"आपण पुरुषाच्या वासनापूर्तीचें साधन आहों ही कल्पनाच स्त्रियांनीं सोडून दिली पाहिजे. उपाय पुरुषापेक्षां स्वतः त्यांच्याच हातीं आहे त्यांना पुरुषांची परोवगी करावयाची असल तर त्यांनीं आपल्या पतीसुद्धां एकंदर पुरुषांच्या नयनसुखासाठीं थाटमाट करणें सोडून दिलें पाहिजे."

गांधींच्या चळवळीनें एकंदर स्त्रीसमाजांत पुष्कळच जागृति झालेली आहे. तीं इतकी कीं कित्येक पुराणमतवाद्यांना गांधीराज्य म्हणजे स्त्रीराज्य असेंच वाटतें!

## पतितोद्धारक गांधी

"आपल्या अब्रूचा विक्रय करून पोट भरणाऱ्या स्त्रियांची पहिली मुलाखत मी कोकोनाडा येथें घेतली. सुमारें ५—६ स्त्रियांशीं माझें फारच थोडा वेळ

संभोपण झाले; दुसरा प्रसंग बारीसाल येथें आला; सुमारें शंभर पतित भगिनी ओळांऊ कळवून भेटावयास आल्या होत्या. "

" पुरुषानें अनेक दुष्कृत्यें केलीं आहेत. त्यां सर्वांत मनुष्य समाजांतील दुर्बळ नव्हे तर उच्चतर अर्धांगाची–स्त्रियांची केलेली अवनति ह्यासारखें दुसरें अधःपात करणारें व अंगावर शहारे आणणारें कोणतेंच कृत्य नसेल. "

" म्हणूनच एक पुरुष म्हणून मला ह्या शंभर भगिनींपुढें मान खालीं घालावी लागली. " " जर असहकार आपणास शुद्ध करणार नाहीं व आपल्या वासनांस आळा घालणार नाहीं तर ती चळवळ हवी कशाला ? " असें म्हणून गांधींनीं असहकारितेची खरी व अंतर्मुख व्याप्ति व्यक्त केली आहे: " अशा साडेदहा लाख स्त्रिया रोज आठ तासप्रमाणें हातमागावर काम करतील तर भिकार हिंदुस्थानाला दर ताशीं कितीतरी रुपये मिळतील. " महात्माजींच्या स्फूर्तीमुळें बारिसाल येथें ह्या स्त्रियांना प्रामाणिक कामधंदा देऊन पवित्राचरणी होण्याचे कामीं मदत करण्याचीहि पुढें तजवीज झाली.

गांधींच्या कल्पनांतील व कार्यांतील ही उदात्तता पुष्कळांस हास्यास्पद वाटेल अशी आम्हांस भीति वाटते.

## मातृभाषाप्रेमी गांधी

" हिंदुस्थान हा देश एक दिवस इंग्रजी भाषा बोलणारांचा देश होईल. " अशी राजा राममोहनराय ह्यांची भविष्यवाणी आहे. ह्या भविष्यवाणीचे पुरस्कर्ते देशांत अद्याप आहेत. " सध्यांच्या इंग्रजी भाषेचा दर्जा आपणास भूषणास्पद नाहीं आणि तो खऱ्या लोकशाहीला पोषकहि नाहीं ही गोष्ट ते विसरतात. "

सुशिक्षित व अशिक्षित ह्यांस परस्परांपासून अत्यंत अलिप्त राखणारी एक मोठी अडचण सुशिक्षितांचें इंग्रजी भाषेवरील फाजील प्रेम हीच आहे.

म. गांधींनीं हिंदुस्थानच्या भूमीवर पाय टाकतांच अगदीं अपरिहार्य असल्यावांचून इंग्रजी भाषेचा उपयोगच करावयाचा नाहीं अशी प्रतिज्ञा केली. आणि गांधींच्या ' कारकीर्दीत ' खासगी सभांपासून राष्ट्रीयसभांपर्यंत चोहोंकडे देशी भाषांचा वाढत्या व फारच मोठ्या प्रमाणावर उपयोग होऊं लागला. असहकारितेची चळवळ विलक्षण लोकप्रिय व प्रसृत होण्याचें कारण हा देशी भाषांचा उपयोग हेंच आहे. म. गांधींनीं राष्ट्रीय शिक्षणांतहि देशी भाषांना अग्रप्रथमस्थान दिलें आहे.

## गांधी व राष्ट्रभाषा

राष्ट्रभाषा म्हणून हिंदी भाषेचा उपयोग व्हावा असाहि गांधींचा अगदीं प्रथमपासून प्रयत्न आहे. हिंदी साहित्य संमेलनाच्या इंदूर (२९-३-१८) साहित्यसंमेलनाचे अध्यक्षस्थानावरून त्यांनीं ह्या मताचा जोरानें पुरस्कार केला होता. मद्राससारख्या थोडयाशा भागांतील लोकांचीच त्यामुळें गैरसोय होईल. परंतु आपल्या प्रांताबाहेर व राष्ट्रीय सभांतून भाग घेणाऱ्या त्या प्रांतांतील पुढाऱ्यांनीं कांहीं दिवसपर्यंत 'रोज एक तास हिंदी शिकण्यांत खर्च करावा' असें त्यांचें सांगणें आहे. म. गांधींच्या ह्या इच्छेप्रमाणें सध्यां मद्रासकडील भागांत हिंदी भाषेचा प्रसार करण्याचें काम संघटित रीतीनें व बऱ्याच मोठया प्रमाणावर सुरू आहे.

## गांधी व राष्ट्रीय पोषाख.

गांधींच्या पोषाखांतील उत्क्रांति व त्यांच्या चरित्राची उत्क्रांति हीं बिंब-प्रतिबिंबवत् आहेत. पोषाख व पेशा ह्यांचें अपरिहार्य साहचर्य त्यांच्या चरित्रांत उत्तम रीतीनें दिसून येतें.

अनुकरणाच्या दृष्टीने पाहिलें तर महात्मा गांधींचें अनुकरण करून खादीची टोपी घालणें हें साहेबांचें अनुकरण करून डोक्यावर चिमणीचें धुराडें, किंवा गळ्यांत गळोटीचा फांस, घालण्यापेक्षां खचित कमी हास्यास्पद ठरेल. व त्याहून मौज ही कीं, ज्या साहेबफॅशन्सचें अनुकरण डोळे मिटून आम्ही करतों त्या खुद्द विलायतेंत भलभलत्या कारणांनींच मूळ उत्पन्न झालेल्या असून त्यांचा व सुखसोयीचा तिकडेही मेळ बसला नाहीं तर तो इकडे कोठून बसणार? मिस बॅलिन नांवाच्या एका इंग्रज व्याख्यात्रीनें युरोपिअन लोकांना खालील प्रमाणें सर्टिफिकेट दिलेलें आहे– " In manners, very minor part. " चालीरीति व पोषाक यांचे बाबतींत सुधारलीं म्हणविणारीं युरोपिअन राष्ट्रें रानटी लोकांसारख्याच माकडचेष्टा करितात. या बाईनें या आक्षेपाचीं उदाहरणहि कांहीं दिलीं आहेत. इलिझाबेथ राणी आपल्या गळ्यावरील आवाळू झांकण्याकरितां कॅसाळ गळपट्टा घाली हें पाहून इंग्रज बायकाहि तसेंच करूं लागल्या; व अजूनहि गळ्याभोंवतीं कॅसाळ कुत्र्याकोल्ह्यांची सबंध कातडीं घालून इंग्रज बायका शोभा मिरवितात! आठव्या हेनरीनें गालावरील नायटे बुजविण्याकरितां मेणाच्या चकत्या लावल्या तें पाहून लोकहि तेंच करूं लागले.

अशाच रीतीनें उंच गळपट्टे, भारी खळ लावलेले गळपट्टे, अस्तन्यांचे कॉलर, गळ्गोटी, उंच खोटांचे निरुंद बूट, कंबर चिरडून टाकणारे कंबरबंद, जघन फुगवून दाखविणाऱ्या स्प्रिंगच्या तारा, इत्यादि वगैरेंची उपपत्ति आहे. ( सायन्स ऑफ ड्रेस, पृ. २५८ ) विद्वान् इंग्रज ग्रंथकार ले हंट यानें तर इंग्रजी पोषाखाविरुद्ध तडाक्यावर तडाके उडविले असल्याचें प्रसिद्ध आहे. इंग्रजी कोटासंबंधानें तो लिहितो—" विद्यमान कोटाच्या पोषाखांत सुख सोय, समंजसपणा किंवा काटकसर हीं रतिमात्रहि नाहींत. तो जितका कुरूप तितका निरुपयोगी आणि जितका निरुपयोगी तितकाच खर्चाचा असतो. पोषाखाचे हे सर्व दुर्गुण विलायतेंतून इकडे येऊन द्विगुणित झाले असल्यास नवल काय ?

वरील सर्व विवेचनाचें तात्पर्य इतकेंच कीं, हिंदुस्थानांत अनेक दृष्टीनें पोषाखाची क्रांति होण्याची आतां वेळ आली आहे; व ती होतांना सुख, सोय, खर्च, स्वदेशाभिमान वगैरे हेतूंकडे लोकांनीं नजर पुरविल्यास तें योग्यच होईल हे सर्व हेतु संभाळून त्यांतल्या त्यांत प्रांतिक राष्ट्रभावनाहि कोणास संभाळतां आली तर इष्टच आहे. पण ती संभाळतां येत नसल्यास राष्ट्रीय पोषाखाच्या संशोधनांत क्वचित् स्वत्व गमावलें तरीहि मोठीशी फिकीर नाहीं. पोषाखाची फॅशन बदलावयाची म्हणजे उगाच मुद्दाम गबाळपणा करावयाचा किंवा लकतरें वागवावयाचीं असा मात्र अर्थ नव्हे. स्वदेशी कपडा पोषाखाला वापरला तरी त्यांतहि स्वच्छता व साधेपणा हीं जीं सभ्यतेचीं मुख्य दोन अंगें तीं असलींच पाहिजेत. पण एकदां स्वदेशीच्या दृष्टीनें आपण पोषाखाकडे पाहूं लागलों म्हणजे पोषाखाचा आकार, वजन, माप, किंमत, कपड्याची जात व वाण वगैरे यावतीत इष्ट अशीच क्रांति घडून येईल यांत शंका नाहीं. ही क्रांति घडवून आणण्याची महत्व जबाबदारी सुशिक्षित लोकांवरच येऊन पडते. म्हणून स्वदेशीच्या चर्चेनें उगीच फुगविलेली व्यापक दृष्टि अर्थशास्त्राचें अवडंबर, व आंकड्यांचें गौडबंगाल न रचतां त्यांनीं स्वतः तावडतोब सक्रिय होण्यास व अशिक्षितांना वळण लावण्यास उद्युक्त झालें पाहिजे. ( -केसरी )

## प्रकरण २९ वें.

# युवराजांचें आगमन.

### येणार ! येणार !-युवराज येणार !



हिंदी राजकीय सुधारणांचा उपक्रम करून त्यांना शुभाशीर्वाद देण्याचें काम खास युवराजांच्या हस्तें करण्यांत यावें व अशा रीतीनें गांधींनीं सुधारणांची घालविलेली अब्रू परत मिळवावी अशी अधिकाऱ्यांची स्वाभाविक इच्छा होती. परंतु सुधारणांच्या उपक्रमासाठीं युवराज हिंदुस्थानांत आल्यास हिंदी राष्ट्राला नाइलाजास्तव त्यांच्या स्वागत समारंभावर बहिष्कार घालावा लागेल असें गांधींनीं जाहीर केलें.

युवराजांवर बहिष्कार घालण्याची सूचना उघड उघड राजद्रोही आहे असें मि. मॉटेग्यु ह्यांनीं पार्लमेंटमध्यें जाहीर केलें. परंतु युवराजांवरील बहिष्कार आणि युवराजांच्या स्वागतसमारंभावरील बहिष्कार ह्यांत टळक भेद आहे. शिवाय तुम्हीं मात्र तटस्थ घराण्यांतील राजपुरुषाचा सुधारणांचा गाजावाजा करण्याकडे उपयोग करावा आणि आम्हांला मात्र सुधारणांविषयींची नापसंती व्यक्त करण्याकरितां तुमच्या स्वागतसमारंभावर बहिष्कार घालण्यास मनाई असावी हा डाव आम्हांला समजतो. अशा रीतीनें गांधींनीं आगष्ट ता. ४ १९२० च्या यंग इंडियांत ह्या बहिष्काराचें समर्थन केलें.

### अखेर काकाच आले.

अखेर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें युवराजांचा हिंदुस्थानांत येण्याचा बेत रहित झाला आणि ती कामगिरी बादशहांचे काका ड्यूक ऑफ् कॅनॉट ह्यांजवर संपविण्यांत आली. त्यांच्या स्वागतसमारंभांवर बहिष्कार घालण्याचें ठरलें. ता. १२ जानेवारी १९२१ रोजीं ड्यूकनीं मद्रासच्या बंदरांत पाऊल ठेवलें. ज्या ज्या ठिकाणीं ड्यूक गेले त्या त्या ठिकाणीं त्या त्या वेळीं हरताळ पाडण्यांत आले व त्यांच्या स्वागतसमारंभांवर बहिष्कार घालण्यांत आले.

" हुजूरांचें आगमन मीं वर्णन केलेल्या राज्यपद्धतीची समाप्ति करण्यासाठीं झालेलें नसून तिची इभ्रत कायम टेवण्याकरितां झालेलें आहे. * * * हुजूरच्या स्वागतसमारंभापासून अलिप्त राहण्यांत याप्रमाणें आमचा हेतु आपल्यासारख्या राजपुरुषाविरुद्ध मुळींच नसून ज्या पद्धतीला आपण उचलून धरण्याकरितां आला आहांत त्या पद्धतीविरुद्ध आहे. "

" माझें हुजूरांस असें सांगणें आहे कीं, त्यांनीं एक इंग्रज गृहस्थ या नात्यानें आमच्या ह्या चळवळीचें निरीक्षण करावें. व साम्राज्य आणि एकंदर जग यांस तिचा कितपत उपयोग होईल तें पहावें. "

" इंग्रजांशीं मित्रत्वाच्या नात्यानें रहावें अशी आमची इच्छा आहे. परंतु ही मैत्री तत्वांत व व्यवहारांत बरोबरीच्या नात्याची असली पाहिजे. आणि हें ध्येय साध्य होईपर्यंत आम्हांला असहकार म्हणजे आत्मशुद्धि करीत राहिलेंच पाहिजे. "

काकांनीं गांधींचें हें पत्र वाचलें असेलच परंतु Forget and forgive विसरा आणि क्षमा करा असें म्हणण्यापलीकडे त्यांच्या हातून जास्त कांहींच कार्य झालें नाहीं.

## खुद्द युवराजहि आले.

" युवराज दिलसफाई तरी करतील किंवा बेदिली तरी वाढवितील. "

" अमृतसरची काळी कुट्ट छटा हिंदुस्थानच्या तोंडावर अद्याप स्पष्ट दिसत आहे " ही गोष्ट ड्यूक ऑफ् कॅनॉट यांनीं स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली असूनहि लॉर्ड रेडिंग यांनीं युवराजांना हिंदुस्थानांत येण्याविषयीं आमंत्रण दिलेंच आणि विलायती मुत्सद्यांनीं तें मान्यहि केलेंच. या बाबतींत प्रांतिक गव्हर्नरांचा सल्ला दोघांनींहि मानला नाहीं.

लॉर्ड रेडिंग किंवा ब्रिटिश प्रधानमंडळ यांना हिंदुस्थानच्या दिलसफाईची पर्वा नव्हती. हिंदुस्थान नमवावें किंवा भुलवावें येवढीच त्यांची इच्छा होती असें युवराजांच्या निष्फळ व केवळ औपचारिक कामगिरीवरून म्हणावें लागतें.

युवराजांच्या स्वागतसमारंभावर बहिष्कार घालण्यांत येईल असा गांधींनीं प्रथम बेत जाहीर झाला तेव्हांच स्पष्ट इशारा दिला होता आणि ड्यूक ऑफ् कॅनॉट यांच्या आगमनाच्या वेळीं या बहिष्काराची अंमलबजावणीहि झाली होती.

युवराजांच्या आगमनावर बहिष्कार घालण्याचा ठराव वर्किंग कमिटीनें केला होताच. आणि गांधींनीं ह्या बहिष्काराच्या अंमलबजावणीची रीतहि अगदीं स्पष्टपणें जाहीर केलेली होती.

फक्त डॉ. वेलकर आणि श्री. मोतीवाला ह्या दोन सभासदांच्या विरुद्ध मतांनीं मुंबई म्युनिसिपालटीनें युवराजांना मानपत्र देण्याचा ठराव मंजुर केला होता. १७ नोव्हेंबरला युवराजांनीं सकाळीं मुंबईच्या किनाऱ्यावर पाऊल ठेविलें आणि धक्क्यावरबरेच युरोपिअन, युरेशियन व पार्शी व थोडेसे हिंदु व मुसलमान बडे गृहस्थ आणि या भागांतील बहुतेक सर्व राजेरजवाडे ह्यांच्या समोर धक्क्यावरील राजमंडपांत म्यूनसिपालटीतर्फे युवराजांना मानपत्र देण्यांत आल्यावर मिरवणुक सुरू झाली.

## मुंबईतील विचित्र अनुभव.

मिरवणुकीकडे लोकांचे लक्ष वेधून भलताच प्रकार घडूं नये म्हणून गांधींनीं त्याचवेळीं एल्फिन्स्टन रोडवर एक विलायती मालाची जंगी होळी पेटविण्याचा समारंभ केला. परतु हा समारंभ संपून लोक परत फिरूं लागले होते; इतक्यांत एका मागून एक गिरण्या जबरदस्तीनें बंद पाडून मजूर वर्ग रस्त्यावरुन फिरूं लागला.

रस्त्यावरून जाणाऱ्यायेणाऱ्यांच्या विलायती टोप्या काढून घ्याव्यात, परदेशी पेहेराव करणारांच्या मागें लागावें, युरोपियनांस व पारशांना मारहाण करावी असा प्रकार सुरू झाला. कांहीं पारशी व युरोपियन ह्यांनी गांधी टोपी घालून रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्यांचा अपमान केला हेच हा प्रकार वाढत जाण्याचें मूळ कारण होतें. कांहीं पारशी स्त्रियांसहि त्रास देण्यांत आला.

एक वाजतां गांधींना ही बातमी समजली आणि संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत ते ठिकठिकाणीं फिरून लोकांस शांत करीत होते.

'गांधी महाराज की जय' म्हणून जावें तेथे गांधींचा जयजय करण्यांत येई, परंतु अशा प्रत्येक ठिकाणीं शांतिब्रह्म गांधीमहाराजांना घायाळ पोलीस, जखमी पारशी किंवा हिंदुमुसलमान, जळतें दारूदुकान हीं पाहण्याचा प्रसंग ओढवला.

अत्याचाराचा अग्नि मुंबई शहरांत गुरुवारीं सकाळीं प्रदीप्त झाला तो रविवारीं संध्याकाळीं शमला.

व्यक्तिशः उल्लेख करण्यासारखी ह्या दंग्यांतील गोष्ट म्हणजे मुंबईचे शेट वसनजी गोविंदजी ह्यांच्या दुकानांची लूट होऊन हजारों रुपयांचें नुकसान तर झालेंच परंतु लोकांस शांत करण्याचे अशांत श्रम करीत असतां पारशी मवाल्यांकडून त्यांना बेदम मार खावा लागला व वर आणखी दंग्यास उत्तेजन दिल्याच्या आरोपावरून ६ महिने सक्तमजूरीची शिक्षा भोगावी लागली. त्यांनीं आपल्या तर्फे कोर्टांत पुरावाहि दिला नाहीं किंवा नुकसान भरपाईहि मागितली नाहीं. म. गांधींच्या सहवासानें व उपदेशानें अत्यंत तत्वनिष्ठ व निःस्वार्थी बनलेल्या थोडयाशा लोकांपैकीं हें एक नमुनेदार उदाहरण आहे.

" ह्याप्रमाणें सामुदायिक कायदेभंगाचा उपक्रम करण्याची आशा पुन्हां एकवार नामशेष झाली आहे " असें म्हणून गांधींनीं ह्या असल्या स्वराज्यानें मला अगदीं शिसारी आली आहे असें जाहीर केलें.

आम्हीं कायदेभंगाला अनुकूल असें शांतिमय वातावरण निर्माण केलें आहे असें असहकारी म्हणतात परंतु ऐनवेळीं त्यांना शांतता राखतां आली नाहीं म्हणून गांधींनीं त्यांना दोष दिला आणि मी तर ह्या एकंदर चळवळीचा प्रवर्तक असून मला ही अत्याचारांची प्रवृत्ति मुळांतच दाबतां न आल्यामुळें सर्वस्वी खरा दोष माझाच आहे असें म्हणून प्रायश्चित्तादाखल स्वराज्य मिळेपर्यंत दर सोमवारीं उपवास करण्याचा त्यांनीं निश्चय केला.

## मुंबईबाहेर

मात्र ह्या अत्याचारांचा विशेष परिणाम घडून आला नाहीं. १७ तारखेलाच हिंदुस्थानच्या प्रत्येक मोठया शहरांतील व लहान सहान गांवांतील हरताळ निर्विघ्नपणेच नव्हे तर फार यशस्वी रीतीनें पार पडले. विशेषतः कलकत्ता येथील हरताळ तर इतका निरपवाद व सुसंघटित होता कीं, त्या योगानें बंगालचा एकंदर युरोपियन समाज घाबरून गेला. बंगाल चेंबर ऑफ् कॉमर्स व युरोपियन असोसिएशन ह्यांनीं ही चळवळ दडपून टाकण्याविषयीं सरकारकडे विनंति-अर्ज केले.

लॉर्ड रेडिंग हे १७ तारखेला मुंबईस हजर होतेच. खुद्द मुंबईतील व एकंदर देशांतील त्यावेळच्या परिस्थितीमुळें लॉर्ड रेडिंग निराश झाले असतील व चिडले असतील हें अगदीं स्वाभाविक आहे. कारण त्यांनीं स्वतःच्याच जबाबदारीवर युवराजांस आमंत्रण दिलें होतें.

मुंबईतील दंग्याची बातमी तात्काळ विलायतेस जाऊन गांधींना पकडण्या-विषयीं ओरड सुरू झाली. लॉर्ड रेडिंग ह्यांनीं ह्या ओरडीकडे दुर्लक्ष केलें परंतु त्याबरोबरच सर्व देशभर भीषण दडपशाहीला त्यांनीं परवानगी दिली.

## काँग्रेस वर्किंग कमिटीचे ठराव.

ह्या मुंबईच्या दंग्यानंतर लगेच ( ता. २२-२३ ) मुंबई येथेंच कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीची बैठक भरली. *ह्या बैठकींत दंग्याबद्दल खेद प्रदर्शित करण्यांत* आला व असे दंगे पुन्हां होऊं नयेत म्हणून एक योजना करण्यांत आली. कमी-टीनें असा एक ठराव केला कीं, " राष्ट्रीय स्वयंसेवक पथकांची एक मध्यवर्ती संस्था स्थापन करण्यांत यावी. कॉंग्रेस व खिलाफत स्वयंसेवक पथकें ह्या मध्य-वर्ती संस्थेखालीं संयुक्त करण्यांत यावीत. प्रांताप्रांतांनीहि आपापलीं मध्यवर्ती मंडळें स्थापन करावींत. लष्करी पेहेराव शक्य तोंपर्यंत टाळावा. तरवार बाळगूं नये. हातांत मोठी काठी बाळगूं नये. प्रत्येक पथक २० स्वयंसेवकांचें असावें. त्यांच्यावर एक मुख्य नाईक असावा. अशा वीस नाइकांवर एक सरनाईक असावा. ह्या पुढील नेमणुका मध्यवर्ती मंडळानें कराव्यात. "

*ह्या ठरावाची अंमलबजावणी मात्र झाली नाहीं असें दुःखानें म्हणावें लागतें.*



# प्रकरण २६ वें.

# अश्रुतपूर्व दडपशाही.

## पूर्वेतिहास.

असहकारितेविरुद्ध सरकारनें प्रथम उपेक्षावृत्ति व नंतर उपहासवृत्ति स्वीकारून पाहिली. परंतु असहकारितेचें वाढतें बळ असह्य होऊन १९२१ च्या प्रारंभापासूनच देशभर दडपशाहीला हळूहळू सुरुवात होत गेली.

मद्यपाननिषेध व परदेशी कापडावरील बहिष्कार ह्या चळवळी १९२०च्या प्रारंभापासूनच थोड्या फार सुरू झाल्या होत्या आणि त्या वर्षाच्या उत्तरार्धांत त्या फारच जोरांत आल्या. त्यावेळीं मात्र दडपशाही चांगलीच रंगांत आली. दिल्ली व पंजाब यांतील कांहीं भागांत ह्या वर्षाच्या प्रारंभीच सभाबंदीचे कायदे लागू करण्यांत आले होते. लॉर्ड सिंह ह्यांच्या अमलाखालील बिहार प्रांत आणि पंजाब व संयुक्त प्रांत हे ह्या दडपशाहीला प्रामुख्यानें बळी पडत होते; वऱ्हाड व मध्यप्रांत ह्यांतहि ही दडपशाही फार जोरांत होती. व सिंध, कर्नाटक आणि बंगालहि ह्या सत्रांतून सुटले नव्हते. १४४ व १०७ (इं. क्रि. प्रो. कोड) ह्या कलमांखालीं चोहोंकडे भाषणबंदी किंवा शिक्षा ह्यांना ऊत आला होता. सभाबंदीच्या कायद्याची अंमलबजावणी मधून मधून होतच होती. आणि राजद्रोहाच्या कलमाचाहि उपयोग केला जात होता.

## नव्या जोमाची नवी दडपशाही.

युवराजांच्या स्वागतसमारंभांवरील बहिष्कारानें ह्या दडपशाहीला नवा जोम आला.

बंगालमधील सर्व खिलाफत व कॉंग्रेस स्वयंसेवक पथकें सरकारनें गैरकायदा मंडळें आहेत असें २१ नोव्हेंबर रोजीं जाहीर केलें. अराजकी संस्था वगैरेसकट ह्यांच्या विरुद्ध म्हणून करण्यांत आलेल्या १९०८ च्या क्रिमिनल लॉ अमेंडमेंट

ॲक्टखालीं हा हुकूम काढण्यांत आला होता. २३ तारखेला दिल्ली प्रांतांत राजद्रोही सभाबंदीचा कायदा जारी करण्यांत आला. स्वयंसेवक संस्थाहि गैर-कायदा ठरविण्यांत आल्या. पंजाब व संयुक्त प्रांत यांच्या सरकारांनीहि दिल्लीचें अनुकरण केलें. सर्वत्र, एकाच वेळीं निकराची दडपशाही करून लोकमत दडपून टाकण्याचा सरकारचा विचार होता. परंतु तो व्यर्थ ठरला.

" मला स्वतःला ह्या हुकमांबद्दल हर्ष होत आहे. त्यामुळें कायदेभंग कसा-तरी उपस्थित करण्याची आवश्यकता उरलेली नाहीं. सरकारचें आव्हान स्वीकारण्याची आपली तयारी असेल तर तात्काळ दोन हात होऊं देण्याची ही संधि आहे."

मुंबईच्या दंग्यांनीं जरा उदास झालेल्या म. गांधींना ह्या नव्या परिस्थितीमुळें नवा जोम चढला.

स्वयंसेवक संस्था बेकायदेशीर कामांत गुंतलेल्या नाहींत. आम्हीं ह्या चालूच ठेवणार व नवनव्या स्वयंसेवकांची भरती करणार. आणि शिवाय २४ डीसेंबरला युवराजांच्या आगमनाच्या वेळीं हरताळहि पाडणार असें बंगालच्या पुढाऱ्यांनीं जाहीर केलें.

" सर्व प्रांतिक कमीट्यांनीं आपापलें स्वयंसेवक खातें निर्माण करावें आणि सर्व चालू स्वयंसेवक पथकें सघटित व एकसूत्री करावींत " असा ता. २२ व २३ नोव्हेंबरला मुंबई येथें भरलेल्या कार्यकारी कमीटीनें ठराव केला. कायावाचा मनानें अहिंसाव्रत पाळीन व आपल्या कर्तव्यांपासून केव्हांहि भ्रष्ट होणार नाहीं अशा अर्थाची शपथ स्वयंसेवकांनीं घेतलीच पाहिजे असेंहि एक कलम ह्या ठरावांत होतें.

## प्रत्यक्ष सुरुवात.

असहकारितेच्या पहिल्या ( कलकत्ता जादा ) कॉंग्रेसचे अध्यक्ष लाला लजपतराय ह्यांस ता. ३ डिसेंबरला पकडण्यांत आलें आणि मोठ्या धरपकडीला सुरुवात झाली. अहमदाबाद कॉंग्रेसचे निवडलेले अध्यक्ष दे. बं. दास ह्यांस, लॉर्ड रॅनॉल्डसे ह्यांनीं आधीं खासगी मुलाखत घेऊन मग, ता. १० रोजीं पकडलें. अलाहाबादच्या नेहरू कुटुंबांतील मोतीलाल ह्यांच्या सुद्धां चारजणांस पकडण्यांत आलें.

पंजाब, अजमीर, दिल्ली, संयुक्तप्रांत, बंगाल व आसाम ह्या प्रांतांतील बहुतेक सर्व च अव्वल दर्जाचे पुढारी एकामागून एक पकडण्यांत आले. परंतु सरकारचा उद्देश सिद्धीस गेला नाहीं.

पुढाऱ्यांच्या अभावीं जनता भेदरून गेली नाहीं किंवा कार्यकर्ते दिङ्मूढ बनले नाहींत. प्रत्येक प्रांतांतून हजारों वृद्ध तरुण स्वयंसेवक पथकांत नांवें नोंदवूं लागले. बंगालमध्यें तर कैद्यांस ठेवण्यास तुरुंगसुद्धां पुरेनातसे झाले.

कमींत कमी ३० हजार राष्ट्रभक्त ह्या दडपशाहीच्या सत्रांत आपली आहुति देण्यास पुढें सरसावले असावेत असा अदाज आहे आणि म. गांधींच्या ह्या असहकारितेच्या कार्यक्रमांत एकंदर कमींत कमीं ४० हजार राष्ट्रभक्त तुरुंग-तीर्थाची यात्रा करून आले असतील ह्यांत शंका नाहीं.

तुरुंग म्हणजे क्रीडांगण, आणि न्यायमंदिरें म्हणजे नाट्यगृहें अशी सर्व सामान्य समजूत होऊन गेली. हा प्रकार केव्हां थांबेल व कसा थांबेल ह्याची कोणासच कांहींच अटकळ होईना. सरकार इरतीस पडलेलें आणि लोक स्वराज्याकांक्षेच्या दुर्दमनीय इच्छेनें प्रेरित झालेले.

झाला हा प्रकार पुरे झाला, असें म्हणून नेमस्त लोक शांत आंखडता घेण्याविषयीं विनवूं लागले. कायद्याच्या दुरुपयोगाबद्दल त्यांनाहि निषेध करणें भाग पडूं लागलें.

## अडचणींतून पळवाट.

ह्या अडचणींतून आतां बाहेर तरी पडावें कसें हा व्हॉइसरॉयांस मोठाच पेंच पडलेला होता.

हिंदुस्थानच्या राजकारणांतील नामांकित व लोकप्रिय सभेट गंगाधर पं. मदनमोहन मालवीय ह्यांचा ह्यावेळीं व्हाइसरॉयांस फारच उपयोग झाला. असहकारितेच्या राजकारणापासून अलिप्त राहून एकदर परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करीत असलेले मालवीय या मध्यतरीच्या काळांत लोकपक्ष व सरकारपक्ष ह्यांच्यामधील झुलत्या पुलाचें काम फार सफाईनें करीत होते. पंडितजी ह्यावेळीं कलकत्त्यास व्हाइसरॉयांच्या मुलाखतीला गेले व महात्माजींचा कल समजावून घेण्याकरितां श्री. जम्नादास द्वारकादास व पं. हृदयनाथ कुंझरू हे साबरमतीला गेले. नंतर पुढें पं. मदन मोहन मालवीयाच्या नेतृत्वाखालीं एक तटस्थ व सहकारी पुढाऱ्यांचें शिष्टमंडळ (२१-१२-२१) व्हाइसरॉयांच्या मुलाखतीस गेलें.

लोकमत समजावून घेऊन दिलजमाई व दिलसफाई घडवून आणण्याकरितां व्हाइसरॉयांनीं एक सर्वपक्षीय वर्तुलमेज परिषद बोलवावी असें ह्या शिष्टमंडळानें व्हाइसरॉयांस सुचविलें. सभाबंदी व स्वयंसेवकबंदीचे

हुकूम रद्द करून सरकारनें त्या कायद्याखालीं शिक्षा झालेल्या सर्व कैद्यांची सुटका आधीं करावी असेंहि ह्या शिष्टमंडळानें व्हाइसरायांस सुचविलें.

कोठून तरी युवराजांची कलकत्ता येथील व पुढील अलाहाबाद व दिल्ली येथील मुलाखत अंशतः तरी यशस्वी व्हावी; आणि १७ नोव्हेंबरच्या अश्रुतपूर्व हरताळांची पुनरावृत्ति निघूं नये, अशी व्हाइसरॉयांची फार इच्छा होती; परंतु हें काम कोणत्याहि प्रकारची माघार न घेतां केवळ आशा व अपेक्षा दाखवून साधण्याचा त्यांचा डाव होता. ह्यामुळें, कैदी सोडा व हुकूम मागें घ्या ह्या अटी ऐकतांच व्हाइसरॉयांनीं स्पष्ट सांगून टाकलें कीं, ही परिषद बोलावून करावयाचें काय तेंच मला समजत नाहीं.

ह्यावेळच्या उत्तरांत व्हाइसरॉयांनीं शिष्टांची व एकंदर राष्ट्राची मागणी पुढील प्रमाणें निकालांत काढली:—

" पंजाब व खिलाफत ह्या गान्हाण्यासंबंधानें सरकारनें करावे तितके प्रयत्न केले नाहीत असें तुम्हीं म्हणतां. पंजाबविषयीचें गान्हाणें दूर करण्याकरितां येथें आल्यापासूनच बिनसरकारी अत्यंत वजनदार लोकांच्या मतांची माहिती मिळवून मी माझ्या हातीं होतें तेवढें सर्व कांहीं केलें आहे. आणखीहि कांहीं करावें अशी पुष्कळांची इच्छा आहे. परंतु त्यांच्या शिफारशीची अंमलबजावणी करतां येणार नाहीं अशी माझी प्रामाणिक समजूत असल्यामुळें मला त्या मान्य करतां येत नाहींत."

" खिलाफतीसंबधानें म्हणाल तर हिंदुस्थानसरकारनें करावें तरी काय असें तुम्हांला वाटतें ? आम्हीं आमची शिकस्त केलेली आहे."

" सुधारणांसंबधानें एकच शब्द सांगतों. कायदेमंडळें ह्या वर्षाच्या प्रारंभींच कोठें कामाला लागलीं आहेत आणि अधिक किंवा संपूर्ण स्वराज्याची मागणी करण्यांत येत आहे. सुधारणा आतांच प्रत्यक्ष अमलांत येत आहेत. त्या पूर्ण कसोटीस लागल्या आहेत असें अद्याप म्हणतां येत नाहीं."

ह्याप्रमाणें सहकारी व असहकारी ह्या सर्वांसच मान्य असलेल्या मागण्यांतहि वाटाण्याच्या अक्षता लावल्यावर पुढें शिष्टाईचें बोलणेंच खुंटलें.

" सध्यांचा प्रश्न तीन गान्हाण्यांचा निकाल हा नाहीं. शांततप्रधान कार्यासाठीं सभा भरविण्याचा व संस्थांची संघटना करण्याचा अधिकार हाच आजचा प्रश्न आहे; आणि ह्या मुद्यावर लढतांना आम्हीं केवळ असहकाऱ्यांच्या वतीनें लढत नसून राजकारणांत पडणाऱ्या सर्वच पक्षांच्या वतीनें लढत आहों."

व्हाइसरॉय ह्या तत्कालीन प्रश्नाचाहि अनुकूल विचार करण्यास तयार नव्हते आणि म्हणूनच मालवीयजींचे हे सर्व प्रयत्न फुकट गेले.

" नालायक सेनापतींची घोडचूक."

दे. बं. दास हे कौन्सिलप्रवेशाच्या धोरणाचा पुरस्कार करण्याकरितां स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष म्हणून दौऱ्यावर असतांना मद्रास येथील ३० मे १९२३ च्या एका भाषणांत म्हणाले:—

" मीं स्वतः पुढाकार घेऊन लोकांस तुरुंगांत नेलें. बंगाल्यांत मीं ( कायदेभंगाची ) चळवळ सुरु केली. त्यावेळीं उत्पन्न झालेलें प्रतीकाराचें सामर्थ्य दांडगें होतें. आणि अत्यंत उद्दाम सरकार नमतें घ्यावयास तयार झाल असतें. तुम्हीं घोडचूक केलीत आणि सगळा चुथडा केलात. आणि आतां तुम्ही लोकांकडे वळतां आणि चरका, चरका, म्हणून घसेफोड करतां. अत्यंत उद्दाम सरकार तुमच्यापुढें नमलें होतें. तडजोडीच्या अटी माझ्याकडे आल्या आणि त्या मीं वरिष्ठ ठिकाणीं सादर केल्या. कारण त्यावेळीं मीं तुरुंगांत होतों. जर मी तुरुंगांत नसतों तर राष्ट्राला त्या अटी मीं मान्य करावयास लावलें असतें. जर ह्या मान्य करण्यांत आल्या असत्या तर आज कांहीं निराळाच प्रकार दृष्टोस पडला असता. "

ह्या उद्गारांत दे. बंधु दास ह्यांनीं गांधींवर फारच भयंकर आरोप केला होता. गांधींवर अशा तऱ्हेचे आक्षेप प्रारंभापासून त्यांच्या तुरुंगवासापर्यंत कित्येकांकडून घेण्यांत येत. परंतु ते खासगी स्वरूपाचे तरी असत किंवा मोघम तरी असत. परंतु हा आक्षेप जाहीर, कडक शब्दांतला आणि एका विवक्षित प्रसंगास उद्देशून होता.

गांधींचें कर्तृत्व श्रेष्ठ कीं नेतृत्व श्रेष्ठ ? गांधींची कर्तबगारी मोठी कीं, मुत्सद्दे-गिरी मोठी असाहि प्रश्नार्थक पेंच ह्या उद्गारांत दे. बं. दास ह्यांनीं लोकांस घातला होता. परंतु मुख्य मुद्दा कर्तृत्वाचा किंवा नेतृत्वाचा नसून वस्तुस्थितीचा आहे. आणि ही वस्तुस्थिति काय होती ?

ह्या संबंधानें पं. मदनमोहन मालवीय, दे. बं. दास, म. गांधी, मौ. अबदुल कलाम अझाद वगैरेंमध्ये झालेला खास सरकारी " क्लिअरलाईन " तारांचा व्यवहार प्रसिद्ध झालेला आहे व म. गांधींचे त्यावेळचे खासगी चिटणीस कृष्णदास ह्यांनीं व पं. मालवीय ह्यांनीं त्यासंबंधानें खुलासा प्रसिद्ध केला आहे. त्यावरून पुढील गोष्टी स्पष्ट होतात.

## प्रकरण २७ वें.

# अहमदाबाद कॉंग्रेस.



" * * * कित्येकांची भीति व इतरांची आशा निष्फळ करून राष्ट्रीय सभेनें आपलें उद्दिष्ट मात्र बिनचुक साधलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हें उद्दिष्ट म्हणजे असहकारितेच्या धोरणाची पूर्तता करणें हें होय."

### गांधी कॉंग्रेस.

अहमदाबाद कॉंग्रेस ही गांधींच्या कारकीर्दीतील पहिली आणि खरीखुरी गांधी कॉंग्रेस होती. गांधींनीं कॉंग्रेसची पूर्वतयारी आणि प्रत्यक्ष तयारी ही सर्वस्वी आपल्या प्रांतांत, आपल्या देखरेखीखालीं आणि आपल्या मर्जीप्रमाणें केली होती.

कॉंग्रेसच्या पूर्वतयारीस अगदीं लौकर सुरवात होऊन सर्व कामें अगदी झटपट, सफाईनें केलीं जात होतीं. कॉंग्रेस केवळ देखाव्याची न व्हावी म्हणून कॉंग्रेसमधील प्रत्येकास जबरदस्त फी ठेवण्यांत आली होती; कॉंग्रेसचा मंडप अगदीं हिंदी पद्धतीचा आणि सर्वस्वी खादीमय होता; पांच वर्षेपर्यंत बंद पडलेली प्रदर्शनाची पद्धत नवीन परिस्थितीला अनुसरून पुन्हां रूढ करण्यांत आली होती. खादी व स्वदेशी प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें; कॉंग्रेसमधील खुर्च्या टेबलें वगैरे पाश्चात्य उपकरणांची पुरी हकालपट्टी झाली होती. आरोग्यसंरक्षणाची व्यवस्था अगदीं नमुनेदार होती. खड्डे खडासांत खादीच्या भिंतीनीं उत्तम आडोसा केलेला होता आणि गांधींच्या व आपल्या प्राचीन पद्धतीप्रमाणें ज्यानें त्यानें आपल्या मलावर माती टाकून साफसफाई ठेवण्याची सूचना होती व मागाहूनच्या सफाईचें काम पगारी भंग्यांऐवजी सर्व जातींच्या स्वयंसेवकांकडून होत होतें; खास स्त्रीपरिषद भरविण्यांत आली होती; एकंदर सभापरिषदांतून निदान दोन लाख लोकांनीं तरी भाग घेतला होता आणि त्या सर्व खटाटोपांत एकहि अपघात झाला नाहीं.

कायम राखावयाचीच; परंतु प्रसंगीं अडचण पडूं नये म्हणून महात्मा गांधी ह्यांस राष्ट्रीय सभेचे सरमुखत्यार नेमण्यांत येत आहे. त्यांना ऑ. इं. कॉं. कमीटीचे सर्व अधिकार व आपल्यामागें दुसरा सरमुखत्यार नेमण्याचे अधिकार देण्यांत येत आहेत; मात्र म. गांधी किंवा त्यांच्या मागून अधिकाराख्ढ होणारे सरमुखत्यार ह्यांस कॉंग्रेसच्या उद्देशपत्रिकेंत फरक करण्याचा अधिकार नाहीं आणि त्यांनीं सरकारशीं कोणत्याहि अटीवर तह केल्यास ऑ. इं. कॉं. कमीटीची संमति मिळून खुद्द कॉंग्रेसनें त्याला पसंती दिल्यावांचून तो राष्ट्राला बंधनकारक होणार नाहीं.

## वाद व मतभेद.

म. गांधींस सरमुखत्यार नेमण्याच्या ठरावाला महाराष्ट्र पक्षानें फसून विरोध केला व त्यांच्या विरोधामुळें त्यांच्या सर्वाधिकारित्वावर कांहीं बंधनें घालण्यांत आलीं. परंतु मुख्य वादाचा मुद्दा निराळाच होता.

वर्तुळमेज परिषदेच्या कल्पनेला गांधी सर्वस्वीं अनुकूल होते. असहकारितेच्या १ आगष्ट १९१९ च्या उपक्रमाचे वेळींच त्यांनीं व्हाइसरॉयांस तशी सूचना दिली होती. परंतु त्यांच्या कांहीं प्राथमिक अटी होत्या. मालवीय शिष्टमंडळाची शिष्टाई व्हाइसरॉयांनीं धुडकावून लावल्यानंतर कॉंग्रेसने ठरावाच्या रूपानें ह्या प्रश्नाला चालना द्यावी म्हणून पं. मालवीय, बॅ. जिन्हा वगैरेंनीं शिकस्तीचे प्रयत्न केले.

हजारों पुढारी व कार्यकर्ते ह्यांस बेगुमानपणानें तुरुंगांत खेचलें जात असतां कॉंग्रेसनें आपण होऊन तडजोडीची तयारी दर्शवावी ही गोष्ट कोणत्या उत्साही राष्ट्रभक्तास पसंत पडणार ? तडजोडीची गोष्ट तर दूरच राहिली. परंतु ह्या बेगुमान धोरणास उत्तर म्हणूनच कीं काय, कॉंग्रेसचें ध्येय बदलून स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य हें कॉंग्रेसचें ध्येय असावें असा ठराव मौ. हजरत मोहानी ह्यांनीं भर कॉंग्रेसमध्यें पुढें आणला. ह्या स्वातंत्र्याच्या ठरावास विरोध करतांना म. गांधी म्हणाले:—" आपण आधीं आपले बळ एकवटूं या. आधीं आपण आपलें बळ अजमावून पाहूं. ज्याची आपणांस खोली माहित नाहीं अशा डोहांत आपण उतरूं नये. ध्येयें ही कांहीं कपड्यांसारखी साधी बाब नव्हे; कीं तीं मर्जी लागेल तशीं बदलावींत. त्यांच्यासाठींच राष्ट्रें मरावयास तयार होतात आणि युगेंच्या युगें त्यांच्या साठींच जगतात. आपलें सध्यांचें ध्येय व्यापक आहे. त्यांत अत्यंत दुबळ्यांचा आणि बलिष्ठांचाहि समावेश होतो. मौ. हजरत मोहानी यांच्या ध्येयांत दुबळ्यांना जागा नाहीं. "

असें जरा सविस्तर व उपांगांचें वर्णन देण्याचें कारण हेंच कीं, आधुनिक परिस्थितींत गांधींच्या विचारसरणीची कार्यसरणी कशी असूं शकेल ह्याचें हें सर्व देशाला उदाहरण होतें.

हकीम अजमलखान हे दे. बं. दास ह्यांच्या गैरहजिरींत बैठकीचे अध्यक्ष निवडण्यांत आलेले होते व वल्लभभाई पटेल हे स्वागताध्यक्ष होते. एकंदर ४७२६ प्रतिनिधी हजर होते.

### काँग्रेसमधील मुख्य ठराव

अर्थातच असहकारितेचा होता. ह्या ठरावानें काँग्रेसकडून कलकत्ता व नागपूर येथील काँग्रेसच्या असहकारितेच्या ठरावास पुन्हां मान्यता देण्यांत आली. ठिकठिकाणच्या सभाबंदीच्या आणि स्वयंसेवक पथकें गैरकायदेशीर ठरविणाऱ्या सरकारी ठरावांमुळें लोकांनीं शपथ पत्रिकेवर सह्या करून आणि स्वयंसेवक पथकांत नांवें नोंदवून व गाजावाजा न करतां तुरुंगांत जाऊन आणि काँग्रेस कमिट्यांच्या सभा व योग्य त्या ठिकाणीं शांतपणें जाहीरसभासुद्धां भरवून कायदेभंग करावा. अशा सभा इमारतींत, प्रवेश तिकिटें ठेवून व आगाऊ जाहीर करून भरविण्यांत याव्यात.

जुलमी सत्तेला प्रतीकार करण्यास सशस्त्र बंडाऐवजीं सविनय कायदेभंग हाच एक सुधारलेला व परिणामकारक मार्ग आहे. हिंदुस्थानसरकारचें सध्याचें बेजबाबदार स्वरूप बदलून टाकणें जरूर आहे असें ज्यांना वाटत असेल आणि ज्यांची अहिंसेवर पूर्ण श्रद्धा असेल अशा प्रत्येक मनुष्यानें व्यक्तिगत सविनय कायदेभंग करावा आणि ज्या ठिकाणीं इतर सर्व अटी पाळल्या गेल्या आहेत असें वाटेल त्याठिकाणीं सामुदायिक कायदेभंग सुरू करावा असें ह्या राष्ट्रीय सभेचें मत आहे.

व्यक्तिगत अथवा सामुदायिक कायदेभंग सुरू झाला असेल तेव्हां किंवा वर्किंग कमीटी अथवा प्रांतिक कमीटी वेळोवेळीं विशिष्ट हुकूम सोडील तेव्हां त्यांची अध्यप्रतेनें अंमलबजावणी व्हावी म्हणून इतर कार्यक्रम तहकूब ठेवण्यांत यावेत.

सर्व राष्ट्रीय शाळांतील १८ वर्षांवरील वयाचे विद्यार्थी व शिक्षक ह्यांनीं प्रतिज्ञापत्रकावर सह्या करून राष्ट्रीय स्वयंसेवक पथकांत नांवें दाखल करावींत.

काँग्रेसच्या बहुतेक प्रमुख कार्यकर्त्यांवर तुरुंगांत जाण्याची पाळी लवकरच येण्याचा संभव असल्यामुळें, राष्ट्रीय सभेची एकंदर कार्यपद्धति शक्य तोंपर्यंत

कायम राखावयाचीच. परंतु प्रसंगीं अडचण पडूं नये म्हणून महात्मा गांधी ह्यांस राष्ट्रीय सभेचे सरमुखत्यार नेमण्यांत येत आहे. त्यांना ऑ. इं. कॉं. कमीटीचे सर्व अधिकार व आपल्यामागें दुसरा सरमुखत्यार नेमण्याचे अधिकार देण्यांत येत आहेत; मात्र म. गांधी किंवा त्यांच्या मागून अधिकाराहढ होणारे सरमुखत्यार ह्यांस कॉंग्रेसच्या उद्देशपत्रिकेंत फरक करण्याचा अधिकार नाहीं आणि त्यांनीं सरकारशीं कोणत्याहि अटींवर तह केल्यास ऑ. इं. कॉं. कमीटीची संमति मिळून खुद्द कॉंग्रेसनें त्याला पसंती दिल्यावांचून तो राष्ट्राला बंधनकारक होणार नाहीं."

## वाद व मतभेद.

म. गांधींस सरमुखत्यार नेमण्याच्या ठरावाला महाराष्ट्र पक्षानें कसून विरोध केला व त्यांच्या विरोधामुळें त्यांच्या सर्वाधिकारित्वावर कांहीं बंधनें घालण्यांत आलीं. परंतु मुख्य वादाचा मुद्दा निराळाच होता.

वर्तुळमेज परिषदेच्या कल्पनेला गांधी सर्वस्वीं अनुकूल होते. असहकारितेच्या १ आगष्ट १९१९ च्या उपक्रमाचे वेळींच त्यांनीं व्हाइसरॉयांस तशी सूचना दिली होती. परतु त्यांच्या कांहीं प्राथमिक अटी होत्या. मालवीय शिष्टमंडळाची शिष्टाई व्हाइसरॉयांनीं धुडकावून लावल्यानंतर कॉंग्रेसने ठरावाच्या रूपानें ह्या प्रश्नाला चालना द्यावी म्हणून पं. मालवीय, बॅ. जिन्हा वगैरेंनीं शिकस्तीचे प्रयत्न केले.

हजारों पुढारी व कार्यकर्ते ह्यांस बेगुमानपणानें तुरुंगांत खेचलें जात असतां कॉंग्रेसनें आपण होऊन तडजोडीची तयारी दर्शवावी ही गोष्ट कोणत्या उत्साही राष्ट्रभक्तास पसंत पडणार ? तडजोडीची गोष्ट तर दूरच राहिली. परतु ह्या बेगुमान धोरणास उत्तर म्हणूनच की काय, कॉंग्रेसचें ध्येय बदलून स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य हें कॉंग्रेसचें ध्येय असावें असा ठराव मौ. हजरत मोहानी ह्यांनीं भर कॉंग्रेसमध्यें पुढें आणला. ह्या स्वातंत्र्याच्या ठरावास विरोध करतांना म. गांधी म्हणाले:—" आपण आधीं आपले बळ एकवटूं या. आधी आपण आपलें बळ अजमावून पाहूं. ज्याची आपणांस खोली माहित नाहीं अशा डोहांत आपण उतरूं नये. ध्येयें ही कांहीं कपडयांसारखी साधी बाब नव्हे; कीं जों मर्जी लागेल तशीं बदलावीत. त्यांच्यासाठींच राष्ट्रें मरावयास तयार होतात आणि युगेंच्या युगें त्यांच्या साठींच जगतात. आपलें सध्यांचे ध्येय व्यापक आहे. त्यांत अत्यंत दुबळ्यांचा आणि बलिष्ठांचाहि समावेश होतो. मौ. हजरत मोहानी यांच्या ध्येयांत दुबळ्यांना जागा नाहीं."

हा ठराव बहुमतानें नामंजूर झाला. मौ. हजरत मोहानी हे ह्याच वेळच्या खिलाफत परिषदेचे अध्यक्ष होते. अध्यक्षपदावरील आपल्या भाषणांत व पुढें खास बैठकींत त्यांनीं ह्या ठरावाचा पुन्हां पुरस्कार केलाच, परंतु तेथेंहि त्यांस बहुमत मिळालें नाहीं. ह्याच अध्यक्षपदावरील भाषणावरून त्यांजवर पुढें खटला झाला व शिक्षाहि झाली.

'१८ वर्षांवरील प्रत्येक मुसलमानानें स्वयंसेवक पथकांत दाखल व्हावें असा खिलाफत परिषदेनें एक ठराव केला.

### वर्किंग कमीटीचा ठराव

कॉंग्रेसच्या बैठकीनंतर तावडतोब वर्किंग कमीटीची बैठक होऊन तींत असा ठराव करण्यांत आला कीं, कायदेभंग करून स्वयंसेवक संस्था स्थापन करण्याचा कॉंग्रेसचा विचार असल्यामुळे कॉंग्रेसचें कार्य प्रत्यक्ष अंगावर घेऊन त्या कामास लागणारे आणि जरूर पडेल तरच व तेव्हांच तुरुंगांत सुद्धां जाण्यास तयार होणारे असे स्वयंसेवकांचे कार्यकारी व राखीव वर्ग करून नांवें नोंदविण्याची सुरुवात करावी. स्वयंसेवकांची निवड काळजीपूर्वक व्हावी. स्वयंसेवकांच्या याद्या सर्व प्रांतांतून पुऱ्या होण्यापूर्वी म्हणजे १५ तारखेपर्यंत कोणत्याहि प्रांतानें चढाईचा कायदेभंग सुरू करूं नये.

### मालवीय परिषद्.

करायला जावें एक तर होतें भलतेंच असा अनुभव घेण्याचा कटु प्रसंग पं. मदन मोहन मालवीय ह्यांजवर मुंबई शांतिपरिषदेमुळें ओढवला.

अहमदाबाद कॉंग्रेसनतर पं. मालवीय, बॅ. जिन्हा वगैरे तटस्थ पुढाऱ्यांच्या खटपटीनें वर्तुळमेज परिषदेची कल्पना मागें पडली तरी एक सर्वपक्षीय शांतता-परिषद भरविण्याची कल्पना नांवारूपास आलीच.

पंजाब प्रकरणांत आपल्या कार्यकारी कौन्सिलरीचा राजीनामा देऊन अत्यंत लोकप्रिय झालेले व पुढें स्टेट सेक्रेटरीचे सल्लागार होऊन राजमान्य राहिलेले सर शंकरन् नायर यांस पं. मालवीय यांनीं परिषदेचे स्पीकर अथवा केवळ सुव्यवस्थारक्षक नेमलें.

सर शंकरन् नायर हे एकवार लोकप्रिय होते व सध्यां राजमान्यहि होते. असा सर्वांगसुंदर अध्यक्ष वस्तुतः तटस्थ व निःपक्षपात वृत्तीचा नव्हता. मलबारमधील दंगे व अलीबंधूंची संगत ह्यामुळें सर शंकरन् नायर ह्यांचें मत म. गांधीविषयीं अत्यंत कलुषित झालेलें होतें.

ह्या परिषदला तटस्थांशिवाय बरेच नेमस्त पुढारी आणि असहकारी पुढारी हजर होते. हजर असलेल्या असहकाऱ्यांनीं परिषदेच्या प्रत्यक्ष कार्यांत भाग घ्यावयाचा नाहीं; फक्त आपलें म्हणणें परिषदेपुढें मांडावयाचें असें ठरविलें होतें व ह्या कामीं म. गांधी ह्यांसच फक्त त्यांनीं पुढाकार दिला होता. परिषदेंत प्रत्यक्ष भाग घेऊन आपण तडजोडीस उत्सुक झालों आहोंत असा प्रतिपक्षानें गैरसमज करून घेण्यास जागा देण्याची त्यांची इच्छा नव्हती. ह्याच्या उलट सरकारनें तर आपली बाजू परिषदेपुढें मांडण्याचीसुद्धां तसदी घेतली नव्हती. ह्यामुळें ह्या परिषदेला व त्यांच्या ठरावाला केवळ स्वतंत्र व नेमस्त पक्षानें सरकार व असहकारी ह्यांस उद्देशून केलेले शिफारसी वजा ठराव असेंच स्वरूप प्राप्त झालें होतें.

परिषदेचें स्वरूप प्रारंभापासूनच असें झालेलें असल्यामुळें म. गांधी आपली बाजू परिषदेपुढें मांडूं लागले तेव्हां त्यांच्या कोणत्याहि मुद्याला हरकत घेण्याचें त्यांना कारणहि नव्हतें व तसा त्यांना अधिकारहि नव्हता. असें असूनहि म. गांधींनीं आपली बाजू पुढें मांडतांना अलीबंधूंच्या सुटकेचा प्रश्न उपस्थित करतांच सर शंकरन् नाय्यर हे रागानें लाल झाले आणि सभेंतून उठून गेले. व सर विश्वेश्वर अय्या यांचे अध्यक्षतेखालीं परिषदेचें पुढील कार्य पार पाडावें लागलें.

एकंदर सभेचें कार्य राजद्रोही व टाकाऊ आहे असा खुद्द अध्यक्षांनींच आपल्या वर्तनानें व पुढें वर्तमानपत्रांतून माजविलेल्या वादविवादानें जाहीर केल्यानंतर परिषदेच्या ठरावांस महत्व तरी यावें कसें ?

सर शंकरन् ह्यांनीं त्यावेळीं चिडून वर्तमानपत्रांतून कित्येक लेख लिहिले व पुढें गांधी आणि अराजकता हें पुस्तक प्रसिद्ध करून गांधींना अद्याप न पकडण्यांत सरकारनें मोठीच चूक केली आहे असें आपलें मत देऊन टाकलें !

" मुंबई येथें भरलेली ' शांतता परिषद ' ही एका भावी वडया शांतता-परिषदेच्या प्रस्तावनेसारखी होती. पण ही वडी परिषद भरविण्यास कौन्सिलांतच विरोध झाल्यामुळें, ग्रंथाशिवाय ग्रंथाची नुसती प्रस्तावना प्रसिद्ध केल्याप्रमाणेंच, मुंबईची परिषद सकृद्दर्शनीं निष्फळ किंबहुना कित्येकांच्या दृष्टीनें हास्यास्पदहि ठरली. पण अशा परिषदेचा विचार आमच्या मतें थोडया वेगळ्या दृष्टीनेंच करावयास पाहिजे. या परिषदेची खरी जबाबदारी, तिची मूळ कल्पना ज्यांनीं काढली व निमंत्रणें पाठविलीं त्यांच्यावरच होती, व त्यांच्या हेतूच्या दृष्टीनें

जरी ती सर्वस्वी सफल झाली नाहीं, तरी अशा बिकट परिस्थितींत, या सत्प्रवृत्त गृहस्थांनीं त्यांना शक्य तितकें सर्व कांहीं केलें याविषयीं वाद नाहीं; व त्याकरितां त्यांचे आभार हि मानले पाहिजेत." —केसरी २४-१-२२

ह्या मालवीय परिषदेनें नेमलेल्या खास कमीटीनें परिषदेचे ठराव हिंदुस्थान सरकारपुढें मांडून त्या ठरावांतील मुद्यांवर ३१ जानेवारीच्या आंत वर्तुळमेज परिषद बोलावण्याची खटपट करावी व तोंपर्यंत म. गांधींनीं बार्डोली येथील कायदेभंग तहकूब ठेवावा इतकें ह्या परिषदेंत गांधींनीं तडजोडीचें धोरण स्वीकारून माघार घेण्याचें कबूल केलें. मुंबई क्रॉनीकलनें म्हटल्याप्रमाणें लॉर्ड रेडिंग व त्यांची प्रभावळ यांस हिंदी प्रश्नाचा खरोखरच निकाल लावावा असे मनापासून वाटत असेल व जरुर तें करण्यास ते तयार असतील तर मुंबईच्या परिषदेनें त्यांस दार मोकळें करून दिलें आहे. नोकरशाहीची मनोरचना पालटली पाहिजे असें महात्माजींनीं अह- मदाबादेला सांगितलें व ती संधी बदलली आहे हें कसें दाखवावयाचें हें या परिषदेंत अगदीं स्पष्ट झालें आहे.

### वर्किंग कमीटीचा ठराव

मालवीय परिषदेनें उपस्थित झालेल्या परिस्थितीचा विचार करण्याकरितां ऑल-इंडिया काँग्रेस कमिटीच्या वर्किंग कमिटीची सभा ता. १७ रोजीं म. गांधी यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. सभेस नऊ सभासद हजर होते. खालील प्रमाणें ठराव पास झाले—

१ हल्लींच्या कठिण परिस्थितीचा विचार करण्याकरितां, राष्ट्रांतील निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या गृहस्थांची परिषद बोलावण्याचे बाबतींत पंडित मदनमोहन मालवीय व त्यांचे सहकारी यांनीं जी खटपट केली तिजबद्दल वर्किंग कमिटी त्यांचे आभार मानीत आहे. त्या परिषदेच्या ठरावांस अनुलक्षून ही कमिटी असा ठराव करते कीं, अहमदाबादच्या राष्ट्रीय सभेनें ठरविलेली चढाईची कायदेभंगाची चळवळ जानेवारीच्या ३१ तारखेपर्यंत किंवा मालवीय कॉन्फरन्सनें सर्वपक्षीय परिषद भरविण्याची व्यवस्था करण्याकरितां नेमलेल्या कमिटीचें काम संपेपर्यंत (जी तारीख अगोदर येईल तोंपर्यंत) तहकूब करावी.

२ सर्वपक्षीय परिषद यशस्वी होण्याकरितां वातावरण अनुकूल करण्यास खालील उपाय योजावे-(अ) ज्या जाहिरनाम्याखालीं व वटहुकुमाखालीं स्वयंसेवकसंघ, मद्यपानबंदी, जाहीर सभा व काँग्रेसच्या इतर नेहमींच्या चळवळी हीं सर्व बंद करण्यांत आलीं आहेत ते सर्व परत घेण्यांत यावे, व त्यांच्याखालीं कैद झाले-

त्यांस अगर खटला चालू असलेल्यांस सोडून देण्यांत यावें; (आ) अलीबंधू-सह 'फतव्याच्या बाबतींत तुरुंगांत असलेल्या सर्वांस मुक्त करण्यांत यावें; (इ) मालवीय कॉन्फरन्सच्या तिसऱ्या ठरावांत नमूद केल्याप्रमाणें अनत्याचारी चळवळीमुळें अटक झालेल्या सर्व लोकांची व्यवस्था करण्यांत यावी; (ई) सरकारने वरीलप्रमाणें तजवीज करतांच, सर्वपक्षीय परिषद बोलाविण्यांत आल्यास त्या परिषदेचा निकाल लागेपर्यंत सर्व हरताळ, मद्यपानबंदी, कायदेभंग हीं थांबविण्यांत यावीं.

३ रे राष्ट्रीय सभेच्या मागण्या काय आहेत याविषयीं गैरसमजूत होऊं नये म्हणून राष्ट्रीय सभेच्या व्यासपीठावरून स्वराज्य, खिलाफत व पंजाब याविषयीं ज्या मागण्या वारंवार करण्यांत आल्या आहेत त्यांजकडे मालवीय कॉन्फरन्सनें नेमलेल्या कमिटीचें लक्ष ही सभा वेधीत आहे. व या कमिटीचें असेंहि म्हणणें आहे कीं, राष्ट्रीय सभेच्या व खिलाफतीच्या प्रतिनिधींना त्यांचें कर्तव्य म्हणून याच मागण्या पूर्णपणें मागाव्या लागतील.



## प्रकरण २८ वें.

# आधुनिक कुरुक्षेत्र–बारडोली



अहमदाबाद कॉंग्रेसमध्यें कायदेभंगाचा ठराव होतांच ठिकठिकाणीं त्यासंबंधानें तयारी सुरू होती. मध्यस्थ परिषदेंतील ठरावांनीं किंवा त्या ठरावामुळे कायदेभंगाची तारीख पुढें ढकलली गेली तरी कायदेभंगाची तयारी बारडोली तालुक्यांत खुद्द महात्माजींनीं सुरू केली व इतरत्रहि सुरूच होती.

"मुंबईस 'मध्यस्थपरिषद' भरल्यावेळीं सरकारकडून अनुकूल उत्तर येईपर्यंत वाट पहावी म्हणून महात्मा गांधींनीं कायदेभंगाची चळवळ ता. ३१ जानेवारीपर्यंत तहकूब ठेवण्याचें ठरविलें होतें. त्यावर अद्यापि सरकारकडून कांहीं अनुकूल उत्तर आलें नाहीं, येईलसें लक्षणहि दिसत नाहीं, व ता. ३१ येऊन ठेपली; तेव्हां आपल्या पूर्वीच्या कार्यक्रमाप्रमाणें गुजराथेंत बारडोली तालुक्यांत कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याची तयारी करावी म्हणून म. गांधी व पटेल यांनीं बारडोलीस जाऊन पाहणी केली आणि तेथील तालुका परिषदेंत कायदेभंगाचा ठरावहि पास झाला. महाराष्ट्र प्रां. कॉं. कमिटीनें जळगांव तालुक्याची पाहणी करण्याचें ठरविलें आहे. कायदेभंगाच्या चळवळीस प्रारंभ करण्याला मद्रास प्रांतांतील गुंटूर जिल्ह्यांतले रहिवासी अगदीं एका पायावर तयार आहेत. त्यांनीं अशापप्रायतों आपला जमीन महसूल दिला नाहीं, व तो देण्याचा नाकारण्याचें त्यांनीं ठरविलें आहे. गुंटूर जिल्ह्यांतील ही तयारी पाहून मद्राससरकारनेंहि जे कोणी जमीनमहसूल न देतील त्यांच्या जमिनी एकदम जप्त करण्याची व त्या निकृष्ट वर्गाला अथवा महायुद्धांतून परत आलेल्या शिपायांना देण्याची नव्या कायद्यानें तजवीज करून ठेवली आहे. गुजराथभागाच्या कमिशनरांनीं इतकी दूरदृष्टि दर्शविली नसली तरी कापसाचें उभें पीक जप्त करून शेतसाऱ्याचें तिप्पट चौपट रक्कम वसूल होईल हें हेरून ठेवून शेतसारा दिल्याशिवाय शेतांतील माल हलवावयाचा नाहीं असा मनाईहुकूम सोडला

आहे. इतर अनेक प्रकारांनीं अनेक ठिकाणीं कायदाभंग चालू आहे; परंतु जमीनमहसूल देण्याचें नाकारणें ही कायदेभंगाची शेवटची पायरी असल्यामुळें या चळवळीचा परिणाम काय होतो हें पाहण्याकडे सर्व देशभक्तांचे डोळे लागून राहिले आहेत." केसरी ३१-१-२२

म. गांधींच्या इच्छेवरून इतर सर्व ठिकाणचें प्रयत्न थांबविण्यांत आले व राष्ट्राचें सर्व लक्ष बार्डोलीकडे लागून राहिलें.

बारडोलीची पूर्व तयारी व अखेर निकाल ह्यासंबंधानें केसरी पत्राच्या खास खातमीदारानें फार सुंदर, निरीक्षक व निःपक्षपात दृष्टीनें हकीगत प्रसिद्ध केली होती. तीच ह्या ठिकाणीं देण्यांत येत आहेः—

## बारडोलीची पूर्वतयारी.

मु. बारडोली ता. ९।२।२२

आज सगळ्या हिंदुस्थानचें लक्ष साहजिकच बारडोलीकडे लागलें आहे. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं अनत्याचारी असहकारितेची शेवटची पायरी म्हणजे सामुदायिक कायदेभंग या आठवड्यांत बारडोलीस सुरू करणार, व शांततेच्या बंडाचे निशाण उभारून हिंदुस्थानालाच काय, पण निःशस्त्र केल्या गेलेल्या सर्व गुलाम राष्ट्रांना, स्वातंत्र्याचा नवीन मार्ग घालून देणार, आणि बारडोली हें हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्ययुद्धाचें रणक्षेत्र बनणार या कल्पनेनें सर्वांचें तिकडे लक्ष वेधलें आहे. पण एक गोष्ट खरी कीं बारडोलीचा जयजयकार जितका महाराष्ट्रांत, जितका मुंबईस ऐकू आला तितका बारडोलीजवळ ऐकू येत नाहीं ! अशी एक कल्पना दूरच्या माणसाची सहज होते कीं, आज ज्या जिल्ह्यांत बारडोली आहे त्या सुरत जिल्ह्यांत एक विशेष प्रकारची धामधूम चालू असेल पण तशी स्थिति नाहीं. सुरत बारडोलीपासून तीस मैलावर आहे, पण खुद्द सुरतेस या कायदेभंगाबद्दल लोकांत फारशी औत्सुक्यवृत्ति दिसत नाहीं. याचा अर्थ लोकांना काळजी वाटत नाहीं असा नसून, महात्माजींच्या अनत्याचारी चळवळीचा असा विलक्षण परिणाम झाला आहे कीं, लोकांना स्वार्थत्यागाचा बाऊ मुळींच वाटेनासा झाला आहे. खुद्द बारडोलीस किंवा आसपासच्या गांवांसहि लोकांना कायदेभंगाबद्दल होणाऱ्या शिक्षांचें कांहींच वाटत नाहीं. दुसरी गोष्ट स्पष्ट आहे कीं, येथील लोकांचा महात्माजींच्या शब्दावर एवढा विश्वास आहे कीं, महात्माजी सांगतील तें करण्यास हा तालुका तयार आहे.

### बारडोलीची परिस्थिति.

बारडोली तालुका या कायदेभंगास अनेक दृष्टींनीं अगदीं योग्य असें क्षेत्र आहे. महाराष्ट्रांत दिसणारा ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद या ठिकाणीं ऐकूंहि येत नाहीं. उलट ब्राह्मण ब्राह्मणेतर, पाटीदार, वैश्य वगैरे सर्व जाती एकमेकांशीं अत्यंत प्रेमानें वागतात. निसर्गाच्या कृपाप्रसादानें सर्व तालुका समृद्ध असल्यानें, दुष्काळाचें नांवच नाहीं, व मोठमोठे जमीनदार स्वतःच घरीं शेती करतात, या जातींशिवाय मुसलमान समाजहि बराच आहे. पण तोहि सुखी आहे. याशिवाय दुबळा नांवाचा शेतीवर मजुरी करणारा वर्ग बराच मोठा आहे; पण हा सर्व वर्ग या पाटीदार वर्गावर सर्वस्वी अवलंबून असल्यानें पाटीदाराचा शब्द त्यांना मान्य असतो. अशा स्थितींत गांवोगांव राष्ट्रीय सभेच्या शाखा स्थापन झाल्या कारणानें अगदीं समाजाच्या शेवटच्या थरापर्यंत नवीन चैतन्य पोचलें आहे. स्वभावतःच हा तालुका कायदेबाजीच्या व्यसनापासून मुक्त आहे. खून, दरोडा, घरफोडी वगैरे भयंकर अपराधांचें नांव वर्षांतून एकादे वेळेलाहि ऐकूं येत नाहीं. दिवाणी दाव्याचा आंकडाहि ५०—७५ च्या आंत आहे. दारूचें व्यसन फक्त दुबळ्यांत आहे. तात्पर्य, सत्प्रवृत्त सुखी लोक, दुही-भांडाभांडीचा अभाव व स्वभावोद्भूत अनत्याचारित्व असा त्रिवेणी संगम बारडोलींत आहे.

महात्मा गांधींच्या हातीं राष्ट्रीय चळवळीचीं सूत्रें आल्या दिवसापासूनच हा तालुका राष्ट्रीय कार्यक्रमांत अग्रेसर आहे. याचें कारण महात्मा गांधींच्या कार्यकर्तृत्वाबद्दल अत्यंत विश्वास हें होय. येथें थोडे ताम राहणाऱ्या माणसालासुद्धां आढळून येतें कीं, महात्माजींवर बारडोली तालुक्यांतील लोकांची देवतुल्य श्रद्धा आहे. महात्माजी जें सांगतील तें दिव्य करण्यास ते तयार आहेत. 'सरकार गोळीबार करील तर काय कराल' असा प्रश्न विचारल्यास 'महात्माजी असतांना गोळीबार होणें शक्य नाहीं,' असें हे सांगतात! महात्माजी चमत्कार करूं शकतात अशीहि कल्पना आहे. महात्माजींना पकडून नेलें तरी त्यांची आज्ञा आपण शब्दशः पाळूं असें लोक म्हणतात. मुसलमान मंडळींपैकीं पुष्कळ लोक दक्षिण आफ्रिकेंत जाऊन आले आहेत, व त्यांनीं येतांना दक्षिणआफ्रिकेंतील महात्माजींच्या यशाचें श्रेय आणलें आहे. साहजिकच अशा स्थितींत महात्माजींच्या शब्दावर बारडोली तयार आहे यांत आश्चर्य नाहीं.

### पाटलांचा पुरावा.

महात्माजींनीं याच कारणाकरितां बारडोली हा तालुका पसंत केला आहे.

अनत्याचारिता व हिंदुमुसलमानांची जूट, या दोन अटी या तालुक्यानें पुऱ्या केल्या आहेत. कोर्टावर जवळ जवळ पूर्ण बहिष्कार आहे, व मुलांपैकीं ९० टक्के मुलें राष्ट्रीय शाळेंत शिकत आहेत. महात्माजींवरील श्रद्धेमुळें निर्भयता आहे. यानंतरची परीक्षा अर्थात् खादीची व अस्पृश्यतेची होय. हा प्रांतच कापसाचा असल्यामुळें कापूस पुष्कळ होतो. पण लोक रहाटावर फारसें सूत काढीत नाहींत. विणण्याचें काम तर नाहींच नाहीं. पण महात्माजींनीं ही अटच घातल्यानें बारडोली या अटी पुऱ्या करण्याकरितां शक्य ती खटपट करीत आहे. आज रहाट सर्वत्र सुरू झाले आहेत. मागहि सुरू आहेत; पण या बाबतींत पूर्वाभ्यास नसल्याने आज खादी तालुक्यास पुरेल इतकी तयार होत नाहीं. तथापि महात्माजींची अट पुरी करण्याचा लोकांचा निश्चय असल्यानें खादीची पैदास जोरानें वाढत आहे.

अस्पृश्यता चालविणें ही मात्र खरी परीक्षा होती व याच परीक्षेवर सर्व अवलंबून राहिलें होतें जर लोकांनीं आपखुषीनें अस्पृश्यता काढून टाकली तर ते वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार होतील यांत शंका नाहीं. महात्माजींनीं व स्थानिक पुढाऱ्यांनीं सांगतांच एका क्षणांत अस्पृश्यता नाहींशी झाली, बाजारहाट वगैरे ठिकाणीं ताबडतोब अस्पृश्य स्पृश्य झाले. एवढ्यावरच भागलें नाहीं. दहावीस गांवांचे बायकापुरुष एकत्र जमवून महात्माजींनीं विहिरीवर एकत्र पाणी भरण्याची तयारी आहे का असें विचारतांच एक क्षणभर त्यांनीं कांकूं केलें. पण लगेच, जर यांत पातक असेल तर तें महात्माजी काढून टाकतील असें म्हणून सर्वांनीं संमति दिली. व प्रत्यक्ष पाणी भरलें. या परीक्षेनंतर मात्र बारडोलीबद्दल बिलकुल शंका राहिली नाहीं. व बारडोली तालुकाच मुक्रर करण्यांत आला.

गेल्या महिन्याच्या २६ तारखेपासून महात्माजींचा मुक्काम बारडोलीस आहे. महात्माजींबरोबरच सुरतचे पुढारी श्री. दयाळजी हे असून शिवाय श्री. विठ्ठलभाई पटेल हे आहेतच. श्री शंकरलाल बँकर हेहि काम करीत आहेत, पण आजकाल श्री. विठ्ठलभाईंवर सर्व भर आहे. महात्माजींनीं व्हाइसरॉय साहेबांना दिलेलें उत्तर हाच बारडोलीच्या जोराचा पुरावा आहे. महात्माजी मुंबईस पडितजींना भेटण्याकरितां गेले आहेत. गोरखपूर व बरेली येथील दंग्यांचा त्यांच्या मनावर अत्यंत परिणाम झालेला आहे. अनत्याचारितासंबंधानें महात्माजींचा आग्रह असल्यानें पुनः ते कायदेभंग पुढें ढकलतात कीं काय यांची येथें भीति

वाटत आहे. लोकांची पूर्व तयारी असल्यानें त्यांची फारच निराशा होणार यांत शंका नाहीं. ता. ११ ला काय करणार याची कल्पना कोणासच नाहीं; मात्र महात्माजी सांगतील तें काम करण्यास सर्वांचीच तयारी आहे. ता. ११ ला वर्किंग कमीटीची सभा बोलावली आहे. पाहावें ती काय ठरविते तें.

ता. १०।२।२२.

## पूर्वतयारीची परीक्षा.

अकोटी हा गांव बारडोलीपासून १२ मैलांवर आहे. या गांवीं गुरुवार ता. ९।२।२२ रोजीं भोंवतालच्या २०।२५ गांवांतून त्या त्या गांवचे पुढारी बोलाविले होते. सभेस सुमारें १००० लोक हजर होते, त्यामध्यें १००।२०० बायकाहि दिसत होत्या. अस्पृश्यांपैकीं पांचपन्नास लोक हजर होते. सभेचा पहिला विशेष हा होता कीं, सभेंत सर्वत्र खादीचें साम्राज्य दिसत होतें. महात्मा गांधींच्या शुद्धस्वरूपी चळवळीचें बाह्य चिन्ह जी खादी, त्या खादीचा सभेमध्यें पसरलेला समुद्र पाहतांना कोणालाहि आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. बायकाहि रहाटांचा छाप असलेल्या साड्या नेसल्या होत्या. शांततेच्या लढ्याला सुरुवात करण्यापूर्वी महात्माजींनीं घातलेल्या अटींचें माप पुरेपूर बारडोलीच्या लोकांनीं टाकलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं सभेंत सर्वत्र अवर्णनीय शांतता होती.

सभेचें अध्यक्षस्थान अकोटी गांवचे पुढारी रामाभाई यांना देण्यांत आलें होतें. विठ्ठलभाई पटेल यांनीं महात्माजींचें अनुकरण करून बसूनच व्याख्यानास सुरुवात केली! प्रथमतः त्यांनीं अस्पृश्यतेबद्दल गांवाची स्तुति केली व अस्पृश्य लोक समाजाच्या अगदीं मध्यभागीं येऊन बसतील तो सुदिन असें तें म्हणाले. नंतर त्यांनीं कर न दिला तर कोणतीं संकटें ओढवतील, तसेंच या शांततेच्या लढ्यांत किती त्रास होतील याचें उत्तम चित्र रेखाटलें. टाळ्या वाजविण्याचा इकडे प्रघात नसल्यामुळें लोकांत किती उत्साह होता हें कळणें शक्य नव्हतें. तथापि पटेल यांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व संकटांना तोंड देण्याची त्यांची तयारी होती हें स्पष्ट दिसत होतें. शंकरलाल बँकर यांनीं राष्ट्रीय सभेनें घातलेल्या सर्व अटी स्पष्टपणें समजावून सांगितल्या. दक्षिणआफ्रिकेंत महात्माजींबरोबर काम केलेले मिया इमामसाहेब यांनीहि उर्दूत भाषण करून लोकांस उत्तेजन दिलें. पुण्याचे गोखले व मुंबईचे मडलिक यांनाहि बोलण्याचा आग्रह केल्यावरून या शांततेच्या युद्धांत बारडोलीस जय मिळाल्यास निःशस्त्र हिंदुस्थान स्वतंत्र करण्याचें श्रेय बारडोलीस मिळणार आहे, व यांत यश कसें येईल

हें सांगितलें. सुरतचे सुप्रसिद्ध पुढारी दयाळजी यांनींहि लोकांमध्यें आपल्या तेजस्वी भाषणानें उत्साह उत्पन्न केला. नंतर लोकांतर्फे तेथील पुढारी जीवनजी वगैरे मंडळींनीं कायदेभंग व्यवस्थित चालविण्याचें आश्वासन दिल्यावर सभा बरखास्त झाली.

मंडळी परत येतांना वाटेंत साकी या गांवीं तेथील मंडळींच्या आग्रहावरून उतरली. पटेल यांनीं अस्पृश्यतेचा दोष लोकांच्या मनांतून अजीबात निघून गेला आहे किंवा नाहीं हें पाहण्याकरितां त्या गांवांतील कांहीं घरंदाज लोकांना व वृद्ध स्त्रियांना प्रश्न विचारले. अस्पृश्यता आपण मानीत नाहीं असें त्यांनीं सांगितलें. पण पुरी परीक्षा पाहण्याच्या उद्देशानें अगदीं सत्त्व पाहणाऱ्या दुर्वास ऋषीप्रमाणें पटेलसाहेबांनीं गांवच्या मुख्य विहीरीवर प्रत्यक्ष अंत्यजानें पाणी भरलेलें पाहिल्याशिवाय आपलें समाधान होणार नाहीं असें सांगितलें. अर्थात् अंत्यजाला बोलावून त्याच्याकडून पाणी समक्ष काढविलें. महात्माजींवर येथील लोकांची किती अपरंपार श्रद्धा आहे याचें हें एकच उदाहरण बस आहे. याचें कारण ही सगळी क्रांति ता. २९ नंतरच्या केवळ १०।१२ दिवसांतली आहे.

खुद्द बारडोलीस तालुक्यांतील इतर खेड्यांप्रमाणें या कायदेभंगाचा जोर दिसत नाहीं. याचा अर्थ बारडोलीस कांहीं नाहीं असें नाहीं. बारडोलीच्या लोकांनींहि बहुमतानें कर न देण्याचा ठराव केला आहे, पण हें बहुमत आहे. तालुक्यांतील खेडेगांवीं मात्र लोकांनीं कर न देण्याच्या शपथा घेतल्या आहेत. या ठिकाणीं एक विशेष गोष्ट नमूद केली पाहिजे ती ही कीं, या शांततेच्या युद्धांतील प्रतिपक्षी जें सरकार त्यांचें नेहमींचें अक्राळविक्राळ स्वरूप या ठिकाणीं दिसत नाहीं. काळ्या व खाकी डगल्याचे पोलीस, संगिनी लावलेले लष्करी लोक किंवा सर्व कामांत आपल्या अस्तित्वानेंच हातभार लावणारे सफेत पोषाखांतील आमचे सी. आय. डी. मित्र हे पाहण्यासहि मिळत नाहींत. काय कारण असेल तें सांगतां येत नाहीं. पण सरकारच्या या मंडळींनीं या चळवळीशीं असहकारिता केली आहे असें स्पष्ट दिसतें. येथील मेस डिस्ट्रिक्ट ऑफिसर *मि. शिवदासानी यांनीं अगदीं शांततेच्या मार्गानीं आपण चळवळ फोल करून दाखवितों, असें सरकारास आश्वासन दिलें आहे असें म्हणतात !

*महात्मा गांधी यांना शिक्षा झाल्याबरोबर त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला व पेन्शन पेन्शचेंहि नाकारलें.

## प्रकरण २९ वें.

# अत्याचार.



अनत्याचार हा म. गांधींच्या तत्वज्ञानाचा, जीवनकार्यांचा, राजकारणाचा आणि असहकारितेचा आत्माच होय. ह्यासाठींच म. गांधींनीं अहिंसामंत्राचा प्रारंभापासून अगदीं बोलणाराच्या 'दातांच्या कण्या होतील' व ऐकणारांचे 'कान किटतील' अशा रीतीनें उपदेश चालविला होता.

वंगभंगाची चळवळ व त्यानंतरची होमरूलची चळवळ ह्या दोहोंच्याहि संयुक्त परिणामांस सहजच मागें टाकील इतकी विलक्षण जागृति महात्माजींच्या चळवळीनें झालेली होती; स्वार्थत्यागाला मर्यादा उरलेली नव्हती व राष्ट्रकार्यासाठीं प्राणत्यागापर्यंतहि जनतेची अत्यंत मोठया प्रमाणावर तयारी होती. आणि असें असूनहि ह्या एकदर चळवळीच्या इतिहासांत राजकीय हेतूनें, जाणूनबुजून केलेला असा एकहि खून, एकहि बाँबचा स्फोट किंवा एकहि गुप्त कट कोठें झाला नाहीं. जिन्हाळ्याच्या धार्मिक बाबींशीं प्रसंग, कडव्या, धर्मवेड्या व अज्ञ अशा समाजांशींहि व्यवहार असून ही स्थिति. 'गांधींच्या अनत्याचाराच्या उपदेशानेंच देशांतील अराजकतेचा, अत्याचारी पथाचा आणि अत्याचारांनीं हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळवून देतां येईल ह्या कल्पनेचा बीमोड केला' असें मि. रशब्रुक बुइलियम्स हे खास सरकारी हिंदी वार्षिक अहवालांत स्पष्टपणें कबूल करतात.

### म. गांधी यशस्वी झाले काय?

म. गांधींची हिंदुस्थानांतील चळवळ यशस्वी झाली काय? ह्या प्रश्नाचें उत्तर सत्य व अहिंसा ह्या दोन तत्वांवर दृष्टी ठेवूनच द्यावयाचें तर होय असेंच द्यावें लागेल. ह्या प्रचण्ड व व्यापक चळवळींत म. गांधींची सत्यनिष्ठा अगदीं १०० नंबरी ठरली आणि बाँब, खून व गुप्तकट ह्यांच्या दृष्टीनें त्यांचा अहिंसावादहि यशस्वी झाला असेंच म्हणावें लागतें.

आतां ह्या सत्यनिष्ठेनें आम्हांला भोळसट आणि अहिंसेनें नामर्द बनविलें किंवा काय हा प्रश्न उपस्थित होतो. परंतु ज्या चळवळीनें तुरुंग हें सामान्य जनतेला क्रीडांगण बनवून दिलें, हजारों लोकांना ज्या चळवळीनें देहदंड व शारिरिक आणि मानसिक धोके अत्यंत मोठ्या प्रमाणांत सहन करण्यास शिकविलें त्या चळवळीनें राष्ट्राला नामर्द बनविलें असें म्हणणें म्हणजे नामर्द शब्दाचा अर्थच बदलण्यासारखें आहे.

म. गांधी व गांधींचा असहकार ह्यांच्या मुळावर उठलेल्या प्रतिपक्षानें मात्र ह्या दोन्ही बाबतींत, विशेषतः अहिंसेच्या बाबतींत गांधींची चळवळ अपयशी ठरविण्याचे प्रयत्न कसून केले. आणि ह्याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून हेंच आहे कीं, गांधींच्या चळवळीचा जोम व अजिंक्यपणा हा सर्वांशीं अनत्याचारांत सांठविलेला आहे. अत्याचार चिरडून टाकणें हें बलाढ्य सरकारला पुष्कळच सुलभ आहे; परंतु अत्यंत परिणामकारक पण अनत्याचारी अशी कोणतीहि चळवळ दडपून टाकणें, नैतिक अधिष्ठानाच्या व मानसिक उत्तेजनाच्या अभावीं अशक्यच होतें. प्रतिपक्षाच्या ह्या प्रवृत्तीमुळेच कोठेंहि दंगा झाला तरी त्याचा संबंध असहकारितेशीं जोडावा अथवा कोणत्याहि प्रसंगीं मोठ्या शांत किंवा संतप्त जमावांना अनत्याचारि राहण्याच्या त्यांच्या प्रयत्नांत सहाय्य करूं नये अशी प्रवृत्ति चळवळीच्या उत्पत्तीपासूनच दिसून येत होती.

मालवीय परिषदेनंतर म. गांधींवर आग पाखडणाऱ्या व आतां सर मायकेल ओडवायर ह्यांच्या बदनामीच्या फिर्यादीस कारणीभूत झालेल्या " गांधी व अराजकता " ह्या आपल्या पुस्तकांत सर शंकरन नायर ह्यांनी तर अनत्याचारी गांधींच्या चळवळीशीं त्यांच्यामतें संबंध येणाऱ्या अशा १०० लहान मोठ्या दंग्यांची यादी देऊन

गांधींच्या अपराधाची शंभरी भरली.

आतां ते प्रायश्चित्ताला पात्र झाले आहेत असें सूचविलें होतें. ह्या यादींतील *स्टेटमेंटच्या प्रमाणाची येथें चिकित्सा करण्याचें कांहींच कारण नाहीं.*

गांधींच्या असहकारितेशीं जबरदस्तीनें संबंध जोडण्यांत आलेला असा पहिला दंगा डिसेंबर ( १९२० ) च्या शेवटच्या आठवड्यांत रायबरेली जिल्ह्यांत झाला.

अयोध्याप्रांतांतील तालुकदाराविरुद्ध फार दिवसांच्या गाऱ्हाण्यांमुळें त्या प्रांतांतील रयत फार कंटाळली होती. डिसेंबरमध्यें अयोध्या शहरांत भरलेल्या

रयतसभेला एक लाख रयत जमा झाली होती ! ह्या किसानांच्या चळवळींत १०-१२ ठिकाणीं किरकोळ लूटालुटीहि झाल्या आणि त्यांपैकींच एका प्रसंगीं फुरसतगंज व मुनशीगंज ह्या ठिकाणीं पोलीसनें गोळीबार करून ९ इसम ठार व १५–२० जखमी केले. व ६६० लोकांची धरपकड करून पुढें त्यांस सोडून देण्यांत आलें. संयुक्त प्रांतांतील किसानांची ही चळवळ पुढें फारच वाढत जाऊन स्थानिक कायदे कौन्सीलांत त्यांच्या गाऱ्हाण्यांसंबंधानें एक कायदाहि करण्यांत आला. व तेथील नेमस्त व जमीनदार पक्षांत विलक्षण तेढ उत्पन्न झाली.

ह्यानंतरचा रक्तपाताचा मोठा प्रसंग म्हणजे नानखाना येथील अकाली शिखांची तेथील गुरुद्वाराच्या महंतानें केलेली राक्षसी कत्तल हा होय. सेंट्रल शिखलीगनें पुढें अक्टोबरमधील बैठकींत असहकारितेचा पुरस्कार केला व ते कट्टे असहकारी बनले हें खरें परंतु ह्यावेळीं शिरोमणी गुरुद्वार प्रबंधक कमीटी व शिख गुरुद्वारांची सुधारणा करण्याचे तिचे प्रयत्न हे सत्याग्रही स्वरूपाचे परंतु शुद्ध धार्मिक होते.

## राजशाही.

मार्च ( १९२१ ) महिन्याच्या प्रारंभीं राजशाही तुरुंगांतील ६६९ कैदी दंगा करून पळून गेले होते व त्यांजवर गोळीबार करण्यांत आला होता. आतां चोहोंकडे गांधी राज्य झालें आहे अशी कैद्यांची समजूत झाली होती असें ह्या प्रकरणांत सरकारनें नेमलेल्या कमीटीनें एक विधान केलें होतें !

## नागपूर.

नागपूर येथें ता. २७ मार्च रोजीं रात्रीं दारूच्या ६ दुकानांवर लोकांनी हल्ला केला. दुसरे दिवशीं विणकरी मोहोल्यांत संशयित आरोपींना पकडण्याकरितां पोलीस गेले असतां लोकांनीं त्यांजवर एकदम हल्ला केला असें सरकारी रिपोर्टांत म्हटलें आहे. पोलिसांनीं गोळ्या झाडल्या. त्यामुळें १० इसम मेले व १५।२० जखमी झाले. मेलेल्या लोकांना स्मशानांत पोंचविण्यास २०००० लोक जमले होते.

बॅ. बॅप्टिस्टा ह्यांच्या अध्यक्षतेखालीं कॉंग्रेस कमीटीतर्फे नेमलेल्या लोकपक्षीय चौकशी कमीटीनें ह्या प्रकरणाची जाहीर चौकशी करून गोळीबार कसा अनवश्यक होता त्यासंबंधाचा साधार खुलासा केला आहे.

## मालेगांवचा दंगा.

हा मात्र राजकारणापासून मुळींच अलिप्त नव्हता आणि त्याचें स्वरूपहि भीषण होतें. मालेगांवची वसती २० हजार असून त्यांतील सुमारें १६हजार लोकसंख्या मुसलमानांची व मुख्यतः विणकरांची आहे. हा दंगा ता. २५ व २६ एप्रिल १९२० रोजीं झाला. त्यांत कित्येक 'राजनिष्ठ' हिंदुमुसलमानांचीं घरें लुटण्यांत आलीं; पोलीस फौजदार व एक पोलीस जवान ह्यांस प्रथम ते लपून बसलेल्या घरांस आग लावून ते बाहेर पडल्यावर त्यांस क्रूरपणानें ठार करण्यांत आलें व उभयपक्षीं ८।१० लोक ठार झाले. ह्या दंग्यासंबंधानें चौकशी करण्याकरितां कॉंग्रेसतर्फे नेमलेल्या कमीटीच्या रीपोर्टाचा सारांश असा आहेः—

(१) हा दंगा पूर्वी संकेत ठरवून किंवा मुद्दाम जाणूबुजून करण्यांत आलेला नाहीं.

(२) प्रांतांच्या अधिकाऱ्यांचें वर्तन निःपक्षपातीपणाचें व तडजोडीचें होतें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मि. सिमकॅक्स यांच्या आगमनानें त्यांत फेरबदल झितपत झाला यांविषयीं आम्ही निश्चित मत देऊं शकत नाहीं. परंतु काठ्या न वापरण्याविषयींचा जाहिरनामा निष्कारण व अवेळीं काढण्यांत आला असें आमचें ठाम मत आहे.

(३) फौजदार व खटला चालविणारे मॅजिस्ट्रेट यांचें कोर्टांतलें वर्तन योग्य नव्हतें. दंडाची रक्कम आणून भरणा करण्याकरितां आरोपींना गावांत जाऊं दिलें असतें तर दंगा झाला नसता असें आम्हांस वाटतें.

(४) फौजदारानें मशिदीपाशीं गोळीबार केला नसता तर हा दंगा इतका विकोपास गेला नसता. आरोपींना दंड देण्याला अवकाश देण्यांत येऊन त्यांची सुटका करण्याचें कबूल केलें असतें तर गर्दी मोडली असती.

(५) खिलाफत चळवळवाल्यांनीं गोलवींची व्याख्यानें करवलीं, किंवा कांहीं पुढाऱ्यांनीं काठ्या न वापरण्याविषयी वगैरे जाहीर पत्रक काढलें यांतहि कांहीं आम्हास दोषास्पद वाटत नाहीं. पण या जाहीर पत्रकांस सरकाराकडून मिळावा तसा मान मिळाला नाहीं.

(६) इतर गोष्टींत कोणाची कशीहि चूक असो वा नसो, फौजदार व पोलीस शिपाई यांचे खून आणि विशेषतः दुसऱ्या दिवशीं जाणूनबुजून केलेली लुटालूट या गोष्टी अगदीं अन्याय्य व अक्षम्य आहेत. हिंदुमुसलमानांची एकी असतांना देवळाला आग लावणाचें हत्यहि तसेंच अक्षम्य आहे.

(७) ज्या असहकारितावादी पुढाऱ्यांनीं ही चळवळ अनत्याचारी राखण्याचा प्रयत्न केला आणि स्वतःच्या वर्तनाविषयीं गैरसमज पसरत होता तरी देखील अनत्याचार पाळण्याकरितां प्रसिद्धीपत्रक काढण्याचें धैर्य दाखविलें त्यांचें वर्तन प्रशंसनीय होतें.

(८) या अत्याचारांत व्यक्तिशः कोणाचा-कांहींहि दोष असो, त्या योगानें एकदरींत असहकारितेच्या चळवळीवर आक्षेप घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. प्रत्येक चळवळींत कांहीं अत्याचारी लोक सामील होण्याचा संभव असतो च तसें लोक आगाऊ ओळखणें व त्यांस निवडून काढून संस्थेत त्यांचा प्रवेश न होईल असें करणें मुळींच शक्य नसतें. यास्तव असल्या व्यक्तिशः अपराधावरून सगळ्या चळवळीला दोष देण्याचें कारण नाहीं. तथापि यामुळ तरी असहकारितेच्या व्यासपीठावरून जाहीर व्याख्यानें देण्याची परवानगी योग्य अधिकृत व्याख्यात्यांसच असावी अशी आमची शिफारस आहे.

## आसामांतील मजूर.

आसाममधील चहाच्या मळ्यांतील मजुरांत मे (१९२१) च्या प्रारंभीं मोठाच असंतोष माजून निरनिराळ्या मळ्यांतील सुमारें १२ हजार मजूर एकाएकीं कामें सोडून घरोघर जावयास निघाले. चांदपूर ह्या ठिकाणीं त्यांचा मोठा जमाव जमला होता. दंग्याच्या भीतीनें सरकारनें त्याठिकाणीं गुरखासैनिक आणून ठेविलें होतेंच. ह्या गुरख्यांनी मजूरांच्या जमावावर घोडे चालवून व हाणमार करून मोटीच दंगल उडवून दिली. त्यांच्याविषयीं सहानुभूती दाखविण्याकरितां पूर्वबंगाल्यांतील रेल्व व आगबोट कंपन्यांच्या नोकरांनी प्रचंड संप पुकारले. हे संप व ही एकंदर धामधूम दोन महिने सुरू होती. ह्या धामधुमीच्या मुळाशी असहकारी चळवळेच होते असें अधिकारी व अँग्लो इंडियन वर्गाचें म्हणणें होतें. वस्तुतः उपासमारीनें वैतागलेल्या मजुरांच्या मनांत म. गांधीविषयीं पूर्ण आदर होता व असहकारी त्यांच्या अडचणीच्या प्रसंगीं त्यांस सहाय्य करावयास पुढें सरसावले इतकेंच.

## धारवाड येथील गोळीबार

हा असहकारितेच्या हितशत्रूंकडून दुसरा एक आवडता मोठा असहकाऱ्यांच्या डोक्यावर आदळला जातो. हा गोळीबार १ जुलै १९२१ रोजीं झाला. ह्याची उत्पत्ति दारूदुकानावरील पिकेटिंग पासून आहे. फौजदार कचेरीपासून १ फर्लांग अंतरावर असलेल्या दारू दुकानावर दोन स्वयंसेवक पिकेटिंग करीत

होते. नुकतीच दोन स्वयंसेवकांस पिकेटिंगबद्दल ६।६ महिने शिक्षाझाली असल्यामुळें दस्तुरीकडच्या सभेला व सहज रस्त्यांतून जाणायेणारे लोक ह्या स्वयंसेवकांकडे उत्सुकतेने व कौतुकानें पहात उभे राहणें स्वाभाविक होतें. कांहीं कारण नसतांना जवळ सशस्त्र पोलीस पहारा ठेवण्यांत आला होता. रात्रीं काळोख पडल्यावर ह्या पोलीस पहाऱ्यापासून जवळच असलेल्या शिंदीच्या दुकानापुढील तटाच्या दरवाजाला दोनदां आग लागली आणि रस्त्यावरील लोकांनीं ती विझविण्याची खटपट चालविली. इतक्यांत जवळचे पोलीस ठाण्याकडे गेले आणि दहाच मिनिटांत गोळीबार सुरू झाला. गोळीबाराची आगाऊ सूचनाहि नव्हती आणि तेथें कोणी जबाबदार अधिकारीहि नव्हता. पोलीस इन्स्पेक्टर ह्यांनीं आपल्याच अधिकारांत हें काम बजाविलें २०।२५ मिनिटांनीं जखमी लोकांस आणण्याकरितां जाणाऱ्या लोकांवरहि गोळीबार करण्यांत आला.

दुसऱ्या दिवशीं तेथील चार राष्ट्रीय वर्तमानपत्रांचे मुद्रक व संपादक आणि इतर पुष्कळ राष्ट्रीय कार्यकर्ते ह्यांस पकडण्यांत आलें. आरोपींनी स्वतःचा बचाव केला नाहीं आणि पुढें त्यांस शिक्षाहि झाल्या.

ह्या प्रकरणाची स्वतंत्र चौकशी व्हावी म्हणून आरोपींकडून व इतरांकडून करण्यांत आलेले शिकस्तीचे प्रयत्न सरकारनें यशस्वी होऊं दिले नाहींत व न्यायमंदिरांतहि ह्या प्रकरणाची स्पष्ट चिकित्सा झाली नाहीं. त्यापेक्षां ह्या संबंधानें जास्त खुलासा करण्याचें कारणच नाहीं.

## मोपला बंड.

" अत्याचार आणि अनत्याचार ह्या दोन परस्पर विघातक शक्ति आहेत. अनत्याचार हा ह्यामुळें यशस्वी व्हावयास अनत्याचारी वातावरणाची आवश्यकता आहे. असहकाराच्या उत्पत्तीपासून ह्या वातावरणांत इतकी प्रचण्ड खळबळ दुसऱ्या कोणत्याहि प्रसंगानें उडालेली नव्हती. " यं. इं.(८-९-२१).

अशा ह्या मोपला बंडाच्या वणव्याची पहिली ठिणगी १९ ऑगष्ट रोजीं पडली. तिरूरंगडी येथील कांहीं खिलाफत कार्यकर्त्यांना पकडतांना मलबारच्या जिल्हा मॅजिस्ट्रेटनीं मशीदींत प्रवेश केला व मोपल्यांनीं ह्या धरपकडीस विरोध केला. अशा रीतीनें ह्या बंडास सुरवात झाली. सप्टेंबरच्या दुसऱ्या आठवड्यांत हा दंगा पराच शमला व बंडखोरांचा एक पुढारी कुन्हीकोया भांगल हा लष्करी लोकांच्या हातीं लागला. तथापि ह्या बंडाचा पुरा मोड व्हावयास कित्येक महिने लागले.

ह्या बंडांत मोपल्यांच्या व सरकारी पोलीस व सैनिक ह्यांच्या झटपटींत शेंकडों मोपले ठार झाले; मोपल्यांनीं सुमारें ३ हजार तरी हिंदू लोकांस जबरदस्तीनें बाटविलें, हिंदू स्त्रियांची विटंबना केली आणि एकंदर मोपला वस्तीच्या चार तालुक्यांत खऱ्याखुऱ्या युद्धाचे प्रकार घडवून आणले. सरकारतर्फेहि मोपल्यांचा चांगलाच समाचार घेण्यांत आला आणि मोपल्यांच्या हिंदूंवरील अत्याचारांइतकींच ह्या मोपल्यांच्या अनवस्थेचीं हृदयद्रावक वर्णनें पुढें प्रसिद्ध झालीं आहेत.

लोकपक्षातर्फे ह्या बंडाळीचा सविस्तर रिपोर्ट, एक खास कमीटी नेमली, असूनहि, शेवटपर्यंत तयार झालेला नाहीं आणि सरकारतर्फेहि ह्या प्रकरणाची स्वतंत्र रीतीनें जाहीर चौकशी झालेली नाहीं.

ह्या दंग्यांतील मोपल्यांच्या अत्याचारांनीं अद्यापहि एकंदर हिंदुसमाज मुसलमानांविषयीं मनांत कुढत आहे आणि ह्याप्रसंगीं मलबारांतील हिंदू लोकांनीं सरकारला साहाय्य केलें ह्या कल्पनेनें मोपल्यांचीं अंतःकरणें हिंदूंविषयीं अद्यापहि चांगलींच तिडलेलीं आहेत.

द्वेषानें द्वेष शमत नाहीं; विरोधानें विरोध कमी होत नाहीं. ह्या म. गांधींच्या अहिंसा तत्वाचें मोपला बंड व त्याचे परिणाम हें मूर्तिमंत व ठळक उदाहरण आहे.

### हेंच का तुमचें स्वराज्य ?

असें तावडतोब म. गांधी व असहकारी ह्यांस विचारण्यांत येऊं लागलें. त्यावेळीं म. गांधींनीं दिलेलें उत्तर विचार करण्यासारखें आहे:—

" मी ह्याचा निष्कर्ष निराळ्या रीतीचा काढतो. सध्यांच्या सरकारचें खरें अंतःस्वरूप काय आहे तें मोपला बंडामुळें अत्यंत ठळकपणें आपणास दिसून येत आहे. तीन गोष्टी अगदीं स्पष्ट आहेतः—

(१) अत्यंत सुधारलेल्या विनाशक हत्यारांनीं सज्ज असूनहि सरकारला मालमत्ता व जीवित ह्यांचें संरक्षण करतां आलें नाहीं. मागाहून शांतता प्रस्थापित करण्यांत आली हें कांहीं ह्याचें उत्तर नव्हे.

(२) दीर्घकाळपर्यंत अंमल करूनहि मोपल्यांना शांतिप्रिय नागरिक बनविण्याच्या कामांत सरकारला अत्यंत दूषणास्पद अपयश आलें.

(३) एकाबाजूनें मोपल्यांच्या शौर्याला शांतता आणि परमेश्वर ह्यांच्या कामांकडे वळविण्याचें सरकारला साधलें नाहीं आणि उलट ह्या कायद्यांस न.

'जुमानणाऱ्या लोकांपासून संरक्षण करतां येईल असें हिंदूंना शिक्षण देण्याचेंहि त्यांना साधलें नाहीं.

" असहकाऱ्यांनीं कांहीं अद्याप स्वराज्य मिळविलेलें नाहीं. देशांतील एकंदर दुष्ट प्रवृत्तींवर त्यांनीं अद्याप ताबा मिळविलेला नाहीं असा त्यांच्यावर आरोप करतां येईल परंतु मलबारमधील प्रसंगाचें श्रेय मात्र प्रामाणिकपणें त्यांस देतां येणार नाहीं.'

ह्या वर्षाच्या प्रारंभींच जनाब याकुब हसन ह्यांस मलबारमध्यें प्रवेश करण्याची मनाई करण्यांत आली होती व त्या धोरणामुळेंच मोपल्यांतील खिलाफत चळवळ प्रारंभापासूनच निव्वळ स्थानिक व बेजबाबदार कार्यकर्त्यांच्याच हातीं राहिली. बंडाच्या सुरुवातीसहि म. गांधी वगैरे प्रमुख पुढाऱ्यांस मलबारमध्यें प्रवेश करूं देण्यांत आला नव्हता आणि म्हणूनच शुद्ध असहकारतेचा व निर्मळ अहिंसेचा अधिकारी वाणीचा संदेश अशिक्षित मोपल्यांस प्रारंभापासून अखेरपर्यंत कधींच ऐकावयास मिळाला नाहीं. आणि म्हणूनच हें बंड फारच मोठ्या प्रमाणावर असूनहि असहकारितेच्या कार्यांत म. गांधींनीं तें मुळींच विचारांत घेतलें नाहीं.

ह्यामुळें ह्या बंडानें असहकारितेवर प्रत्यक्ष व तत्काळ प्रत्ययास येण्यासारखा, कांहींच परिणाम घडून आला नाहीं. उलट असहकारितेचा जोर सारखा वाढतच जात होता. तथापि इतकें मात्र खरें कीं, ह्या अत्याचारानें असहकारितेच्या जोमदार, खळाळणाऱ्या व शुद्धरक्तांत विषप्रवेश करविला. तत्काळ व प्रत्यक्ष परिणाम न दिसतांच कालांतरानें हळूहळू परिणामकारक होणाऱ्या विषाप्रमाणें ह्या बंडानें जनतेच्या मनांत ठाव दिला.

## असहकारितेला मूर्च्छाच आणणारा.

अशा प्रकारचा मोठा राष्ट्रीय चळवळीवर हाणण्याचें काम मोपला बंडानें केलें नाहीं. तें काम संयुक्त प्रांतांतील गोरखपुर जिल्ह्यामधील चौरिचौरा येथील दंग्यानें केलें. महात्माजींच्या शब्दांत ह्या दंग्याचें वर्णन असें आहे:—असें समजतें कीं, ज्या शिपायांचा अशा रीतीनें चेंदामेंदा करण्यांत आला, त्यांचें वर्तन लोकांना चांगलीच चीड येण्यासारखें होतें. इनस्पेक्टरनें लोकांना वचन दिलें होतें कीं, पोलीसांकडून यापुढें त्यांना उपसर्ग पोंचणार नाहीं. परंतु

पुढें वचनभंग करण्यांत आला. मिरवणुक पुढें निघून गेल्यावर मागें राहिले-ल्यांशीं शिवीगाळ व धक्काबुक्की करण्यांत आली. ह्या लोकानीं मदतीसाठीं आरडाओरड केली. जनसमूह मागें फिरला. शिपायांनीं गोळीबार केला. त्यांच्या-जवळ असलेला थोडा दारू गोळा संपून गेला. आणि ते सुरक्षिततेसाठीं ठाण्यांत जाऊन बसले. माझा बातमीदार कळवितो कीं, लोकांना जेव्हां हें समजलें तेव्हां त्यांनीं ठाण्याला आग लावली. आपल्या प्रिय प्राणासाठीं आपखुषीनें कैद होऊन बसलेल्या त्या शिपायांना बाहेर पडावें लागलें. ते बाहेर पडतांच त्यांचा चेंदामेंदा करण्यांत आला आणि तीं छिन्न विछिन्न झालेलीं प्रेतें आगींत फेंकून देण्यांत आलीं."

---

ते बारडोलीस सुरवात करतील असें वाटे. अर्थात् चळवळ ता. ८ रोजींनच सुरू झाली तर ता. ११ ला होईल, व ११ ला सुरू झाली तरी निदान ता. १४ ला ती सुरू होऊन, दिल्लींतील राजपुत्राच्या प्रवेशाला बारडोली येथील चळवळीचा अपशकून महात्माजी हटकून घडवून आणतील आणि राजपुत्रावर राजकीय बहिष्कार घालण्याची जी मोठी चळवळ महात्माजींनीं आपल्या स्फूर्तीनें सुरू केली तिचा शेवटहि तेच औचित्याच्या दृष्टीनें वरील प्रकारें घडवून आणतील, असा सर्व लोकांना भरंवसा होता." (केसरी)

### पण ह्या प्रश्नाचें उत्तर काय ?

"कोणत्याहि चोड आणण्यासारख्या कृत्यांनीं अनाथ झालेल्या आणि जमावाच्या दयाबुद्धीवर भरंवसा टाकलेल्या लोकांच्या खुनांचें समर्थन होऊं शकणार नाहीं. हिंदुस्थान अनत्याचारी आहे असें म्हणतें. आणि अत्याचारी साधनांनीं स्वातंत्र्याच्या सिंहासनावर अधिष्ठित होऊं पाहतें. अशावेळीं अत्यंत प्रक्षोभक कारणामुळेसुद्धां अत्याचार होणें हें दुश्चिन्ह आहे. कल्पना करा, ईश्वरकृपेनें बारडोलीचा 'अनत्याचारी' कायदेभंग यशस्वी झाला; सरकारनें बारडोलीच्या विजयी वीरांकडे अधिकार सोपविला; अशावेळीं पुरेशा प्रक्षोभक कारणांमुळेहि अत्याचार होऊं लागल्यास त्यांचा बंदोबस्त कोण करणार ?" (म. गांधी)

### केसरीचा रिपोर्ट.

ज्या दिवसाकडे सगळ्या हिंदुस्थानचे डोळे लागले आहेत तो दिवस आज उजाडला. हिंदुस्थानच्या इतिहासांत अपूर्व असा हा दिवस खास ठरणार अशा भावनेनें सर्व हिंदुस्थानचें लक्ष बारडोलीकडे लागलें असेल. येथेंहि आज लोकांत खूप गडबड आहे. आज सकाळच्या गाडीनें पंडित मदन मोहन मालवीय, जयकर, नटराजन वगैरे मंडळी, महात्माजींनीं सामुदायिक कायदेभंग पुढें ढकलावा अशी आग्रहाची विनंति करण्याकरितां आली आहे. महात्माजींचाहि जवळ जवळ तोच निश्चय असल्याकारणानें पंडितजींना मोठें यश आपोआपच मिळणार आहे! पंडितजी तर सगळीं आनंदांत आहेत. वर्किंग कमिटीकरितां शेट छोटानी, जमनालाल, केळकर वगैरे मंडळीहि आज आली आहेत. कमिटीच्या १५ सभासदांपैकीं फक्त पांचच मंडळी ठराव करणार असें दिसतें. कारण बाकी कोणीहि आले नाहींत. सरकारच्या बाजूनेंहि आज स्वतः कलेक्टर मि. मार्टिन साहेबांची स्वारी सी. आय. डी. च्या पथकासह त्याच गाडीनें हजर झाली. आजच सकाळीं या तालुक्यांतील पाटदारांपैकीं पुष्कळांनीं राजीनामे दिल्याचें

बाबतींत पूर्णत्व आल्याशिवाय कायदेभंगास सुरुवात करावयाची नाहीं हें तत्व पूर्ण नैतिक असेल परंतु व्यवहार्य नाहीं. आज विशेषत: तुरुंगांत खितपत पडलेल्या देशभक्तांचा स्वार्थत्याग लक्षांत घेतां चढाईचें धोरण पत्करणें लोकांना जरूर वाटतें. सबब झालेल्या अत्याचाराबद्दल राष्ट्राला महात्माजींनी योग्य वाटेल तें प्रायश्चित करावयास सांगून कायदेभंगास एक-दोन आठवड्यांनीं तरी सुरुवात करावी. त्यांच्या भाषणानंतर मोअझम अल्ली, जोहर अहमद, षमनजी, स्वामी सत्यदेव, देसाई वगैरे मडळींनीं, कोणत्याहि कारणानें कायमचा किंवा वर्षभरसुद्धां चढाईचा कायदेभंग लांबणीवर टाकूं नये असें आग्रहपूर्वक सांगितलें. केळकर यांनींहि पंडितजी वगैरे मध्यस्थांना त्यांचें चढाईच्या कायदेभंगांबद्दल स्पष्ट मत काय आहे तें काढून घेण्याकरितां कांहीं सूचक प्रश्न विचारले त्यांच्या उत्तरादाखल त्यांना कबूल करावें लागलें की दास, लजपतराय व इतर शेकडों हजारों लोकांनीं कायदेभंग केला तो योग्य होता, व ते तुरुंगांत आहेत त्या अर्थी इतरांनींहि तसेंच करणें योग्य होईल. तथापि हल्लीं झालेलें क्षुब्ध वातावरण शांत करण्याकरितांच कायदेभंग थांबविला पाहिजे असा खुलासा डॅ. जयकर यांनीं मागाहून केला.

इतकें झाल्यावर महात्माजींनीं वर्किंग कमिटीच्या सभासदांशिवाय बाकीच्यांनीं आपलीं मतें सांगितल्याबद्दल त्यांचे आभार मानून त्यांस रजा दिली व नंतर वर्किंग कमिटीच्या खास बैठकी सुरुवात झाली. वर्किंग कमिटीलो महात्मा गांधी, जमनालालजी, छोटानी, केळकर, व विठ्ठलभाई पटेल असे पांच सभासद हजर आहेत. बाकीच्या सभासदांनीं तारेनें आपलीं मतें कळविलीं आहेत. व त्यांत कायदेभंग पुढें ढकलावा असें आपलें मत कळविलें आहे असें दिसतें."

## वर्किंग कमिटीचे ठराव.

बारडोली येथें ता. ११ व १२ फेब्रुवारी रोजीं झालेल्या 'वर्किंग कमिटी'च्या बैठकींत खालील ठराव पास झाले:—

१ चौरीचौरा येथील दंगेखोरांनीं अमानुषपणानें कॉन्स्टेबल लोकांना ठार मारल्याबद्दल व पोलीस ठाणें जाळल्याबद्दल सभेस अत्यंत खेद होत आहे व मृतांच्या कुटुंबांविषयीं सहानुभूति वाटत आहे.

२ जेव्हां जेव्हां कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचें ठरवावें तेव्हां तेव्हां कोठें तरी दंगेधोपे घडतात हें पाहून व जनतारूपी जनार्दनाला ही चळवळ नापसंत आहे असें मानून बारडोलीस व इतरत्र चालू होणारी सार्वत्रिक सामुदायिक कायदेभंगाची चळवळ तहकूब करावी. शेतकऱ्यांना जमीनमहसूल देण्याविषयीं स्थानिक कॉंग्रेसकमिट्यांनीं सांगावें व चढाईच्या सत्याग्रहाच्या पूर्वतयारी दाखल आरंभिलेली चळवळहि थांबवावी.

३ गोरखपूर येथील अत्याचार अगर मुंबई मद्रासचे दंगे वगैरे सर्व नाहींसे होऊन वातावरण अगदीं शांत होईपर्यंत कायदेभंगाची चळवळ तहकूब समजली जाईल.

४ जाणूनबुजून व मुख्यत्वेंकरून तुरुंगवासास आमंत्रण देण्याकरितांच ज्या चळवळी सुरू असतील त्या बंद कराव्या. वातावरण शांत राहील अशी जेथें खात्री असेल तेथेंच कॉंग्रेसची मामुली हरताळ वगैरे चळवळ चालली तरी हरकत नाहीं. दारुबाजांना ' दारु पिऊं नका ' एवढाच खराखुरा उपदेश करण्याकरितां जें पिकेटिंग शांतपणें चालू असेल तेवढें करावें; पण ती चळवळ जबाबदार सुशील माणसांच्या हातांत पाहिजे.

५ सरकारी जाहिरनाम्याविरुद्ध ज्या सभा अगर मिरवणुकी होत असतील त्यादि थांबवाव्या. कॉंग्रेसकमिट्यांच्या खासगी सभा, अथवा नेहमींची चळवळ चालू ठेवण्याकरितां भरणाऱ्या जाहीर सभा यांस ही बंदी लागू नाहीं.

६ मक्तेदार शेतकरी जमीनदारांस मक्ता देत नाहींत अशी तक्रार वर्किंग कमिटीकडे आली असल्यामुळें वर्किंग कमिटीचा कॉंग्रेसच्या संस्थांस व प्रचारकांस असा आदेश आहे कीं, त्यांनीं शेतकऱ्यांस सांगावें कीं असें करणें कॉंग्रेसच्या आज्ञेविरुद्ध असून राष्ट्रास घातक आहे.

७ जमीनदारांच्या कायदेशीर हक्कांवर गदा आणण्याचा कॉंग्रेसचा बिलकुल हेतु नाहीं अशी त्यांची खात्री असूं द्यावी. व ज्या ज्या ठिकाणीं रयत जमीनदार यांचा तंटा असेल त्या ठिकाणीं तो तडजोडीच्या मार्गानें व पंचायतपद्धतीनें मिटविण्यांत यावा.

८ स्वयंसेवकांची नोंद करण्यांत कॉंग्रेसने घातलेल्या शर्तींत शैथिल्य आलें असून त्यादीवर भर देण्यांत येत नाहीं, अस्पृश्यतेविषयीं दुर्लक्ष होतें. उमेदवारांची अनत्याचारीपणावर दृढ श्रद्धा आहे कीं नाहीं याची चांगली चौकशी होत नाहीं इत्यादि गोष्टी वर्किंग कमिटीच्या नजरेस आल्या आहेत; तयव सर्व

न्कॉंग्रेस संस्थांस अशी आज्ञा आहे कीं, त्यांनीं आपापल्या स्वयंसेवकांच्या न्यादींची फेरतपासणी करून ज्यांच्या बाबतींत या सर्व अटी पाळल्या जात नस-तील त्यांस यादीतून काढून टाकावें.

९ वर्किंग कमिटीला असें वाटतें कीं, राष्ट्रीय सभेच्या घटनेनुसार तिच्या सर्व ठरावांची अक्षरशः अमलबजावणी न झाल्यास ध्येय लवकर साध्य व्हाव-याचें नाहीं; कदाचित् केव्हांहि तें साध्य होणार नाहीं.

१० हे ठराव ऑल-इंडिया कॉंग्रेसकमिटीची जादा बैठक होईपर्यंत अमलांत राहतील व तिजपुढें ते कायम करण्याकरि[illegible] सादर करण्यांत येतील.

**नवीन [illegible]क्रम.**

अहिंसा हा सार्वत्रिक-सामुदायिक कायदेभंगाच्या चळवळीचा प्राण आहे, ही भावना जनतेंत व्हावी तशी बद्धमूल झाली नाहीं हें गोरखपूरच्या अत्याचा-रानें सिद्ध झालें आहे. तसेंच जो येईल त्यास स्वयंसेवक नोंदवून सत्याग्रहाच्या चळवळीच्या मुख्य तत्वाविषयीं बेफिकीरपणा लोकांनीं दाखविला आहे. या सर्व गोष्टी ध्यानांत घेतां वर्किंग कमिटीचें सर्व कॉंग्रेस संस्थांस असें सांगणें आहे कीं, त्यांनीं यापुढें खालीलप्रमाणें कामें करावीं—(१) राष्ट्रीय सभेचे निदान एक कोटि सभासद जमविणें—(शांतता-म्हणजेच अहिंसा व न्यायबुद्धि-व सत्य हीं दोन राष्ट्रीय सभेचीं मूलतत्वे आ[illegible] म्हणून ज्याचा यावर विश्वास नसेल त्यास सभासद करूं नये; व कॉंग्रेसच[illegible]टना सभासद होऊं इच्छिणारास समजा-वून सांगण्यांत यावी. अर्थात् ठरलेल[illegible]र्षिक वर्गणी प्रत्येक सभासदानें भरलीच पाहिजे.) (२) हातरहाटांचा प्रस[illegible]र्णें व खादीच्या निपजेकरितां व्यवस्था करणें-(कॉंग्रेसचे अधिकारी व प्र[illegible]नीं खादीच वापरावी, व लोकांस उत्तेजन देण्याकरितां स्वतः रहाटावर सू[illegible] काढण्यास शिकावें.) (३) राष्ट्रीय शाळा काढणें-(सरकारी शाळांवर पिकेटिंग [illegible] नये व जनतेचें लक्ष वेधण्याक-रितां राष्ट्रीय शाळांच्या श्रेष्ठपणावरच विशेष जोर देण्यांत यावा). (४) अस्पृश्य लोकांचें जीवित सुधारणें, त्यांस मुलं शाळेंत पाठविण्यास विनंति करणें-(अस्पृश्यता ज्या स्थळीं फार कडक [illegible] तर्ये कॉंग्रेस फंडांतून निराळ्या विहिरी बांधाव्या व निराळ्या शाळा का[illegible], अस्पृश्यता नष्ट करण्याचा शक्य तितका प्रयत्न करण्यांत यावा). (५) घरोघर जाऊन दारू-बाजाचें मन परावृत्त करण्याची खटपट करणें-(६) ग्रामपंचायती व शहर-पंचायती स्थापून लोकमतावर जोर देऊन तंटबखेडे मोडणें-(पंचायतीचा निकाल

न मानणारावर सामाजिक बहिष्कार वगैरे टाकण्यांत येऊं नये. (७) सर्व जाती व पोटजाती यांमधील भेदाभेद घालवून एकी करण्याकरितां समाजसेवा खातें निर्माण करण्यांत यावें; व दुखापतींचे वेळीं व आजारीपणांत एकजात सर्वांस मदत करावी–( प्रत्येक असहकारितावादी अशा वेळीं इंग्लिश अथवा हिंदी मनुष्याची सेवा करणें हा सारखाच बहुमान समजेल). (८)टिळक–स्वराज्य–फंड चालू ठेवणें–( कॉंग्रेसशीं सहानुभूति असणाऱ्या प्रत्येक गृहस्थानें आपल्या १९२१ च्या उत्पन्नाचा एक–शतांश भाग तरी द्यावा, व प्रत्येक प्रांतानें या फंडापैकी २५ टक्के रक्कम ऑल–इं. कॉं. कमिटीला द्यावी ) (९) सरकारी नोकरीवर पाणी सोडणाऱ्या लोकांकरितां कांहीं तरी तजवीज करावी असें वर्किंग कमिटीला वाटतें, म्हणून या कामाकरितां छोटानी, बजाज व पटेल या तीन गृहस्थांच्या कमिटीनें या प्रश्नाचा विचार करून येत्या ऑल–इं. कॉं. कमिटीच्या सभेपुढें आपली योजना विचाराकरितां मांडावी.

बार्डोली तालुक्याची जादा परिषद भरून वर्किंग कमिटीचे हे ठराव मान्य करण्यांत आले व सरकारी सारा तायडतोब देण्याचें ठरलें.

## " दिल्लीनें थोडी बाजू सावरली. "

"दिल्ली येथें ता. २४ व २५ रोजीं ऑल–इंडिया कॉंग्रेसकमिटीचें काम चालून अखेर मिश्र स्वरूपाचे ठराव मंजूर झाले. मिश्र म्हणण्याचें कारण असें कीं, थेट म. गांधींपासून तों मौ. हजरत मोहानी यांचेपर्यंत जे. निरनिराळे पक्ष व उपपक्ष आज राष्ट्रीय सभेंत आहेत त्यांपैकीं एकालाहि खऱ्या मनानें हवे तसे हे ठराव झाले नाहींत हें खरें; पण उलटपक्षीं प्रत्येकाला जी गोष्ट विशेष इष्ट वाटते तिचा थोडा थोडा अंश ठरावांत संग्रहित झाला आहे. म्हटलें तर हे ठराव कोणाचेहि सर्वांशी मान्य होण्यासारखे नाहींत; म्हटलें तर सर्वांना मान्य होण्यासारखे थोडथोडें कांहीं त्यांत आहे. ही स्थिति समाधानकारक नाहीं असें सहृदयांनीं कोणीहि म्हणेल; पण आपण घालेल्या पाण्याप्रमाणें, राष्ट्रीय सभेच्या मनांत पांचसात वर्षांत राजकीय आकांक्षेच्या ज्या एकाहून एक जोरदार उकळ्या फुटत आहेत त्या लक्षांत घेतां, दिल्लीच्या या ठरावांची ही स्थिति स्वाभाविकच आहे असेंच कोणीहि म्हणेल."

" बार्डोली येथें वर्किंग कमिटीनें जे पिछेहाटीचे ठराव केले ते पंडित मदन मोहनप्रभृति कांहीं लोकांखेरीज कोणालाच पसंत नव्हते. कित्येकांनीं आपली नापसंती स्पष्ट बोलून दाखविली, कित्येक फक्त अर्धवट पुटपुटले,' कित्येकांनीं

-ओंठ हलविले नाहींत तरी त्यांचें मन मळमळूं लागलें, व त्या ठरावाची भाषा स्वतः महात्माजींनीं सजविली होती तरी त्यांनाहि एक प्रकारचें असमाधानच वाटत होतें. कारण सामुदायिक सत्याग्रहापर्यंत भरधांव मजल नेऊन सर्व चळवळ एकदम थांबविल्यानें, एकदम सबूर करून ब्रेक आवळल्यानें आगगाडीचा इंजिनड्रायव्हर किंवा मोटरीचा शोफर यालाहि गाडींत बसणाराप्रमाणेंच धक्का बसतो. बारडोली येथील ठरावांना इतर अनेक प्रांतांच्या वर्तमानपत्रांतून संमति मिळाली नाहीं असें नाहीं. पण ती संमति प्रायः शाब्दिक व मिळमिळीत अशीच होती, घसघशीत किंवा छातीठोकपणाची नव्हती, हें कोणीहि सांगेल; व याचें खरें प्रत्यंतर दिल्लीस आलें. कारण ऑ. इ. कॉंग्रेसकमिटीच्या बैठकीपूर्वी दिल्लीस वर्किंग कमिटीची जी बैठक झाली तींत या कमिटीनें आपण होऊनच बारडोलीच्या ठरावाची दुरुस्ती सुचविली. " ( केसरी )

ह्या दुरुस्तीसहि निरनिराळ्या सभासदांनीं पन्नासांवर उपसूचना पुढें आणल्या होत्याच.

ह्या बैठकींत म. गांधींच्या ह्या नवीन धोरणास विरोध करण्याचे कामीं पुढारीपण मुख्यतः महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं आपल्याकडे घेतलें होतें व हजरत मोहानी, डॉ. मुंजे वगैरेंनीं विशेष निकराच्या उपसूचना पुढें आणल्या होत्या. परंतु अखेर महात्माजींच्या इच्छेप्रमाणें कायदेभंग तहकूबीला ऑ. इं. कॉं. कमिटीनें आपली संमति दिलीच. परंतु बारडोलीच्या ठरावानें वैय्यक्तिक कायदेभंगाला सुद्धां मनाई केली होती ती मनाई कांहीं शर्तींवर काढून घेण्यांत आली.

असहकारितेची सर्व चळवळ थांबवून लोकांनीं आतां कायदेकौन्सिलांत शिरावें अशीहि एक सूचना स्वामी श्रद्धानंद हे पुढें आणणार होते. परंतु म. गांधींच्या विरुद्धत्व त्यांनीं ही उपसूचना वादविवादाकरितां पुढें आणली नाहीं.

तथापि ह्या एका गोष्टीवरूनच बार्डोलीच्या ठरावानीं राष्ट्रीय चळवळीचा अवसानघात किती झाला ह्याची कल्पना करतां येते.

## मला जाचांतून सोडवा.

ता. २ मार्चच्या 'यंग इंडिया' त म. गांधींनीं खालील आशयाचे उद्गार काढिले आहेत:—

" दिल्ली येथें ऑ. इं. कॉं. कमिटीला आलेल्या सभासदांच्या मनांत कळत किंवा न कळत अत्याचारीपणाचा प्रवाह इतका जोराचा वाहत होता कीं, मी खरोखरीच तोंडानें व मनांतून, माझा खूब जोराचा पराभव व्हावा अशीच ईश्वराची

प्रार्थना करीत होतों. अल्पसंख्याक राहणें, आपल्या विरुद्ध बहुमत असतां आपल्याच मताचा आग्रह धरून बसणें, याचा मला पूर्वापार अनुभव आहे. उलट मला मनापासून एकाद्या गोष्टीचें भय वाटत असेल तर ती आपल्या बाजूला बहुमत असणें हीच होय ! कारण माझ्या बाजूला हल्लीं जें प्रचंड बहुमत आहे, असें सरकारला व इतरांना दिसतें त्यांत अविचारी उपासकांचीच भरती आहे. अशा उपासकांचा मला मनापासून वीट आला आहे. हे लोक माझ्या तोंडावर थुंकतील तर मी नीट जागेवर आहें, म्हणजे बरोबर आहें, चूक करीत नाहीं, असें मला वाटेल. मग माझ्या हातून घडणाऱ्या हिमालय पर्वताएवढ्या चुका किंवा गैरअंदाज कबूल करावे लागणार नाहींत, गेल्या मार्गानें परत फिरावें लागणार नाहीं, किंवा पुन: पुनः नव्या नव्या घडया बसवाव्या लागणार नाहींत. पण हें सर्व घडून यावयाचें नव्हतें ! माझ्या बाजूस एवढें बहुमत दिसतें यांत मी दुसऱ्या लोकांचा फायदा माझ्या अधिकाराच्या जोरावर घेत नसून तेच माझा फायदा घेनात असें मला वाटूं लागलें आहे. मी निर्लज्ज बनणें यांतच माझा खरा सुरक्षितपणा आहे. माझी ही खोड कधीं जाणार नाहीं असें कमिटीतील माझ्या स्नेह्यांना मी सांगत असतों. ज्या ज्या वेळीं लोक चुका करतील त्या त्या वेळीं त्या जाहीरपणें कबूल केल्याशिवाय मी सोडणार नाहीं. माझ्या सदसद्विवेकबुद्धिखेरीज मी इतर कोणाचेंहि ऐकणार नाहीं, मग त्याकरितां मी एकीएकी एक उरलों तरी चालेल सत्याला स्मरून वागणें असतें तें असेंच. लोकांचें वर्तन पाहून मी आज अधिक दुःखी झालों, पण अधिक शहाणाहि झालों आहें. आम्हां लोकांतील अनत्याचारीपणा हा अगदीं वरवरचा आहे. त्याचा प्रवेश खोल नाहीं. पोटांतून आम्हाला क्रोधाचे कढावर कढ येत असतात, व सरकारहि त्याला एकसारखी आपल्या अविचारी दुष्कृत्यांनीं मदत करीत असतें. आम्ही कमकुवत दुबळेपणामुळेंच अनत्याचारी आहों. पण पहिली संधि मिळतांच सूड घेण्याची बुद्धि आम्हीं मनांत जपून ठेवून वाढवीत असतों. कमकुवत लोकांच्या नाइलाजाच्या अनत्याचारीपणांतून खरी शांतता कधीं तरी निर्माण होईल काय ? मी चालविलेला हा प्रयोग निष्फळ नाहीं काय ? जें मला *वाईट दिसतें तें मी चांगलें कसें म्हणूं ? शक्तीच्या सहकारितेंतून मुदीची सह*कारिता कशी निघेल ? वाट नसलेल्या अरण्यांतून चालतांना मनुष्याला पदोपदीं थांबलेंच पाहिजे, अडखळलेंच पाहिजे, मागें परतलेंच पाहिजे, त्याला इजा होऊन रक्तहि आलें पाहिजे.

. दिल्लीस लोक येतील ते असंतुष्ट अशा मनस्थितीत येतील हें तर मी ओळखूनच होतों. पण तेथें विरोधाचें एवढें प्रचंड वादळ होईल अशी मला कल्पना नव्हती. विधायक कार्यक्रमाची त्यांना गोडी नसल्यामुळें तो मंजूर करण्यास ते तयार होईनात. ही काय सामाजिक सुधारणेची सभा आहे कीं काय असें ते विचारीत. सरकारला अनत्याचारीपणाचे ठोसे लगावणें त्यांना हवें होतें ! ठोसे आणि ते अनत्याचारी ! ! पण हा सर्व कृत्रिम देखावा होता. त्यांना हें कळेना कीं, विधायक कार्यक्रमाच्या संवयीं शिवाय मिळालेले स्वराज्य हें एक दिवसहि चालवितां येणार नाहीं. ( तुरुंगांत जाणें हें कांहीं ठोसे लगावणें होत नाहीं. ) विशिष्ट प्रकारच्या तुरुंगवासानें स्वराज्य मिळेल. ज्यांच्या मनांत द्वेष, दुष्टपणा, व अत्याचारीपणा ही खळबळ करीत आहेत, पण केवळ तोंडानें जें अनत्याचारीपणा घोलत आहेत, अशा हजारों लोकांना तुरुंगांत पाठवून युक्तीनें सरकारपासून स्वराज्य चोरून ( 'स्टील' ) घेऊं ही समजूत व्यर्थ आहे. अनत्याचारीपणा तोंडानें म्हणूं पण वाटेल तेव्हां अत्याचार करूं असा धाक दाखवून स्वराज्य मिळविण्याची आमची इच्छा असेल तर शांततेची भाषाच अजीबात आपण टाकून द्यावी. व काय आणितां येईल ती शारीरिक शक्ति उपयोगांत आणावी हेंच बरें—कारण जगाची ही जुनी रीतच आहे व तसें करण्यांत ढोंगीपणा तरी नाहीं. वाटेल तर ' माझा ठराव नामंजूर करा; पण तो मंजूर कराल तर त्याची जबाबदारी फार मोठी पडेल. तुमचा शांततेच्या मार्गावर विश्वास नसेल तर माझा ठराव मंजूर करण्याच्या भानगडींत पडूं नका. ' असें मी त्यांना दिल्लीस जीव तोडून सांगत होतों. पण माझें न ऐकतां त्यांनीं विशेष फरक न करतां तो ठराव मंजूर केला. तेव्हां आतां त्यांना त्यामुळें येणारी जबाबदारी पार पाडणें प्राप्त आहे. ती जबाबदारी हीच कीं, लोकांचें टुमणें मागें लागलें तरी कायदेभंगाच्या चळवळींत पुनः न शिरतां शांत मनानें विधायक कार्यक्रमाला लागावें. आज तावडतोब करावयाचें काम म्हटलें म्हणजे काय वाटेल तें करून तुरुंगांत जाणें हें नव्हे. भाषणस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य हीं प्रस्थापित करणें याहि गोष्टी आज तावडतोब करण्याच लागण्याची वेळ नव्हे; तर अंतर्मुख होऊन आत्मशुद्धि करणें, शांततेच्या साधनांची जुळवाजुळव करणें हें होय. आणि ही खबरदारी आपण न घेतली तर संकटगर्तेत खोल बुडून नापत्ता होऊं.

जे लोक आज तुरुंगांत गेले आहेत त्यांचा विचार मनांत आणण्यांत अर्थ नाहीं. चौरीचौऱ्याची हकीकत मी ऐकली तेव्हां त्या गुन्ह्यांबद्दल प्रायश्चि-

त्याचा पहिला हप्ता म्हणून मी त्यांना मनानें बळी देऊन टाकलें. लोकांनीं आपल्या निश्चयसामर्थ्यानें आपणाला खुलें करावें या बुद्धीनेंच ते तुरुंगांत गेले, आणि स्वराज्यांतील पार्लमेंटचें पहिलें कृत्य तुरुंगाचे दरवाजे खुले करणें हेंच होईल, अशी आशा वाटत होती; पण ईश्वराची इच्छा वेगळीच होती. आम्ही जे लोक बाहेर राहिलों त्यांनीं त्यांना सोडविण्याचा प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां आतां त्यांना पुरी शिक्षा भोगली पाहिजे! जे याहून वेगळ्या समजुतीनें तुरुंगांत गेले असतील त्यांनीं वाटेल तर सरकारकडे अर्ज करून माफी मागून परत यावें. त्यांना मोकळीक आहे. किंबहुना या चळवळींतून अशा लोकांचा निचरा झाल्यानें ती अधिक खंबीरच होईल. पूर्वी रशियांत हजारों लोक तुरुंगांत गेले, पण अजून तो देश स्वतंत्र झाला नाहीं. बहुत लोकांनीं शांत व स्वस्थ रहावें व फार थोड्यांनीं पूर्ण अनत्याचारी बनून चळवळ करावी; असें केल्यास अधिक लवकरच स्वराज्य मिळेल. पण मनात अत्याचारीपणा जतन करून ठेवून लोक तुरुंगांत गेले तर आपलें ध्येय दुरावेल. म्हणून यावेळीं लोकांची निंदा जुमानू नये. फार थोडे लोक चळवळीला मिळाले तरी पुरे म्हणावें. अधिकाऱ्यांनीं आपला हा कमकुवतपणा मानून दडपशाही अधिक चालविली तरी तिला मान द्यावी, आणि दडपशाहीचा केवळ प्रतिकार करण्याकरितां म्हणून जो व्यक्तिशः कायदेभंग सुरू होता तोहि सोडून द्यावा. आणि सर्व शक्ति एकवटून ती आर्थिक व सामाजिक सुधारणेवर खर्च करावी. या कार्यक्रमांत चटकदारपणा किंवा स्वारस्य नसल. परंतु शक्तिवर्धन तरी खास आहे. जमीनदार, मवाळ वगैरे सर्व लोकांपुढें गुडघे टेकून आपण त्यांना विनवून असें सांगावें कीं तुमच्या संबधानें आमच्या मनांत यत्किंचितहि किंतु किंवा अप्रीति नाहीं. इंग्रज लोकांचाहि आपण द्वेष करू नये किंवा त्यांना दुखवूं नये. त्यांना फार तर नमून न वागलें म्हणजे आपलें कर्तव्य संपलें.

दिल्लीच्या सभेंत ज्या थोड्या लोकांनीं ठरावाविरुद्ध मतें दिलीं त्यांचें ध्येय वेगळेंच आहे. असहकारितेच्या कार्यक्रमावर ज्यांचा विश्वास नाहीं अशांनीं आपला स्वतंत्र पक्ष व एखादी नवी घटना बनविणें हेंच त्यांच्या दृष्टीनें अधिक योग्य व स्वदेशभक्तीचें असें होणार नाहीं काय? असें झाल्यानें त्यांना अधिक खरेपणानें राजकीय शिक्षण देतां येईल. राष्ट्रीय सभेच्या क्रीड (ध्येया) वर ज्यांचा विश्वास नाहीं, अशांनीं ही सभा सोडून जाणेंच अधिक बरें. केवळ असहकारितेवर विश्वास नसेल तर गोष्ट वेगळी. कारण त्याला सदा स्थितीतहि

राष्ट्रीय सभेंत राहतां येईल. पण ज्यांचा ध्येयाच्या शब्दावर विश्वास नाहीं त्यांना मात्र या सभेंत जागाच उरत नाहीं. दिल्ली येथील सभेंत मी ध्येयाचा खुलासा मांडला. विशेषः तींतील 'पीसफुल' या शब्दाचा अर्थ 'अनत्याचारी' आणि 'लेजिटिमेट' या शब्दाचा अर्थ सत्यमय किंवा 'सत्यपूर्ण' असा करून मीं मांडला तेव्हां मला कांहीं लोकांनीं विरोध केला. त्यानें तर माझ्या मनाला फारच इजा झाली. हें माझें भाषांतर साभिप्रायच होतें. पण लोक गंभीरपणानें म्हणूं लागले कीं, कीडमध्यें तशा अर्थाचे शब्द नाहींत तें खुलाशाच्या रूपानें तरी तुम्ही घालणार कोण ? तेव्हां हे प्रतिशब्द काढून टाकण्यास मी कबूल झालों. कारण, म्हटलें उगाच खदकारक वाद त्यावर कशाला माजवा ? पण या योगानें सत्याचा खून झाल्याप्रमाणें मला दुःख झालें आहे. हे अल्पसंख्याक लोक पुरे स्वदेशभक्त असून त्यांनाहि स्वराज्य मिळवावयाचें आहे. पण अनत्याचारीपणा व सत्य यांवर त्यांचा विश्वास नसेल तर राष्ट्रीय सभेंतून त्यांनीं जावें हें बरें. ज्यांचीं त्यांनीं निरनिराळीं ध्येयें स्वतंत्र ठेवून काम करणें बरें नव्हे काय ? जेथें आपलें पटत नाहीं तेथें हजर राहून अडथळा करण्यापेक्षां गैरहजर राहणेंच अधिक बरें. लोकशाही प्रस्थापित व्हावयाची असेल तर यानेंच होईल."

प्रकरण ३१ वें.

# " आम्हीं जातों आमुच्या गांवा— "



हजार दोन हजार वर्षांत असा एखादाच प्राणी मानव कोटींत जन्म घेतो. एखाद्या येशू खिस्ताला अथवा गांधीला मोकळेपणीं वावरूं देण्यासहि ज्या मानवी समाजाला भीति वाटते, तो समाज जगण्यास योग्य नाहीं, असें निःसंशय समजावें. त्याची घडी भरली असल्याचें तें पूर्व चिन्ह आहे आणि यमपाश त्याच्या गळ्यांत आधींच पडले आहेत.—रें. जॉन हेन्स् होम्स्.

*　　*　　*

बार्डोलीच्या ठरावानें आणि पुढें दिल्ली येथें कायम झालेल्या ठरावानें म. गांधींनीं सर्व प्रकारचा आक्रामक कायदेभंग बंद ठेविला होता. इतकेंच नव्हे तर इंग्रज लोकांवर मनापासून प्रेम करा असें अत्याग्रहानें सांगण्याचें काम त्यांनीं जोरानें चालविलें होतें. असें असूनहि प्रिन्स ऑफ् वेल्स ह्यांचा दौरा अगदीं संपत आला आहे अशा वेळीं, ता. १० मार्च रोजीं म. गांधींना अहमदाबाद येथें पकडण्यांत आलें.

म. गांधींची लोकविलक्षण धडाडी आणि अनत्याचारी मर्दानी चळवळ ह्यांचा आतांपर्यंत सरकारला चांगलाच अनुभव आलेला होता. आणि गांधींचा हा देहस्वभाव चोरीचोऱ्यानें मुळांतच बदलणें शक्य नाहीं हेंहि सरकार जाणून होतें. आणि म्हणूनच बहुधा म. गांधींचें जनतेवरील वजन शक्य तितकें कमी झालें आहे अशी वेळ पाहून त्यांस पकडण्यांत आलें असावें.

## म. गांधी यांजवरील खटला.

" महात्मा गांधी यांजवरील खटल्यास ता. १८ शनिवारी सव्वाबाराचे सुमारास प्रारंभ झाला. व अवघ्या एका तासांत तो संपलाहि. सरकारनें आपणाकडून पुष्कळ थाट मांडला होता; पण महात्माजींनीं आपल्या सडेतोडपणानें

ती सर्व निरर्थक करून टाकला. प्राय: असा महत्वाचा खटला मुंबईस चालावयाचा; पण महात्माजी गुन्ह्याची कबुली स्वत: होऊन देणार हें सरकारास कळून चुकलें असल्यामुळें, त्यांना मुंबईचें हायकोर्ट, स्पेशल ज्यूरी वगैरेंच्या खटाटोपांत पडण्याचें कारण पडलें नाहीं.

खटल्याचें काम अहमदाबादचे सेशन्स-जज्ज ब्रूमफिल्डसाहेब यांच्यापुढें चाललें होतें. कोर्टाची जागा नेहमीची नसून कँपांतील शाहीबागेंत ठरविण्यांत आली होती. येथील इमारत पुरी दीडदोनशें माणसें बसण्याइतकीहि मोठी नाहीं. सरकारी पाहुण्यांचें तें बहुधा भोजनगृह असावें ! इमारतीबाहेर कंपाउंड मात्र खूप मोठें आहे, तथापि याचाहि लोकांस फारसा उपयोग नव्हता. कारण हें ठिकाण शहरापासून दोन मैल लांब असून, शिवाय आज बंदोबस्त फारच कडक राहणार असें लोकांस कळून चुकलें होतें. सकाळपासूनच शहरच्या लोकांना लष्करचें दर्शन अनेक रीतींनीं घडत होतें. खटल्याच्या दिवशीं गिरण्या बंद राहणार अशी बोलवा होती, पण मजूरवर्ग त्या बाजूस मुळींच दिसला नाहीं. इमारतींत तिकिटानें प्रवेश मिळालेल्या शेंदीडशें लोकांखेरीज कंपाउंडच्या बाहेर रस्त्यावर फार तर तीनतीनशें माणसें असतील नसतील. शांतता राखण्याचा महात्माजींचा उपदेश अहमदाबादेच्या लोकांनीं खरोखरच अदमासाबाहेर आचरणांत आणिला होता. आज गांधीजींचा खटला चालू असल्याचें आपणास माहीत आहे असें दर्शविणारें एकहि गमक लोकांनीं सरकारला मिळूं दिलें नाहीं. शहरांत पोलीस व लष्कर यांचा बंदोबस्त मात्र जागजागीं बराच दिसून येत होता. शाहीबागेचें कंपाउंड तर लष्करी लोकांनीं चौतर्फा नुसतें फुलून गेलें होतें.

सुमारें अकरा वाजल्यापासून प्रेक्षक लोक कोर्टांत येऊं लागले होते. तिकिटें थोडीं असल्यामुळें तीं महात्माजींशीं एकानाएका रीतीनें संबंध येणाऱ्या लोकांनाच बहुधा दिलीं होतीं. सरकारी तिकिटांनीहि सुमारें पांचपन्नास लोक आले होते. पण गांवांतील शिष्ट व सुशिक्षित जनतेपैकीं असे फारच थोडे लोक होते. तरी खुद्द जज्जाच्या खुर्चीला प्रेक्षकांच्या खुर्च्या भिडल्या होत्या; व दुरून पाहणारास हा न्यायाधीश, हा खटला चालविणारा बॅरिस्टर व हा आरोपी असें वेगवेगळे ओळखतांहि येऊं शकले नसते. आरोपीच्या निःसंभारी साधेपणानें कोर्टांतील नेहमींचा डामडौल पटसारा लोपला होता. आरोपीची खुर्ची न्यायाधीशाच्या खुर्चीपासून चार हातहि दूर नव्हती. अनेक सरकारी अधिकारी-

त्यांतील खुणा केलेले भाग वाचून दाखविले. ते त्याचा उद्देश काय म्हणून विचारतां म्हणाले कीं, आरोपी गांधी यांनी राजद्रोहात्मक असे हे नुसते तीनच लेख लिहिले नसून इतर पुष्कळच लिहिले आहेत, व राजद्रोह फैलावण्याचा हा उद्योग ते आज बरेच दिवस करीत आहेत. हें ऐकतांच गांधीजी हंसूं लागले, व याचें कारण पुढें दिलेली त्यांची कैफीयत वाचणारास आपोआप कळून येईल. स्ट्रँगमन बाचीत होते ते लेख मॅजिस्ट्रेटपुढें दाखल झाले असले तरी सेशन कोर्टांत पुरावा घेतला गेला नसल्यामुळें वास्तविक गैरलागूच होते. तथापि हें बंधन स्ट्रँगमन यांच्या मार्गांत आपणच घातलें आहे असें समजून, जज्जांनी बॅरिस्टरसाहेबांस कांहीं वेळ आपल्या तोंडाचा चिकटा घालवूं दिला पण लवकरच ते म्हणाले कीं, अधिक उतारे वाचून तरी तुम्हीं अधिक काय मिळविणार? शिवाय जे लेख बाचण्यांत येत त्यांतले शब्द चार्जांतील लेखांपेक्षां अधिक कडक आहेत असें श्रोत्यांनाहि वाटत नव्हतें! महात्माजींचें लिहिणेंच मुळीं एक टाकीं. सरकारचा निषेध झाला तरी तो वाटेल त्या त्यांच्या लेखांत एकरूपच, म्हणजे स्पष्ट व प्रांजळपणाचाच सांपडावयाचा; त्यांत आंत एक व बाहेर दुसरें असा भेदच मिळावयाचा नाहीं; तेव्हां यापुढें सरकारी बॅरिस्टर तरी काय करणार? आपण आणखी भाराभर उतारे वाचले तरी त्यांचा अर्थ एकच. शिवाय आरोपीहि शब्दांच्या म्हणाल त्या कडक अर्थाला कबूल, असें पाहून स्ट्रँगमनसाहेबांनीं शेवटीं फक्त इतकेंच सांगितलें कीं, गांधींना शिक्षा जबर दिली पाहिजे. आरोपी बँकर यासंबंधानें मात्र ते असें म्हणाले कीं, ते या लेखांचे केवळ मुद्रक आ न, लेख लिहिण्यांत त्यांचा संबंध नसल्यानें त्यांना फक्त दंड करून सोडलें तरी [illegible]कारची त्याला हरकत नाहीं.

यानंतर शिक्षेच्या बाबतींत तुम्हांला कांहीं सांगावयाचें असल्यास [illegible] असें महात्मा गांधी यांना विचारण्यांत आलें, तेव्हां त्यांनीं प्रथम तोंडी थोडेसें भाषण करून आपली लेखी कैफीयत नेहमींप्रमाणें बसूनच वाचून दाखविली. ती अशी:—

## म. गांधींची कैफियत.

*महात्मा गांधींनी स्वतःच्या बचावार्थ कोणताहि पुरावा दिला नाहीं किंवा* अपराधहि नाकबूल केला नाहीं. मात्र आपण हे लेख कां लिहिले याच्या समर्थनार्थ पुढील आशयाचें आत्मसमर्थन कोर्टास दाखल केलें. ते म्हणतात—पूर्वी मी पक्का राजनिष्ठ व सहकारितावादी असतांना आज मी तितकाच कट्टा असं-

सांपडेल त्या जागी उभें राहिलें होतें. कॉं. वर्किंग कमिटीचें सभासद आणि म. गांधी यांचे खास स्नेही यांना त्यांच्या खुर्चीला लागून खुर्च्या दिल्या होत्या. प्रेक्षक वर्गांत स्त्रियाहि पुष्कळ होत्या. बाराला सुमारें दहा मिनिटें कमी असतां महात्मा गांधी व शंकरलाल बँकर हे पोलीस सुपरिंटेंडेंटसमवेत कोर्टांत येऊन दाखल झाले. ते येतांच सर्वांनी उठून त्यांना ताजीम दिली. युरोपियन लोकहि उठले. फक्त नेटिव्ह सरकारी वकील तेवढे उठले नाहींत ! जज्ज येऊन दाखल होईपर्यंत महात्माजींचें अनेक मित्रमंडळीशीं संभाषण नेहमींप्रमाणें सुरू होतें. शेवटीं बारिस्टर स्टँगमन व त्यानंतर न्यायाधीश आल्यावर बारा वाजून दहा मिनिटांनीं खटल्यास सुरुवात झाली.

प्रथम खटल्याचे कागद चाळून न्यायाधिशांनीं बोलण्यास सुरुवात केली. सरकारी बॅरिस्टरास उद्देशून ते म्हणाले कीं, मजकडे मॅजिस्ट्रेट कडून चार्ज आला त्यांत तीन लेखांचा उल्लेख असतां, त्यांना निरनिराळे गुन्हे असें मानल्याचें दर्श विणारा अनेकवचनीं शब्द नाहीं. यावर, तो शब्द घातला पाहिजे अशी स्टँगमन यांनी संमति दिली; व इनसाफाकरितां चार्ज जरी एक तरी गुन्हे तीन असें ठरलें. अर्थात प्रत्येकाकरितां बहुधा वेगवेगळी शिक्षा दिली जाणार असा सर्वांनी तर्क बांधला. नंतर कोर्टाच्या शिरस्तेदारांनी चार्जशीट वाचून दाखविला; आणि क्रि. प्रो. प्रमाणें चार्जांतील आरोपाचें स्वरूप न्यायाधिशांनीं आरोपीस समजावून द्यावें असें असल्यामुळें ही अवश्यक अशी गोष्ट दोनचार मिनिटें खर्चून त्यांना व्यर्थ करावी लागली ! यानंतर आरोपींना गुन्हा कबूल कीं नाकबूल हें विचारण्याचा विधि व्हावयाचा तोहि अर्थात रीतसर झाला, व उभयतांनींहि अगदीं मोजक्या शब्दांत आम्ही गुन्हा पूर्णपणें कबूल करितों असा सणसणीत जबाब दिला ! येथेंच खटल्याचें मुख्य काम संपलें; पण मि. स्टँगमन उठून म्हणाले कीं, आरोपींनीं गुन्हे कबूल केले असले तरी पुढें खटला रीतसर चालवून पुरावा द्यावा असाहि एक विकल्प क्रि. प्रो. कोडांत सांगितलेला आहे, त्याचा अवलंब करून खटला चालवावा व याला त्यांनीं कांहीं आधारहि दाखविले. परंतु न्यायाधिशांनीं सांगितलें कीं, कबुलीजबाब इतका स्पष्ट आहे कीं, पुरावा घेत बसून वेळ घालविण्याचें कांहीं कारण नाहीं.

शेवटीं फक्त शिक्षा सांगण्याचें काम राहिलें; व यावर मात्र तुम्हास कांहीं सांगावयाचें असल्यास मी ऐकून घेतों, असें न्यायाधिशांनीं म्हटल्यावर स्टँगमन यांनी दहावीस मिनिटेंपर्यंत 'यंग इंडिया' पत्राचे कांहीं नवेजुने अंक चाळून

त्यांतील खुणा केलेले भाग वाचून दाखविले. ते त्याचा उद्देश काय म्हणून विचारतां म्हणाले कीं, आरोपी गांधी यांनीं राजद्रोहात्मक असे हे नुसते तीनच लेख लिहिले नसून इतर पुष्कळच लिहिले आहेत, व राजद्रोह फैलावण्याचा हा उद्योग ते आज घरेच दिवस करीत आहेत. हें ऐकतांच गांधीजी हंसूं लागले, व याचें कारण पुढें दिलेली त्यांची कैफीयत वाचणारांस आपोआप कळून येईल. स्ट्रँगमन नाचीत होते ते लेख मॅजिस्ट्रेटपुढें दाखल झाले असले तरी सेशन कोर्टीत पुरावा घेतला गेला नसल्यामुळें वास्तविक गैरलागूच होते. तथापि हें बंधन स्ट्रँगमन यांच्या मार्गांत आपणच घातलें आहे असें समजून, जज्जांनीं बॅरिस्टरसाहेबांस कांहीं वेळ आपल्या तोंडाचा चिकटा घालवूं दिला पण लवकरच ते म्हणाले कीं, अधिक उतारे वाचून तरी तुम्ही अधिक काय मिळविणार ? शिवाय जे लेख वाचण्यांत येत त्यांतले शब्द चार्जांतील लेखांपेक्षां अधिक कडक आहेत असें श्रोत्यांनाहि वाटत नव्हतें ! महात्माजींचें लिहिणेंच मुळीं एक टाकीं. सरकारचा निषेध झाला तरी तो वाटेल त्या त्यांच्या लेखांत एकरूपच, म्हणजे स्पष्ट व प्रांजळपणाचाच सांपडावयाचा; त्यांत आंत एक व बाहेर दुसरें असा भेदच मिळावयाचा नाहीं; तेव्हां यापुढें सरकारी बॅरिस्टर तरी काय करणार ? आपण आणखी भाराभर उतारे वाचले तरी त्यांचा अर्थ एकच. शिवाय आरोपीहि शब्दांच्या म्हणाल त्या कडक अर्थाला कबूल, असें पाहून स्ट्रँगमनसाहेबांनीं शेवटीं फक्त इतकेंच सांगितलें कीं, गांधींना शिक्षा जबर दिली पाहिजे. आरोपी बँकर यासंबंधानें मात्र ते असें म्हणाले कीं, ते या लेखांचे केवळ मुद्रक आ[illegible], लेख लिहिण्यांत त्यांचा संबंध नसल्यानें त्यांना फक्त दंड करून सोडलें तरी [illegible]कारची त्याला हरकत नाहीं.

यानंतर शिक्षेच्या बाबतींत तुम्हांला कांहीं सांगावयाचें असल्यास [illegible] असें महात्मा गांधी यांना विचारण्यांत आलें, तेव्हां त्यांनीं प्रथम तोंडीं थोडेसें भाषण करून आपली लेखी कैफीयत नेहमींप्रमाणें बसूनच वाचून दाखविली. ती अशी:—

## म. गांधींची कैफियत.

महात्मा गांधींनी स्वतःच्या बचावार्थ कोणताहि पुरावा दिला नाहीं किंवा अपराधहि नाकबूल केला नाहीं. मात्र आपण हे लेख कां लिहिले याच्या समर्थनार्थ पुढील आशयाचें आत्मसमर्थन कोर्टास दाखल केलें. ते म्हणतात—पूर्वी मी पक्का राजनिष्ठ व सहकारितावादी असतांना आज मी तितकाच कट्टा असं-

-तोपवादी व असहकारितावादी कसा झालों हें, माझ्या देशबांधवांस व त्याच प्रमाणें इंग्लंडांतील ज्या जनतेच्या समजुतीकरितां मजवर हा खटला करण्यांत आला आहे त्यांस जाहीर करणें हें माझें कर्तव्य आहे. तसेंच या कोर्टापुढें मी मजवरील आरोप कबूल कां करीत आहें तेंहि कोर्टाला कळविणें जरूर असल्यानें मी पुढील विवेचन करीत आहें.

माझ्या सार्वजनिक आयुष्यास १८९३ सालीं दक्षिणआफ्रिकेंतील अशांततेच्या वातावरणांत प्रारंभ झाला. त्या वेळीं ब्रिटिश अधिकाऱ्यांचा मला जो अनुभव आला तो स्पृहणीय नव्हता. त्या वेळीं मला कळून चुकलें कीं, मी केवळ हिंदी मनुष्य असल्यामुळें मला मनुष्यत्वाचें कोणतेंहि हक्क नाहींत. पण तेवढ्यानें मी निराश मात्र झालों नाहीं. त्या वेळीं मला वाटलें कीं, ब्रिटिश राज्यपद्धति तत्वतः मूळची चांगली असून हिंदी जनतेच्या अमानुष वागणुकीचा आगंतुक दोष तिला बाहेर जडला आहे. यास्तव मी त्या राज्यपद्धतीशीं राजीखुषीनें मनःपूर्वक सहकारिता सुरू केली. राज्यपद्धतींत दोष दिसला तर त्यावर मी कडक टीका करीत असें; परंतु ती राज्यपद्धतीच नष्ट करावी असा विचार त्या वेळीं माझ्या मनांत आला नाहीं.

याच कारणास्तव १८९९ सालीं जेव्हां बोअरयुद्धामुळें ब्रिटिश साम्राज्याच्या अस्तित्वावरच घाला आला त्यावेळीं मी ' ॲम्ब्युलन्स कोअर ' उभारून, लेडी स्मिथचा वेढा उठविण्याकरितां ज्या ज्या ठिकाणीं चकमकी झडल्या त्या त्या ठिकाणीं सैन्याला मदत दिली. १९०६ सालीं झुलू लोकांच्या बंडाच्याहि वेळीं मी घायाळांना वाहून नेणाऱ्या डोलीवाल्यांचें पथक उभारून बंडाचा उपक्रम होईपर्यंत काम केलें. या दोनहि वेळच्या कामांसाठीं मला पदकें मिळालीं असून युद्धखात्याच्या रिपोर्टांतहि माझी शिफारस नमूद केलेली आहे. लॉर्ड हार्डिंज यांनीहि माझ्या दक्षिण आफ्रिकेंतील कामगिरीकरितां मला ' कैसर-इ-हिंदचें ' सुवर्णपदक दिलें.

१९१४ सालीं जर्मन युद्धास प्रारंभ होतांच, त्यावेळीं इंग्लंडांत असलेल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या व इतरांच्या सहाय्यानें मी स्वयंसेवकांचें ॲम्ब्युलन्स पथक उभारलें; व त्याच्याहि कामाची अधिकाऱ्यांनी शिफारस केली. १९१८ सालीं दिल्ली राजधानींत ' वॉरकॉन्फरन्स ' भरवून लॉर्ड चेल्म्सफर्ड यांनीं जेव्हां ' रंगरूटांची ' मागणी केली त्यावेळीं मी खेडा जिल्ह्यांतून एक पलटण उभारण्याकरितां इतके परिश्रम केले कीं मी त्या योगानें आजारीहि पडलों. हे परिश्रम फल-

रूप होण्याच्या रंगांत आलें होतें इतक्यांत युद्ध समाप्त झालें व ' रंगरूट ' जमविण्याचें काम बंद करण्याचा हुकूम आला. हीं सर्व कामें करण्यांत मी एकाच दृढभावनेनें प्रेरित झालों होतों; व ती हीच कीं, असल्या कामगिरीनें तरी माझ्या देशबांधवांस ब्रिटिश साम्राज्यांत संपूर्णतेनें समान हक्क मिळतील.

पण जनतेच्या खऱ्या स्वातंत्र्यावर घाला घालणाऱ्या रौलेट बिलानें माझ्या मनाला पहिला विजेचा धक्का बसला; व त्या वेळीं त्या बिलाविरुद्ध चळवळ करणें हें आपलें कर्तव्य आहे असें वाटून मी घनचक्कर चळवळ केली. त्यानंतर जालियांवाला बागेंतली कत्तल, गल्लींतून सरपटण्याचा हुकूम, भर चवाट्यावर फटक्याची शिक्षा वगैरे जे उपमर्दकारक प्रकार सुरू झाले त्याचें वर्णन न करणेंच बरें. याच वेळीं माझ्या हेंहि लक्षांत आलें कीं, तुर्कांचा मुलूख व इस्लामी धर्मक्षेत्रांवरील अधिराज्य या संबंधांत हिंदी मुसलमानांना ज वचन प्रधानमंडळानें दिलें होतें तें वचनहि पाळलें जाण्याचा संभव नाहीं. अशा रीतीनें माझी मनोदेवता सांगत असतां, आणि माझे स्नेही सोबतीहि मला इषारा देत असतां, १९१९ च्या अमृतसरच्या राष्ट्रीय सभेंत मीं सरकारशीं सहकारिताच करण्याविषयीं झगडलों ! कारण मॉंटेग्यू-चेल्मस्फर्ड सुधारणा अपुऱ्या व असमाधानकारक आहेत असें जरी मला वाटत होतें तरीं त्या योगानें हिंदी राजकारणांत नवीन मनूचा उदय झाला आहे आणि त्या मनूंत मुसलमानांची व पंजाबची गाऱ्हाणीं दूर केलीं जातील अशी मला त्या वेळीं आशा वाटत होती.

पण माझ्या सगळ्या आशा पार ढांसळून गेल्या. खिलाफतीसंबंधीचें वचन मोडलें गेलें. पंजाबच्या अत्याचाराबद्दल सफेतीचा हात फिरविण्यांत आला; बहुतेक अपराधी शिक्षा न होतांच निसटले, त्यांतले कित्येक तर पेन्शन खात आहेत, कित्येक अजून सरकारी नोकरींत आहेत, आणि कांहींजणांना तर बढती च बक्षिसहि मिळालें आहे ! त्याचप्रमाणें या वेळीं माझ्या हेंहि लक्षांत आलें कीं, रिफॉर्म ॲक्टानें नोकरशाहीचें मन बदललेलें नसून, या सुधारणा म्हणजे हिंदुस्थानांतील द्रव्य अधिक जारीनें शोषण करण्याचा व हिंदी राष्ट्रास गुलामगिरीच्या पंकांत अधिक खोल रुतविण्याचा तो एक डाव आहे !

ब्रिटिशांचा संबंध जडल्यानें हिंदुस्थान देश राजकीय व आर्थिक दृष्ट्या पूर्वीपेक्षां अधिक दुबळा झाला असाहि विचार आतां माझ्या मनांत येऊं लागला. हिंदी राष्ट्र निःशस्त्र झालें असल्यानें कोणाहि जुलुम करणाऱ्या विरुद्ध बंड उभारण्याची त्यास ताकद राहिली नाहीं. हिंदुस्थानचा हा दुबळेपणा व परावलंबी-

पणा इतका वाढला आहे की, या देशाला वसाहतींच्या जोडीचें स्वराज्य मिळविण्याला कित्येक पिढ्या जाव्या लागतील अशी या देशांतील कित्येक चांगल्या लोकांचीहि समजूत झालेली आहे ! दुष्काळ निवारण करण्याचें जनतेंत बिलकुल त्राण उरलें नाहीं. ब्रिटिशांच्या आगमनापूर्वी या देशांतील खेड्यांतून कापसाचीं वस्त्रें विणण्यांत येत, व त्या योगानें शेतकीच्या तुटपुंज्या उत्पन्नांत आवश्यक अशी भर पडत असे. हिंदुस्थानच्या जीवनास अवश्यक अशा या धंद्याची मुंडी कशी निर्दयपणानें मुरगळण्यांत आली त्याचें ब्रिटिश साक्षीदारांनींच वर्णन लिहून ठेविलें आहे !

खेड्यापाड्यांतील अर्धपोटीं राहणारी जनता दिवसेंदिवस कशी निःप्राण बनत चालली आहे याची शहरवासीयांस क्वचितच कल्पना करतां येते. व्यापारीदृष्टीनें जनतेचें द्रव्यशोषण करण्याकरितांच हिंदुस्थानावर ब्रिटिशांनीं राज्य चालविलें आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत येत नाहीं. त्याचप्रमाणें परकीय द्रव्यशोषकांचे हस्तक बनून आपण जी दलाली घेतों व नफा उकळतों, तो नफा व ती दलाली सामान्य जनतेच्या निढळाच्या घामानें पैदा केलेल्या द्रव्याचें शोषण होय, ही गोष्टहि नगरवासीयांच्या ध्यानांत येत नाहीं. खेडेगांवांतल्या रहिवाशांचे अस्थिपंजराचे सांपळे पाहिले म्हणजे त्यांच्या दैन्यावस्थेचा जो पुरावा मनावर बिंबतो तो आंकडेशास्त्रज्ञांच्या हातचलाखीनें नष्ट होणें शक्य नाहीं. राष्ट्रांतील जनतेची खच्ची करण्याच्या या घोर व अपूर्व अशा अपराधाबद्दल राज्यकर्ते व नगरवासी यांना ईश्वराच्या न्यायासनापुढें खचित खचित जबाब द्यावा लागेल.

या देशांतील कायदेहि परकीय द्रव्यशोषकांच्या हिताकरितां उपयोगांत आणले जातात. पंजाबच्या लष्करी कोर्टांनीं ज्यांना शिक्षा दिली त्यांतले शेंकडा ९५ इसम तर अगदीं निरपराधी होते अशी माझी प्रामाणिक समजूत झाली आहे. हिंदुस्थानांतील राजकीय स्वरूपाच्या खटल्यांचा मला जो आतांपर्यंत अनुभव आला आहे त्यावरून माझें असें ठाम मत झालें आहे कीं, १० खटल्यांपैकीं ९ खटल्यांत तरी आरोपी निरपराधी असतात. त्यांचा अपराध जर कांहीं असेल तर स्वदेशभक्ति हाच होय. परे, गोऱ्या–काळ्यांत वाद उपस्थित झाला म्हणजे तर शंभरांतून ९९ खटल्यांत न्यायाचा बोजवाराच उडतो ! यांत अतिशयोक्तीचा भाग मुळींच नसून ज्यांना असल्या खटल्यांची माहिती आहे त्यांच्या नित्याच्या अनुभवांतील ही गोष्ट आहे. परकी द्रव्यशोषकांच्या हिताकरितां,

जाणूनबुजून किंवा न कळत पण कायद्यांचा असा दुरुपयोग केला जातो असें माझें मत आहे.

पण सर्वांत खेदाची गोष्ट ही कीं, न्याय खात्यांत काम करणाऱ्या गोऱ्या किंवा काळ्या सरकारी नोकरांस आपण या पापाचे धनी होत आहोंत याची जाणीव नसते. हिंदी राज्यपद्धति म्हणजे जगांतील एक सर्वोत्कृष्ट पद्धति असून तिची बजावणी करण्याचें पुण्यकृत्य आपण करीत आहों, व या मार्गानें सावकाशीनें कां होईना पण हिंदुस्थानचें कल्याण होईल अशीच बहुतेकांची प्रामाणिकपणाची समजूत असते. एका बाजूस खंबीर पण परिणामकारक अशी दडपशाही व संघटित शक्तिसर्वस्व असून, दुसऱ्या बाजूला प्रतिकाराचें किंवा स्वसंरक्षणाचें मोडकेंतोडकें साधनहि नसल्यामुळें, प्रजेच्या पौरुषाची रूची झाली असून ती प्रजा ढोंगी बनली आहे हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. या ढोंगीपणाच्या दुष्ट संवयीमुळेंच राज्यकर्त्यांचीहि दिशाभूल होत आहे.

पीनल कोडांतील ज्या १२४ अ कलमाखालीं सुदैवानें मजवर आरोप ठेवण्यांत आला आहे तें कलम नागरिकांच्या स्वातंत्र्याच्या नरडीचा घोट घेण्याचें अत्यंत निर्घृण शस्त्र आहे. पण कायद्यानें का राजकर्त्यांविषयीं कोठें प्रीति उत्पन्न करतां येते ! जर एकाद्याच्या मनांत एकाद्या माणसाविषयीं किंवा पद्धतीविषयीं प्रेम वाटत नसेल, तर त्यास तसें बोलून दाखविण्याला खुशाल मुभा असली पाहिजे. मात्र त्यानें त्या योगानें अत्याचारास उत्तेजन किंवा बडखोरीस चिथावणी देऊं नये. पण या १२४ अ कलमांत तर असे नमूद केलें आहे कीं, अप्रीतीचा फैलाव केला कीं, हा गुन्हा होतो ! या कलमाखालीं ज्यांची ज्यांची चौकशी झाली त्यांतल्या कित्येक खटल्यांची हकीकत वाचल्यावरून मी साफ म्हणूं शकतों कीं, या कलमानें दोषी ठरविलेले कित्येक इसम अत्यंत लोकप्रिय असे देशभक्त होते. याकरितांच या कलमाचा आरोप आपणांवर ठेवला जाणें हें मी माझें भाग्यच समजतों.

माझ्या मनांत अप्रीति वास्तव्य कां करीत आहे याचा हा मी थोडक्यांत इतिहास सांगितला. व्यक्तिशः कोणाहि अधिकाऱ्याविषयीं माझ्या मनांत अप्रीति नाहीं. मग बादशहाविषयीं नाहीं हें सांगावयास नकोच. परंतु ज्या राज्यपद्धतीचा एकंदरींत परिणाम राष्ट्रास विघातक असा झाला आहे, त्या राज्यपद्धतीविषयीं अप्रीति वाटणें हा मी सद्गुणच समजतों. पूर्वीच्या कोणत्याहि रियासतींतल्यापेक्षां ब्रिटिश रियासतींत हिंदुस्थानच्या पौरुषाची अधिक हानि झाली आहे.

असें माझें ठाम मत असल्यानें या राज्यपद्धतीविषयीं मनांत प्रीति वागविणें हें मी पापकर्म समजतों, आणि म्हणूनच ज्या ज्या लेखांवरून माझ्यावर फिर्याद करण्यांत आली आहे त्या त्या लेखांत त्या राज्यपद्धतीविरुद्ध मत देण्याचा माझा अधिकार मला बजावतां आला हें मी भाग्य समजतों.

सारांश, हिंदुस्थान व इंग्लंड यांचा आज जो कृत्रिम संबंध जडला आहे त्यांतून बाहेर पडण्याला असहकार हा एक मार्ग सुचवून मी उभय राष्ट्रांची एक प्रकारें सेवाच केली आहे. सत्याशीं सहकारिता करणें हें जसें कर्तव्य आहे तसेंच असत्याशीं असहकार करणें हेंहि कर्तव्यच आहे. पूर्वी हा असहकार अत्याचाराच्या रूपानें दर्शविला जात असे, पण त्या योगानें दुष्ट कृत्यांची परंपरा वाढतच जाई. वास्तव जगांतून दुष्टपणा नाहींसा करण्याला अनत्याचारी असहकार हाच खरा मार्ग आहे असें मी या राष्ट्रास शिकवीत आलों आहें. दुष्टपणाशीं असहकार करण्याबद्दल जी शिक्षा होईल ती भोगण्याला तयार होणें हा एक अनत्याचारीपणाचाच भाग आहे; याकरितां मला जी कोणतीहि जास्तींत जास्त शिक्षा देण्यांत येईल ती भोगण्यास मी मोठ्या आनंदानें तयार आहें. कायद्याच्या दृष्टीनें माझें कृत्य अपराधांत गणलें जात असेल; परंतु नागरिकत्वाच्या नात्यानें मी माझें तें अत्यंत श्रेष्ठ कर्तव्यच मानतों. आपण, न्यायाधीश यांना माझें शेवटीं एवढेंच सांगणें आहे कीं, ज्या राज्यपद्धतीची व ज्या कायद्याची बजावणी करण्याकरितां तुम्ही येथें बसलां आहां ते कायदे व ती राज्यपद्धति दुष्ट असून, मी निरपराधी आहें असें तुम्हास वाटत असेल तर तुम्ही आपलें काम सोडून देऊन त्या राज्यपद्धतीशीं व कायद्याशीं असहकार करा. पण तसें न वाटतां ही राज्यपद्धति व हा कायदा राष्ट्राला कल्याणकारक आहे व अतएव माझें कृत्य राष्ट्रहितविघातक आहे अशी तुमची समजूत असल्यास मला जितकी कडक शिक्षा देतां येत असेल तितकी कडक शिक्षा द्या."

शंकरलाल बँकर यांस विचारतां त्यांनीं शिक्षेच्या बाबतींत विशेष कांहीं सांगावयाचें नाहीं असा जबाब दिल्यावर न्यायाधिशांनीं खालील भाषण करून शिक्षा सांगितल्या.

## कोर्टाचा निकाल

गांधीजींचें भाषण वाचून झाल्यावर सेशन्सजज्ज मि. ब्रूमफील्ड कोर्टाचा निकाल सांगतांना म्हणाले—" गांधीजी, तुम्ही आपला अपराध कबूल केल्यानें एका परीनें माझें काम सोपें झालें आहे. तथापि तुम्हास शिक्षा किती

सांगावी हें ठरविण्याचें कामहि कमी कठीण आहे असें नाहीं. कायदा कोणाहि व्यक्तीचा मुलाहिजा ठेवीत नाहीं. तरी पण नेहमीं ज्या प्रकारचे आरोपी माझ्या पुढें येतात किंवा येतील त्यांत तुमची गणना करतां येत नाहीं. आज लक्षावधि लोक तुम्हास महान् देशभक्त व पुढारी मानतात ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. ज्यांचीं राजकीय मतें तुमच्या मताशीं पटत नाहींत ते देखील तुमचें ध्येय उच्च आहे व तुमची वर्तणुक उदात्त साधूसारखी आहे असेंच मानतात. परंतु मला तुमच्याविषयीं एकाच दृष्टीनें विचार करणें प्राप्त आहे; व त्या दृष्टीनें तुम्ही स्वतःच्या कबूलीप्रमाणेंच कायदा मोडून सरकारविरुद्ध एक मोठा गुन्हा केला आहे. तुम्हीं अनत्याचाराचा उपदेश केला असून अनेक वेळां अत्याचार थांबविण्याविषयींहि बरीच खटपट केली आहे हें मी विसरलों नाहीं. परंतु तुमचीं राजकीय मतें आणि तीं मतें ज्यांच्यापुढें तुम्ही सांगत असा त्यांच्यापैकीं पुष्कळांचा स्वभाव लक्षांत घेतां असल्या मताच्या प्रतिपादनानें अत्याचार घडणार नाहींत असें तुम्हांस तरी कसें वाटलें असावें याचें मला तर कोडेंच पडलें आहे. तुम्हास मोकळें सोडणें तुम्ही सरकारला अशक्य करून ठेविलेंत याबद्दल मला अत्यंत खेद होतो. पण वस्तुस्थिती तशी आहे हें निर्विवाद होय. अशा परिस्थितींत तुम्हास शिक्षा किती द्यावी हें बरोबर ठरविणें कठिण आहे. परंतु सुमारें बारा वर्षांपूर्वीं, बहुतांशीं अशाच परिस्थितींत मि. बा. गं. टिळकाना याच १२४ अ. कलमाखालीं जो शिक्षा झाली तेंच उदाहरण मी डोळ्यापुढें ठेऊन चालणार आहें. मि. टिळकांना प्रथमतः जी शिक्षा सांगण्यांत आली ती नव्हे, तर अखेरीस जी शिक्षा अमलांत आली ती, सहा वर्षांची साधी कैद हीच होय आणि तुम्हांलाहि त्यांच्याइतकीच तशीच शिक्षा देणें गैर होणार नाहीं अशी माझी समजूत आहे. तुमच्यावर तीन आरोप आहेत. त्यांतल्या प्रत्येक आरोपाबद्दल दोन वर्षेंप्रमाणें एकंदर सहा वर्षांच्या साध्या कैदेची मी तुम्हास शिक्षा फर्मावितों. यापुढें जर कदाचित् परिस्थितींत फरक घडला तर ही शिक्षा कमी करण्याला सरकारला अधिकार आहे, व तो अधिकार बजावून तुमची लवकर सुटका झाल्यास मला जितका आनंद होईल तितका दुसऱ्या कोणास होणार नाहीं."

यानंतर मि. शंकरलाल बँकर यांजकडे वळून जज्ज म्हणाले, "तुम्ही फक्त आपल्या पुढाऱ्याच्या अनुरोधानें वागलां ! वास्तव तुम्हास पहिल्या दोन अपराधाबद्दल प्रत्येकीं सहा महिनेंप्रमाणें मिळून एक वर्षांची साधी कैद, आणि तिसऱ्या

गुन्ह्याबद्दल एक हजार रुपये दंड अशी शिक्षा देण्यांत येत आहे. दंड न दिल्यास पुन: सहा महिन्यांची साधी शिक्षा भोगावी लागेल."

याप्रमाणें शिक्षा सांगितलेली ऐकून म. गांधी म्हणाले कीं, " कै. लोकमान्य टिळकांच्या चौकशीचें उदाहरण डोळ्यापुढें ठेऊन तुम्ही माझा बहुमान केला आहे. कारण या बाबतींत लो. टिळकांशीं माझी तुलना केली हा मी अत्यंत श्रेष्ठ मान व महद्भाग्य समजतों. तुम्ही जी शिक्षा दिली आहे तिच्यापेक्षां इतर कोणीहि कमी शिक्षा दिली नसती. एकंदरींत हा खटला चालवितांना मला माझ्या अपेक्षेपेक्षांहि अधिक अदबीनें आणि चांगल्या रीतीनें वागविण्यांत आलें हें मला कबूल केलें पाहिजे."

प्रकरण ३२ वें.

# " अमुचा राम राम घ्यावा. "

## शिक्षा सुनावल्यावर.



शिक्षा सांगितल्यानंतर क्षणैकपर्यंत सर्व समाज तटस्थ झाला. शिक्षा बरीच होणार असे पूर्वी वाटणारालाहि तिची मजल सहा वर्षेपर्यंत जाईल अशी खरोखरच कल्पना नव्हती. तसेंच शंकरलाल बँकर यांना दंडावर सोडलें तरी हरकत नाहीं अशी स्पष्ट सूचना सरकारी बॅरिस्टरांनीं केली असतांहि, त्यांना एक हजार रुपये दंड करून शिवाय एक वर्षाची कैद दिली गेली ही गोष्टहि अदमासाबाहेर घडली. शिक्षा सुनावल्यानंतर न्यायाधीश तुरुंगांचें वारंट लिहीत असतांच समाजाची शांतता मोडून गलबल सुरू झाली, तरी न्यायाधिशांनीं तिकडे कानाडोळा केला. त्यांची वर्तणूक सर्व वेळ संभावीतपणाचीच होती. त्यांच्या चेहेऱ्यावरील कुर्रेबाजी आचरणांत उतरली नाहीं. मध्यें एक वेळ स्ट्रॅंगमन बोलत असतां लोकांना हंसूं आवरलें नाहीं, तरी त्यांनी वांकडी नजर करून पाहण्यापलीकडे कांहीं उद्गार काढले नाहीत. प्रथम कोर्टात येतांना व जातांनाहि त्यांनीं किंचित् मान लववून महात्मा गांधींचा सत्कार केला. न्यायाधीशांच्या पाठोपाठ कलेक्टर व इतर अधिकारी निघून गेले. त्यांनींहि गांधीजींशीं दोन शब्द बोलून निरोप घेतला. बॅरिस्टर स्ट्रॅंगमन यांनींहि जातांना महात्माजींना माथा लवविला असें पाहून सर्वांत शेवटीं सरकारी वकील गेले. त्यांनींहि आपली पहिली बेमुरवतखोरी टाकून देऊन गांधीजींनां दोन्हीं हातांनीं प्रणाम केला.

यानंतर बराच वेळपर्यंत हें कोर्ट आहे अशी ओळखहि न उरण्यासारखा खुल्या खेळीमेळीचा प्रकार सुरू होता. शिक्षा सांगतांच महात्माजींना पोलीससाहेब घेऊन जातील अशी जी भीति होती ती लोपून, स्वतः पोलीससाहेबच बाहेर निघून गेले व कोर्टाला महात्माजींच्या आश्रमाचें स्वरूप आलें ! पुढें सहा वर्षे होणाऱ्या महात्माजींच्या वियोगाच्या दुःखाचाहि लोकांना क्षणभर विसर पडून

रानें प्रत्येकाच्या मनांत व चेहऱ्यावर जी एक प्रकारची उद्विग्नता आली होती ती मात्र कांहीं केल्या लोपणें शक्य नव्हतें. न्यायाधीशांनीं शिक्षा सांगतांना सद्‌बुद्धीनें अशी आशा प्रकट केली कीं, देशांत यापुढें स्थिरस्थावर झाल्यास सरकार गांधीजींची मुक्तता सहा वर्षांची मुदत भरण्यापूर्वीहि करील, व तसें घडल्यास आपणास फार आनंद होईल. देशांत स्थिरस्थावर होणें म्हणजे काय याविषयीं जज्ज ब्रूमफील्ड यांची व इतरांची कल्पना जुळणें शक्य नसलें तरी महात्माजी लवकर सुटून परत यावे व त्यांनीं फिरून देशोद्धाराचें काम आपल्या लेखणीनें व वाणीनें पूर्ववत् सुरू करावें अशीच सर्वांची मनापासून इच्छा आहे.—( केसरी. )

## तुरुंगांतील पहिलें पत्र

"वर्किंग कमीटीचे अध्यक्ष आणि हिंदुमुसलमानांचे आणि यथार्थ सांगावयाचें म्हणजे एकंदर हिंदुस्थानचे पुढारी" ह्या नात्यानें गांधींनीं साबरमती तुरुंगांतून आपलें पहिलेंच पत्र ता. १२ मार्चे रोजीं हकीम अजमलखान ह्यांस लिहिलें.

"सर्व काळ आणि सर्व परिस्थितींत हिंदु–मुसलमानांचें ऐक्य हें आपलें धर्मव्रत असलें पाहिजे." परंतु

"पारशी, ख्रिश्चन, ज्यू व प्रबळ शीख अशासारख्या अल्पसंख्याक समाजांस हें ऐक्य भीतिप्रद होतां कामा नये."

- "अनत्याचार हें आपलें धोरण ठाम केल्यावांचून हें ऐक्य अशक्य आहे असें माझें मत आहे."

"एकंदर हिंदुस्थानच्या ऐक्याचें–आणि म्हणूनच आपल्या राजकीय आकांक्षा पूर्ण करून घेण्याचें अपरिहार्य असें साधन—दृश्यचिन्ह म्हणजे चरका अथवा खादी हेंच आहे असें मला तरी वाटतें."

"कार्यकर्ते अगदीं थोडे आहेत. विधायक कार्याचे प्रचण्ड डोंगर पुढें पडले आहेत; अशा वेळीं मी एकहि कार्यकर्ता विनाशक कार्याकडे लावण्यास तयार होणार नाहीं. परंतु त्याचें मुख्य कारण हें आहे कीं आजच्यासारखें असहिष्णुतेचें साम्राज्य म्हणजेच एक प्रकारचा अत्याचार आतांसारखा कधींच बोकाळला नव्हता."

"तुरुंगांत धांव घेण्याविरुद्ध असलेलें माझें सावधगिरीचें धोरण म्हणजे आपण तुरुंगांपासून दूर पळावयाचें असें मात्र नव्हे. सरकार जर प्रत्येक **अनत्याचारी** असहकारी खड्यासारखा निवडून काढील तर मला त्यांत आनंदच आहे."

" अस्पृश्यतेचा मी मुद्दामच उल्लेख केला नाहीं. तिचा उच्छेद केलाच पाहिजे असें प्रत्येक चांगल्या हिंदूला वाटतेंच असा माझा भरंवसा आहे. "

' माझ्या मतें अत्यंत शीघ्र परिणामी व उत्कृष्ट असा कार्यक्रम मी आपणापुढें ठेविला आहे. अत्यंत उतावीळ खिलाफतवाल्याहूनही याहून चांगला कार्यक्रम आखूं शकणार नाहीं. "

## वर्किंग कमीटीचे ठराव.

म. गांधींच्या शिक्षेच्या आदल्याच दिवशीं वर्किंग कमीटीची बैठक भरून तींत पुढील आशयाचे ठराव करण्यांत आले:—

१ म. गांधींच्या धरपकडीच्या व पुढच्या अत्यंत प्रक्षोभक काळांत राष्ट्रानें दाखविलेल्या भूषणास्पद आत्मसंयमनाबद्दल कॉं. व. कमीटी राष्ट्राचें अभिनंदन करीत आहे व पुढील आणीबाणीच्या काळांत असेंच दिलदार आत्मसंयमन करण्यांत येईल अशी आशा बाळगीत आहे.

२ ही पूर्ण शांतता हा अनत्याचार तत्वाच्या प्रसाराचा उत्कृष्ट पुरावा आहे आणि त्यामुळें पंजाब खिलाफत व स्वराज्य ह्या कार्याचें पाऊल पुढेंच पडलें आहे.

३ म. गांधींच्या धरपकडीनें बार्डोली-दिल्ली कार्यक्रमांत कसलाहि फरक झालेला नाहीं. त्यांतील विधायक कार्यक्रम पार पाडण्यासाठीं सर्वांनीं शिकस्तीचे प्रयत्न करावेत प्रां. कॉं कमीटयांनीं आपल्या अधिकाराचा उपयोग जपून करावा.

४ राष्ट्राचें ध्येय साध्य करावयास चरका व खादी अवश्यक असल्यामुळें सर्व कॉंग्रेस व खिलाफत संस्थांनीं ह्या कार्याकडे पूर्वीपेक्षांहि विशेष लक्ष पुरवावें.

५ राष्ट्रांतील लक्षावधि अर्धपोटी राहणाऱ्या लोकांस चरखा हा एक फुरसतीच्या वेळचा खासगी उद्योग होणार असल्यामुळें व जनता आणि सुशिक्षित वर्ग ह्यांची त्यामुळें सांगड पडणार असल्यामुळे सर्व पक्षांच्या व सर्व जातींच्या व वर्गांच्या लोकांनीं राजकीय मतांकडे न पाहतां ह्या कार्याला हातभार लावावा.

महात्मा गांधींच्या शिक्षेनंतर लगेच भरलेल्या बैठकींत कमीटीनें पुढील ठराव केला:—

" म. गांधींच्या शिक्षेनें त्यांच्या सर्वमान्य व सर्वप्रिय पुढारीपणाला मुकावें लागत आहे ह्याची जाणीव व. कमीटीला आहे. तथापि त्यांच्याद्वारें पारतंत्र्यबद्ध असूनहि हिंदुस्थान सगळ्या जगाला सत्य व अहिंसा ह्या सनातन तत्वांचा संदेश देत आहे ह्याबद्दल कमीटीला हर्ष वाटत आहे. "

## प्रकरण ३३ वें.

# स्वातंत्र्य–मंदिरांत.

" लक्ष्मी कशी आहे ? "



म. गांधींच्या भेटीस येरोडा जेलमध्ये श्रीमती कस्तुरबा गांधी ह्या २ जुलै १९२२ रोजीं गेल्या. त्यांना म. गांधींनीं पहिला प्रश्न विचारला तो हा. म. गांधींची स्वतंत्र प्राण्यांशीं ही पहिलीच भेट होती. लक्ष्मी ही महात्माजींनीं आपल्या पोटच्या मुलीप्रमाणेंच आपल्या कुटुंबांत वाढविलेली अस्पृश्य धेडाची लहान मुलगी आहे !

आज अगदीं सामान्य माणसाप्रमाणें तुरुंगांत सहा वर्षांचा काळ कंठीत असलेलें राजद्रोही हृदय हें असें आहे.

" हिंदुस्थानांतील हा महात्मा इतका प्रेममय आहे कीं, त्याला एखादी जोड शोधून काढण्यासाठीं आपण पाहूं लागलों, तर वर्तमान काळांत तर काय पण भूत काळच्या अखंड इतिहासांतसुद्धां ती सांपडावयाची नाहीं. राग, दुष्टपणा, प्रतिकारबुद्धि, द्वेष वगैरे सारे दुर्गुण त्यांच्यांतून पार नाहींसे झालेले आहेत. त्यांच्या अंतःकरणांत शुद्ध प्रेमावांचून दुसऱ्या कोणत्याहि भावनेचा लेश सुद्धां उरलेला नाहीं. अमूक एका विशिष्ट स्थळांतील माणसांनाच ते आपले बांधव समजत नसून त्यांची ही प्रेमगंगा जगांतील अखिल मानवसमाजापर्यंत पोहोंचलेली आहे. तींत स्नानपानादि व्यवहार करण्यास कोणासहि मज्जाव नाहीं. "

परंतु अशा ह्या अंतःकरणासहि उपवास घडविण्याकरितां हिंदी नोकरशाही वर्तमानपत्रें वाचूं देण्यास, सामान्य मासिकें पुरविण्यास किंवा " बाल–बोध " पुस्तक तुरुंगाबाहेर पाठवून जगांतील बालबालिकांशीं प्रेमसंबंध जोडूं देण्यास तयार नाहीं. त्यांनीं कस्तुरबा गांधी व हकीम अजमलखान ह्यांस लिहिलेल्या

पत्रांतील कांहीं मजकुरास सरकारतर्फे हरकत घेण्यांत आली आणि तेव्हांपासून त्यांनीं बाह्य जगाशीं पत्रव्यवहार करणें सोडून दिलें.

येरोडयाच्या तुरुंगांत प्रथम वर्षभर श्री. शंकरलाल बँकर हेच फक्त त्यांच्या सहवासांत असत. इतरांना त्यांच्याशीं बोलण्या चालण्यास सक्त मनाई आहे. त्यांस एका स्वतंत्र बराकींत ठेवण्यांत आलें असून फिरावयास स्वतंत्र असें ल्हानसें आवारहि मोकळें आहे.

## जगाचें नुकसान.

वेळ हा बहुमोल आहे. गेलेला पैसा परत मिळवितां येईल. पण गेलेला क्षण परत मिळवितां येणार नाहीं. म. गांधी हे सामान्य माणसापेक्षां १०० पट मोठे आहेत असें धरल्यास त्यांच्या कैदेनें जगाचें ५८ वर्षे नुकसान होणार आहे. परंतु वस्तुतः ते सामान्य माणसापेक्षां १०० × १०० पट मोठे आहेत असें सहज म्हणतां येईल. ह्या हिशेबानें त्यांच्या कैदेमुळे जगाचें ५८३३ वर्षे नुकसान होणार आहे यांत शंका नाहीं, असें एक गणित एका गृहस्थांनीं प्रसिद्ध केलें होतें!

## हंसावें कीं रडावें ?

१ तुरुंगांत महात्मा गांधींना औदासीन्य (मेलँकोलिया) रोग जडला आहे अशी एक बातमी राष्ट्रसेवक ह्या मुंबईच्या थोडे दिवस चालून बंद पडलेल्या दैनिकानें एकदां प्रसिद्ध केली. तुरुंगांत महात्माजींना ही बातमी समजली तेव्हां ते हंसले! महात्माजींच्या वृत्तींत व कृतींत कांहीं वैगुण्यें असोत किंवा नसोत, अगदीं बालपणापासून कालपर्यंत त्यांनीं वैयक्तिक व सार्वजनिक स्वरूपाच्या इतक्या कांहीं प्रसंगांस तोंड दिलें आहे कीं, म. गांधी स्थितप्रज्ञ आहेत ही गोष्ट जगांतील कोणत्याहि बुद्धियुक्त प्राण्याला नाकबूल करतां येणार नाहीं. टॉलस्टॉयसारख्या जगद्विख्यात अनेक विभूतींहूनहि गांधींचें श्रेष्ठत्व जर कशांत असेल तर तें त्यांच्या ह्या स्थितप्रज्ञ वृत्तींतच!

असें असूनहि विद्वान् व पुढारी गृहस्थांसहि अशी बातमी शक्य वाटते! मग महात्माजींनीं हंसावें कीं रडावें? म. गांधी स्थितप्रज्ञ आहेत आणि म्हणूनच ते रडले नाहींत हंसले!

हिंदुस्थाननें अद्यापहि आपल्या पुढाऱ्यास ओळखलें नाहीं असेंच अखेर म्हणावयाचें काय!

## नालायक !

म. गांधी हे बॅरिस्टर गांधी होते. परंतु त्यांचें नांव बॅरिस्टरांच्या यादींतून विलायतेंत कमी करण्यांत आलें आहे. त्यांनीं बॅरिस्टरास न शोभण्यासारखें वर्तन केलें आहे ! कारण ? त्यांनीं पैसे देईल त्याचें वकीलपत्र घ्यावयाचें हा शिष्टाचार मोडला आणि पुन्हां वकीलीवर बहिष्कारहि पुकारला !

## तुरुंगांतील कामगिरी.

१ म. गांधींनीं तुरुंगांत हातरहाटावर काढलेलें सूत तुरुंगाबाहेर आलें होतें आणि त्याचें ठिकठिकाणीं प्रदर्शनहि झालें. तत्वनिष्ठा ही नेहमीं सक्रिय व व्यावहारिकच असली पाहिजे ह्या आचारधर्माचें हें निदर्शक असें हें पवित्र सूत्र आहे ह्यांत शंकाच नाहीं.

२ ह्या शिवाय गांधींची तुरुंगांतील दृश्य व प्रसिद्ध कामगिरी म्हणजे मुळशी सत्याग्रही कैद्यांच्या बाबतींतील. श्री. देव प्रभृति कित्येक मुळशी सत्याग्रह्यांस तुरुंगांतील ' वर्दी ' पुरी करतां न आल्यामुळें फटके लावण्यांत आले. आणि ह्या अन्यायाचा प्रतीकार करण्याकरितां सत्याग्रह्यांनीं अन्न वर्ज केलें. अखेर म. गांधींनीं तुरुंगांच्या अधिकाऱ्यांच्या परवानगीनें ह्या प्रकरणांत मध्यस्थी केली आणि तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीं झालेली शिक्षा अन्यायाची होती हें कबूल केलें आणि सत्याग्रह्यांनीं उपवास मोडला.

## गांधींची प्रकृति.

१ तुरुंगांत गेल्यानंतर एक वर्ष झालें नाहीं तोंच त्यांची प्रकृति बिघडली असावी असें दिसतें. मध्यंतरी त्यांना कांहीं दिवस थोडा ताप येई, पचनक्रिया बिघडली होती, मलबद्धतेचाहि विकार जडला होता व दांताचाहि जरा त्रास होई. त्या त्रासानें त्यांचें वजनहि बरेंच कमी झालें होतें परंतु पुढें त्यांचें वजन हळूहळू वाढत गेलें.

सरकारतर्फे प्रसिद्ध झालेली अगदीं ताजी बातमी अशी होती कीं, म. गांधींचें वजन पुन्हां जरा कमी झालें आहे परंतु आपखुषीनें ते कांहीं अन्नविषयक प्रयोग करून पहात असल्यामुळें असें झालें असून आतां पुढें नियमित आहार घेण्याचें आश्वासन त्यांनीं दिलें आहे.

## खुनी माणसावर महात्माजींचा प्रभाव—

मुंबई क्रॉनिकलमध्यें मौलाना शौकत अल्लींनीं सांगितलेली खालील हकीकत आली होतीः—

माधव नांवाचा एक भंगी दारू पिऊन आला व दारूच्या निशेंत त्यानें आपल्या बायकोचा खून केला. त्यामुळें त्याला फांशीची शिक्षा झाली. त्याला नंतर राजकोटच्या तुरुंगांत आणून मौ. शौकत अल्लींच्या कोठडी शेजारी ठेवण्यांत आलें. दोघांची ओळख लवकरच झाली व शौकतअल्लींनीं त्याला स्वतःची हकीगत सांगण्यास सांगितलें. त्यानें आपली हकीगत अगदीं मोकळेपणानें व पश्चात्तापपूर्ण अशा शब्दांत सांगितली. तो म्हणाला, मला शिक्षा झाली हें योग्य झालें. आतां माझ्या वांट्यास जे थोडे दिवस राहिले आहेत त्या दिवसांत मी परमेश्वराचें भजन करणार व त्याचें स्मरण करणार. एके रात्रीं शौकत अल्लींनीं त्याच्या नाचाचा व गाण्याचा आवाज ऐकला. हा आवाज शेजारच्या खोलींतून येत होता. तो माणूस परमात्म्याशीं एकरूप होऊन त्याचें गुणसंकीर्तन करीत होता. ही रात्र म्हणजे त्याच्या आयुष्यांतील शेवटची रात्र होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं हा माणूस आपल्या कोठडींतून मोठ्या आनंदानें हंसत व ईश्वराचें भजन करीत फांसाकडे चालला. त्याच्या गळ्याला फांस लावतांच तो मोठ्यानें " महात्मा गांधी की जय " असें ओरडला. त्याबरोबर साऱ्या तुरुंगांतून महात्माजीच्या जयजयकाराचा एकच ध्वनि निघाला. नंतर तुरुंगांतील अधिकाऱ्यांनीं माधव किती आनंदानें फांशी गेला हे मला सांगितलें. ते म्हणाले " गेल्या पंधरा वर्षांत आम्हांला असलें उदाहरण दृष्टीस पडलें नाहीं. " जेलचा सुपरिंटेंडंट मौलानांजवळ येऊन म्हणाला " या खूनी माणसाला गांधीशीं काय करावयाचें आहे ? " मौलाना म्हणाले, "परमेश्वरा ! मला दुसरा जन्म देणारच असशील तो धेडाचा अगर भंग्याचाच दे ! " अशी प्रार्थना करणारा अनाथांचा कैवारी जगांत जर कोणी असेल तर तोच एक आहे ! "

## महात्मा गांधींची येरवड्यांतील दिनचर्या.

' रंगून मेल ' चे संपादक श्री. मझरअल्ली नोव्हेंबर ( १९२३ ) मध्यें येरवड्याच्या तुरुंगांतून सुटून आले. त्यांच्या सुटकेपूर्वी सहा महिने येरवड्यामध्यें ते महात्मा गांधींच्या सहवासांत होते. त्यांनीं महात्माजींच्या दिनचर्येसंबंधीं पुढील हकीगत सांगितली आहेः—

महात्माजी पहाटेस चार वाजतां उठतात व नित्यविधि उरकून प्रार्थना करतात. ही प्रार्थना अहमदाबादच्या सत्याग्रहाश्रमांत चालते तशीच असते. प्रार्थना आटोपतांच उपनिषदें व नंतर गीता यांचा पाठ होतो. तो आटोपतो तों ६।-६॥ च। सुमार होतो. नंतर उर्दू पुस्तकांचें वाचन चालतें. नंतर सकाळची न्याहारी होते. न्याहरीला फळें आणि दूध याखेरीज कांहींहि घेत नाहींत. आठ वाजतां न्याहारी आटोपली की, अकरापर्यंत रेंटिया चालवून सूत कातण्याचें काम महात्माजी नियमितपणें करतात. ११ वाजतां चक्की दळण्याला सुरवात होते. हें दळण्याचें काम ते सुमारें एक तास करतात. अर्ध्या तासांत ५ रत्तल पीठ ते दळूं शकतात. नंतर कलाक अर्धा कलाम आराम केल्यावर एक वाजतां पुन: कामास सुरवात होते. हें काम मुख्यतः इंग्रजी व उर्दू वाचनाचे असतें. महात्माजींना हल्लीं उर्दू चांगलें वाचतां व लिहितां येऊं लागलें आहे. ३॥-४ पर्यंत सायंकाळचें जेवण उरकून घेण्यांत येतें. नंतर ७ वाजेपर्यंत उर्दू, इंग्रजी, गुजराथी वगैरे पुस्तकांचें वाचन चालतें आठ वाजतां पुन: प्रार्थना करून ते गप्पा मारीत आंथरुणावर पडतात व झोपीं जातात. नवापुढें गप्पा वगैरे साफ बंद करण्याची वहिवाट आहे. श्री. शंकरलाल बँकर कैदेंतून सुटल्यावर श्री. मझरअल्ली हे अहोरात्र त्यांच्या जोडीला असत.

## महात्माजींची प्रकृति.

हल्लीं चांगली असून, त्यांचें आजचें वजन १०५ रत्तल आहे. ते खूप आनंदांत असतात. त्यांना बाहेरच्या जगाची वार्ता कोणी अमलदाराच्या तोंडून जी काय ओझरती कळेल तितकीच. वर्तमानपत्रें त्यांना देण्याची सक्त मनाई आहे. चोरून कोणी त्यांच्या खोलींत वर्तमानपत्र टाकलेलें अ ढळलें तर त्याच्याकडे ढुंकूनहि न पाहतां तें फाडून टाकण्याची त्यांची वहिवाट आहे. पुण्याचे कलेक्टर येऊन त्यांना असहकारितेची चळवळ निष्फळ झाल्याची बातमी सांगत. त्यांची बोलण्याची रीत चीड उत्पन्न करणारी असे. पण महात्माजींना त्याचें कांहींच वाटत नसे ते हंसत हसत म्हणत कीं, त्याला जर वाटत असेल कीं, असल्या गोष्टी मला सांगितल्यानें मला दुःख होईल तर घेईनाका बिचारा आपल्या मनाची हौस पुरवून !

## प्रकरण ३४ वें.

# यशापयश.

### उपःकाल



**उपःकालचा** नितांत रमणीय, उत्साहवर्धक देखावा किती स्फूर्तिप्रद असतो! आकाशाच्या पूर्वक्षितिजावर गुलाबी आणि सोनेरी, लाल आणि निळ्या, रुपेरी आणि धूसर रंगाच्या छटांचा हलकल्लोळ सुरू असतो रंगछटांचें स्वरूप क्षणोक्षणीं बदलत असतें; रंगछटांच्या ढिगांचें–ढगांचें स्वरूप क्षणोक्षणीं बदलत असतें. आकृतींचा बदल, रंगांचा फेरफार, परिवर्तनांचा सुकाळ! आणि हा एकंदर प्रकार–हें विलक्षण स्थित्यंतर अगदीं सुसंगत, सुखद, शक्तिगर्भ आणि उत्साहवर्धकच असतें.

म. गांधींचा हिंदी राष्ट्रकार्यांतील प्रवेश व कार्य म्हणजे हिंदी राजकीय क्षितिजावरील हा अरुणोदयाचा दैवी खेळच होय. हिंदी राष्ट्रकार्यांत आज चरका-संगीत तर उद्यां बहिष्काराचा रणभेरी, आतां अस्पृश्यांविषयींच्या मृदु भावना तर मग पिकेटिंगचें जमदग्नी स्वरूप; कोठें राष्ट्रीय शिक्षणाच्या रुपेरी, तर कधीं अहिंसेच्या गुलाबी, त्या ठिकाणीं निर्भय कायदेभंगाच्या लालभडक तर त्याठिकाणीं निर्मळ शांतिपाठाच्या गुलाबी, क्षणांत लहान तर क्षणांत प्रचण्ड अशा उद्बोधक आणि उत्तेजक छटा झळकत होत्या. आणि धर्मकारण, समाजकारण, उद्योगधंदे, व्यापारव्यवसाय, गुन्हेगारी आणि व्यसनबाजी, चैन आणि तपश्चर्या अशा मानवी जीवनाच्या सर्व अंगांवर त्यांचें परिवर्तन पडत होतें. आणि हा सर्व हलकल्लोळ सुखद, स्वाभाविक, सुसंगत आणि शक्तिगर्भ असाच होता.

म. गांधींच्या या तीन वर्षांतील कारकीर्दींत हिंदुस्थानच्या एकंदर राष्ट्रीय जीवनक्रमावर झालेल्या बहुविध परिणामांचा चित्रपट अंतःचक्षूंपुढें रंगविणें हें कार्यसुद्धां उपःकालचा स्वर्गीय आनंद कल्लोळ पहात बसण्याइतकेंच प्रसन्नताप्रद, सुखप्रद, आणि उन्मादप्रद आहे.

रमणीयता, विविधता, स्थित्यंतरें ह्या सगळ्या बाबतींत ह्या राष्ट्रीय देखावा ज्याप्रमाणें अरुणोदयाशीं सर्वस्वी सारखा दिसतो त्याप्रमाणेंच तो अल्पकालिन अस्तित्वांतहि सारखाच ठरला ! हा सर्व प्रकार अवघ्या तीन वर्षांत आटोपला !

## " सारेंच ऑफस "

" सारेंच ऑफस् " अशा दोनच शब्दांत गांधींच्या तीन वर्षांच्या कारकीर्दीचें एखादा टवाळ थुट्टा, बच्च्या, खुजा. किंवा मट्ट मुत्सद्दी समालोचन करूं शकेल ह्यांत शंका नाहीं. अरुणोदयाच्या कल्लोळांतून सूर्योदय होतो; परंतु गांधींच्या ह्या कल्लोळांतून स्वातंत्र्योदय मात्र झाला नाहीं. दुर्दैवाची, दुःखाची आणि विचार करण्यासारखी गोष्ट आहे ती हीच कीं, असें कां व्हावें ?

आम्हीं स्वदेशी बहिष्काराची प्रचण्ड चळवळ केली आणि वङ्गभंग रद्द होऊन मोर्लेमिंटो सुधारणा मिळविल्या आम्ही होमरूलची चळवळ केली आणि मॉंटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणा मिळविल्या. आम्ही अवाढव्य आणि अद्वितीय अशी असहकारितेची चळवळ केली पण आज आम्हीं ह्या चळवळीच्या उगमाच्याच ठिकाणीं आहोंत. अमृतसरहून आमचें एकहि पाऊल पुढें पडलेलें नाहीं. किंबहुना अर्धे पाऊल मागेंच पडलें आहे. जर आम्हीं अमृतसरच्या ठरावाला अनुसरून कायदेकौन्सिलांच्या निवडणुकी लढविल्या असत्या तर १९२३ अखेरच्या निवडणुकीपेक्षां १९२० अखेरच्या निवडणुकींत राष्ट्रीयांची भरती कौन्सीलांत कितीतरी जास्त प्रमाणावर झाली असती !

पण खरोखरच का गांधींची चळवळ इतकी अपयशी, राष्ट्राची पिछेहाट करणारी झाली आहे ? गांधींनीं आमचें हित तरी काय केलें आणि ह्या अपयशाचें कारण तरी काय ?

* * * *

## अनत्याचाराची शास्त्रीय मीमांसा.

म. गांधींच्या जीवनकार्यासंबंधानें व असहकारितेसंबंधानें आतांपर्यंत अनेक अव्वल दर्जाच्या देशी व विदेशी विद्वानांनीं किती तरी लेख व पुस्तकें लिहिलीं आहेत. परंतु त्या सर्वांत अमेरिकेंतील आयोवा विश्वविद्यालयांतील समाजशास्त्राचे प्रोफेसर मि. केज् ह्यांनीं लिहिलेलें "अनत्याचारी सक्ति" "Non-voilent Coercion" हें पुस्तक अत्यंत महत्वाचें आहे.

" आधुनिक जगाचें मन फक्त आधिभौतिक ( नॅचरल ) शास्त्रांपुरतेंच पूर्वग्रहदूषित नसलेलें आणि नवविचारक्षम आहे " * * * परंतु " आज आपणास चिंताजनक आणि भावी पिढ्यांना आश्चर्यजनक गोष्ट आहे ती हीच की समाजशास्त्र व राजकारणशास्त्र ह्या मानवी व्यवहारशास्त्रांत आधिभौतिक शास्त्रांतल्या ह्या नवविचारक्षम मनाचा मागमूसहि लागत नाहीं. " (आर्. एम्. लोग्हेट-वर्ल्ड टुमारो )

प्रो. केज् ह्या नियमास अपवाद दिसतात. त्यांनीं हें पुस्तक अत्यंत संकुचित आणि पाश्चात्य राजकारणांतील रूढीमान्य तत्वांविषयीं अंधप्रेमानें लिहिलेलें नाहीं किंवा केवळ निर्मळ ध्येयवादी भावनाशीलतेनेंहि लिहिलेलें नाहीं. ह्या पुस्तकांत त्यांनीं ह्या अनत्याचारी पद्धतीची तात्विक सर्वांगसुंदरता, सामाजिक आवश्यकता, तिच्यांतील व्यावहारिक अडचणी आणि सनदशीर पद्धतींतील गुणावगुण ह्या सर्वांचें समाजशास्त्रांतील व्यापक, सर्वमान्य आणि आद्य अशा तत्वांस अनुसरून विवेचन केलें आहे. गांधींच्या कारकीर्दीचें व चळवळीचें सिंहावलोकन करून त्या प्रकरणाच्या अखेर प्रो. केज् म्हणतात,—" हा मजकूर लिहून होत आहे त्यावेळी ह्या असहकार चळवळीपासून अखेर फलनिष्पत्ति काय होईल ती सांगतां येणें कठीण आहे. तिचे पुढें कांहींहि होवो, त्याच्याकडे मुळींचसुद्धां लक्ष्य न देतां आपणास असें म्हणतां येईल की, जगाच्या इतिहासांत अत्यंत अश्रुतपूर्व असें निःशस्त्र प्रतिकाराचें आणि अनत्याचारी सक्तीचें स्वरूप आपणास दिसत आहे. चीन, कोरिया व हिंदुस्थान ह्या भागांत ह्या चळवळी अलीकडे सुरू झाल्या; तोंपर्यंत ह्या राष्ट्रांतील एतद्विषयक शिकवणुकी अगदींच निवृत्तिपर आणि वैय्यक्तिक स्वरूपाच्या होत्या असें वाटे. पश्चिमेच्या नैतिक आणि सामाजिक इतिहासांत अजरामर स्थान मिळविलेल्या संघटित स्वरूपाच्या सामुदायिक चळवळींवर त्यांचा कांहीं परिणाम होण्यासारखा आहे असें मुळींच दिसत नसे. परंतु असहकारितेनें ही सर्व कल्पना पार बदलून टाकली आहे. तिनें सर्वांचें महत्व मुख्यतः ह्याच गोष्टींत आहे की, ती सामुदायिक, (राष्ट्रीय) चळवळ आहे. आणि एका विलक्षण गणितपद्धतीनें तिचें वैय्यक्तिक अप्रतिकाराच्या धोरणाचें सामाजिक निष्क्रिय स्वरूप बदलतें व त्याचें अतिपलादय आणि अत्यंत चैतन्यगर्भ अशा सामाजिक शक्तींत रूपांतर होतें.

" जर गांधींना लोकसमुदाय एकाचवेळीं, एकसूत्री आणि पूर्वनिश्चित निषेधासाठीं जागृत करतां आला नसता तर त्यांची ही शिकवणूक बुद्धाच्या धर्म-

स्त्रीप्रमाणेंच सामाजिक दृष्टीनें निष्फळ झाली असती. परंतु गांधींनीं हें तत्व राष्ट्रीय आणि ऐतिहासिक प्रमाणावर प्रयोगांत आणलें आहे. विवक्षित उदाहरणांत त्या प्रयोगाचा परिणाम कांहीहि होवो. परंतु त्याला चिरकालीन महत्व प्राप्त होणार आहे. "

## आत्मक्लेश.

प्रो. केज यांच्या मतें आपल्या स्वातंत्र्याला आळा घालूं पहाणाऱ्याच्या क्रियेला तीन प्रकारच्या प्रतिक्रिया होऊं शकतात:—(१) आनंदानें किंवा मूक संमतीनें त्या क्रियेला वश होणे (२) निमूटपणें नाइलाजास्तव मान वांकविणें किंवा (३) विरोध करणें. हा विरोध तीन प्रकारांनीं करतां येणें शक्य आहे. (१) बुद्धिवाद (२) अनत्याचारी प्रतिरोध किंवा (३) अनत्याचार.

प्रतिरोध करतांना प्रतिपक्षानें जाणून बुजून दिलेलें दुःख सहन करणें हा आत्मक्लेशांचा मार्ग ते बुद्धिवाद ह्याच सदरांत घालतात व कधीं कधीं अन्नत्याग हा स्वयंप्रेरित आत्मक्लेशांचा मार्गहि बुद्धिवाद या सदरांत येऊ शकतो. परंतु जेव्हां आत्मक्लेश हे प्रतिपक्षाच्या मनोवृत्तीवर परिणाम करण्याकरितां जाणून बुजून आपण अन्नत्यागवगैरे मार्गांनीं आपणावर ओढवून घेतों तेव्हां तो अनत्याचारी सक्तीचा मार्ग होतो.

आत्मक्लेश सहन करण्याची ताकद आणि तत्परता हा अनत्याचारी मार्गाचा आत्मा आहे. आत्मक्लेशांच्या परिणामाचें प्रो. केज ह्यांनीं केलेलें वर्णन फार मार्मिक आहे. संप, बहिष्कार व असहकार हे अनत्याचारी सक्तीचे सर्वांत शुद्ध असे मार्ग आहेत. असहकारितेंत पहिल्या दोहोंचा समावेश होतोच. परंतु त्यांची औद्योगिक व व्यापारी क्षेत्रांतून त्याबाहेरील क्षेत्रांपर्यंत व्याप्ति वाढविण्यांत येते.

ह्या अनत्याचारी सक्तींतील सक्तीची व्याप्ति व मर्यादा निश्चित व नियमित करून पुन: प्रो. केज म्हणतात कीं, आत्मक्लेश सहन करण्याची तत्परता हा तर नितांत शुद्ध निःशस्त्र प्रतीकाराचा आत्मा आहे. अनत्याचारी निःशस्त्र प्रतीकार हा दुधारी तरवारीसारखा आहे व असलाच पाहिजे. ह्या बाबतींत अत्याचारी मार्गाशीं त्याचें साम्य नाहीं. आधुनिक काळांत सशस्त्र प्रतीकारानें भीषण व जगड्व्याळ स्वरूप धारण केलें आहे ह्याचें मुख्य कारण हें आहे कीं, शस्त्रधारकांवर, निःशस्त्र प्रतीकाऱ्यांप्रमाणें आपोआप नियंत्रण घालूं शकणारी स्वयंसिद्ध अशी शक्तीच अस्तित्वांत नसते. संप, बहिष्कार

वगैरे बाबतींत सामान्य लोकांचा कल पहावा लागतो. " सामान्य जनतेच्या स्वयंप्रेरित नैतिक, सांपत्तिक आणि सामाजिक सहकारितेवांचून निःशस्त्र प्रतीकार यशस्वीच होऊं शकत नाहीं. उलट अत्याचार किंवा धाकदपटशा ह्यांचा कोणत्याहि पक्षानें स्वीकार केला तर तो त्याचा आपल्या दुबळेपणाचा कबूली जबाबच समजावा. त्यावरून आपल्या कार्याला जनतेचें पुरेसें पाठबळ मिळेलच असा आत्मविश्वास नसावा किंवा स्वतः कष्ट आणि हानि सोसण्यापेक्षां दुसऱ्यांवरच तीं लादण्याची उत्सुकता अधिक असावी हें स्पष्ट दिसून येतें. " ह्यासाठींच आमचें असें मत आहे कीं, निःशस्त्र प्रतीकाराची खुली, प्रामाणिक, स्वात्मार्पण करूं इच्छिणारी वृत्ति आणि कोणत्याहि स्वरूपांतील अनत्याचारी सक्तीचा विधायक उपयोग ह्यांच्यांत अत्यंत जिव्हाळ्याचा, सुपरिणामी व समाजधारणेस आवश्यक असा संबंध आहे. "

कायद्यानें होणारी शिक्षा न टाळतां सहन करण्याची तत्परता निःशस्त्र प्रतीकाऱ्यानें दाखविलीच पाहिजे. नाहीं तर दंड चुकवितां येईल ह्मणून कोणीहि कोणताहि गुन्हा करावा ही प्रवृत्ति वाढून अराजकताच माजेल.

अशा प्रकारें विस्तृत विवेचन केल्यावर प्रो. केस म्हणतात :—

## अडचणी आणि मर्यादा.

" *वस्तुस्थिति अशी आहे कीं, निःशस्त्र प्रतीकार आणि अनत्याचारी सक्ति* हे सामाजिक वागणुकीचे मार्ग असे आहेत कीं, द्वेष व सूड बुद्धीनें गढूळ न झालेल्या सामाजिक न्यायाची आणि सामाजिक सत्याची विशेष चाड असणाऱ्या स्त्रीपुरुषांवर ह्या तत्वांची विलक्षण छाप पडलीच पाहिजे."

" खरोखर, तात्विक गुणावगुणच पाहिले तर मानवी जीवनक्रमांत अत्यंत न्याय्य आणि कल्पनेला शक्य इतकें बलिष्ठ असें हें शस्त्र आपणापुढें पडलेलें आहे असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. आत्मसंयमन करण्यास समर्थ आणि आत्मक्लेशाची भरपूर किंमत देण्यास समर्थ असलेला समाज त्याचा अव्यभिचारी प्रामाणिक बुद्धीनें व निश्चयी बाण्यानें उपयोग करील तर असहकार हें शस्त्र जगांतल्या जुलमाच्या आणि स्वार्थसाधकांच्या प्रत्येक नम्यांत नम्या युद्धपद्धतींनाहि हाणून पाडण्यास समर्थ होईल."

"परंतु ह्यांतील तात्विक सत्य जरी नाकारतां येणें जवळ जवळ अशक्य आहे तरी त्याची उपयुक्तता मुख्यतः तत्वांतच आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत संप, बहिष्कार, असहकार आणि अनत्याचाराचा प्रत्येक कार्यक्रम ह्यांच्या मुळावर दोन

नैतिक शत्रु उठलेले असतात. आणि त्यांपैकीं कोणत्या तरी एकाच्या भक्ष्यस्थानीं ही चळवळ पडण्याचा फारच संभव असतो. नैराश्य किंवा औदासीन्य ह्यांच्यामुळें ती चळवळ मंदावते किंवा आत्मघातकी अत्याचारांत तिचा स्फोट होतो. आणि हा झगड्याचा काळ जितका जितका लांबतो तितका तितका त्यांपैकीं कोणत्या तरी एका अरिष्टास तो झगडा बळी पडण्याची खात्री वाढतच जाते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अनत्याचारी सत्तीसाठीं, आत्मसंयमन, कार्यनिष्ठा, अप्रतीकारी, आत्मक्लेश सहन करण्याची शक्ति, उच्चतर नैतिक विकास हीं सगळीं सामान्य मनुष्यांनीं सध्यां मिळविलेल्यापेक्षां अधिक प्रमाणांत जरूर असतात."

अनुकूल परिस्थितींत योग्य प्रसंगीं ह्याचा चांगलाच उपयोग होणें शक्य आहे, परंतु (१) ह्या चळवळीला यश भराभर मिळत गेलें पाहिजे; (२) ही मोहीम दीर्घकाळपर्यंत लांबविली जातां कामा नये. आणि (३) तिचें कार्यक्षेत्र थोडया बहुत प्रमाणांत नियमित पाहिजे. "संप, आणि बहिष्कार आणि ह्या सर्वांच्या इतर सर्व प्रकारांत मनुष्याच्या मनोविकारांवर आणि भावनांवर नाखुषी, नैतिक क्षेप, समुदायनिष्ठा, जातीयत्वाची जाणीव, कार्यनिष्ठा-अशा सारख्या सर्व मनोविकारांवर आणि मनोभावनांवर सामान्य जीवनक्रमांतल्यापेक्षां फारच फाजील ताण पडतो."

## गांधींना त्यांची जाणीव होती.

ह्या सर्व अडचणी, मर्यादा आणि खुब्या म. गांधी पूर्णपणें जाणून होते आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या चळवळीला लोकविलक्षण अशी दिशा लाविली होती.

म. गांधी दर तीन महिन्यांनीं आपल्या प्रचण्ड कार्यक्रमांतील एकेक मुद्दा पुढें आणीत आणि तारखा लावून तो मुद्दा पुरा करण्याचा प्रयत्न करीत. बेझवाडा कार्यक्रमांतील प्रत्येक मुद्याला व एकंदर कार्यक्रमाला त्यांनीं अशीच कालमर्यादा घातली होती. त्याचें कारण तरी हेंच होतें कीं, एक कोटी रुपये, स्वदेशी व बहिष्कार वगैरे कामांकरितां अगदीं थोडा व निश्चित वेळ आंखून द्यावयाचा व त्या योगानें कार्यकर्त्यांच्या मागें कामाची निकड लावावयाची; मग ठराविक मुदतींत कांहीं तरी निश्चित यश जनतेच्या डोळ्यांसमोर ठेवावयाचें. एक यश डोळ्यांत भरलें म्हणजे त्या यशानें आलेल्या नव्या जोमाला शैथिल्य येण्यापूर्वीं अगदीं नवें आणि तसेंच निकडीचें व कालमर्यादा घातलेलें नवें काम द्यावयाचें. पुन्हां त्याचें यश दाखवून तज्जन्य उत्साहाला आणखी तिसरें काम

द्यावयाचें हा गांधींचा मार्ग होता. आणि एक कोटी रुपयांचा फंड नियमित मुदतींत गोळा करून म. गांधींनीं ह्या युद्धपद्धतीला लागणारें मूळ उत्साहाचें नैतिक आणि पैशांचें व्यवहारिक भांडवल भरपूर जमवून ठेविलें होतें.

एकंदर मोहीम दीर्घ काळपर्यंत लांबविली जाऊं नये हें प्रो. केज ह्यांचें दुसरें तत्व पूर्णपणें पटलें असल्यामुळेंच म. गांधी हे "एक वर्षांत स्वराज्य" ही कल्पना धरून बसले.

सिनेमांतल्या धांवत्या चित्रपटांतल्या देखाव्यांप्रमाणें गांधींचे कार्यक्रम दरघडी बदलतात म्हणून त्यांजवर त्यावेळीं टीका करणारे लोक ह्या एक वर्षांत स्वराज्य ह्या कल्पनेला हंसत व गांधी स्वतःची तरी फसवणुक करीत आहेत किंवा राष्ट्राची तरी फसवणुक करीत आहेत असा त्यांच्यावर बावळटपणाचा किंवा दांभिकतेचा आरोप करूं पहात.

निर्वाणीचा सामुदायिक कायदेभंग एकावेळीं फक्त एकाच ठिकाणीं आणि अगदीं नियमित क्षेत्रांतच व्हावा अशी म. गांधींची कल्पना होती व त्यावेळीं एकंदर राष्ट्रानें आपले इतर सर्व कार्यक्रम बंद ठेऊन पादाक्रांत केलेली नैतिक प्रगतीची जागा, खंदक खणून धरून बसावें आणि वातावरण अनत्याचारी राखावें एवढेंच गांधी सांगत.

## गांधींचें कार्यवैशिष्ट्य.

गांधींच्या कार्यकुशलतेचें, बुद्धिवैभवाचें व वैशिष्ट्याचें खरें खुरें चिन्ह एकंदर असहकारितेंत जर कोठें व्यक्त झालें असेल तर तें ह्या कल्पनेंतच. आजपर्यंतच्या सर्व निःशस्त्रप्रतिकाऱ्यांपुढें व प्रो. केजसारख्या विचारवन्तांपुढें मुख्य पेंच पडतो व जो अखेरीस नडतो तो हाच क्षेत्राचा पेंच. अपरिमित क्षेत्रांत सत्याग्रह पुकारणें कठीण आणि परिमित क्षेत्रांत करून काम मागणें कठीण. म. गांधींची यावर तोड अशी होती व आहे कीं, एकंदर राष्ट्रानें निर्वाणीचा सत्याग्रह करण्याइतकें नैतिक सामर्थ्य कमावून तयार व्हावयाचें, परंतु सत्याग्रह मात्र एकाच तालुक्यांत ( किंवा फार तर जिल्ह्यांत ) करावयाचा.

सत्याग्रहाचे मोठ्यांत मोठे शत्रु दोनच. एक अत्याचार आणि दुसरा औदासीन्य. सर्व राष्ट्रभर एक वर्षाच्या मुदतीची व नित्य नव्या कार्यक्रमाची चळवळ सतत चालू ठेवल्यामुळें शेवटपर्यंत उत्साह तर कायम राहिलाच. आणि पुढें विवक्षित तालुक्याबाहेर कसलीहि खास चळवळ नसली तरी, त्या तालुक्याकडे नजर राहिल्यामुळें उत्साह कायम राहिलाच. परंतु त्याबरोबरच दुसरा मोठा

शत्रु जो अत्याचार त्याचा बंदोबस्त करावयास सर्व राष्ट्राला निर्वेध मार्ग मोकळा झाला. अशा रीतीनें दोन्ही अंतस्थ शत्रूंचा पुरा बंदोबस्त केल्यावर फक्त एकाच बाह्य शत्रूशीं तोंड द्यावयाचें काम उरलें. तें फक्त एका तालुक्यानेंच करावयाचें. प्रो. केज ह्यांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे आत्मक्लेश सहन करण्याची ताकद आणि तत्परता हा अनत्याचाराचा आत्मा असल्यामुळें एका तालुक्याला आपण एवढ्या प्रचण्ड शत्रूला तोंड कसें द्यावें असा प्रश्नच उपस्थित करण्याचें कारण नाहीं. उत्कट, निष्कलंक आणि परिणामकारक आत्मबलिदान नियमित भागांतच होऊं शकेल.

"चोहोंकडे एकाच वेळीं आत्मबलिदान होऊं लागल्यास राष्ट्राची दृष्टि कोठेंच एकाग्र होणार नाहीं, अत्याचारांचा बंदोबस्त करणें अशक्य होईल आणि देशांत कोठेंहि अत्याचार झाल्यास जनतेचें लक्ष ह्या अत्याचारांकडे व ते शमविण्यासाठीं सरकारनें उपयोगांत आणलेल्या उपायांकडे वळून बिचाऱ्या तत्वनिष्ठ भागांचें बलिदान मात्र व्यर्थ ठरेल ! नव्हे चौरीचौऱ्याच्या दंग्यानें ४० हजार राष्ट्रवीरांचें बलिदान व्यर्थ गेलें ! "

प्रो. केज् ह्यांच्या ह्या निरीक्षक व चौकस विचारसरणीच्या आधारानें पाहिल्यास पुष्कळशा जुन्या टीकाकारांसहि म. गांधींची कार्यपद्धति व वर्तणुक शेवटपर्यंत किती सुसंगत व शास्त्रशुद्ध होती तें दिसून येईल.

युद्धाची मुदत नियमित ठेवावयाची; युद्धांत एकामागून एक स्थानिक लढाया देऊन त्यांत डोळ्यांत भरण्यासारखे विजय मिळवून दाखवावयाचे आणि निर्णायक लढाई सर्वंध आघाडीवर न देतां एकाच केंद्रावर द्यावयाची ह्या तीन गोष्टींवरच अनत्याचारी युद्धाची यशस्विता प्रो. केज ह्यांच्या मतें अवलंबून आहे. आणि म. गांधी ह्यांनीं बरोबर ह्याच युद्धनीतीचा अवलंब केला होता.

म. गांधींची विचारसरणी इतकी तत्वशुद्ध आणि उभारणी शास्त्रशुद्ध असूनसुद्धां अखेर अपयश कां यावें ? औदासीन्यामुळें गांधींच्या चळवळीला अपयश आलें नाहीं हें अगदीं उघड आहे.

प्रत्यक्ष दिसावयास गांधींना अत्याचार हाच अंतःशत्रु बाधला असें दिसतें. पुष्कळांच्या मतें गांधींची अनत्याचाराविषयींची फाजील हांव हीच त्यांना नडली; ह्या आक्षेपांतच गांधींच्या असहकारितेच्या अपयशाचें बीज आणि रहस्य आहे.

हें बीज आणि हें रहस्य म्हणजे अर्धवटपणा हेंच होय.

* * *

## अर्धवटपणा.

गांधींच्या असहकारितेला अपयश येण्याचें मुख्य कारण हें आहे कीं, आम्हीं गांधींचा स्वीकार केला परंतु गांधींच्या तत्वांचा मात्र पुरा स्वीकार केला नाहीं. आम्हांला गांधींची अलौकिक तपश्चर्या व अद्वितीय पुण्याई हीं पाहिजे होतीं परंतु त्याबरोबरच अपरिहार्य व आवश्यक असलेलीं बंधनें मात्र नको होतीं. आम्हांला म. गांधी सोळा आणे पाहिजे होते; परंतु त्यांची अहिंसा व सत्यनिष्ठा हीं मात्र चार आठ आण्यांपेक्षां जास्त नको होतीं.

" चौरीचौऱ्याचा अनर्थ ही एक खुणेची निशाणी आहे. निष्ठुर पूर्वतयारी न केल्यास हिंदुस्थान कोणता मार्ग स्वीकारील तें ह्यावरून दिसून येतें " ( १६-२-२२ ) असें गांधींचें म्हणणें होतें व पुढें दिल्ली येथील ऑल इं. काँ. कमीटीच्या बैठकीचा विचार करतांना ते लिहितात;—दिल्ली येथें आलेल्या सभासदांच्या मनांतून " कळत किंवा नकळत अत्याचारीपणाचा प्रवाह इतका जोराचा वाहत होता आणि मी खरोखरच मनांतून आणि मोठ्यानें ईश्वराची अशीच प्रार्थना करीत होतों कीं, माझा अगदीं सपाटून पराभव व्हावा....मला ह्या अविचारी अनुयायी वर्गाच्या प्रचण्ड सहयेचा अगदीं वीट आला आहे..... तुमचा शांततेच्या मार्गावर विश्वास नसेल तर माझा ठराव मंजूर करण्याच्या भानगडीत तुम्हीं पडूं नका असें मी त्यांना दिल्लीस जीव तोडून सांगत होतों. पण अखेर त्यांनीं ठराव मंजूर केलाच. ( २-३-२२ ). "

म. गांधींची ही तक्रार सामान्य जनतेविषयीं किंवा सामान्य अनुयायांविषयीं नसून ऑल इंडिया कॉंग्रेसकमिटीच्या सभासदांविरुद्ध, म्हणजेच जबाबदार स्थानिक पुढाऱ्यांविरुद्ध होती.

## अर्धवटपणा तो हाच.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, सामान्य जनतेला हें अनत्याचाराचें तत्व पटणें शक्य होतें कीं अशक्य होतें, हा प्रश्न अगदीं अलाहिदा होता. जुन्या मुख्य दुय्यम व स्थानिक पुढाऱ्यांनीं ह्या तत्वाला व त्याच्या उपदेशाला निर्भेळ स्वस्थपणें व अनिर्बंध गतीनें राष्ट्रीय मनोभावनांत मुरूं देण्याला मदत करण्याऐवजीं त्या तत्वाला व उपदेशाच्या प्रवाहाला अशक्यतेच्या आक्षेपानें भिजविण्याचे, अनिश्चिततेच्या आरोपानें अडविण्याचे, अपवादांच्या आग्रहानें पाट फोडण्याचे आणि निरनिराळ्या नियमित क्षेत्रांत कोंपवून धरण्याचे प्रयत्न अगदीं प्रा(रं)भा-

पासूनच सुरू केले आणि हे सर्व प्रयत्न अहिंसेला धर्म म्हणून नाहीं तरी धोरण ( Policy ) म्हणून मान्यता दिल्यावरहि वाढत्या जोमानें सुरूच होते.

### अहिंसा तत्वाची हिंसा.

( १ ) 'मूले कुठारः' ह्या न्यायानें अहिंसा अशक्य आहे असाच मुळीं गांधींच्या अहिंसावादावर पहिला आक्षेप घेण्यांत आला. हा आक्षेप कदाचित् अपुरा पडेल व ' एकदां अनुभव तरी पाहूं या ! ' असें कोणी म्हणतील; अशांच्यासाठीं ( २ ) अहिंसा तत्व हें व्यक्तीला व राष्ट्राला नामर्द बनविणारे आहे असा दुसरा आक्षेप घेण्यांत येऊं लागला. ह्या दोन उच्छेदक आक्षेपांनीं काम भागत नाहीं असें पाहिल्यावर ( ३ ) तिसरा संक्षेपक आक्षेप पुढें येऊं लागला:—नियमित काळपर्यंत, फक्त राजकारणांत व तीहि केवळ कॉंग्रेसच्या राजकारणांत अहिंसा क्षम्य समजावी; परंतु अहिंसेचा कालमर्यादाहीन असा सार्वत्रिक उपदेश अक्षम्य आहे. अहिंसा निरुपयोगी ठरल्यास हिंसावादाला, अत्याचाराला पूर्ण मुभा आहे असें गृहीत धरून (व स्पष्ट आणि सदोदित बोलत राहून ) चालण्यांत यावें; राजकारणाबाहेर अनत्याचार उपदेशांत व आचरणांत आवश्यक नसावा; आणि प्रत्यक्ष कॉंग्रेसचा संबंध नसेल अशा राजकारणांतहि अनत्याचार पाळलाच पाहिजे असें समजण्यांत येऊं नये.

ह्या आक्षेपांसंबंधानें म. गांधींचें म्हणणें असें होतें कीं, ( १ ) अनत्याचार अव्यवहार्य आणि अशक्य असो किंवा नसो; परंतु तो तसा आहे किंवा नाहीं हें अनुभवानें ठरविण्यासाठीं मला कांहीं काळपर्यंत तरी निर्वेध संधि द्या. धोरण म्हणून स्वीकारलेला अनत्याचार आणि धर्म म्हणून स्वीकारलेला अनत्याचार ह्यांत फरक इतकाच आहे कीं, धोरण पाहिजे तेव्हां बदलतां येतें; धर्म हा पाहिजे तेव्हां बदलतां येत नाहीं. परंतु एरव्हीं धोरण व धर्म ह्या दोन्हीं दृष्टीनें स्वीकारलेला अनत्याचार सारखाच निर्मळ, निर्वेध आणि एकनिष्ठ असला पाहिजे. परंतु आक्षेपकांनीं निदान तत्वतः तरी म गांधींचे हें म्हणणें ऐकलें नाहीं.

### सपशेल चुकीचा आक्षेप.

अहिंसावाद हा व्यक्तीला व राष्ट्राला नामर्द बनविणारा आहे हा आक्षेप तत्वतः आणि व्यवहारतः अगदीं चुकीचा आहे.

तत्वतः गांधीचें मत काय आहे तें पाहू. The Doctrine of the Sword ( यं. इं. ११ ऑगष्ट १९२० )-तरवारीचें तत्वज्ञान ह्या आपल्या अत्यंत महत्वाच्या लेखांत म. गांधी म्हणतात:—

" नामर्दपणा आणि अत्याचार ह्या दोहोंपैकीच कोणतातरी एक मार्ग स्वीकारणें अपरिहार्य असेल तर मी अत्याचारच स्वीकारावा असा सल्ला देईन. * * * ह्यासाठींच मी बोअर युद्धांत, झुलूंच्या नामधारी बंडांत आणि गेल्या महायुद्धांत भाग घेतला. म्हणूनच ज्यांची अत्याचारावर श्रद्धा असेल त्यांना शस्त्रास्त्र विद्या शिकविण्यांत यावी असें मी म्हणतों. स्वतःचा उपमर्द नामर्दपणानें व असहाय्य पाहत रहाण्यापेक्षां हिंदुस्थाननें स्वाभिमानाच्या संरक्षणासाठीं हातीं शस्त्र धरलें तरी मला चालेल."

" हिंदु मुसलमानांचें ऐक्य " ह्या सदराखालीं मोपल्यांच्या अत्याचारासंबंधानें लिहितांना ( यं. इं. २८-७-२३ ) म. गांधी म्हणतात;—

" हिंदु किंवा त्याचप्रमाणें मुसलमान, ह्या दोहोंपैकीं कोणताहि एक पक्ष घद्कून जाईल तेव्हां त्यांना दोन मार्ग मोकळे आहेत. प्रतीकार न करतां वीरवृत्तीनें मरण स्वीकारावें; त्यायोगानें खोडसाळपणाची वाढ एकदम बंद पडेल; किंवा प्रतीकार करून जगावें किंवा मरावें. प्रत्येक व्यक्तीला जगाच्या अंतापर्यंत हे दोन्ही मार्ग मोकळे राहणारच. आम्हीं असहाय्य झालों आहोंत ह्या मुळेंच सर्व वाद उपस्थित होतात. प्रतीकार न करतांच स्वतःच्या तत्वासाठीं मरावयाची दैवी कला आम्हीं विसरून गेलों आहोंत, आणि त्याचप्रमाणें आम्हीं स्वसंरक्षणासाठीं जिवावर उदार होऊन शारीरिक बळाचा उपयोग करण्याची कलाही विसरून गेलों आहोंत."

व्यवहारतः पाहिलें तरी सुद्धां म. गांधींच्या उपदेशानें राष्ट्र नामर्द बनलें आहे असें म्हणतां येत नाहीं.

बंगभंगाच्यावेळीं अत्याचाराचें तत्व बंगालमध्ये खूपच बळावलें होतें. शेंकडो तरुण त्या तत्वामुळें लागेल तो स्वार्थत्याग करण्यास पुढें सरसावत होते. त्या नंतर व पुढें होमरूल चळवळीच्यावेळीं सरकारनें केलेल्या सार्वत्रिक दडपशाहीमुळें ह्या तत्वाचा जवळ जवळ बीमोड झाला. आणि बंगालमध्यें १९१७ ची कॉंग्रेस पार पाडण्याकरितां पुरेसे स्वयंसेवक मिळणेंहि जड पडलें. लोकमान्यांच्या गैरहजिरीत महाराष्ट्रांत तरुण किंवा वृद्ध विटी प्रांतिक परिषद भरविण्यास किंवा स्वदेशी व स्वराज्य ह्यांचें नांव काढण्यासहि भीत होती ह्यामुळें देशांत अनत्याचाराचा पुरस्कार कोणीहि करीत नव्हता हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. परंतु म. गांधींच्या कारकीर्दीत पंजाबांतील अमानुषी सरकारी अत्याचार प्रत्यक्ष डोळ्यांपुढें असूनहि युवराजांच्या दौऱ्याच्यावेळीं त्याच बंगाल्यांत हजारों

स्वयंसेवक रोज दडपशाहीला स्वतःचे बळी देण्यास तत्परतेनें पुढें येत होते; त्याच महाराष्ट्रानें मालेगांव-धारवाड नागपूर विसरून चोहोंकडे जोमानें पिकेटिंग चालविलें होतें; त्याच दिल्ली पंजाबनें निर्मेळ हरताळ पाडून शेंकडों तरुण व वृद्ध राष्ट्रकार्यासाठीं पुढें केले; आणि एकंदर हिंदुस्थाननें फार थोडया मुदतींत चाळीस हजार तरी राष्ट्रवीर दडपशाहीच्या अग्निवर्षावांत उत्सुकतेनें बळी दिले व आणखीही देण्याची तयारी होतीच!

अत्याचारांचा तात्विक पुरस्कार करणाऱ्यापेक्षां अनत्याचाराचा पुरस्कार करणाऱ्या म. गांधींनींच सामान्य जनसमूहाला व कार्यकर्त्यांना अधिक मर्दानी बनविलें आहे. ह्या विधानाला प्रत्यक्ष शारीरिक अत्याचारांचाहि भरपूर पुरावा मिळण्यासारखा आहे. लाला लजपतराय ह्यांस पकडलें त्यावेळीं पंजाबांत कांहींच धाडसी प्रकार घडले नाहींत. बंगाल्यांत अरविंद घोष किंवा श्री पाल ह्यांस पकडल्यावेळीं अनपेक्षित असे धाडसी प्रकार कांहींच घडले नाहींत. आणि लोकमान्यांस मुंबई येथें शिक्षा झाली तेव्हां लहानसा गोळीबार झाला. परंतु म. गांधींना पकडल्याची नुसती उडत बातमी समजतांच पंजाबांत व गुजराथेंत ठिकठिकाणीं किती तरी अत्याचार घडले, खुद्द मंबईला प्रचण्ड खळबळ उडाली! आणि त्यावेळीच्या सरकारनें स्वीकारलेल्या अत्यंत उग्र स्वरूपामुळें एकंदर राष्ट्र मुळींच गांगरून गेलें नाहीं. उलट नव्या व दुप्पट जोमानें चळवळींत पडलें. सर शंकरन् नाय्यर ह्यांनीं तर एकंदर शंभर दंग्यांना म. गांधी कारणीभूत झाले असें यादीनिशीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. हे सर्व प्रकार गांधींच्या इच्छेविरुद्ध होते व त्यांतील कित्येकांचा गांधींशीं व म. गांधींच्या तत्वज्ञानाशीं प्रत्यक्ष संबंध कांहींच नव्हता; किंबहुना ते गांधींचें तत्वज्ञान जनतेला किती अंशांनीं पटलें नव्हतें किंवा पोहोंचलें नव्हतें तेंच दर्शवितात. तथापि (अ) राष्ट्रांतील सामुदायिक व संघटित राजकीय अत्याचार सर्वस्वी बंद पडले; (आ) राजकारणांत भाग घेणाऱ्या लोकांपैकीं फारच मोठी संख्या राष्ट्रकार्यासाठीं राष्ट्रीय सभेच्या तत्वांस अनुसरून भरपूर स्वार्थत्याग करण्यास प्रचण्ड प्रमाणावर पुढें येऊं लागली आणि (इ) राजकारणांत प्रत्यक्ष व विशेष लक्ष न घालणारी सामान्य जनता तीव्र प्रक्षोभक कारण उत्पन्न झाल्यावर अत्याचार करण्यासहि सिद्ध झाली. आणि ह्या दोन्ही प्रवृत्ति वाढत्या लोकमतजागृतीला शोभतील इतक्या वाढत्या प्रमाणांत व्यक्त झाल्या. ह्या वस्तुस्थितिदर्शक तीन गोष्टींच्या समीकरणानें असें स्पष्ट सिद्ध होतें कीं, कांहीं झालें तरी म. गांधींच्या

अहिंसेच्या शिकवणुकीनें राष्ट्र संघशः किंवा व्यक्तिशः नामर्द बनलें नाही. उलट दंडपशाहीला तोंड देण्याची राष्ट्राची तत्परता राष्ट्रीय जागृतीला शोभेशा प्रमाणांत वाढतच होती.

ही प्रवृत्ति केवळ क्षणिकवत् म.गांधींच्या व्यक्तिमहात्म्यामुळें उद्भवलेली होती असेंहि म्हणतां येत नाहीं. अकाली लोकांचा अर्धधार्मिक सत्याग्रह, नागपूरचा शुद्ध धार्मिक व शुद्ध राजकीय (निशाण) सत्याग्रह, बोरसद तालुक्यांतील जादा पोलीस कर नाकारण्याचा यशस्वी सत्याग्रह हे सर्व राजकीय दृष्ट्या अत्यंत अनवस्थेच्या, अनास्थेच्या आणि निराशेच्या काळांत सुरू झालेले सत्याग्रह पाहिले म्हणजे राष्ट्रांतील कमींतकमी मर्दानी वृत्तीची मर्यादा स्पष्टपणें दिसून येते. ही कमींतकमी मर्यादासुद्धां मागील कोणत्याहि चळवळीच्या जास्तींत जास्त मर्यादेपेक्षां कितीतरी अधिक विस्तृत आहे ह्यांत शंकाच नाहीं.

वस्तुतः म. गांधींची अनत्याचाराची शिकवणुक इतकी मर्दानी होती की, अनत्याचाराच्या पांघरुणाखाली म. गांधी अत्याचाराची-बंडाचीच पूर्वतयारी करीत आहेत अशी पुष्कळांची कल्पना झाली होती. ह्यामुळें जाहीर रीतीनें बंड पुकारण्याची वेळ केव्हां येईल बरें ? असा प्रश्न कित्येकांकडून त्यांस विचारण्यांत येई. ह्याच्या उलट कित्येक लोक त्यांस अत्यंत धूर्त व अनत्याचाराचें पांघरुण घेऊन अत्याचारांची पूर्व तयारी करणारा ढोंगी पुढारी समजून त्यांच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करीत. ( यं. इं. ११-८-२३ )

म. गांधींवरील हे दोन परस्पर विरोधी आक्षेप परस्पर संक्षेपक बनतात असें वस्तुस्थितीवरून व तर्कशास्त्रदृष्ट्या अगदीं स्पष्ट दिसून येतें.

### आत्म-क्लेश.

आत्म क्लेश (Suffering) ही अनत्याचाराची अपरिहार्य पुरवणी आहे.

आत्म-क्लेश सहन करावयाचें, इतकेंच नव्हे तर, आनंदानें व तत्परतेनें सहन करावयाचें ही तर म. गांधींच्या शिकवणुकींतील एकच, खरीखुरी व परिणामकारक शक्ति आहे. परंतु अहिंसेप्रमाणेंच ह्या आत्मक्लेशाच्या तत्वालाहि अगदीं प्रारंभापासून पद्धतशीर रीतीनें विरोध करण्यांत आला व त्या बाबतींत शक्य तितका सवलती घेण्याची प्रवृत्ति वाढविण्यांत आली. कोर्टावरील बहिष्काराच्या मुद्यांशी मुख्यतः सरकारी सत्तेचें अधिष्ठानच डळमळीत करणें हाच उद्देश होता. परंतु आनंदानें व तत्परतेनें, परंतु निर्मळ कार्यांत आत्मक्लेश सहन करावयाचें हाहि एक हेतु ह्या बहिष्काराच्या मुद्यांशीं होताच. आणि ह्या

हेतुमुळें हा बहिष्कार अंशतःसुद्धां केवळ तात्विक न ठरतां शुद्ध व्यावहारिकः कर्णेच क्रमप्राप्त झालें. आणि म्हणूनच आत्म-क्लेशाच्या तत्वाबरोबरच ह्या बहिष्कारासहि कडक विरोध करण्यांत आला.

लाला लजपतराय ह्यांनीं अगदीं अलीकडेसुद्धां ( ८-१२-२३ ) म. गांधींच्या ह्या अहिंसा व आत्मक्लेश अशा दोन्ही तत्वांवर आक्षेप घेतले आहेत. आपणास अपयश आलें ह्याचें एक कारण " आपल्या पुढाऱ्यानें व्यवहार्यतेच्या पलीकडे अहिंसा नेली " हें आहे. असा महात्माजींच्या अहिंसेवर शेरा मारण्यापूर्वी लालाजी म्हणतात; " कष्ट सोसणें हें आपलें ध्येय असतांना त्यापासून च्युत होणें ही गोष्ट भीरुपणाची समजली जाईल. तथापि कष्टासाठीं कष्ट सोसावे ह्या गोष्टीवर माझा मुळींच विश्वास नाहीं. एखाद्या व्यक्तीची आत्मशुद्धि करण्यास ह्या मार्गाचा कदाचित् उपयोग होईल. परंतु राष्ट्राच्या झगड्यांत त्याचा उपयोग होईल असें मला वाटत नाहीं. "

वस्तुतः केवळ आत्मक्लेशासाठीं म्हणून तुरुंगांत उठल्यासुटल्या शिरावें असें म. गांधींनीं कधींच सांगितलेलें नाहीं. उलट " कसें तरी करून तुरुंगांत जाणें हा अत्याचारच होय " ( यं. इं. २३-२-२२ ) असेंच त्यांनीं सांगितलें आहे. म. गांधींच्या आत्मक्लेश ह्या तत्वांत व त्याच्या अंमलबजावणींत मुख्य मुद्दे होते ते हेच कीं, ( १ ) आत्म-क्लेश हे अत्यंत विशुद्ध मनोवृत्तीनें व पद्धतीनें सहन केले तरच ते परिणामकारक होतील; (२) सर्व प्रकारचे क्लेश हे रागानें कुरकुर करीत किंवा कष्टानें सहन न करतां आनंदानें, तत्परतेनें व निष्ठापूर्वक सहन करावेत.

म. गांधींच्या चळवळीचें खरें सामर्थ्य ह्या आत्मक्लेश तत्वांतच आहे. वस्तुतः गांधींचा शुद्ध अहिंसावाद हा उघड उघड निषेधात्मक-निष्क्रियतेचा ( Hegadive ) व अप्रतीकारी मार्ग आहे. ह्या निष्क्रिय मार्गांत क्रिया-चैतन्य-सामर्थ्य आणि प्रतीकार उत्पन्न होतो तो केवळ ह्या आत्मक्लेशामुळेंच.

प्रो. कंज ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें, पौर्वात्यांचें अनत्याचाराचें तत्व हें आतांपर्यंत निष्क्रियतेचें व वैयक्तिक स्वरूपाचेंच आहे असें वाटे, परंतु " असहकारितेनें ही कल्पना साफ बदलून टाकली आहे. कांहीं विलक्षण अंकगणितपद्धतीनें वैयक्तिक अप्रतीकाराच्या सामाजिक दृष्ट्या निःपरिणामी चळवळीचें एक प्रचण्ड सामर्थ्यसंपन्न, आणि अत्यंत चैतन्यगर्भ अशा सामाजिक शक्तींत रूपांतर होतें ! "

परंतु ह्याचें एक कारण आत्मक्लेश हेंच आहे. प्रो. केज म्हणतात, " अत्यंत विशुद्ध स्वरूपाचा निःशस्त्र प्रतीकार आणि आत्मक्लेश सहन करण्याची तत्परता ही अविभाज्य आहेत. "

" कष्टांसाठीं कष्ट " सहन करण्याच्या आत्म-क्लेशाच्या तत्वावर माझा विश्वास नाहीं असें बोलणाऱ्यांस वस्तुतः हेंच सुचवावयाचें असतें कीं, शक्य तोंपर्यंत कष्ट टाळावेत आणि फक्त नाइलाज असेल तेव्हांच ते खुषीनें सहन करावेत. ज्या आत्मक्लेशांचे प्रत्यक्ष, तात्काल आणि स्थूल परिणाम दिसून येत नाहींत ते आत्मक्लेश व जे टाळतां येणें शक्य आहे ते आत्म- क्लेश त्यांस नको आहेत. उ० डॉ. वरद राजलु नायडू ह्यांचा वैय्यक्तिक कर न देण्याचा निश्चय, नागपूर निशाण सत्याग्रहांतील विशेष जाचक नसलेला व प्रत्यक्ष, स्थूल व तत्कालीन फायदा नसलेला सत्याग्रह, लाला लजपतराय ह्यांस कोर्टांत पुरावा देऊन शिक्षा टाळतां येऊं शकत होती किंवा सामुदायिक कायदेभंग सुरू नसतांना एखाद्या व्यक्तीला सरकारनें मागितलेली जमानत देऊन शिक्षा टाळतां येते असल्या व अशा प्रसंगीं सत्याग्रह किंवा कायदेभंग करून कष्ट सोसणें ह्या आक्षेपकांस नको असतें. परंतु हे आक्षेपक एक गोष्ट विसरतात. ती ही कीं, मनुष्य हा स्वभावतःच कष्ट टाळू पाहणारा असतो. आणि अनत्याचारी सत्याग्रहाची सर्व मदार आत्मक्लेशांवर अवलंबून असते. अशा स्थितींत "शक्य तोंपर्यंतच" कां होईना शिक्षा टाळण्याची प्रवृत्ति कायम ठेवल्यास असहकारितेचा सर्वच डोलारा डळमळल्याशिवाय राहत नाहीं. प्रचण्ड व प्रशस्त पायाखालील एकच दगड निखळून पडला तरी वरील इमारत खचूं लागते आणि म्हणूनच म. गांधी अहिंसा व आत्मक्लेश ह्या तत्वांत तडजोड करण्यास कधींच तयार नसत."

अहिंसा व आत्म-क्लेश ह्या महात्माजींच्या दोन्ही आद्य तत्वांना ह्याप्रमाणें प्रारंभापासूनच विरोध करण्यांत आला. आणि हा विरोध म. गांधींच्या एक वर्षांत स्वराज्य व अनत्याचारी असहकारितेनें स्वराज्य ह्या कल्पनांस संमति देऊन करण्यांत आला !

## एक वर्षांत स्वराज्य.

ह्या अनत्याचारी असहकाराच्या अपरिहार्य कालमर्यादेसहि असाच परंतु अप्रत्यक्ष स्वरूपाचा विरोध करण्यांत आला. प्रथम एक वर्षांत स्वराज्य ही कल्पनाच अव्यवहार्य म्हणून ठरविण्यांत येऊं लागली आणि नंतर ही कल्पना अर्थ- घातक आहे असें समजण्यांत व समजावून सांगण्यांत येऊं लागलें.

ह्या तात्विक विरोधाप्रमाणें व्यावहारिक विरोधहि पुष्कळच करण्यांत आला. खरेंच सांगावयाचें म्हणजे एक वर्षांत स्वराज्य ही कल्पना अशा अंतस्थ विरोधकांना सर्वस्वी अशक्य वाटत होती. एक वर्षांत स्वराज्य ह्या कल्पनेवर महात्माजींची पूर्ण निष्ठा होती. आणि ह्या कल्पनेला सुसंगत असे मार्ग त्यांनीं आंखले होते. परंतु विरोधकांनीं ही कल्पना फार आकर्षक व उत्तेजक असल्यामुळें पुढें पुढें व एकंदरींत तिला प्रत्यक्ष व सरळ वृत्तीनें विरोध न करतां तिला सुसंगत असलेल्या व महात्माजींनीं आंखलेल्या मार्गांना मात्र खूप विरोध केला. आणि ध्येय मात्र एक वर्षांत स्वराज्य पण मार्ग मात्र "अनेक वर्षांत स्वराज्य" अशा रीतीनें महात्माजींच्या कार्यक्रमाला तडजोडीचें स्वरूप आलें.

महात्माजी, विद्यार्थी, वकील, व्यापारी, पुढारी व कार्यकर्ते ह्याच्याकडून प्रचण्ड स्वार्थत्याग, तीव्र आत्मक्लेश, सार्वत्रिक कार्यनिष्ठा, असामान्य आत्मसंयमन व अश्रुतपूर्व संघटना ह्यांची अपेक्षा करीत होते. आणि केवळ एक वर्षापुरतेंच पाहिलें तर हे सर्व प्रकार अशक्य किंवा अव्यहार्य नव्हते. युरोपियन राष्ट्रांनीं व स्वत: कांहीं अंशीं हिंदुस्थाननें महायुद्धांत अशा प्रकारची पुढाऱ्यांची अपेक्षा पूर्ण करून दाखविली होती. परंतु हिंदुस्थानांत महात्माजींच्या कल्पनेला कसे फांटे फोडण्यांत आले ते पहा.

### सार्वत्रिक राष्ट्रीय शिक्षण.

हें सरकारी मदतीवांचून केंव्हांहि अशक्य आहे असें लाला लजपतराम ह्यांनीं कलकत्ता येथील जादा काँग्रेसच्यावेळीं (१९२०) अध्यक्षपदावरून स्पष्टपणें व सविस्तरपणें प्रतिपादन केलें होतें. आणि एक वर्षाचीच मर्यादा घेतली तर त्यांत राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था सर्वत्र उभारून त्या अशत: तरी स्थिर करणेंहि अर्थातच सर्वस्वी अशक्य होतें. आणि म्हणूनच सरकारी इमारतीचा डोलारा चोहोंकडून कोसळून पाडावा व राष्ट्रीय कार्यक्रमांतील कांहीं कार्याला भरपूर कार्यकर्ते मिळावेत म्हणूनच म. गांधींनीं सरकारी शिक्षण संस्थांवर सार्वत्रिक व निरपवाद बहिष्कार, एक वर्षापुरता किंवा स्वराज्य मिळेपर्यंत पुकारला * परंतु एक वर्षाची कालमर्यादा अविरोधी वृत्तीनें कां

* "तरुण बंगाल्यांस" (यं. इं. १९-१-२०) उद्देशून लिहिलेल्या पत्रांत म. गांधी लिहितात "तहकूब ठेवलेल्या अभ्यासाच्या काळांत एक वर्षापेक्षां सुद्धां कमी मर्यादेंत शक्य तितक्या शांतपणें स्वराज्य कसें मिळवितां येईल ह्या गोष्टीचा

होईना, पण मान्य केलेल्या आक्षेपकांनीं मात्र हा बहिष्काराचा कार्यक्रम केवळ विघातक आहे अशी ओरड करून शाळा सोडून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्यांची राष्ट्रीय शिक्षण संस्थेंत सोय झालीच पाहिजे असा आग्रह धरला आणि राष्ट्रीय सभेचें पुष्कळसें द्रव्यबळ, मनुष्यबळ, व कर्तृत्व हीं निरनिराळ्या राष्ट्रीय शिक्षणसंस्थांत गुंतवून ठेविलीं. ज्यावेळीं प्रत्येक रुपया, प्रत्येक व्यक्ति, प्रत्येक दिवस हा शुद्ध व तात्कालपरिणामकारक राजकारणांत अमूल्य महत्वाचा होता अशावेळीं ह्या आक्षेपकांनीं जवळ जवळ एका पिढीनंतर किंवा ५।१० वर्षांनीं अंशतः परिणामकारक होणाऱ्या कार्यांत पुष्कळसें राष्ट्रीय बळ गुंतवून ठेविलें! ह्या शिक्षणसंस्थांतून तत्कालिक राजकारणास थोड्याफार प्रमाणांत सहाय्य करूं शकेल असा शीघ्रपरिणामी अभ्यासक्रम म्हणजे सूत कातणें व विणणें, प्रसंगीं स्वयंसेवक म्हणून कामें करण्याकरितां शिस्त व सामर्थ्य देणारी कवाईत व व्यायाम यांचाच होता. परंतु अचूक ह्या कामांचीच आक्षेपकांनीं जाणून बुजून किंवा अजाणपणें उपेक्षा केली.

## स्वदेशी आणि बहिष्कार

हीं उथळ न होतां उत्कट व्हावींत आणि त्यांचा मारा सहजासहजीं खास इंग्लंडवरच व्हावा म्हणून महात्माजींनीं खादीची कल्पना काढली. खादीच्या निपजेला लागणारी एकंदर साधन सामुग्री देशीच नव्हे तर शुद्ध गांवठी व म्हणूनच खरीखुरी स्वावलंबी व कमींत कमी मुदतींत जास्तींत जास्त प्रमाणावर जुळवितां येण्यासारखी होती. शिवाय ती कार्यकर्ते व जनता ह्यांच्यांत निकट संबंध आणि समानशीलता उत्पन्न करणारी होती; जनतेंतील बऱ्याच मोठ्या भागाला तत्काळ व्यवसाय व वेतन पुरविणारी होती. आणि ह्यांतूनहि राहणारी उणीव भरून काढण्याकरितां महात्माजींनीं कपड्यांची गरज कमी करण्याचाहि सक्रिय उपदेश चालविला होता. आणि एक वर्षाच्या कालमर्यादेंत व्यापाऱ्यांकडून व सर्व सामान्य लोकांकडून इतका स्वार्थत्याग व सुखत्याग अशक्य नव्हता. व इतक्या कार्याची उभारणीहि अशक्य नव्हती. परंतु आक्षेपकांनीं कालमर्यादेचा स्वीकार

विचार करावा असें माझें आग्रहाचें सांगणें आहे. मी तुम्हाला चरखा हाच उपहार देतों. त्याच्यावरच हिंदुस्थानची सांपत्तिक मुक्ति अवलंबून आहे. तुमची इच्छाच असेल तर मग मात्र दायबाबूनीं देऊं केलेल्या कॉलेजांत जाण्याची तुम्हाला मोकळीक आहे."

फेला परंतु तिला पडदानशीन बनविलें आणि आपण गिरण्या आणि सार्वत्रिक बहिष्कार ह्या नांवावर स्वैरसंचार सुरू केला. वस्तुतः कोणतीहि गिरण कंपनी बनविल्यापासून तीन वर्षांच्या आंत कापड तयार करूं शकत नाहीं; तिला लागणारी सर्व यंत्रसामुग्री परदेशीं तयार असली तरी मागणी जाऊन येथें उभारली जाण्यासुद्धां एक वर्ष पुरत नाहीं; शिवाय सामान्य जनता व राजकारणी प्रवृत्तीचे लोक ह्यांकडून प्रत्यक्ष, सुलभ व दृश्य राजकारण व राष्ट्रकार्य करून घेण्याचें व त्या योगानें राजकीय कार्यकर्ते व जनता ह्यांच्यांत विशेषच संघटना घडवून आणण्याचें एक साधन नष्ट होतें; खादीच्या व्यापारांत मध्यस्थ दलालांनीं फाजील नफा खाल्ला तरी तो फक्त शहरांतच, आणि शिवाय तो गिरणीवाल्याइतक्याच केवळ शंभर दोनशें लोकांतच वाटला न जातां पुष्कळच जास्त च दुय्यम स्थितींतील लोकांत वाटला जातो; शिवाय खादीबरोबरच गरजा कमी करण्याची कल्पना साहचर्यामुळें स्वीकारली जातेच व त्यामुळें स्वतःच्या खिशांतून मध्यस्थांस द्याव्या लागणाऱ्या नफ्याचें प्रमाणहि कमीच होतें. ह्या सगळ्या गोष्टी स्पष्ट असतांहि आक्षेपकांनीं गिरण्यांची कालावधीची कल्पना आणि सार्वत्रिक बहिष्काराची उथळ कल्पना ह्यांच्या नादीं लागून खादीच्या कल्पनेला चांगलाच प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष विरोध चालविला.

म. गांधींच्या कल्पनेप्रमाणें व कार्यपद्धतीप्रमाणें एक वर्षांत स्वराज्य कमवावयाचें ( Win ) नव्हतें तर एक वर्षांत

## स्वराज्य प्रस्थापित करावयाचें

होतें; देशांत एक स्वतंत्र व ब्रिटिश सरकारला प्रतिस्पर्धी अशी शासनसंस्था निर्माण करून राज्यकारभार स्वतःच्या हातीं घ्यावयाचा, आमच्या हातीं देणें सरकारला भाग पाडावयाचें अशी महात्माजींची योजना होती. डी. व्हॅलेरा यांची सिनफेन चळवळ आणि महात्माजींची असहकारितेची चळवळ ह्यांत मुख्य भेद हिंसावादाचा आहे तर मुख्य साम्य हें स्वराज्यप्रस्थापनेचें आहे. " सिनफेनर्स हे अत्यंत कडक असहकाराचाच पुरस्कार करीत आहेत आणि त्यांत हिंसा नसती तर तिचें स्वरूप हिंदुस्थानांत पुरस्कार करण्यांत येणाऱ्या चळवळीसारखेंच झालें असतें. " स्वत्वशून्य राष्ट्राला स्वातंत्र्यप्रिय राष्ट्र बनवावयाचें, एकपंचमांश राष्ट्रावरील अमानुषी अस्पृश्यतेचा डाग काढून त्यांस मानव बनवावयाचें, सर्वच राष्ट्राला खादीनें मढवावयाचें, कर्जबाज व व्यसनी लोकांना स्वावलंबी व सत्वशील बनवावयाचें आणि असामान्य संघटनेच्या

राज्यसंस्थेला प्रतिस्पर्धी अशी राज्यसंस्था निर्माण करावयाची हे ज्या चळवळीचे हेतु व साधनें ती चळवळ निवृत्तिपर होती असें म्हणणें म्हणजे आपण बुद्धिसंन्यास घेणेंच होय !

दुर्दैवानें ही कल्पनासुद्धां व्हावी तितकी दृढमूल झाली नाहीं. ह्या कल्पनेला उपेक्षणीय ठरविल्यामुळेंच आक्षेपक असहकाऱ्यांनीं न्यायमंदिरें, शाळा व कौन्सिलें ह्यांजवरील बहिष्कारास व्यावहारिक व तात्विक विरोध केला; एतद्विषयक कॉंग्रेसच्या ठरावांची अंमलबजावणी धुसफुसत केली. आयर्लंडवांचून जगाच्या पाठीवर आतांपर्यंत कोणीहि प्रयोग करून पाहिला नाहीं अशी ही कल्पना व्यवहारक्षम करूं पाहणाराला संन्यासमार्गी म्हणणें म्हणजे महंमद पैगंबर किंवा लेनिन ह्यांना संन्याशी ठरविण्यासारखेंच आहे.

## सत्य.

हा गांधींच्या चळवळीचा मूलाधार. त्यालाहि असहकारी आक्षेपकांकडून कांहीं विरोध झालाच. परंतु गांधींनीं सत्यनिष्ठा हा मुद्दा वादग्रस्त न ठेवितां गृहीत सिद्धांत म्हणूनच ते धरून चालूं लागले, सत्यनिष्ठेला विरोध करणें हें काम अहिंसेला विरोध करण्याइतकें सरळ व सोपें नव्हतें; तीव्र सत्यनिष्ठा ही तीव्र मुत्सद्देगिरीइतकीच प्रतिपक्षाला दिङ्मूढ करते असा जनतेला अनुभव येत होता; जनता मुत्सद्देगिरी अपुरी समजून वीरवृत्तीची अपेक्षा करूं लागली होती व वीरवृत्तीला सत्याविषयींची बेपर्वाई विशेपसी रुचत नाहीं अशा अनेक कारणांमुळें त्या तत्वाला मात्र विशेष व समोरून हल्ले चढविण्यांत आले नाहींत. फक्त जातां जातां, हळूच, मागून त्या तत्वाला चिमटे काढण्यांत येत होते.

* * * *

## अपयशाचें एक सर्वसामान्य व सर्वमान्य कारण.

असहकारितेच्या अपयशाला कारणीभूत होणारा एक मुद्दा शुद्ध असहकारी व आक्षेपक असहकारी ह्या दोघांसहि लागू पडणारा आहे. लाला लजपतराय ह्यांच्या शब्दांत ( ८-१२-२३ ) सांगावयाचें म्हणजे "एका वर्षांत स्वराज्य ह्या मोहिमेच्या गडबडींत कॉंग्रेसची सुव्यवस्थित संघटना करण्याचें भान कोणाच राहिलें नाहीं. पैसा गोळा केला, स्वयंसेवक जमविले, सभासद नोंदले, वगैरे कामें उरकलीं, पण एका वर्षांत स्वराज्य मात्र आलें नाहीं. ह्याचें कारण संघटनेचा अभाव हें होय.

### स्वपर बलाबल अजमावतां आलें नाहीं.

" सरकारच्या बळाचा बरोबर अंदाज करतां आला नाहीं " असा एक आक्षेप ह्या चळवळीवर घेण्यांत येतो. परंतु महात्माजींच्या लेखांचें व भाषणांचें चळवळीच्या सुरुवातीपासून सूक्ष्म निरीक्षण करणारास असें स्पष्ट दिसून येत होतें कीं, सरकार कर्तुमकर्तुम् सामर्थ्यसंपन्न आहे आणि ह्या सामर्थ्याचा ते बेमुर्वतपणें उपयोग केल्याशिवाय राहणार नाहीं ह्यांची त्यांना पुरी जाणीव होती व लोकांसहि ती जाणीव उत्पन्न व्हावी म्हणून ते शिकस्तीचे प्रयत्न करीत होते. दंगेधोपे मोडण्यासाठीं सरकारनें अमलांत आणलेले मार्ग माझ्या अपेक्षेबाहेर कठोर नाहींत; पण लोकांची अनत्याचाराविषयींची आस्था मात्र माझ्या अपेक्षेबाहेर आहे असें त्यांस वाटे.

### नेमस्तांनीं दगा दिला.

हें मात्र असहकारितेच्या ऱ्हासाचें एक निश्चित कारण आहे खरें. अर्ध्याहून अधिक मतदार मतें न देतील तर नेमस्त कौन्सिलांत बसणार नाहींत ( यं. इं १४-७-२१ ) अशी गांधींची अपेक्षा होती पण ती चुकीची ठरली; इतकेंच नव्हे तर अगदीं सामान्य व ढोबळ अन्यायसुद्धां त्यांनीं उघडया डोळयांनी पाहिले व डोळे मिटून किंवा असहकाऱ्यांकडे डोळे मिचकावून त्यांनीं त्यांस संमति दिली !

समाजशास्त्राचीं कांहीं आद्य तत्वें सर्वसंमत आहेत. त्यांत सरकार ह्या संस्थेचें अधिष्ठान, आवश्यकता व कार्यक्षमता ह्यांत पुढील तत्वांचा समावेश होतो. ( १ ) शांतता व संरक्षण, अथवा न्यायदान व युद्धाची तयारी म्हणजेच पोलीसी व लष्करी सामर्थ्य. सरकार ह्या संस्थेचें हें अधिष्ठान व मुख्य कार्य आहे. (२)कायदा व कर हे ह्या मुख्य कार्याचे स्वाभाविक परिणाम आणि सरकार ह्या संस्थेचीं दुय्यम अंगें होत.

ह्या दोन प्राथमिक स्वरूपाच्या कार्यांना जगाच्या आधुनिक संक्रमणावस्थेंत आणखी (३)शिक्षण व व्यापार ह्या दोन कार्यांची भर पडलेली आहे. "स्वराज्यप्रस्थापनेसाठीं " प्रतिस्पर्धी संघटना निर्माण करावयाची म्हणजे ती अर्थातच राष्ट्रीय सभा ही होय. आणि त्यासाठीं राष्ट्रीय सभेनें प्रथम देशांत सर्वत्र, निदान जेथें सरकारची मदत अपुरी, अनिष्ट, अलभ्य असेल अशा प्रसंगीं व ठिकाणीं तरी शांतता व सुव्यवस्था राखण्याचें कार्य यशस्वी रीतीनें बजाविण्याची आपली लायकी सिद्ध केली पाहिजे व त्यासाठीं आधीं राष्ट्रीय सभेच्या शांतिसेनाविभा-

गाची जोमदार संघटना झाली पाहिजे. कॉंग्रेसच्या स्वराज्यप्रस्थापक प्रयत्नांचा हा पाया आहे हें विसरून चालणार नाहीं.

## कायदा व कर.

ह्या बाबतींत कॉंग्रेसचें कार्य दुहेरी राहणार. सरकारचे कोणते कायदे पाळावेत व कोणते पाळूं नयेत ह्या संबंधानें परिणामकारक कायदे म्हणजे ठराव कॉंग्रेसला करतां आले पाहिजेत. तसेंच सरकारचे कोणते कर द्यावेत व कोणते कर, केव्हां, कोणीं व कां देऊं नयेत तेंहि कॉंग्रेसला परिणामकारक ठरवितां आलें पाहिजे आणि शिवाय स्वतःचा खर्च चालविण्यासाठीं भरपूर फंड खुशीच्या करांच्या रूपानें वसूल करतां आला पाहिजे. ह्यासाठींहि स्वयंसेवकांच्या सार्वत्रिक संघटनेची आवश्यकता आहेच परंतु शिवाय " एक कोटी म्हणजेच भरपूर " सभासदहि मिळविलेच पाहिजेत. कारण सभासदांची फी हेंच कॉंग्रेसचे मुख्य, निश्चित व कायम उत्पन्न असणार. परंतु दुसरेंहि जबरदस्त कारण हें आहे कीं, ते राजीखुषीनें व जाणून बुजून कॉंग्रेसचे कायदे पाळण्यास बांधले गेलेले कॉंग्रेसचे प्रजाजन ठरतात. आणि विशेष कार्यप्रेम व विशेष ध्येयप्रेम ह्यामुळें हे प्रजाजन सामान्य प्रजाजनांपेक्षां विशेष बळकट संघशक्ति निर्माण करतात. कॉंग्रेसचे हुकूम पाळण्याचा संभव असलेल्या लोकांची संख्या ह्या सभासदांच्या संख्येवरूनच अजमावतां येणार. शिवाय सरकारच्या कायद्यास नैतिक संमति देणाऱ्या कौन्सिल मतदारांची संख्या साठ लाख असल्यामुळें कॉंग्रेस अधिक राष्ट्रीय, लोकप्रिय, व श्रेष्ठ ठरावयास तिच्या मतदारांची संख्या ह्या संख्येपेक्षां पुष्कळच जास्त असली पाहिजे हें उघडच आहे.

ह्याशिवाय शिक्षणव्यवहार वगैरेवरहि सरकारच्या ताब्याऐवजीं कॉंग्रेसचा ताबा हळूहळू वाढत गेला पाहिजे ह्या दृष्टीनें विचार केल्यास कॉंग्रेसचे आतांपर्यंतचे प्रयत्न उपक्रम ह्या दृष्टीनें नजरेस करतां येण्यासारखे आहेत.(१) वर्किंग-कार्यकारी-कमिटी नेमण्याची लोकमान्यांची लखनौ कॉंग्रेसमध्यें मागें पडलेली कल्पना अमलांत आणून, ( २ ) महत्वाचे प्रसंगीं स्वतंत्र चौकशीकमिट्या नेमून ( ३ ) एक कोटीचा फंड जमवून ( ४ ) स्वतंत्र खादी खातें निर्माण करून ( ५ ) पिकेटिंगच्या द्वारा व्यापाराचें नियंत्रण करून ( ६ ) शिक्षणसंस्था चालवून ( ७ ) कॉंग्रेस कमिटयांचें जाळें देशभर पसरून आणि ( ८ ) हरताळ अमलांत आणून कॉंग्रेसनें आपलें अधिष्ठान स्थिर केलें आहे. सांपत्तिक स्थिति सुधारली आहे व व्यापार, शिक्षण वगैरे बाबतींत राष्ट्रांत अजवरी जी दोहेंना, आपली

स्वतंत्र नियामक सत्ता प्रस्थापित केली आहे. परंतु मुख्य मुद्दा हा आहे कीं, हे सगळे प्रयत्न अगदींच अपुरे आहेत. त्यासाठीं काँग्रेसच्या संस्थांची पुनर्घटना झाली पाहिजे आहे व कार्यक्षेत्र विस्तृत व विविध झालें पाहिजे आहे. चौकशी कमिट्या नेमून ह्यासाठीं प्रथम कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीची पुनर्घटना झाली पाहिजे. ब्रिटिश प्रधान मंडळाच्या धर्तीवर वर्किंग कमिटीचा प्रत्येक सभासद हा व्यक्तिशः एकेका चळवळीचा कार्यवाहक आणि सघशः एकंदर कमीटी ही राष्ट्रीय सभेच्या एकंदर कामास सामुदायिक रीतीनें जबाबदार असली पाहिजे. या दृष्टीनें सध्यां फक्त एक खादीखातें तेवढेंच स्वतंत्र निर्माण करण्यांत आलें आहे. परंतु त्याप्रमाणेंच आणखी (१) अंतर्व्यवस्था [होम डि.] खातें. संघटना व अंतर्गत कारभार (सेक्रेटेरिएट) [२] स्वयंसेवक खातें [३] न्यायखातें [४] व्यापारखातें (५) जमाबंदी खातें [६] मजुरसंघटना खातें [७] परराष्ट्रीय खातें [८] पब्लिक वर्क्स खातें [९] धर्मसंघटना खातें.

काँग्रेसनें इतकीं खातीं पाडून त्या त्या खात्यावर एका स्वतंत्र सभासदाची नेमणूक करावीच. परंतु शिवाय ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच सभासदसुद्धां सध्याप्रमाणें बेजबाबदार सह्यागार ठेवूं नयेत. ह्यासाठीं ऑलइंडिया कॉंग्रेस कमिटीची पुनर्घटनासुद्धां झालीच पाहिजे आहे. वर्किंग कमिटीतील सभासदाच्या दिमतींत ऑ. इं. कॉं. कमिटींतील सभासदांपैकीं प्रत्येक प्रांतातर्फे एकेक सभासदाचें कौन्सिल देण्यांत यावें आणि ह्या कौन्सीलांतील प्रत्येक सभासद हा आपल्या प्रांतापुरता त्या खात्याचा प्रांतिक मुख्याधिकारी व्हावा. ह्या योगानें ऑ. इं. कॉं. कमिटींतील निदान एक तृतीयांश सभासद तरी जबाबदार कार्यकर्ते बनतील. ही परंपरा शक्य तितकी खालपर्यंत भिडविली पाहिजे."

स्वराज्यप्रस्थापनेचा प्रश्न नागपूर काँग्रेसमध्येंच मान्य झालेला होता आणि वस्तुतः त्यावेळींच अशी कांहीं तरी योजना अमलांत यावयास पाहिजे होती. परंतु ह्या दिशेनें कोठेंच, कांहींच प्रयत्न झाला नाहीं. आणि खुद्द मुंबईला युवराजांचे आगमनाचेवेळीं दंगा झाला तेव्हां ऐनवेळेला कॉंग्रेसतर्फे शांतता संरक्षणाचा परिणामकारक प्रयत्न तत्काळ सुरू करतां येणें अशक्य झालें. किंबहुना पुढेंहि शक्य झालें नाहीं. शांतता संरक्षणाचे प्रयत्न झाले व ते परिणामकारकहि झाले. परंतु ते प्रयत्न परिणामकारक होण्याचें कारण मात्र कॉंग्रेसची कार्यक्षमता हें नसून गांधींचें व्यक्तिमहात्म्य हेंच होतें. अशा संघटनेच्या अभावीं कार्यक-

मोतील एकेक भाग हातीं घेऊन आक्रमण करण्यांत आलेली जागा खंदक-खणून धरून धसण्याची योजना करतां आली नाहीं; अहिंसेच्या व्रीदामुळें अपरिहार्य झालेली शांतताप्रस्थापनेची जबाबदारी पार पाडण्यास लायक व भरपूर "स्वयंसेवक सर्वत्र उपलब्ध होऊं शकले नाहींत; स्वयंसेवक भरपूर मिळत, परंतु त्यांच्यांत सदिच्छा असे पण सुसंस्कारित आणि समंजस अशी कार्यक्षमता मात्र नसे. ह्याच कारणामुळें मजूर संघटनेचा प्रश्न शेवटपर्यंत मागेंच पडून राहिला. ग्रामसंघटनेसारखीं शांतपणें व जाहिरातीस्वरूपाचीं नसलेलीं कार्ये अजीबात राहून गेलीं; कॉंग्रेसचे सभासद व चरके हातमाग ह्यांस जागृत व चालू ठेवण्याचें जबाबदार साधन उरलें नाहीं. आणि अखेर बार्डोलीच्या माघारीनंतर उत्पन्न झालेलें श्रमशैथिल्य आणि अतथ्य वादविवाद ह्यांच्या योगानें कॉंग्रेसची इमारत पायासुद्धां हादरून गेली व सर्व कारभाराची अनवस्था झाली. संघटना असती तर कॉंग्रेसची इतकी हलाखी कधींच झाली नसती.

ह्या संघटनेच्या बाबतींत एका दृष्टीनें आक्षेपक असहकारी हे एकनिष्ठ असहकाऱ्यांपेक्षां अधिक दोषी आहेत. त्यांना एका वर्षात स्वराज्य व स्वराज्यस्थापना ह्या दोन्ही कल्पना फारशा मानवल्या नव्हत्या हें कबूल आहे, परंतु त्यांना अनत्याचार, पराकाष्ठेची सत्यनिष्ठा आणि ' दुबळेपणा ' ही सुद्धां मान्य नव्हतीं. उलट त्यांस मुत्सद्दिगिरीचा मार्गच श्रेयस्कर वाटत होता. म. गांधींच्या सत्यनिष्ठा व अहिंसा तत्वामुळें राजकारणांत एक प्रकारची सुरक्षितता पुष्कळ काळपर्यंत उत्पन्न झाली होती. ह्या सुरक्षिततेचा फायदा घेऊन अशा मुत्सद्यांनी वस्तुतः अत्याचारी, अनत्याचारी आणि सनदशीर जहाल ह्या तिन्ही चळवळींत सारख्याच उपयुक्त ठरणाऱ्या कित्येक चळवळी व संस्था दृढमूल करून घ्यावयास पाहिजे होत्या. अशा चळवळींपैकीं सर्वांत मुख्य स्वयंसेवकसंघ व शारीरिक शिक्षणाचे आखाडे ह्या होत्या. ह्या गोष्टी अनत्याचाराला विरोधी नाहींत, अत्याचाराला अत्यावश्यक आहेत आणि सनदशीर जहाल चळवळींत उपयुक्त आहेत. शिवाय मुत्सद्दिगिरीच्या दृष्टीनें पाहिलें तर असें सर्वांगसुंदर कार्य साधून घेण्याची ही संधि सर्वोत्कृष्ट होती. सर्वत्र नाहीं तरी निदान आपल्या हुकमतीतालील शिक्षणसंस्थांतून तरी त्यांना लष्करी पद्धतीची कवाईत व शारीरिक शिक्षण व संरक्षक आणि आक्रामक व्यायाम त्यांच्या शिक्षणांची सोय करणें अशक्य नव्हतें. परंतु शिक्षणाच्या ह्या अंगाची अत्यंत उपेक्षा करण्यांत आली

म. गांधींची अहिंसेची शपथ अगदीं प्रारंभीं पुढें आलेली नव्हती. आणि ती पुढें आल्यावर सुद्धां नडण्यासारखी नव्हती. कारण सद्धेतु व सत्कार्य ह्यांच्यापुढें तत्कालीन सत्याची किंमत नाहीं असेंच ह्या आक्षेपक पक्षाचें तत्वज्ञान आहे. तेव्हां मुत्सद्दिगिरीच्या दृष्टीनें पाहिल्यास शठं प्रति शाठयम् या तत्वाचा पुरस्कार करणारांना ह्यावेळींच मात्र म. गांधींच्या शपथेपुरती सत्याची व सदसद्विवेकबुद्धीची इतकी कार्यप्रतिबंधक मातब्बरी वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. इतर केव्हांहि येवढी निरपवाद नसलेली सत्यनिष्ठा ह्यावेळींच अशी जागृत कां व्हावी?

सत्यमूर्ति महात्मा गांधींशीं तरी प्रतारणा करूं नये असें आम्हांस वाटलें. हें ह्या प्रश्नाचें उत्तर असूं शकेल. परंतु अंतिम कार्याच्या दृष्टीनें हा प्रसंग म. गांधींशीं नसून हिंदी नोकरशाहीशीं होता; शठं प्रति शाठयम् हें तत्व अमलांत आणण्यास लायक असाच होता. हा मुद्दा सोडून दिला तरी उघडपणें महात्माजींच्या शपथेचा इनकार करून किंवा प्रत्यक्ष व्यवहारांत ती शपथ मुकाट्यानें गाळून आक्षेपकांस ही चळवळ हातीं घेतां आली असती. म. गांधींच्या नगाऱ्याच्या घाईपुढें आमच्या टिमकीचें कोणी कांहींच ऐकून घेतलें नसतें असेंच अखेर ह्या प्रश्नाचें उत्तर संभवतें. आणि ह्या कारणामुळेच ब्रिटिश मालाचा सार्वत्रिक बहिष्कार, परराष्ट्रीय चळवळ वगैरे कामें आम्हांला करतां आलीं नाहींत असेंच आक्षेपकांकडून सांगण्यांत येईल. परंतु आम्हांला बुद्धिवाद ( व तदनुषंगिक बुद्धिभेद ) करण्यापलीकडे दुसरें कांहींहि करतां येणें शक्य नव्हतें असेंच ह्या प्रश्नाचें खरेंखुरें उत्तर द्यावें लागतें. आणि मग हा बुद्धिवाद अत्यंत सद्धेतुमूलक व स्वाभाविक असला तरी तो कार्यप्रवर्तक नसून केवळ कार्यविघातक होता असेंच म्हणावें लागतें.

* * * *

## बुद्धिभेद

### विरोधाचें प्रस्थ माजविण्यांत पुरुषार्थ तो कोणता ?

विरोध हा अधिकच नेटाच्या प्रयत्नांची आवश्यकता आणि प्रयत्न करणाऱ्याच्या कर्तबगारीची योग्यता दर्शवितो, असें ह्या विचारसरणीवर उत्तरादाखल सांगण्यांत येईल. आम्हांला हें म्हणणें बहुतांशीं कबूल आहे. परंतु येथें विरोधाचा पाढा वाचण्यांत येत आहे ह्याचें कारण हेंच कीं, हे आक्षेप सहकारी, तटस्थ किंवा प्रतिपक्ष ह्यांच्याकडून घेण्यांत येत नव्हते. ते आक्षेप असहकारी

म्हणविणाऱ्या म. गांधींचें पुढारीपण व त्यांचें तत्व स्वीकारलेल्या अशा स्वपक्षीयांकडून घेण्यांत येत होतें. ह्यामुळें प्रारंभापासूनच म. गांधींच्या असहकारी पक्षांत अनुयायी असहकारी व आक्षेपक असहकारी असे उपपक्ष निर्माण झाले. प्रतिपक्षाकडून घेण्यांत येणारे आक्षेप उपेक्षेनें किंवा उत्तरानें हाणून पाडतां येतात. परंतु स्वकीयांकडून आक्षेप घेण्यांत येऊं लागले कीं तडजोड करावी लागते आणि बुद्धिभेद होतो. न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ॥२५-३ लोकसंग्रहासाठीं शहाण्यानीं अज्ञजनांचा

बुद्धिभेद करूं नये

असें जगत्श्रेष्ठ मुत्सद्दी भगवान श्रीकृष्ण ह्यांचें गीतेंतील तत्व आहे. परंतु लोकसंग्रह आणि मुत्सद्दिगिरी ह्या दोहोंवरच आपल्या राजकारणाची उभारणी करूं पाहणाऱ्या आक्षेपक असहकाऱ्यांनीं अगदीं अव्वलपासून अखेरीपर्यंत हा बुद्धिभेद करणारा बुद्धिवाद सुसंगतपणें, चिकाटीनें आणि अखंड चालू ठेवला. आणि तो अहिंसा, आत्मक्लेश, स्वराज्याची उभारणी, एक वर्षांत स्वराज्य, नियमित क्षेत्रांत कायदेभंग अशा अगदीं जिव्हाळ्याच्या बाबतींत.

अशा अंतस्थ विरोधकास म. गांधी स्पष्ट बजावीत होते कीं, " दोन परस्परविरोधी शक्ति समांतर रेषेंत जाऊं शकतील. परंतु एकाच दिशेकडे जाऊं शकणार नाहींत ! * * * ज्यांचा अहिंसेवर भरंवसा नसेल अथवा दोन्ही ( हिंसा व अहिंसा ) यांचा प्रवाह एकाच पात्रांतून वाहू शकेल असें वाटतें त्यांनीं स्वतःचा एक स्वतंत्र पक्ष बनवावा आणि ह्या वादाचा खुशाल निकाल लावून घ्यावा. त्यायोगानें असहकाऱ्यांचें काम विकट होईल. परंतु अतस्थ शत्रूशीं झगडण्याइतकें मात्र तें काम विकट होणार नाहीं. शरीर निर्विष राहलें पाहिजे. आंतल्या अंगांत कांहींहि अशुद्ध द्रव्य उत्पन्न झाल्यास ( Organic ) सेंद्रिय रोग उत्पन्न होईल व तो घातक ठरेल. बाहेरून होणारा आघात घातक होणार नाहीं. म्हणून यशःप्राप्तीची अगदीं पहिली आणि एकच अट आहे ती ही कीं, आपण स्वतःची प्रतारणा करतां कामा नये. " (यं. इं. १९-२-२१)

प्रत्येक मह्त्वाच्या मुद्यावर महात्मा गांधी अशाच रीतीनें बुद्धिभेदाचा निषेध करीत होते.

एस्. ई. स्टोक्स ह्यांनीं ह्या चळवळीच्या प्रारंभींच राष्ट्राला बजावून ठेविले होतें कीं, " हिंदुस्थानचा खरा पुढारी कोण, हें ठरवावयाचें माप आत्मश्रद्धा हेंच होय. * * * आपला हा आत्मविश्वास दुसऱ्यांच्याहि हृदयांत उत्पन्न कर-

ण्याचें सामर्थ्य ज्याला असेल तोच आपणास अखेरच्या मुक्कामावर नेऊन पोहोंचवील. अशा प्रकारच्या पुढाऱ्याची निकडीची जरूर हिंदुस्थानाला आज आहे आणि अशा प्रकारचा पुढारी आज त्याला लाभला आहे. त्या पुढाऱ्याला आज पाठिंबा न देणें म्हणजे राजकारणाच्या दृष्टीनें मोठीच घोडचूक करणें होय. ह्या पुढाऱ्याच्या कार्यक्रमांतील जो भाग आपणास संमत नसेल, तो चवाठ्यावर मांडून त्याची निषेधपूर्वक चर्चा करणें ही तर राष्ट्राच्या दृष्टीनें मोठीच हानिकारक गोष्ट आहे. आज दीर्घकाळानंतर पुरुषार्थी पुढारी आपणास लाभला आहे. तो प्रामाणिक आहे, निर्भय आहे आणि उज्वल देशभक्तहि आहे. त्याजवर सामान्य जनतेचा पूर्ण विश्वास आहे. आपलें ध्येय सामान्य जनतेला पटवून तिच्या ठिकाणीं उत्साह उत्पन्न करण्याचेंहि सामर्थ्यहि त्याच्या अंगांत आहे. नाना प्रकारच्या शंका आणि कुशंका काढून आणि अकारण भीतीनें त्याला आपण तोंडघशीं पाडलें, तर त्या कृतकर्माचा भयंकर पश्चात्ताप करण्याची वेळ खचीत येईल."

ही विचारसरणी कित्येकांस मुळींच रुचली नाहीं आणि त्यांच्याकडून "राजकारणाच्या दृष्टीनें मोठीच घोडचूक" घडलीच.

"हिंदुस्थानचें पुढारीपण स्वीकारण्यास महात्माजी योग्य आहेत किंवा नाहींत हा प्रश्नच संभवत नाहीं. हिंदुस्थान त्यांच्यामागें जाण्यास योग्य आहे कीं नाहीं आणि त्यांच्या आत्मश्रद्धेला एकनिष्ठपणें पाठिंबा देण्याची योग्यता हिंदी राष्ट्राच्या अंगीं आहे कीं नाहीं, इतकाच प्रश्न आहे."

"नाहीं" असेंच ह्या प्रश्नाचें उत्तर १९२२ च्या पहिल्या तिमाहींत हिंदुस्थानाला द्यावें लागलें. ह्याचें मुख्य कारण "राजकारणाच्या दृष्टीनें मोठीच घोडचुक" आम्हीं केली हें होय.

* * * * *

ह्या अंतस्थ विरोधाच्या अभावीं महात्माजींचा असहकार सर्वस्वी यशस्वी झालाच असता असें काहीं कोणाहि असहकाऱ्याला निश्चितपणें म्हणतां येईलच असें नाहीं. तरी पण इतकें मात्र खरें कीं, ह्या विरोधामुळें कांहीं प्रमाणांत तरी राष्ट्राचा बुद्धिभेद झाला, कार्याला कमीपणा आणि म. गांधींच्या अभिनव आणि अद्भुत क्रांतिकारक प्रयत्नांस परिणामकारक व्हावयास पूर्ण संधि मिळाली नाहीं.

### आक्षेपकांच्या वर्तीनें

येथपर्यंतचें विवेचन हें म. गांधींच्या कार्यक्रमाचा एकनिष्ठेनें पुरस्कार करणा-

रांच्या दृष्टीनें झालें. परंतु ह्या प्रश्नाला दुसरी एक बाजू आहे हें मात्र विसरून चालणार नाहीं.

दुसऱ्या बाजूचा पहिला मुद्दा हा आहे कीं, आक्षेपक असहकारी हे कांहीं जाणूनबुजून राष्ट्रघात करूं पाहणारे, अप्रामाणिक, अज्ञ, अंध किंवा वेडे नव्हते. त्यांना म. गांधींचीं तत्वें व कार्यपद्धती हीं बहुतांशीं मान्य नव्हतीं; परंतु म. गांधींचें विभूतिमत्व मात्र मान्य होतें. आणि म्हणूनच "न जाणो, म. गांधी अद्वितीय मार्गांनीं आपली असामान्य प्रतिज्ञा अंशतः तरी खरी करून पुष्कळसें राष्ट्रकार्य साधतील " असें त्यांस वाटलें आणि म्हणूनच त्यांनीं म. गांधींना कांहीं काळपर्यंत व आपल्या मतें अनिर्बंध अशी अनुभव घेण्यास संधि दिली व स्वतः हि त्या कामीं यथाशक्ति सहाय्य केलें. परंतु मनुष्यस्वभावच असा विलक्षण आहे कीं, त्याला आपल्या बुद्धि व भावना ह्यांस न पटणारे प्रकार जगांत राजरोसपणें चाललेले उघड्या डोळ्यांनीं पाहवत नाहींत. ह्या मनुष्यस्वभावास अनुसरूनच आक्षेपकांनीं गांधींच्या मतांना व मार्गांना शक्य तोंपर्यंत आपल्या मतांशीं व मार्गांशीं जुळवून घेण्याचा अंशतः यशस्वी प्रयत्न केला.

**आक्षेपकांचा विरोध हें मूलतः म. गांधींच्या असहकारितेच्या अपयशाचें कारण नसून म. गांधींच्या श्रेष्ठतम, अभिनव आणि म्हणूनच प्रयोगात्मक मार्गांचा सर्वस्वीं स्वीकार करण्याचे कामीं सामान्य मनुष्यस्वभाव किती अंशांनीं भिन्न, अपुरा आणि अज्ञ आहे ह्याचें तें लक्षण व प्रमाण होतें आणि आहे.** म. गांधी यांनीं जगातील अत्यंत श्रेष्ठ व भावीकाळांत जगावर राम-राज्य स्थापन करूं शकणाऱ्या परंतु आतांपर्यंत वैयक्तिक व स्थानिक स्वरूपांत व प्रमाणांत आणि नियमित क्षेत्रांत उपयोगांत आणल्या गेलेल्या तत्वांना राष्ट्रीय प्रमाणांत राजकारणाच्या क्षेत्रांत आणि सामुदायिक स्वरूपांत उपयोगांत आणून जगांत अभय क्रांति घडवून आणण्याचा प्रचण्ड, सुसंगत व तर्कशुद्ध प्रयत्न केला, पाशवी प्रवृत्तीनें होरपळून हलहलत असलेल्या जगाला अगदीं योग्य प्रसंगीं पुढें होऊन दैवी विचारसरणी व दैवी आचारसरणी शिकविण्याचा प्रयत्न केला. आणि सामान्य जनतेनें त्या प्रयत्नाला भरपूर पाठबळ दिलें. परंतु हें पाठबळ कितें व किती तात्त्विक आहे आणि कमजोर होतें व आहे तें दाखवून देण्याचें कार्य कमनशीबानें ह्या आक्षेपकांस करावें लागलें.

आतां एक वर्षांत स्वराज्य ह्या वायद्याच्या, कायद्याच्या आणि फायद्याच्या दृष्टीनें बोलावयाचें म्हणजे म. गांधींची कारकीर्द किंवा चळवळ अपयशी झाली, सर्वस्वी फसली असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु म. गांधींची असहकारितेची चळवळ केवळ एक वर्षांत स्वराज्य मिळवून देण्याकरितां नव्हती किंवा मुळांतच ती एक वर्षांत स्वराज्य मिळवून देण्याकरितां सुरू झालेली नव्हती.

## अपयशांतील यश.

गांधींची असहकारितेची चळवळ प्रथम सुरू झाली ती खिलाफतीकरितां; मागाहून ह्या कारणांत पंजाबच्या गार्‍हाण्यांची भर पडली आणि अखेर जेव्हां हीं दोन्ही गार्‍हाणीं सर्वस्वी, समाधानकारक रीतीनें सुटावयास हिंदुस्थान स्वराज्य-संपन्न करण्यावांचून गत्यंतर नाहीं असें पुष्कळांस वाटलें व म. गांधींस पटलें तेव्हां त्यांनीं असहकारितेच्या ह्या दोन कारणांचेंहि आद्यकारण म्हणून स्वराज्य हें असहकारितेचें एक कारण व एकच ध्येय ठरवून टाकिलें.

असहकारितेच्या यशापयशाची मीमांसा पहिल्या दोन कारणांकडे पाहूनच करावयाची असेल तर असहकारिता पुष्कळच अशानीं वगभंगविरोधी चळवळी-इतकीच यशस्वी झाली असें म्हणावें लागतें. खिलाफतीचा प्रश्न हा द्विदल प्रश्न होता. खुद्द खिलाफत–कॉंस्टंटिनोपल येथील मुसलमानी धर्मसत्ता व तदनुषंगिक राजसत्ता हें एक दल आणि मुसलमानी धर्मक्षेत्रांचें–पॅलेस्टाइन् मेसापोटेमिया वगैरेचें स्वातंत्र्य हें दुसरें दल. खिलाफत व धर्मस्थळें ह्यांतील खिलाफत आतां सुरक्षित झाली असल्यामुळें तेवढ्या पुरती तरी असहकारिता यशस्वी झालीच आहे. आतां ह्या द्विदल प्रश्नांतील पहिलें दल मुस्ताफा केमाल यांच्या घोडदळ पायदळ सैन्यानें सुरक्षित ठेविलें आहे. गांधींच्या खद्दरबहाद्दरांनीं राखलें नाहीं असें ह्यावर सांगण्यांत येतें. परंतु हा युक्तिवाद भ्रामक आहे. गांधी अलीबंधूंच्या खद्दर–वीरांनीं कर्झन लॉईड् जॉर्ज ह्यांची रग जिरविली नाहीं. हें जसें व जितकें खरें आहे तसें व तितकेंच हेंहि खरें आहे कीं, मुस्ताफा केमालच्या घोडदळपायदळानें हिंदुस्थानालाहि कांहीं शह दिला नव्हता. असें असूनहि हिंदुस्थान सरकारनें ह्या प्रश्नावर लॉर्ड कर्झन संतापून व हताश होऊन बेफाम बरळूं लागण्याइतका जो जोर दाखविला तो सारी गांधींच्या चळवळीनेंच ना ! तटस्थ राष्ट्रांतील लोकमतजागृति, ब्रिटिश साम्राज्यांतील अंतर्गत स्फोटाची भीति, आणि स्थानिक, जातीय व तत्कालीन फायद्यांमुळें खुद्द सर्वस्वी मुसलमानी राष्ट्रांकडूनहि जें नैतिक पाठबळ मिळेना,

उलट प्रत्यक्षविरोधच झाला तें नैतिक पाठबळ केवळ हिंदुस्थानानेंच तुर्कस्थानाला दिलेंना ? ह्या सर्व गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे खिलाफतीच्या संरक्षणासाठीं केलेल्या मदतीचें स्वरूप खुलासेवार व्यक्त झाल्यावांचून रहात नाहीं. ह्यापेक्षां ज़ास्त सहाय्य करणें आणि मुसलमानी धर्म क्षेत्रांच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांत सहाय्य करणें फक्त स्वतंत्र हिंदुस्थानालाच शक्य आहे.

आतां तें " विसरा आणि क्षमा करा " असें वृद्ध बादशाहीकाकांनीं सर्वांस विनविलें ह्यासुद्धां पंजाबच्या प्रश्नावर हिंदुस्थाननें मिळविलेला विजय कांहीं अगदींच अपुरा नाहीं. किंबहुना नेमस्त तर ह्या प्रश्नावर आतां सरकारनें माघार घेण्याइतकें कांहीं उरलेलें नाहीं असें म्हणतच आहेत परंतु कित्येक राष्ट्रीयसुद्धां ह्या प्रश्नावर आतां लढत राहण्याचें कारण नाहीं असें म्हणत आहेत. कांहीं अधिकाऱ्यांचीं पेन्शनें बंद करणें एवढीच त्या प्रकरणांत बाकी राहिली आहे. मेलों तरी हरकत नाहीं; पण चुकी कबूल करणार नाहीं अशा प्रकारची एक द्वेषी, खुनशी, आततायी वृत्ति हिंसा-वादी लोकांत अगदीं अपरिहार्य असते. आणि म्हणूनच जोंपर्यंत ब्रिटिश लोक अहिंसावादी बनले नाहींत किंवा हिंदुस्थान ह्या बाबतींत त्यांच्याहूनहि प्रबळ हिंसावादी बनलेलें नाहीं तोंपर्यंत याहून जास्त कांहीं लाभ मिळवितां येणें शक्य नाहीं. म्हणजे कोठूनहि हिंदुस्थान स्वराज्यसंपन्न झाल्यावांचून राहिलेले यश पदरांत पडणें शक्य नाहीं.

हरदासाची कथा जशी अखेर मूळपदावर येते तशीच ह्या असहकारितेची कल्पना कोठेंहि व कितीहि लांबविली तरी अखेर ती स्वराज्यावरच परतल्यावांचून राहत नाहीं. आणि ह्या स्वराज्याच्या उद्देशांत असहकारिता फसली असली तरी खुद्द पहिल्या दोन उद्देशांत ती सफल झाली आहे हेंहि खरेंच आहे.

आतां हें यश 'कट्टर' असहकारितावादी कदाचित् यशच नव्हे असें म्हणूं शकतील परंतु असहकारितेवर तितकीशी श्रद्धा नसणारे प्रतियोगी असहकारितावादी मात्र हें यश नाकारूं शकणार नाहींत. येथें थोडेंसें विपर्यांतर करून असहकारिता व प्रतियोगी असहकारिता ह्यांच्या अर्थांचा व व्याप्तीचा विचार करणें अगदींच अप्रस्तुत होणार नाहीं.

असहकार ( नॉन. कोऑपरेशन ) आणि प्रतियोगी सहकार ( रिस्पॉन्सिव्ह को ऑपरेशन ) ह्यांच्यांत मुख्य फरक हा आहे कीं, असहकारिता फक्त 'प्रकार' मानते व जाणते. प्रतियोगी सहकारिता ' प्रकार ' आणि ' प्रमाण ' हीं दोन्हीं एकदमच जाणते व मानते. असहकारिता निरपेक्ष, निर्भेळ आणि निश्चित असते.

प्रतियोगी सहकारिता सापेक्ष, वाहती आणि नित्य परिवर्तनशील असते. ह्याचें स्पष्टीकरण असें आहे कीं, असहकारिता ह्या शब्दानें दर्शविलेलें धोरण दिल-सफाई किंवा घेदिली ह्या दोनच अवस्था जाणतें आणि जोंपर्यंत तुमचा सर्वस्वी वृत्तिपालट होऊन तुम्हीं दिलसफाई करणार नाहीं तोंपर्यंत तुमचा आमचा कांहीं संबंध नाहीं असें म्हणतें; म्हणजे येथें फक्त तुमच्या आमच्यांत सहकारिता किंवा असहकारिता ह्याच आणि फक्त एकच प्रकार शक्य आहे. ह्यांत आणखी प्रमाणें किंवा अंश नाहींत. परंतु प्रतियोगी सहकारिता अशी निरपेक्ष नाहीं, निर्मेळ नाहीं किंवा निश्चित नाहीं. केवळ ' जशास तसें ' ह्या शब्दांनीं प्रतियोगी सहकारितेचा पुरा अर्थ व्यक्त होत नाहीं. त्यांत आणखी अंश किंवा प्रमाणें असतात. त्यांत आणखी " जेवढयास तेवढें " ह्या कल्पनेचाहि समावेश होतो. म्हणजे तुम्हीं ठोसा दिल्यास मीहि ठोसा देईन. तुम्हीं स्वस्थ राहिल्यास मीहि स्वस्थ राहीन, तुम्हीं दिलजमाईसाठीं फक्त दोनच पावलें पुढें आल्यास मीहि फक्त दोनच पावलें तुमच्याशीं आणखी पुढें येईन. 'जेवढें' तुम्ही याल किंवा घ्याल ' तेवढें ' मीहि देईन किंवा घेईन. म्हणजे येथें सापेक्षता आली, वाह-तेपणा आला, क्षणभंगुरता आली. प्रतियोगी सहकारितेची मूळ कल्पना कायम ठेवूनहि तिला प्रतियोगी असहकारिता श्री. केळकर म्हणूं शकतात ह्याचें कारण तरी ही सापेक्षता म्हणजेच परावलंबन, ही सळमिसळ आणि ही प्रत्येक उपप्रश्नाचे वेळीं बदलूं शकणारीच नव्हे तर बदलणें संभवनीय किंवा अवश्य असणारी अनिश्चितता हेंच आहे. ह्यांत डाव टाकण्याचें काम ( Initiative ) आपणाकडे राहत नाहीं; आपली क्रिया नेहमीं प्रतिक्रिया ( Response ) च असणार आणि तिचा प्रकार व प्रमाण हीं मूळ क्रियेच्या प्रकारावर व प्रमाणावर अवलंबून राहणार.

हा केवळ शब्दच्छलहि नव्हे किंवा शब्दांचा खेळहि नव्हे. हा भेद फार महत्वाचा आहे. रौंड टेबल कॉन्फरन्सचें बोलणें सुरु असतांना पं. मालवीय ह्यांच्या मार्फत सूचविण्यांत आलेल्या अटी झिटकारून म. गांधींनीं राष्ट्रकार्याचा " चुथडा " (Bungling ) कां केला व मालवीय परिषदेच्या वेळीं नेमस्त व स्वतंत्र पक्षाशीं तडजोड करण्याचें कां नाकारलें, गांधी सुधारणांच्या गोष्टी बोलणें सोडून नोकरशाहीची शुद्धि तरी करूं किंवा श्राद्ध तरी करूं ( Ending or mending ) असेंच कां बोलूं लागले, इंडेम्निटी बिलाला त्यांनीं संमति

कों दिली अशा अनेक कोडयांचा उलगडा ह्या दोन कल्पनांतील मूलभूतभेद लक्षांत आला म्हणजे सहजच होऊन जातो.

असहकारिता फक्त प्रकार जाणते प्रमाण जाणत नाहीं. ह्यामुळेंच असहकारिता आणे आणि पावले हिशेबांत घेऊं इच्छित नाहीं. असहकारिता पावलांचा हिशेब करीत नाहीं. सरकार चार पावलें माघार घेत आहे काय, दोन पावलें पुढें येऊन दोन आंगळें नमतें घेत आहे काय ? असलें प्रमाण असहकारितेला नको आहे. असहकारितेला हृदयपालट ( Change of heart ) पाहिजे असतो. जेथें हृदयपालट नाहीं तेथें केवळ सरकार चार आणे स्वराज्य देत आहे, चार पावलें माघार घेत आहे, सुनेला लागावें म्हणून लेकीला बोलून लोकांना ठकवूं पाहणाऱ्या सासूप्रमाणें कांहीं लहानसहान अधिकाऱ्यांना बडतर्फ करीत आहे किंवा दंड करीत आहे येवढया गोष्टीवर खूष होऊन आपणहि तेवढया पुरतें हात पसरून, दोन पावलें पुढें टाकावीत किंवा संतोषून अथवा संतापून जावें ह्यांत कांहींच अर्थ नाहीं. ह्यांत हृदयपालट नाहीं, पश्चात्ताप नाहीं. ह्यांत फक्त नाइलाज व डावपेंचच आहेत. स्वराज्यापेक्षां सुद्धां म. गांधी ब्रिटिशांच्या हृदयपालटाला जास्त महत्व देत ह्याचें कारण तरी हेंच कीं, हृदयपालट होऊन झालेलें कृत्यच टिकाऊ होईल.

शुद्ध असहकारितेला जरूर असणारा हा हृदयपालटाचा किंवा नोकरशाहीची शुद्धि किंवा श्राद्ध ( आणि खरें म्हटलें तर शुद्धि म्हणजेच श्राद्ध ) करण्याचा प्रयत्न फसला हें आम्हीं प्रथमच कबूल केलें आहे. परंतु प्रतियोगी सहकारितेच्या प्रमाणात्मक ( by digrees ) दृष्टीनें हा प्रयत्न सर्वस्वी फसला असें मुळींच म्हणतां येणार नाहीं.

कौन्सिलें, पदव्या, शाळा, कोर्टें ह्यांजवरील बहिष्कार, परदेशी मालावरील बहिष्कार, मद्यपाननिषेध ह्यांमुळें त्या त्या संस्था ओस पडल्या नाहींत हें जरी खरें असलें तरी त्या त्या संस्थांवर त्यांचा किती परिणाम झाला तें सरकारी रिपोर्ट, खास तज्ञांचे अभिप्राय व प्रत्यक्षस्थिती ह्यांवरून दिसून येतेंच.

कौन्सिलें हीं तमाशेवजा झालीं; पदव्या ह्या जर्मनीच्या खेळण्यांसारख्या पोरखेळच नव्हे तर उपहासास्पद व नालायकीच्या थर्मामिटरवजा झाल्या, शाळा ह्या " इंग्लंड देशांत, लंडन राजधानी " म्हणून घोकणाऱ्या पोरांच्या हमालखान्याऐवजीं ' गांधी महाराज की जय ' म्हणून जयजयकार करणाऱ्या भावी नागरिकांचे कोंडवाडे बनल्या आहेत, न्यायमंदिरें हीं क्रीडांगणें आणि सुरुंगखाने हीं विश्रांति गृहें बनलीं आहेत.

ज्या सुधारलेल्या भाषेंत इभ्रत, स्पष्ट भाषेंत दरारा आणि ' डायरी ' भाषेंत धाक म्हणतां येईल तो ब्रिटीश सरकारचा, गोऱ्या माणसाचा आणि सरकारी शिक्याचा दरारा आतां मुळींच उरलेला नाहीं. असिस्टंट कलेक्टरपासून व्हाइसरॉयपर्यंत प्रत्येक दर्जाच्या अधिकाऱ्याला आणि कोणत्याहि सरकारी खात्याला आतां आपण केवळ " सरकारी " आहोंत येवढ्यावर कोठेंच कांहींच खास किंमत उरलेली नाहीं. सरकारचें नैतिक बळ म्हणजेच लोकांवरील नैतिक दरारा तो जवळ जवळ सर्वस्वीं नष्ट झाल्या सारखा आहे.

फल-श्रुति.

" कोणत्याहि धडधाकड मनुष्याला इतर सर्व मनुष्यांशीं सर्व बाबतींत परिपूर्ण आणि अखंड मतैक्य असल्यानें होणारे भीषण क्लेश सहन होणार नाहींत. म्हणून एकंदर कलहच कसा टाळतां येईल असा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. अमानुषीपणा आणि सूडबुद्धि ह्यांच्यापासून तो अलिप्त ठेवून त्याला अधिकाधिक उदात्त आणि आपला मानसिक व नैतिक विकास झालेला आहे असें वाटणाऱ्या स्त्रीपुरुषांना शोभेल असें स्वरूप कसें द्यावें हाच प्रश्न आहे. "

( प्रो. केज. )

ह्या प्रश्नाचें उत्तर म. गांधींनीं दिले आहे.—

" गांधी ह्यांनी जो हा अप्रतीकाराचा कार्यक्रम आंखून दिला आहे, त्यांतच त्याच्या स्वरूपाचा विश्वव्यापीपणा मला दिसून येतो, आपल्या सांप्रतच्या रचनेंत भयंकर अडचणी आज साऱ्या जगभर उपस्थित झाल्या आहेत त्या साऱ्या नाहींशा करण्याचें सामर्थ्य या कार्यक्रमांत मला दिसतें. हा कार्यक्रम गांधींनीं आपल्या देशापुरता आणि हिंदी लोकांपुरताच लागू केला आहे. पण ह्या मानवी सरहद्दी ओलांडून न जाण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. "

* * * * *

"म. गांधींनीं बुद्ध-ख्रिस्तापासून थोरो-टॉलस्टॉयपर्यंतच्या एकंदर विभूतींनीं आणि तत्वज्ञान्यांनीं आचारांत व विचारांत पुरस्कार केलेल्या ह्या मार्गाला अगदीं आजकालच्या परिस्थितींत उपयोगी पडेल असें तात्विक व व्यावहारिक स्वरूप दिलें आहे. आणि " जगाच्या इतिहासांत अद्वितीय असें निःशस्त्रप्रतीकाराचें व अनत्याचारी सक्तीचें अगदीं नवें स्वरूप आपणापुढें व्यक्त केलें आहे." * * * ह्या विवक्षित कार्यांत यश येवो किंवा अपयश येवो गांधींनीं ह्या तत्वाला राष्ट्रीय आणि संस्मरणीय स्वरूप दिलें आहे. आणि जगांतील कित्येक

राष्ट्रांचें व सर्व विचारवन्तांचें लक्ष ह्या नव्या मार्गाकडे खेंचलें आहे." (प्रो. केज्)

* * * *

"मानवी जातीच्या डोक्यांत कांहीं शहाणपण शिल्लक असेल, तर पाशवी शक्तीचें युग अस्तास गेलें असून शांति आणि बंधुभाव यांचें युग उदयास येत आहे, ही गोष्ट तिच्या ध्यानीं येईल." (रे० जॉन हेन्स होम्स्)

* * * *

* * *

जगाला मार्गदर्शक होण्याच्या प्रयत्नांत म. गांधीनीं हिंदुस्थानचें कांहीं अनहित केलें आहे असेंहि नाहीं. उलट राष्ट्रीयत्व, स्वातंत्र्यप्रियता, जरूर त्या स्वार्थत्यागाची तयारी हीं इतक्या प्रचण्ड प्रमाणावर वाढविलीं आहेत कीं, गांधींच्या ह्या 'जगनिराळ्या' नव्या मार्गाऐवजीं जुन्याच मार्गानें जाणाऱ्या कोणत्याहि मोठ्यांत मोठ्या पुढाऱ्यानें याहून कांहीं जास्त कामगिरी बजावली असती असें मुळींच म्हणतां येत नाहीं.

* * *

गांधीनीं ब्रिटिश सत्तेचा नैतिक पाया इतका पोखरून टाकला आहे, कॉंग्रेसचा व लोकपक्षीय चळवळीचा पाया इतका मजबूद घातला आहे, लोकमत-जागृति इतकी प्रचण्ड प्रमाणावर केली आहे, स्वार्थत्याग, सुखत्याग व सर्वस्व-त्याग ह्यांचीं अशीं कांहीं अद्वितीय उदाहरणें राष्ट्रापुढें ठेविलीं आहेत व राष्ट्राला त्यांचें इतकें सुसंगत शिक्षण दिलें आहे कीं, ह्यापुढें कोणत्याहि मार्गानें स्वराज्य-प्राप्ति करून घेऊं पाहणाऱ्या दुर्लभ अशा योजकाचा मार्ग अगदीं सुलभ करून ठेविला आहे. फक्त शुद्ध कार्यनिष्ठा, निर्भेळ धैर्य आणि निर्मळ पुढारीपण ह्यांचीच उणीव आहे.

* * *

सर्व जगाचें लक्ष हिंदी राजकारण, हिंदी तत्वज्ञान आणि हिंदुस्थान ह्यांजकडे वेधून जगातील विचारवन्तांस नवयुगाची आशा लाविली आहे. आणि म्हणूनच व्हिन्सेंट अँडरसन (न्यू यॉर्क हेरल्ड) ह्यांच्या शब्दांत गांधींच्या यशापयशाचा विचार करतांना अखेर असें म्हणावें लागतें कीं,—

"मानवजातीचा तारक म्हणून म्हणवून घेण्याचें भाग्य आज गांधींना प्राप्त झालें नसेल; तरी भविष्यकाळाचा मार्गदर्शक ह्या नात्यानें तरी त्यांचें नांव अजरामर होऊन जाईल.

## गांधींचें अवतार कार्य.

संहारावांचून जगांतील अस्वस्थतेचा उपसंहार व्हावा, हेंच म. गांधींचें अवतार कार्य आहे.

म. गांधींची असहकारिता हें राजकारण नसून तो धर्म आहे.

असहकारिता हा धर्म तत्वप्रधान नसून आचार प्रधान धर्म आहे.

म. गांधींचा धर्म हा ईश्वरधर्म नाहीं, पूजाधर्म नाहीं, परलोकधर्म नाहीं.

म. गांधींचा धर्म हा व्यवहार धर्म आहे, नीतिधर्म आहे; कर्तव्यकर्म आहे.

म. गांधींचा धर्म हा हिंदु धर्म, बुद्ध धर्म, ख्रिस्ती धर्म, इस्लामी धर्म अशा विविध धर्मांना आणि पंथांना विरोधी धर्म नसून त्या सर्वांना समाधिष्ठान देणारा धर्म आहे.

**सत्य** हें गांधी धर्माचें अधिष्ठान आहे.

**अहिंसा** हें गांधी धर्माचें स्वरूप आहे.

**शांति** हें ह्या धर्मातील **स्थैर्य** आहे आणि प्रेम हें ह्या धर्मातील **चैतन्य** आहे.

**सेवा** हें ह्या धर्माचें लक्षण आहे आणि **स्वार्थत्याग** ही ह्या धर्माची कसोटी आहे.

मानवी साध्यसाधनविषयक आचारविचारांची पुनर्घटना हें ह्या धर्माचें साध्य आहे आणि हिंदी स्वराज्य हें ह्या पुनर्घटनेचें साधन आहे.

समाप्त.

# श्री. सीताकान्त यांचीं पुस्तकें.

## नवजीवन माला.

१ सामर्थ्य, समृद्धि व शांति
२ सामर्थ्य संवर्धन
३ संजीवनी विद्या
४ शक्तिसंरक्षण

## लघु नवजीवन माला.

५ सुलभ व्यायाम
६ संवयी
७ रोगहारक व्यायाम

## राष्ट्र-जीवन माला.

८ स्वराज्याचा उषःकाल
( लोकमान्यांचीं व्याख्याने )
९ मार्ग व मार्गदर्शक

## चरित्र-माला.

१० महात्मा गांधी ( छोटें )
११ लाला लजपतराय
१२ देवी सरोजिनी
१३ म. गांधी ( मोठें )

## सर्व सामान्य.

१४ 'डॉक्टरांकडे तरी जा' !
१५ आरोग्य-सप्तक
१६ फिजी
१७ शांताराम
१८ भयंकर सुरा
१९ घंडू काकांचें लग्न
२० फुप्फुसशक्तिसंवर्धन

## १९२४ सालचीं पुस्तकें.

१ आत्मोन्नति
२ आरोग्य चिंतामणी
३ मानस-चिकित्सा
४ सत्तावनचा शिलेदार